महामुनि आदिकवि श्रीवाल्मीकिप्रणीत

# श्रीरामायण महाकाव्य

[ तृतीय भाग ]

( ३ )

# अयोध्याकाण्ड



(उत्तरार्ध)

(मराठी भाषांतर व निरीक्षण यांसह)

संपादक
श्रीपाद दामोदर सातवळेकर
अध्यक्ष, स्वाध्याय-मंडळ, औंध ( जि० सातारा )



प्रथम संस्करण
विक्रम-संवत् २००२, शालीवाहन शक १८६७, इ०सन १९४६

मूल्य ४) रु०

# अयोध्याकाण्ड

## ( उत्तरार्ध )

---

युद्धजन्य परिस्थितीमुळें हा विभाग योग्य वेळीं प्रकाशित होऊं शकला नाहीं व या भागाला पांढरा कागदही मिळूं शकला नाहीं, याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. पुढील विभाग पांढऱ्या कागदावर छापले जातील व शक्यतों लौकरही प्रकाशित होतील.

औंध
१ पौष विक्रम-संवत् २००२  —प्रकाशक

## श्रीवाल्मीकि रामायणान्तर्गत

# अयोध्याकांड उत्तरार्धाची विषयानुक्रमणिका

# रामायण-चरित्र-माला



# अयोध्याकांड-उत्तरार्धाचें निरीक्षण

महामुनि-वाल्मीकि-प्रणीतं

# श्री रा मा य ण म् ।

## अयोध्याकाण्डम् ।

### ( उत्तरार्धः )

षट्पञ्चाशः सर्गः ।

अथ रात्र्यां व्यतीतायामवसुप्तमनन्तरम् ।
प्रबोधयामास शनैर्लक्ष्मणं रघुपुङ्गवः १
सौमित्रे शृणु वन्यानां वल्गु व्याहरतां स्वनम् ।
संप्रतिष्ठामहे कालः प्रस्थानस्य परंतप २
प्रसुप्तस्तु ततो भ्रात्रा समये प्रतिबोधितः ।
जहौ निद्रां च तन्द्रां च प्रसक्तं च परिश्रमम् ३

---

रात्र संपून, दिवस उजाडला, तरीहि गाढ निद्रा* घेत असलेल्या लक्ष्मणाला तो रघुवंशांतील श्रेष्ठ पुरुष राम हळूहळू जागें करीत म्हणाला, " हे लक्ष्मणा ! या वनांतील पक्षी किलबिल करूं लागले आहेत, त्यांचा शब्द ऐक. शत्रुतापना लक्ष्मणा ! रात्र संपली असल्यानें आपण आतां पुढील मार्ग चालू लागूं; कारण आपली निघावयाची वेळ झाली आहे. " अशा रीतीनें आपल्या गाढ झोपीं गेलेल्या लक्ष्मणाला त्याच्या बंधूनें, रामानें, अगदीं वेळेवर जागें करतांच, लक्ष्मणानें आपली निद्रा व आळस टाकून दिला व तो उठला. आतांपर्यंत झालेल्या त्याच्या श्रमांचा परिहार झालेलाच होता. ( १-३ )

---

* यावरून लक्ष्मणानें चवदा वर्षेपर्यंत झोप घेतली नाहीं, असा जो लोकप्रवाद आहे, तो इतर रामायणांत अदृष्ट असून याच्या या विधानावरून काल्पनिक आहे, असें सिद्ध होतें.

तत उत्थाय ते सर्वे स्पृष्ट्वा नद्याः शिवं जलम्।
पन्थानमृषिभिर्जुष्टं चित्रकूटस्य तं ययुः ४
ततः संप्रस्थितः काले रामः सौमित्रिणा सह।
सीतां कमलपत्राक्षीमिदं वचनमब्रवीत् ५
आदीप्तानिव वैदेहि सर्वतः पुष्पितान्नगान्।
स्वैः पुष्पैः किंशुकान्पश्य मालिनः शिशिरात्यये ६
पश्य भल्लातकान्बिल्वान्नरैरनुपसेवितान्।
फलपुष्पैरवनतान्नूनं शक्ष्याम जीवितुम् ७
पश्य द्रोणप्रमाणानि लम्बमानानि लक्ष्मण।
मधूनि मधुकारीभिः संभृतानि नगे नगे ८
एष क्रोशति नत्यूहस्तं शिखी प्रतिकूजति।
रमणीये वनोद्देशे पुष्पसंस्तरसंकटे ९
मातङ्गयूथानुसृतं पक्षिसंघानुनादितम्।
चित्रकूटमिमं पश्य प्रवृद्धशिखरं गिरिम् १०

नंतर त्या सर्वांनीं उठून पुण्यप्रद अशा यमुना नदींत स्नान वगैरे केलें व ते सर्व ऋषींनीं अवलंबन केलेल्या अशा चित्रकूट पर्वताच्या मार्गानें निघाले. तेव्हां अशा प्रातःसमयीं लक्ष्मणासह पुढील मार्ग आक्रमण करण्यास निघालेला राम कमलपत्राप्रमाणें नेत्र असलेल्या सीतेला म्हणाला, ' हे सीते! वसंतऋतूंत स्वतःच्या फुललेल्या फुलांच्या योगानें, ज्यांनीं स्वतःच त्या फुलांच्या माळा घातलेल्या दिसत आहेत, अशा प्रकारचीं सर्वही बाजूंनीं फुललेलीं पळसाचीं हीं झाडें पहा. हे पहा. हे भल्लातक व बिल्ववृक्ष फलांफुलांमुळें किती वाकलेले आहेत. यांच्या फलाफुलांचा उपभोग कोणाही मनुष्यांनीं अजून घेतलेला नाहीं. अरे लक्ष्मणा! ही पहा मधमाशांनीं तयार केलेली मधाचीं अति प्रचंड मोहोळीं कशीं प्रत्येक वृक्षावर लोंबत आहेत! हा इकडे पाणकावळा ओरडत आहे व त्याच्या ओरडण्याचा शब्द ऐकून, त्याला प्रतिशब्द म्हणून या फुलांच्या ताटव्यांनीं भरगच्च भरलेल्या रमणीय वनामध्यें मोर ओरडत आहेत. (४-९)

हा पहा, इकडे उंच उंच शिखरें असलेला चित्रकूट पर्वत. याच्यावर हत्तींचे

समभूमितले रम्ये द्रुमैर्बहुभिरावृते ।
पुण्ये रंस्यामहे तात चित्रकूटस्य कानने　　११
ततस्तौ पादचारेण गच्छन्तौ सह सीतया ।
रम्यमासेदतुः शैलं चित्रकूटं मनोरमम्　　१२
तं तु पर्वतमासाद्य नानापक्षिगणायुतम् ।
बहुमूलफलं रम्यं संपन्नसरसोदकम्　　१३
मनोज्ञोऽयं गिरिः सौम्य नानाद्रुमलतायुतः ।
बहुमूलफलो रम्यः स्वाजीवः प्रतिभाति मे　　१४
मुनयश्च महात्मानो वसन्त्यस्मिञ्शिलोच्चये ।
अयं वासो भवेत्तात वयमत्र वसेमहि　　१५
इति सीता च रामश्च लक्ष्मणश्च कृताञ्जलिः ।
अभिगम्याश्रमं सर्वे वाल्मीकिमभिवादयन्　　१६
तान्महर्षिः प्रमुदितः पूजयामास धर्मवित् ।
आस्यतामिति चोवाच स्वागतं तं निवेद्य च　　१७

---

कळप आहेत. तसेंच यावर सर्वत्र पक्ष्यांच्या थव्यांचे शब्द सारखे घुमत असतात. हे लक्ष्मणा ! नाना प्रकारचे वृक्ष असलेल्या या रम्य, पवित्र व सपाट अशा या चित्रकूट पर्वतावरील वनामध्यें आपण आनंदानें कालक्रमण करूं. ( १०-११ )

नंतर ते पादचारी राम-लक्ष्मण सीतेसह त्या मनोहर व रम्य अशा चित्रकूट पर्वताजवळ गेले. अनेक तऱ्हेच्या पक्ष्यांचे समूह, मुबलक फळेंमुळें आणि रुचकर पाणी, हीं सर्व यथेच्छ असलेल्या त्या चित्रकूट पर्वतावर गेल्यावर, राम लक्ष्मणास म्हणाला, " हे सौम्या ! नाना जातींच्या लता व वृक्ष आणि विपुल फळेंमुळें यांनीं संपन्न असलेल्या या पर्वतावर उपजीविकेचीं चांगलींच साधनें आहेत, असें मला दिसतें. हे लक्ष्मणा ! या पर्वतावर महात्मे व मुनि वास्तव्य करीत आहेत. म्हणून आपणांलाही हें निवासस्थान चांगलेंच आहे. तेव्हां आपण आतां येथेंच वास्तव्य करूं. " ( १२-१५ )

याप्रमाणें बोलत बोलत राम, लक्ष्मण व सीता असे तिघेही वाल्मीकि मुनींच्या

*

ततोऽब्रवीन्महाबाहुर्लक्ष्मणं लक्ष्मणाग्रजः ।
संनिवेद्य यथान्यायमात्मानमृषये प्रभुः १८
लक्ष्मणानय दारूणि दृढाणि च वराणि च ।
कुरुष्वावसथं सौम्य वासे मेऽभिरतं मनः १९
तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिर्विविधान्द्रुमान् ।
आजहार ततश्चक्रे पर्णशालामरिंदमः २०
तां निष्ठितां बद्धकटां दृष्ट्वा रामः सुदर्शनाम् ।
शुश्रूषमाणमेकाग्रमिदं वचनमब्रवीत् २१

आश्रमांत येऊन पोहोचले व त्यांनीं वाल्मीकि * मुनींना अभिवंदन केलें. त्या धर्मज्ञाच्या महर्षींनींही आनंदित होऊन त्यांचें योग्य पूजन केलें. नंतर स्वागतपर कुशल प्रश्न झाल्यावर मुनींनींही त्यांना "बसा" म्हणून सांगितलें. (१६–१७)

नंतर आपण कोण आहों, हें त्या मुनींना योग्य प्रकारच्या शब्दांत निवेदन करून, तो महापराक्रमी व बलवान् राम लक्ष्मणास म्हणाला! "हे लक्ष्मणा, जा व भक्कम व उत्कृष्ट प्रकारचीं लाकडे घेऊन ये. हे सौम्या! आपणांस राहण्यासाठीं एखादी जागा (निवासस्थान) तयार कर. याच ठिकाणीं वास्तव्य करावें, असें माझ्या मनाला वाटत आहे." (१८–१९)

रामाचें तें भाषण ऐकून, शत्रुदमन लक्ष्मणानें निरनिराळ्या प्रकारचे वृक्ष (लाकडें) आणून एक पर्णकुटी तयार केली. तेव्हां त्या ठिकाणची ती चांगल्या रीतीनें उभारलेली आणि पाऊस आंत न यावा म्हणून, त्यावर गवती छपऱ्या घातलेली

* हे वाल्मीकिमुनि रामायण ग्रथित करणाऱ्या प्राचेतस् वाल्मीकि मुनीहून भिन्न होते, असें टीकाकार म्हणतात व हें त्यांचें म्हणणें कांहीं अंशीं संभवत आहे. असें तिलक टिकाकार एकटाच म्हणत आहे; पण त्याला प्रमाण कांहीं देत नाहीं अर्थात् हें म्हणणें ग्राह्य नाहीं. गोविंदराज या टीकाकाराच्या म्हणण्याप्रमाणें, भरत रामाला भेटून परत गेल्यानंतर जसे इतर ऋषि चित्रकूट सोडून अन्यत्र गेले, तसाच हा वाल्मिकीही राम चित्रकूटाहून पुढें गेल्यानंतर तमसा तीरावर रहावयास गेला, हेंच सत्य दिसतें. तस्मात् दोन वाल्मिकि होते, अशी कल्पना करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं.

ऐणेयं मांसमाहृत्य शालां यक्ष्यामहे वयम् २२
कर्तव्यं वास्तुशमनं सौमित्रे चिरजीविभिः ।
मृगं हत्वाऽऽनय क्षिप्रं लक्ष्मणेह शुभेक्षण २३
कर्तव्यः शास्त्रदृष्टो हि विधिर्धर्ममनुस्मर ।
भ्रातुर्वचनमाज्ञाय लक्ष्मणः परवीरहा २४
चकार च यथोक्तं हि तं रामः पुनरब्रवीत् ।
ऐणेयं श्रपयस्वैतच्छालां यक्ष्यामहे वयम् २५
त्वर सौम्य मुहूर्तोऽयं ध्रुवश्च दिवसो ह्ययम् ।
स लक्ष्मणः कृष्णमृगं हत्वा मेध्यं प्रतापवान् ।
अथ चिक्षेप सौमित्रिः समिद्धे जातवेदसि २६
तत्तु पक्कं समाज्ञाय निष्टप्तं छिन्नशोणितम् २७
लक्ष्मणः पुरुषव्याघ्रमथ राघवमब्रवीत् ।

---

ती मनोहर पर्णकुटिका पाहतांच, अगदीं एकाग्रतेनें सदैव आपली सेवा करण्यास तत्पर असलेल्या लक्ष्मणाला राम म्हणाले, " हे लक्ष्मणा ! आपण मृगमांस आणून या पर्णशालेची आतां वास्तुशांति करूं. कारण चिरजीवी होऊं इच्छिणाऱ्या पुरुषांनीं वास्तुशांति ही अवश्य केली पाहिजे. तरी हे सुलोचना लक्ष्मणा! तूं सत्वर मृग मारून घेऊन ये. शिवाय हा विधि शास्त्रविहितच आहे; यासाठीं धर्मशास्त्राचें स्मरण कर. " ( २०-२४ )

हें भ्रात्याचें भाषण ऐकून, शत्रुपक्षीय वीरनाशक लक्ष्मणानें रामानें जें कांहीं सांगितलें त्याप्रमाणें सर्व कांहीं केलें. तेव्हां राम त्याला म्हणाला, 'लक्ष्मणा ! जरा त्वरा कर आणि हें मृगमांस सत्वर शिजीव. आपण आतांच वास्तुशांति करूं. हा चांगला मुहूर्त आहे आणि हा दिवस ध्रुवसंज्ञक आहे.' (२४-२५)

यानंतर प्रतापी अशा सुमित्रापुत्र लक्ष्मणानें यज्ञाला योग्य असा एक कृष्णमृग मारून आणून तो प्रज्वलित झालेल्या अग्नींत टाकला व तो पक्क झाला आहे आणि अत्यंत तप्त होऊन त्याच्यांतील रक्तस्रावही बंद झाला आहे, असें आढळून आल्यावर, लक्ष्मण पुरुषश्रेष्ठ रामाला म्हणाला, " हे देवतुल्य रामा ! संपूर्ण अव-

अयं सर्वः समस्ताङ्गः श्रितः कृष्णमृगो मया २८
देवता देवसङ्काश यजस्व कुशलो ह्यसि ।
रामः स्नात्वा तु नियतो गुणवाञ्जपकोविदः २९
संग्रहेणाकरोत्सर्वान्मन्त्रान्सत्रावसानिकान् ।
इष्ट्वा देवगणान्सर्वान्विवेशावसथं शुचिः ३०
बभूव च मनोह्लादो रामस्यामिततेजसः ।
वैश्वदेवबलिं कृत्वा रौद्रं वैष्णवमेव च ३१
वास्तुसंशमनीयानि मङ्गलानि प्रवर्तयन् ।
जपं च न्यायतः कृत्वा स्नात्वा नद्यां यथाविधि ३२
पापसंशमनं रामश्चकार बलिमुत्तमम् ।
वेदिस्थलविधानानि चैत्यान्यायतनानि च ।
आश्रमस्यानुरूपाणि स्थापयामास राघवः ३३
तां वृक्षपर्णच्छदनां मनोज्ञां यथाप्रदेशं सुकृतां निवाताम् ।

---

यवांनीं युक्त असा हा सर्वच्या सर्व कृष्णमृग मीं भाजून काढला आहे. आतां आपण देवतांना उद्देशून याग करा; त्या यागाच्या कामामध्यें आपणच कुशल आहांत." ( २५-२९ )

इतकें झाल्यावर जपजाप्यादि कृत्यांत अभिज्ञ, गुणवान् आणि जितेंद्रिय अशा रामानें स्नान करून व यागसमाप्तिविषयक तेवढेच सर्व मंत्र घेऊन थोडक्यांत वास्तुशांति केली. सर्व देवगणांना उद्देशून यजन केल्यावर, शुचिर्भूत झालेल्या रामानें त्या वास्तूमध्यें प्रवेश केला. तेव्हां त्या अत्यंत तेजस्वी रामाच्या मनाला फारच आल्हाद झाला. नंतर वास्तुदोषशमनार्थ मंगलकारक सूक्तें वगैरे ब्राह्मणांना म्हणावयाला सांगून, रामानें नदीमध्यें यथाविधि स्नान केलें आणि यथायोग्य रीतीनें जप करून विश्वेदेव, रुद्र आणि विष्णु या देवतांना उद्देशून बलि दिल्यानंतर पापशमनार्थ असा दुसराही एक उत्कृष्ट बलि रामानें दिला. ( २९-३३ )

नंतर आश्रमाला अनुरूप अशीं जीं देवालयें, पार आणि बलि नेऊन ठेवण्याच्या जागा होत्या, तेथें तेथें रामानें बलि नेऊन ठेविले. नंतर देवगण ज्याप्रमाणें सुधर्मा या नांवानें प्रख्यात असलेल्या सभेमध्यें प्रवेश करतात, त्या-

**वासाय सर्वे विविशुः समेताः सभां यथा देवगणाः सुधर्माम् । ३४**
**सुरम्यमासाद्य तु चित्रकूटं नदीं च तां माल्यवतीं सुतीर्थाम् ।**
**ननन्द हृष्टो मृगपक्षिजुष्टां जहौ च दुःखं पुरविप्रवासात् ३५ [२२६८]**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः॥५६॥

सप्तपञ्चाशः सर्गः ।

**कथयित्वा तु दुःखार्तः सुमन्त्रेण चिरं सह ।**
**रामे दक्षिणकूलस्थे जगाम स्वगृहं गुहः १**
**भरद्वाजाभिगमनं प्रयागे च सभाजनम् ।**
**आ गिरेर्गमनं तेषां तत्रस्थैरभिलक्षितम् २**
**अनुज्ञातः सुमन्त्रोऽथ योजयित्वा हयोत्तमान् ।**
**अयोध्यामेव नगरीं प्रययौ गाढदुर्मनाः ३**
**स वनानि सुगन्धीनि सरितश्च सरांसि च ।**

---

प्रमाणें वृक्षपर्णांचें आच्छादन घातलेल्या आणि जागेच्या अदमासाप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें उभारून, वाऱ्याचा कडेकोट बंदोबस्त केलेल्या त्या मनोहर पर्णकुटिकेमध्यें त्या सर्वांनीं एकदम प्रवेश केला. याप्रमाणें अत्यंत मनोहर असा तो चित्रकूट पर्वत आणि तेथील उत्कृष्ट जल व पशुपक्ष्यांनीं सेवित अशी ती माल्यवती नदी यांचें सान्निध्य प्राप्त झाल्यामुळें रामाला हर्ष झाला आणि अयोध्यानगरापासून बाहेर राहण्याचें दुःख त्याला वाटेनासें झालें. ( ३३-३५ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील छपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

राम गंगेच्या दक्षिण तीराला पोंचल्यानंतर तो दुःखाकुल झालेला गुह बराच वेळपर्यंत सुमंत्रसारथ्याशीं गोष्टी करून नंतर आपल्या घरीं निघून गेला. नंतर राम प्रयागतीर्थावर भरद्वाज मुनीकडे गेला, तेव्हां तेथें त्यांनीं त्याचा सत्कार केला व पुढें तो राम चित्रकूट पर्वताला जाऊन पोंचला. अशा तऱ्हेची गुहाच्या हेरांकडून बातमी सुमंत्रास लागल्यावर गुहाची अनुज्ञा घेऊन, सुमंत्रसारथ्यानें उत्कृष्ट घोडे रथाला जोडले व अत्यंत खिन्न होऊन तो अयोध्यानगरीकडे जाण्यास निघाला. सदैव सावधपणानें असलेला व सावधपणानें वागणारा

पश्यन्ययौ शीघ्रं ग्रामाणि नगराणि च ४
ततः सायाह्नसमये द्वितीयेऽहनि सारथिः ।
अयोध्यां समनुप्राप्य निरानन्दां ददर्श ह ५
स शून्यामिव निःशब्दां दृष्ट्वा परमदुर्मनाः ।
सुमन्त्रश्चिन्तयामास शोकवेगसमाहतः ६
कच्चिन्न सगजा साश्वा सजना सजनाधिपा ।
रामसन्तापदुःखेन दग्धा शोकाग्निना पुरी ७
इति चिन्तापरः सूतो वाजिभिः शीघ्रयायिभिः ।
नगरद्वारमासाद्य त्वरितः प्रविवेश ह ८
सुमन्त्रमभिधावन्तः शतशोऽथ सहस्रशः ।
क्व राम इति पृच्छन्तः सूतमभ्यद्रवन्नराः ९
तेषां शशंस गङ्गायामहमापृच्छ्य राघवम् ।
अनुज्ञातो निवृत्तोऽस्मि धार्मिकेण महात्मना १०

---

तो सुमंत्र सारथि वाटेंत लागणारीं सुगंधी वनें, नद्या, सरोवरें, गांवें आणि नगरें हीं पहात पहात चालला होता. ( १-४ )

नंतर दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं तो अयोध्येंत येऊन पोंचला असतां तेथें सर्वत्र उदासीनता पसरली आहे, असें त्याला दिसलें. तेव्हां जिच्यामध्यें कसलीही गडबड नसून सर्वत्र अगदीं शुकशुकाट झाला आहे, अशी ती अयोध्यानगरी पाहून आधींच अत्यंत खिन्न झालेला तो सुमंत्र शोकावेगानें अगदीं ग्रस्त होऊन गेला आणि ' रामासंबंधीं झालेल्या संतापदुःखानें उत्पन्न झालेल्या अशा शोकाग्नीनें गज, अश्व, प्रजा व राजा यांसह ही नगरी जळून खाक तर झाली नाहीं ना ? ' असें त्याच्या मनांत येऊं लागलें. याप्रमाणें चिंताक्रांत झालेला तो सारथि, शीघ्र गतीनें जाणाऱ्या घोड्यांमुळें नगराच्या द्वाराशीं येऊन, त्यानें नगरांत प्रवेश केला. त्या वेळीं शेंकडों-हजारों लोक " राम कोठें आहे ? " असें विचारीत विचारीत सुमंत्र सारथ्याकडे धांवत धांवत गेले. त्यांना सुमंत्र म्हणाला, " गंगेच्या तीरीं गेल्यावर, महात्म्या धर्मनिष्ठ रामानें मला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि तेथें त्याचा निरोप घेऊन मी आलों. " ( ५-१० )

ते तीर्णा इति विज्ञाय बाष्पपूर्णमुखा नराः।
अहो धिगिति निःश्वस्य हा रामेति विचुक्रुशुः ११
शुश्राव च वचस्तेषां वृन्दं वृन्दं च तिष्ठताम्।
हताः स खलु येनेह पश्याम इति राघवम् १२
दानयज्ञविवाहेषु समाजेषु महत्सु च।
न द्रक्ष्यामः पुनर्जातु धार्मिकं राममन्तरा १३
किं समर्थं जनस्यास्य किं प्रियं किं सुखावहम्।
इति रामेण नगरं पित्रेव परिपालितम् १४
वातायनगतानां च स्त्रीणामन्वंतरापणम्।
राममेवाभितप्तानां शुश्राव परिदेवनाम् १५
स राजमार्गमध्येन सुमन्त्रः पिहिताननः।
यत्र राजा दशरथस्तदेवोपययौ गृहम् १६

---

याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां ते त्रिवर्ग राम, लक्ष्मण व सीता गंगा नदी तरून पलीकडे गेले असें समजतांक्षणीं लोकांचीं मुखें दुःखाश्रूंनीं भरून गेलीं आणि "धिक्कार धिक्कार" म्हणून सुस्कारे टाकीत टाकीत "हे रामा! हे रामा!" असा ते आक्रोश करूं लागले. तेव्हां टोळयाटोळयांनीं रस्त्यामध्यें उभे राहिलेल्या त्या लोकांचें आणखीही बोलणें त्या सुमंत्रसारथ्यानें ऐकलें. ते म्हणूं लागले 'फुटलें आमचें नशीब! राम कांहीं आतां आमच्या दृष्टीस पडत नाहीं आणि दान, यज्ञ व विवाह हीं कृत्यें सुरू झालीं असतां मोठमोठ्या समाजामध्यें आतां धर्मनिष्ठ राम मध्यंतरीं पुनः आमच्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं. या लोकांना काय योग्य आहे, त्यांना काय आवडतें, कोणती गोष्ट यांना सुखावह होणारी आहे, या गोष्टींचा विचार करून रामानें या नगराचें पित्याप्रमाणें परिपालन केलें होतें." (११–१४)

त्यानंतर तो सुमंत्र सारथि बाजारांतून जाऊं लागला असतां रामाकरितांच शोकाकुल झालेल्या स्त्रिया खिडक्यांतून उभ्या राहून शोक करीत होत्या, तें त्याच्या कानांवर आलें. राजमार्गांतून जातांना त्या सुमंत्र सारथ्यानें तोंडावर बुरखा घेतला होता व मध्यंतरीं कोठेंही न थांबतां दशरथराजा ज्या वाड्यांत

सोऽवतीर्य रथाच्छीघ्रं राजवेश्म प्रविश्य च ।
कक्ष्याः सप्ताभिचक्राम महाजनसमाकुलाः १७
हर्म्यैर्विमानैः प्रासादैरवेक्ष्याथ समागतम् ।
हाहाकारकृता नार्यो रामादर्शनकर्शिताः १८
आयतैर्विमलैर्नेत्रैरश्रुवेगपरिप्लुतैः ।
अन्योन्यमभिवीक्षन्ते व्यक्तमार्ततरा स्त्रियः १९
ततो दशरथस्त्रीणां प्रासादेभ्यस्ततस्ततः ।
रामशोकाभितप्तानां मन्दं शुश्राव जल्पितम् २०
सह रामेण निर्यातो विना राममिहागतः ।
सूतः किं नाम कौसल्यां क्रोशन्तीं प्रतिवक्ष्यति २१
यथा च मन्ये दुर्जीवमेवं न सुकरं ध्रुवम् ।
आच्छिद्य पुत्रे निर्याते कौसल्या यत्र जीवति २२
सत्यरूपं तु तद्वाक्यं राजस्त्रीणां निशामयन् ।

होता, तेथेंच तो सुमंत्र गेला. जवळ आल्यानंतर रथांतून लवकर खालीं उतरून तो राजवाड्यांत शिरला आणि मोठमोठ्या लोकांनीं भरलेले सात चौक ओलांडून तो पुढें गेला. रामाचें दर्शन न झाल्यामुळें कृश झालेल्या नगरवासी स्त्रिया, वाडे, प्रासाद आणि सात मजली हवेल्या यांतून सुमंत्र रामाशिवाय आल्याचें पाहून हाहाकार करूं लागल्या आणि अश्रूंचे पूर लोटल्याकारणानें ज्यांतील काजळ धुवून गेलें आहे, अशा मोठ्या नेत्रांनीं त्या अतिशय दुःखित झालेल्या स्त्रिया अगदीं भांबावून जाऊन एकमेकींकडे पाहूं लागल्या. (१५-१९)

त्यानंतर रामाच्या शोकानें विव्हल झालेल्या दशरथाच्या स्त्रियांचें हळूहळू बोलणें प्रासादावरून सुमंत्राच्या कानीं येऊं लागलें. "रामाबरोबर नगरांतून बाहेर गेलेला हा सारथि रामावांचून येथें आला आहे. तेव्हां आतां हा आक्रोश करीत बसलेल्या कौसल्येला काय बरें सांगेल? राज्यलक्ष्मीचा त्याग करून पुत्र अरण्यांत निघून गेला असतांही ज्या अर्थी कौसल्या जिवंत आहे, त्या अर्थी जिवन्त राहणें हें जरी दुःखदायक आहे, तरी जीविताचा नाश करून घेणें खात्रीनें सोपें नाहीं, असें वाटतें." (२०-२२)

प्रदीप्त इव शोकेन विवेश सहसा गृहम् २३
स प्रविश्याष्टमीं कक्ष्यां राजानं दीनमातुरम् ।
पुत्रशोकपरिद्यूनमपश्यत्पाण्डुरे गृहे २४
अभिगम्य तमासीनं राजानमभिवाद्य च ।
सुमन्त्रो रामवचनं यथोक्तं प्रत्यवेदयत् २५
स तूष्णीमेव तच्छ्रुत्वा राजा विद्रुतमानसः ।
मूर्च्छितो न्यपतद्भूमौ रामशोकाभिपीडितः २६
ततोऽन्तःपुरमाविद्धं मूर्च्छिते पृथिवीपतौ ।
उच्छ्रित्य बाहू चुक्रोश नृपतौ पतिते क्षितौ २७
सुमित्रया तु सहिता कौसल्या पतितं पतिम् ।
उत्थापयामास तदा वचनं चेदमब्रवीत् २८
इमं तस्य महाभाग दूतं दुष्करकारिणः ।
वनवासादनुप्राप्तं कस्मान्न प्रतिभाषसे २९
अद्येममनयं कृत्वा व्यपत्रपसि राघव ।

हें राजस्त्रियांचें खरें भाषण ऐकत शोकानें अतिव्याकुळ झालेला तो सुमंत्रसारथि आंत गेला. आठव्या चौकांत गेल्यावर एका पांढऱ्या शुभ्र दिवाणखान्यामध्यें पुत्र-शोकानें खिन्न, दीन व दुःखाकुल होऊन बसलेल्या अशा राजाला त्यानें पाहिलें व तेथें बसलेल्या त्या राजाकडे जाऊन व त्याला नमस्कार करून सुमंत्रानें रामाचें भाषण त्याच्या सांगण्याप्रमाणें त्याला कळविलें. तेव्हां स्वस्थ बसूनच तें ऐकून घेऊन मनामध्यें क्षुब्ध झालेला दशरथ राजा रामाच्या शोकानें व्याप्त झाल्यामुळें भूमीवर मूर्च्छा येऊन पडला. (२३-२६)

राजा मूर्च्छित झाला असतां अंतःपुरांतील सर्व स्त्रिया दुःखित झाल्या आणि राजा भूमीवर पडतांक्षणीं हात वर करून आक्रोश करूं लागल्या. सुमित्रेसह कौसल्या भूमीवर पडलेल्या आपल्या पतीला उठवून म्हणाली, "हे महाभाग्यवान् राजा! अवघड काम करणाऱ्या रामाचा हा दूत वनवासांतून येथें आला आहे, त्याच्याशीं आपण बोलत कां नाहीं? रघुवंशजा! आज हें अन्यायाचें कृत्य केल्या-मुळें आपणांला त्याच्याशीं बोलण्याची लाज कां वाटते आहे? उठा, आपलें

उत्तिष्ठ सुकृतं तेऽस्तु शोकेन स्यात्सहायता ३०
देव यस्या भयाद्रामं नानुपृच्छसि सारथिम् ।
नेह तिष्ठति कैकेयी विश्रब्धं प्रतिभाष्यताम् ३१
सा तथोक्त्वा महाराजं कौसल्या शोकलालसा ।
धरण्यां निपपाताशु बाष्पविप्लुतभाषिणी ३२
विलपन्तीं तथा दृष्ट्वा कौसल्यां पतितां भुवि ।
पतिं चावेक्ष्य ताः सर्वाः समन्ताद्रुरुदुः स्त्रियः ३३
ततस्तमन्तःपुरनादमुत्थितं समीक्ष्य वृद्धास्तरुणाश्च मानवाः ।
स्त्रियश्च सर्वा रुरुदुः समन्ततः पुरं तदासीत्पुनरेव सङ्कुलम् ३४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः॥५७॥

अष्टपञ्चाशः सर्गः। [२३०२]

प्रत्याश्वस्तो यदा राजा मोहात्प्रत्यागतस्मृतिः ।
तदाजुहाव तं सूतं रामवृत्तान्तकारणात् १
तदा सूतो महाराजं कृताञ्जलिरुपस्थितः ।

---

कल्याण असो. आपणच जर शोक करूं लगला तर आपणांला धीर कोण देणार ? हे राजा! जिच्या भीतीमुळें रामाचा वृत्तांत आपण सारथ्याला विचारीत नाहीं, ती कैकेयी येथें नाहीं, आपण निर्भयपणानें त्याच्याशीं बोला." (२७-३१)

याप्रमाणें महाराज दशरथाला बोलून शोकाकुल झालेली व अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत भाषण करीत ती कौसल्या एकदम भूमीवर पडली. तेव्हां विलाप करतां करतां भूमीवर पडलेल्या पतीला व कौसल्येला अवलोकन करून त्या सर्व स्त्रिया सभोंवतीं जमून रडूं लागल्या. त्यानंतर अंतःपुरांतून निघालेला तो ध्वनि कानावर येतांक्षणीं वृद्ध व तरुण असे सर्व पुरुष आणि सर्व स्त्रिया रडूं लागल्या आणि पुनः तें नगर सर्व बाजूंनीं पुनः शोकाकुल झालें. (३२-३४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाचा आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग संपला. ॥ ५७ ॥

नंतर कांहीं कालानें दशरथराजानें मूर्च्छा जाऊन सावध झाल्यावर रामाचा वृत्तांत विचारण्याकरितां त्या सारथ्याला हांक मारिली. तेव्हां तो सारथि हात

राममेवानुशोचन्तं दुःखशोकसमन्वितम् २
वृद्धं परमसन्तप्तं नवग्रहमिव द्विपम् ।
विनिःश्वसन्तं ध्यायन्तमस्वस्थमिव कुञ्जरम् ३
राजा तु रजसा सूतं ध्वस्ताङ्गं समुपस्थितम् ।
अश्रुपूर्णमुखं दीनमुवाच परमार्तवत् ४
क नु वत्स्यति धर्मात्मा वृक्षमूलमुपाश्रितः ।
सोऽत्यन्तसुखितः सूत किमशिष्यति राघवः ५
दुःखस्यानुचितो दुःखं सुमन्त्र शयनोचितः ।
भूमिपालात्मजो भूमौ शेते कथमनाथवत् ६
यं यान्तमनुयान्ति स्म पदातिरथकुञ्जराः ।
स वत्स्यति कथं रामो विजनं वनमाश्रितः ७
व्यालैर्मृगैराचरितं कृष्णसर्पनिषेवितम् ।
कथं कुमारौ वैदेह्या सार्धं वनमुपाश्रितौ ८

जोडून महाराज दशरथापाशीं आला. तो राजा दुःखाकुल होऊन रामाकरितांच शोक करीत होता. नवीन धरून आणलेल्या हत्तीप्रमाणें तो अत्यंत संतप्त झालेला वृद्ध राजा सुस्कारे टाकीत होता आणि आपल्या कळपांतून चुकलेल्या हत्तीप्रमाणें चिंताक्रांत होऊन बसला होता. याप्रमाणें असलेला तो दशरथ राजा मार्गावरील धुळीनें ज्याचें शरीर भरलेलें आहे, ज्याचें मुख अश्रूंनीं व्याप्त झालें आहे, अशा त्या समीप आलेल्या दीन सारथ्याला अत्यंत दुःखानें विचारूं लागला.(१-४)

" अरे सारथ्या! वृक्षांचा आश्रय करून तो महात्मा राम आतां कोठें बरें राहील? आणि आजपर्यंत अतिशय सुखामध्यें वाढलेला तो राम आतां काय बरें खाईल? हे सुमंत्रा! ज्याला दुःखाचा कधींही अनुभव नाहीं व उत्कृष्ट शय्येवर झोंपण्याची ज्याला सवय आहे, तो दुःखी झालेला राजकुमार अनाथाप्रमाणें कसा भूमीवर पडत असेल? जो बाहेर निघाला असतां ज्याच्या बरोबर पायदळ, रथ, व हत्ती जात असत, तो राम निर्जन वनामध्यें कसा बरें राहील? अजगर व श्वापदें ज्यामध्यें संचार करीत असतात आणि कृष्ण सर्प ज्यांत वास्तव्य करीत असतात, त्या वनाचा आश्रय सीतेसह त्या कुमारांनीं कसा बरें केला असेल? हे सुमंत्रा!

सुकुमार्या तपस्विन्या सुमन्त्र सह सीतया ।
राजपुत्रौ कथं पादैरवरुह्य रथाद्गतौ ९
सिद्धार्थः खलु सूत त्वं येन दृष्टौ ममात्मजौ ।
वनान्तं प्रविशन्तौ ताविश्विनाविव मन्दरम् १०
किमुवाच वचो रामः किमुवाच च लक्ष्मणः ।
सुमन्त्र वनमासाद्य किमुवाच च मैथिली ११
आसितं शयितं भुक्तं सूत रामस्य कीर्तय ।
जीविष्याम्यहमेतेन ययातिरिव साधुषु १२
इति सूतो नरेन्द्रेण चोदितः सज्जमानया ।
उवाच वाचा राजानं स बाष्पपरिबद्धया १३
अब्रवीन्मे महाराज धर्ममेवानुपालयन् ।
अञ्जलिं राघवः कृत्वा शिरसाभिप्रणम्य च १४
सूत मद्वचनात्तस्य तातस्य विदितात्मनः ।
शिरसा वन्दनीयस्य वन्द्यौ पादौ महात्मनः १५

बिचाऱ्या सुकुमार सीतेसह रथांतून उतरून ते राजकुमार कसे बरें पायांनीं अरण्यांत गेले ? हे सूता ! खरोखर तूं धन्य आहेस. कारण, मंदर पर्वतावर जाणाऱ्या अश्विनीकुमाराप्रमाणें वनामध्यें माझे पुत्र प्रवेश करीत असतांना तूं पाहिलें आहेस. हे सुमंत्रा ! वनांत गेल्यावर रामानें काय सांगितलें, लक्ष्मण काय म्हणाला आणि सीता काय म्हणाली; तें तूं मला सांग. हे सूता ! राम कोठें बसत असे, कोठें निजत असे, जेवावयास काय खात असे, हें सर्व तूं मला सांग; म्हणजे स्वर्गांतून साधूंमध्यें पडलेल्या ययातिराजाप्रमाणें तुझ्यासारख्या सज्जनांमध्यें पुत्रसंयोगरूप स्वर्गसुखापासून भ्रष्ट झालेला मी हा पुत्राचा वृत्तांत ऐकून जिवंत राहीन." (५-१२)

याप्रमाणें रामाचा वृत्तांत सांगण्याची राजानें आज्ञा केल्यावर, तो सुमंत्र सारथि, अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत राजाला म्हणाला, " हे महाराजा ! धर्माचेंच परिपालन करणारा राम हात जोडून आणि मस्तक नम्र करून मला म्हणाला, " हे सूता ! माझ्या सांगण्यावरून तूं ह्या आत्मवेत्त्या, महात्म्या

सर्वमन्तःपुरं वाच्यं सूत मद्वचनात्त्वया ।
आरोग्यमविशेषेण यथार्हमभिवादनम् १६
माता च मम कौसल्या कुशलं चाभिवादनम् ।
अप्रमादं च वक्तव्या ब्रूयाश्चैनामिदं वचः १७
धर्मनित्या यथाकालमग्न्यगारपरा भव ।
देवि देवस्य पादौ च देववत्परिपालय १८
अभिमानं च मानं च त्यक्त्वा वर्तस्व मातृषु ।
अनुराजानमार्यां च कैकेयीमम्ब कारय १९
कुमारे भरते वृत्तिर्वर्तितव्या च राजवत् ।
अप्यज्येष्ठा हि राजानो राजधर्ममनुस्मर २०
भरतः कुशलं वाच्यो वाच्यो मद्वचनेन च ।
सर्वास्वेव यथान्यायं वृत्तिं वर्तस्व मातृषु २१
वक्तव्यश्च महाबाहुरिक्ष्वाकुकुलनन्दनः ।
पितरं यौवराज्यस्थो राज्यस्थमनुपालय २२

---

व वंद्य अशा पित्याला माझा नमस्कार सांग आणि, हे सूता ! माझ्या सांगण्यावरून कुशल प्रश्न विचारून अंतःपुरांतील सर्व स्त्रियांना तूं भेदभाव न बाळगतां योग्यतेप्रमाणें माझा नमस्कार सांग. माझ्या कौसल्यामातेला कुशलप्रश्नपूर्वक प्रणाम सांग आणि सावधपणानें वागत जा, असें सांगून तिला माझा निरोप कळीव कीं– "हे देवी ! नेहमीं धर्माविषयीं तत्पर राहून वेळेवर होमशालेमध्यें असत जा आणि राजाच्या पायांची देवाप्रमाणें सेवा करीत जा. इतर मातांशीं अहंकार व मान सोडून देऊन वागत जा व हे माते ! जिच्या मर्जीनें राजा वागत आहे त्या कैकेयीशीं विरोध धरूं नको. राजकुमार भरताशींही तूं राजाप्रमाणेंच आदरानें वागत जा. कारण राजे वयानें लहान असले तरी ते पूज्यच आहेत. राजधर्माचें स्मरण सदैव असूं दे." (१३-२०)

"भरतालाही मी खुशाल आहें असें सांग आणि सर्वही मातांच्या ठिकाणीं तूं आपलें वर्तन यथान्याय ठेवीत जा, असाही माझा त्याला निरोप कळव. त्या इक्ष्वाकुकुलाला आनंदविणाऱ्या महापराक्रमी भरताला आणखी असेंही सांग, कीं,

अतिक्रान्तवया राजा मा स्मैनं व्यपरोरुधः ।
कुमारराज्ये जीवस्व तस्यैवाज्ञाप्रवर्तनात् २३
अब्रवीच्चापि मां भूयो भृशमश्रूणि वर्तयन् ।
मातेव मम माता ते द्रष्टव्या पुत्रगर्धिनी २४
इत्येवं मां महाबाहुर्ब्रुवन्नेव महायशाः ।
रामो राजीवपत्राक्षो भृशमश्रूण्यवर्तयत् २५
लक्ष्मणस्तु सुसंक्रुद्धो निःश्वसन्वाक्यमब्रवीत् ।
केनायमपराधेन राजपुत्रो विवासितः २६
राज्ञा तु खलु कैकेय्या लघु चाश्रुत्य शासनम् ।
कृतं कार्यमकार्यं वा वयं येनाभिपीडिताः २७
यदि प्रव्राजितो रामो लोभकारणकारितम् ।
वरदाननिमित्तं वा सर्वथा दुष्कृतं कृतम् २८
इदं तावद्यथाकाममीश्वरस्य कृते कृतम् ।

" तूं यौवराज्याचा स्वीकार करून, मुख्य राज्यावर असलेल्या पित्याचा सांभाळ कर. राजाचें वय होऊन गेलें असल्यामुळें त्याला तूं राज्यपदावरून च्युत करूं नकोस. त्याच्याच आज्ञेनें व्यवहार चालव व यौवराज्याचा उपभोग घे. " डोळ्यामध्यें वारंवार अश्रू येत असून त्यानें " माझ्या पुत्रवत्सल मातेचा तूं आपल्या मातेप्रमाणेंच समाचार घेत जा " असेंही आणखी भरताला कळविण्याविषयीं मला सांगितलें आहे. याप्रमाणें तो महापराक्रमी, महायशस्वी व कमलाप्रमाणें नेत्र असलेला राम माझ्यापाशीं निरोप सांगत असतांना वारंवार डोळ्यांतून अश्रु ढाळींत होता ( २१–२५ )

लक्ष्मण तर अतिशय रागावून सुस्कारे टाकीत टाकीतच मला म्हणाला, " कोणत्या अपराधामुळें राजपुत्र रामाला वनांत हांकून दिलें आहे ? खरोखर उतावीळपणानें कैकेयीला वचन देऊन राजानें ही गोष्ट बरी केलेली असो अथवा वाईट केलेली असो, त्यामुळें आम्हांला तर अतिशय कष्ट भोगावे लागत आहेत हें खरें ! रामाला वनांत पाठविण्याचें काम हें लोभामुळें झालेलें असो अथवा कैकेयीला वरदान दिल्यामुळें झालेलें असो, राजानें ही गोष्ट सर्वस्वीं वाईट

**रामस्य तु परित्यागे न हेतुमुपलक्षये** २९
**असमीक्ष्य समारब्धं विरुद्धं बुद्धिलाघवात् ।**
**जनयिष्यति संक्रोशं राघवस्य विवासनम्** ३०
**अहं तावन्महाराजे पितृत्वं नोपलक्षये ।**
**भ्राता भर्ता च बन्धुश्च पिता च मम राघवः** ३१
**सर्वलोकप्रियं त्यक्त्वा सर्वलोकहिते रते ।**
**सर्वलोकोऽनुरज्येत कथं चानेन कर्मणा** ३२
**सर्वप्रजाभिरामं हि रामं प्रव्राज्य धार्मिकम् ।**
**सर्वलोकविरोधेन कथं राजा भविष्यति** ३३
**जानकी तु महाराज निःश्वसन्ती तपस्विनी ।**
**भूतोपहतचित्तेव विष्ठिता विस्मृता स्थिता** ३४

केली, हें मात्र खचित आहे. ईश्वराची प्रेरणा झाल्यामुळें, त्याच्या इच्छेचें उल्लंघन न करतां राजानें ती गोष्ट केली असें म्हणावें, तर रामाचा त्याग करण्याविषयीं पुढें केलेली ही सबब मला मुळींच योग्य वाटत नाहीं. ईश्वराच्या प्रेरणेनें झालेलें असो किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें हें घडून आलेलें असो, दूरवर विचार न करितां केवळ क्षुद्र बुद्धीने राजानें रामाला वनवासांत पाठविण्याचें जें हें धर्मशास्त्रां-विरुद्ध कर्म झालें आहे, तें इहलोकीं व परलोकीं दुःखदायकच होईल. (२९-३०)

इतरांचें मत कांहींही असो, महाराज दशरथाच्या ठिकाणीं बापाचें नातें राहिलें आहे, असें आतां मला दिसत नाहीं. माझा भाऊ, अधिपति, बांधव व पिता सर्व कांहीं एक रामच आहे. सर्व लोकांच्या हिताविषयीं तत्पर आणि म्हणूनच सर्व लोकांना प्रिय अशा रामाचा जर त्याग केला आहे, तर या कृत्यानें सर्व लोकांची राजाच्या ठिकाणीं भक्ति कशी राहील? सारांश, सर्व प्रजेला प्रिय आणि धर्मानें वागणाऱ्या रामाला हद्दपार करून सर्व प्रजाजनांशीं विरोध संपादन करून तो राज्यपदावर कसा टिकून राहील? (३१-३३)

हे महाराजा ! बिचारी जनककन्या तर भुतानें झपाटल्याप्रमाणें जागचे जागीं खिळल्यासारखी होऊन निरोप वगैरे सांगण्याचें सर्व कांहीं विसरून जाऊन दुःखाचे सुस्कारे टाकीत उभी होती व पूर्वी कधींच अशा संकटाचा अनुभव

अदृष्टपूर्वव्यसना राजपुत्री यशस्विनी ।
तेन दुःखेन रुदती नैव मां किंचिदब्रवीत् ३५
उद्वीक्षमाणा भर्तारं मुखेन परिशुष्यता ।
मुमोच सहसा बाष्पं प्रयान्तमुपवीक्ष्य सा ३६
तथैव रामोऽश्रुमुखः कृताञ्जलिः स्थितोऽब्रवील्लक्ष्मणबाहुपालितः ।
तथैव सीता रुदती तपस्विनी निरीक्षते राजरथं तथैव माम् ३७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे अष्टपञ्चाशः सर्गः ॥५८॥

एकोनषष्टितमः सर्गः । [२३२९]

मम त्वश्वा निवृत्तस्य न प्रावर्तन्त वर्त्मनि ।
उष्णमश्रु विमुञ्चन्तो रामे संप्रस्थिते वनम् १
उभाभ्यां राजपुत्राभ्यामथ कृत्वाहमञ्जलिम् ।
प्रस्थितो रथमास्थाय तद्दुःखमपि धारयन् २

---

नसल्यामुळें त्या दुःखामुळें रडत असलेली ती यशस्विनी राजकन्या मला कांहींच बोलली नाहीं. ( ३१-३५ )

मी निघालों असें पाहून तिचें मुख निस्तेज झालें व ती नवऱ्याच्या चेहऱ्यावर दृष्टि खिळवून एकाएकीं अश्रु मात्र ढाळूं लागली. मी निघालों तेव्हां लक्ष्मणानें रामाचा हात धरला होता; रामाच्या मुखावर अश्रूंचे ओघळ आलेले होते. हात जोडून उभ्या असलेल्या त्या रामानें मला मीं आपणाला कळविल्याप्रमाणेंच निरोप सांगितला. परंतु बिचारी सीता कांहींएक न बोलतां रडत रडत त्या राजाच्या रथाकडे व त्याचप्रमाणें माझ्याकडे पहात होती. ( ३६-३७ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग संपला ॥ ५८ ॥

राम वनामध्यें चालता झाल्यावर मी परत फिरलों असतां दुःखाश्रु ढाळूं लागलेले घोडे मार्गावर उत्सुकतेनें रथ ओढीनात ! तथापि उभयतां राजपुत्रांना मीं नमस्कार केला आणि त्यांच्या वियोगामुळें झालेल्या दुःखानें व्याकुळ झालेला मी रथांत बसून निघालों; परंतु, " राम मला पुनः कदाचित् बोला-

गुहेन सार्धं तत्रैव स्थितोऽस्मि दिवसान्बहून्† ।
आशया यदि मां रामः पुनः शब्दापयेदिति ३
विषये ते महाराज महाव्यसनकर्शिताः ।
अपि वृक्षाः परिम्लानाः सुपुष्पाङ्कुरकोरकाः ४
उपतप्तोदका नद्यः पल्वलानि सरांसि च ।
परिशुष्कपलाशानि वनान्युपवनानि च ५
न च सर्पन्ति सत्त्वानि व्याला न प्रसरन्ति च ।
रामशोकाभिभूतं तं निष्कूजमिव तद्वनम् ६
लीनपुष्करपत्राश्च नद्यश्च कलुषोदकाः ।
सन्तप्तपद्माः पद्मिन्यो लीनमीनविहंगमाः ७
जलजानि च पुष्पाणि माल्यानि स्थलजानि च ।
नातिभान्त्यल्पगन्धीनि फलानि च यथापुरम् ८

वणें पाठवील," या आशेनें मी निषादाधिपति गुहाबरोबर बरेच दिवस तेथेंच राहिलों होतों. असो. महाराज ! आपल्या देशांतील वृक्षसुद्धां अतिशय दुःखानें व्याकुळ झाले असून फुलें, अंकुर व कळया यांसह अगदीं कोमेजून गेले आहेत. नद्या, तळीं व सरोवरें यांतील पाणी आटून गेलेलें आहे आणि वनांतील व उपवनांतील वृक्षांचीं पानेंही वाळून चाललीं आहेत. (१-५)

श्वापदें भक्ष्य शोधून काढण्याकरितां बाहेर पडत नाहींत व अजगरादिकही बिळाबाहेर निघत नाहींत. सारांश, सर्व प्राणी रामासंबंधींच्या शोकानें व्याप्त झाले असल्यामुळें त्या अरण्यांत अगदींच शांतता वाटत आहे. नद्यांतील पाणी घाणेरडें झालें असून आंत असलेल्या कमलवेलींचीं पानें कोमेजून गेलेलीं आहेत आणि त्याचप्रमाणें सरोवरांतील मासे व जलांत रहाणारे पक्षी आंत स्वस्थ बसले

† 'दिवसान् बहून्' म्हणजे बरेच दिवस. म्हणजे पुष्कळ दिवस नव्हेत. दोनांपेक्षां अधिक संख्या असली म्हणजे बहु शब्दाचा प्रयोग संस्कृत भाषेंत होतो. या ठिकाणीं राम सीता-लक्ष्मणांसह गंगापार गेला तो एक दिवस, चित्रकूटला गेला तो दुसरा दिवस व हेरांनीं गुहाकडे खबर आणिली, तो तिसरा दिवस. तिसरे दिवशीं मागचा दिवस थोडा उरला असतां सुमंत्र अयोध्येकडे निघाला म्हणून ' दिवसान् बहून् ' म्हटलें आहे.

*

अत्रोद्यानानि शून्यानि प्रलीनविहगानि च ।
न चाभिरामानारामान्पश्यामि मनुजर्षभ ९
प्रविशन्तमयोध्यायां न कश्चिदभिनन्दति ।
नरा राममपश्यन्तो निःश्वसन्ति मुहुर्मुहुः १०
देव राजरथं दृष्ट्वा विना राममिहागतम् ।
दूरादश्रुमुखः सर्वो राजमार्गे गतो जनः ११
हर्म्यैर्विमानैः प्रासादैरवेक्ष्य रथमागतम् ।
हाहाकारकृता नार्यो रामादर्शनकर्शिताः १२
आयतैर्विमलैर्नेत्रैरश्रुवेगपरिप्लुतैः ।
अन्योन्यमभिवीक्षन्तेऽव्यक्तमार्ततराः स्त्रियः १३
नामित्राणां न मित्राणामुदासीनजनस्य च ।
अहमार्ततया कंचिद्विशेषं नोपलक्षये १४
अप्रहृष्टमनुष्या च दीननागतुरङ्गमा ।

असून त्यांतील कमलेंही वाळून गेलीं आहेत. जलामध्यें आणि स्थलामध्यें होणारीं फुलें व फलें पूर्वीप्रमाणें चांगलीं दिसत नाहींत व त्यांचा सुवासही अगदीं कमी झाला आहे. हे पुरुषश्रेष्ठा ! पक्षी आपआपल्या घरट्यांतच बसले असल्यामुळें येथील बागा अगदीं शून्य दिसत आहेत आणि उपवनेंही मला मनोहर दिसेनाशीं झालीं आहेत. मी अयोध्येमध्यें शिरलों असतां कोणालाही चांगलें वाटलें नाहीं व राम दृष्टीस पडत नसल्यामुळें लोक वारंवार दुःखानें सुस्कारे टाकीत आहेत. ( ६–१० )

हे राजा ! रामावांचून येथें आलेला रथ लांब दृष्टीस पडतांक्षणींच राजमार्गामध्यें उभे असलेल्या सर्व लोकांच्या मुखांवरून अश्रूंचे ओघळ वाहूं लागले. रथ आलेला पाहून राम दृष्टीस न पडल्यामुळें वाडे, सात मजली हवेल्या आणि प्रासाद यांतील कृश झालेल्या स्त्रिया, हाहाकार करीत आहेत आणि अत्यंत दुःखी झालेल्या त्या स्त्रियांना, दीर्घ व निर्मल असे आपले नेत्र अश्रूंच्या प्रवाहानें भरून गेले असल्यामुळें एकमेकींकडे नीट पाहतांही येईनासें झालें आहे. मला सर्वच लोक पीडित होऊन गेल्यामुळें मित्र, शत्रु आणि उदासीन असा भेदच

आर्तस्वरपरिम्लानविनिःश्वसितनिःस्वना  १५
निरानन्दा महाराज रामप्रव्राजनातुरा ।
कौसल्या पुत्रहीनेव अयोध्या प्रतिभाति मे  १६
सूतस्य वचनं श्रुत्वा वाचा परमदीनया ।
बाष्पोपहतया सूतमिदं वचनमब्रवीत्  १७§
कैकेय्या विनियुक्तेन पापाभिजनभावया ।
मया न मन्त्रकुशलैर्वृद्धैः सह समर्थितम्  १८
न सुहृद्भिर्न चामात्यैर्मन्त्रयित्वा स नैगमैः ।
मयायमर्थः संमोहात्स्त्रीहेतोः सहसा कृतः  १९
भवितव्यतया नूनमिदं वा व्यसनं महत् ।

कोठें दिसून येत नाहीं. अयोध्यानगरींतील सर्व लोकांचा हर्ष मावळलेला असून हत्ती व घोडेही दीन झालेले आहेत व जिकडे तिकडे विलाप, ग्लानि, दुःखाचे सुस्कारे आणि आक्रोश दृष्टोत्पत्तीस येत आहे. हे महाराजा ! नगरीमध्यें कोठेंही आनंद नाहीं व तिच्यांतील सर्व लोक राम वनवासांत गेल्यामुळें दुःखित झाले आहेत. यामुळें पुत्रहीन झालेल्या कौसल्येसारखी अयोध्येची स्थिति झालेली मला दिसत आहे. ( ११–१६ )

हे सारथ्याचें भाषण ऐकून अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत अतिशय निराशापूर्ण शब्दांनीं दशरथ त्या सारथ्याला म्हणाला, " दुष्ट कुलामध्यें व दुष्ट देशामध्यें उत्पन्न झालेल्या दुष्ट कैकेयीनें रामाला वनवासांत पाठविण्याविषयीं मला सांगितलें असतां सल्लामसलतीमध्यें निपुण असलेल्या वृद्धांबरोबर मी त्या गोष्टीचा विचार केला नाहीं. मित्र, अमात्य आणि नगरवासी लोक ह्यांपैकीं कोणाचाही विचार न घेतां स्त्रीकरितां मोहामुळें मी ही गोष्ट एकदम अविचारानें केली. हे सूता ! भवितव्यतेमुळें खरोखर या कुलाच्या नाशाकरितां हा मोठा अनर्थ

§ श्लोक १७ ते २० पर्यंतच्या श्लोकांवरून पाहतां, कैकेयीच्या नादीं लागून मंत्रिमण्डळांतील कोणाचेंही मत न घेतां, रामाला, अविचारानें वनांत पाठविल्याबद्दल दशरथाला पश्चात्ताप झाल्याचें निदर्शनास येत आहे. पण आतां पश्चात्ताप होऊन उपयोग काय ?

कुलस्यास्य विनाशाय प्राप्तं सूत यदृच्छया २०
सूत यद्यस्ति ते किंचिन्मयापि सुकृतं कृतम् ।
त्वं प्रापयाशु मां रामं प्राणाः संत्वरयन्ति माम् २१
यद्यद्यापि ममैवाज्ञा निवर्तयतु राघवम् ।
न शक्ष्यामि विना रामं मुहूर्तमपि जीवितुम् २२
अथवापि महाबाहुर्गतो दूरं भविष्यति ।
मामेव रथमारोप्य शीघ्रं रामाय दर्शय २३
वृत्तदंष्ट्रो महेष्वासः क्वासौ लक्ष्मणपूर्वजः ।
यदि जीवामि साध्वेनं पश्येयं सीतया सह २४
अतो नु किं दुःखतरं योऽहमिक्ष्वाकुनन्दनम् ।
इमामवस्थामापन्नो नेह पश्यामि राघवम् २५
हा राम रामानुज हा हा वैदेहि तपस्विनि ।
न मां जानीत दुःखेन म्रियमाणमनाथवत् २६
स तेन राजा दुःखेन भृशमर्पितचेतनः ।

---

कोसळला आहे. हे सूता! जर माझ्या हातून तुझें कांहीं चांगलें झालें असेल, तर तूं रामाला माझ्याकडे घेऊन ये; माझे प्राण सत्वर निघून जाऊं पहात आहेत. (१७–२१)

"अद्यापपर्यंत जर माझी आज्ञा चालत असेल तर तूं रामाला परत आण; रामावांचून मी आतां एक क्षणभरही जिवंत राहूं शकणार नाहीं. अथवा महाबाहु राम जर बराच दूर निघून गेला असेल तर मलाच रथामध्यें घाल आणि लवकर नेऊन रामाला भेटव. प्रमाणबद्ध दाढा असलेला तो महाधनुर्धारी राम कोठें गेला! सीतेसह त्याला पाहीपर्यंत मी जिवंत राहिलों तर भाग्यच म्हणावयाचें. अरे, ही अशी दुःखदायक अवस्था प्राप्त झाली असतांनाही इक्ष्वाकुनंदन राम येथें माझ्या दृष्टीस पडत नाहीं; तेव्हां यापेक्षां आतां अधिक कष्टदायक तें काय आहे! हे रामा! हे लक्ष्मणा! तपस्विनी सीते! मी दुःखानें अनाथासारखा मरत आहें, हें तुम्हांला समजत नाहीं काय?" (२२–२६)

याप्रमाणें त्या दुःखामुळें पुष्कळसा निश्चेष्ट झालेला तो दशरथ राजा अत्यंत

अवगाढः सुदुष्पारं शोकसागरमब्रवीत् २७
रामशोकमहावेगः सीताविरहपारगः ।
श्वसितोर्मिमहावर्तो बाष्पवेगजलाविलः २८
बाहुविक्षेपमीनोऽसौ विक्रन्दितमहास्वनः ।
प्रकीर्णकेशशैवालः कैकेयीवडवामुखः २९
ममाश्रुवेगप्रभवः कुब्जावाक्यमहाग्रहः ।
वरवेलो नृशंसाया रामप्रव्राजनायतः ३०
यस्मिन्बत निमग्नोऽहं कौसल्ये राघवं विना ।
दुस्तरो जीवता देवि मयायं शोकसागरः ३१
अशोभनं योऽहमिहाद्य राघवं दिदृक्षमाणो न लभे सलक्ष्मणम् ।
इतीव राजा विलपन्महायशाः पपात तूर्णं शयने स मूर्च्छितः ३२
इति विलपति पार्थिवे प्रनष्टे करुणतरं द्विगुणं च रामहेतोः ।

अपार शोकानें व्याकुळ होऊन कौसल्येला म्हणाला, "रामासंबंधीं शोक हाच ज्याचा प्रचंड वेग आहे, सीतेचा विरह हेंच ज्याचें पर तीर आहे, दुःखाचे सुस्कारे हेच ज्याचे लाटांमधील मोठमोठे भोंवरे आहेत, अश्रूंच्या प्रवाहांनीं जो गढूळ झालेला आहे, शोकभरांत होणारे हस्तविक्षेप हेच ज्यांतील मत्स्य आहेत, आक्रोश हीच ज्याची मोठी गर्जना आहे, अस्ताव्यस्त झालेले केस हेंच ज्यांतील शेवाळें आहे, कैकेयी हाच ज्यांतील वडवाग्नि आहे, माझ्या अश्रुप्रवाहाला ज्यानें उत्पन्न केलें, त्या कुबड्या मंथरेचीं भाषणें याच ज्यांतील मोठमोठ्या सुसरी आहेत, जिनें रामाला वनवासास पाठविलें अशा दुष्ट कैकेयीला दिलेला वर हीच ज्याची मर्यादा आहे, अशा ह्या शोकासागरांत मी बुडून गेलों आहे व हे देवी कौसल्ये! रामावांचून हा शोकसागर मला जिवंतपणें तरून जातां येणें अशक्य आहे. लक्ष्मणासह रामाला पाहण्याची उत्कंठा असतांनाही तो आज माझ्या दृष्टीस पडत नाहीं, हें एक माझें मोठें पातकच आज उभें राहिलें आहे." असा शोक करीत करीत तो महाकीर्तिमान् दशरथ राजा मूर्च्छित होऊन एकाएकीं शय्येवर पडला व याप्रमाणें रामाकरितां विलाप करीत राजा मूर्च्छित होऊन पडला असतां त्याचें तें अतिशय करुणाजनक भाषण ऐकून राममाता कौसल्यादेवीला ह्या दुःखांत

**वचनमनुनिशम्य तस्य देवी भयमगमत्पुनरेव राममाता ३३**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनषष्टितमः सर्गः॥५९.

षष्टितमः सर्गः । [२३७२]

**ततो भूतोपसृष्टेव वेपमाना पुनः पुनः ।**
**धरण्यां गतसत्त्वेव कौसल्या सूतमब्रवीत् १**
**नय मां यत्र काकुत्स्थः सीता यत्र च लक्ष्मणः ।**
**तान्विना क्षणमप्यद्य जीवितुं नोत्सहे ह्यहम् २**
**निवर्तय रथं शीघ्रं दण्डकान्नय मामपि ।**
**अथ तान्नानुगच्छामि गमिष्यामि यमक्षयम् ३**
**बाष्पवेगोपहतया स वाचा सज्जमानया ।**
**इदमाश्वासयन्देवीं सूतः प्राञ्जलिरब्रवीत् ४**
**त्यज शोकं च मोहं च संभ्रमं दुःखजं तथा ।**
**व्यवधूय च संतापं वने वत्स्यति राघवः ५**
**लक्ष्मणश्चापि रामस्य पादौ परिचरन्वने ।**

---

आणखी पतिवियोगदुःखाचीही भर पडणार कीं काय, असें मनांत येऊन दुप्पट भय वाटूं लागलें. (२७-३३)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग संपला ॥ ५९ ॥

त्यानंतर गतप्राण झाल्यासारखी होऊन भूमीवर मूर्च्छित पडलेली ती कौसल्या सावध झाल्यावर पिशाच्चानें झपाटल्याप्रमाणें कांपत कांपत त्या सारथ्याला म्हणाली, " जिकडे राम, सीता व लक्ष्मण असतील तिकडे मला ने; त्यांच्या-वांचून एक क्षणभर देखील आज जिवंत राहणें मला बरें वाटत नाहीं. रथ लवकर परत फिरव आणि मलाही लवकर दंडकारण्यांत घेऊन जा. माझें जर त्यांच्याकडे जाणें होत नसेल तर मी यमसदनाचीच वाट धरणार." ( १-३ )

यावर तो सुमंत्र सारथी हात जोडून अश्रुप्रवाहानें कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत राजपत्नी कौसल्येला धीर देण्याकरितां म्हणाला, " शोक, मोह व दुःखजन्य धांदल तूं सोडून दे. राम दुःख टाकून देऊन वनामध्यें

आराधयति धर्मज्ञः परलोकं जितेन्द्रियः ६
विजनेऽपि वने सीता वासं प्राप्य गृहेष्विव ।
विस्रम्भं लभतेऽभीता रामे विन्यस्तमानसा ७
नास्या दैन्यं कृतं किंचित्सुसूक्ष्ममपि लक्ष्यते ।
उचितेव प्रवासानां वैदेही प्रतिभाति मे ८
नगरोपवनं गत्वा यथा स्म रमते पुरा ।
तथैव रमते सीता निर्जनेषु वनेष्वपि ९
बालेव रमते सीता बालचन्द्रनिभानना ।
रामारामे ह्यदीनात्मा विजनेऽपि वने सती १०
तद्गतं हृदयं यस्यास्तदधीनं च जीवितम् ।
अयोध्या हि भवेदस्या रामहीना तथा वनम् ११
परिपृच्छति वैदेही ग्रामांश्च नगराणि च ।
गतिं दृष्ट्वा नदीनां च पादपान्विविधानपि १२

---

रहात आहे. धर्मवेत्ता व जितेंद्रिय लक्ष्मणही वनामध्यें रामाच्या पायाची सेवा करून परलोक-प्राप्ति करीत आहे आणि निर्जन वनामध्येंही होणारें वास्तव्य घरा-प्रमाणेंच समजून व अत्यंत निष्ठापूर्वक रामाचेच ठिकाणीं मन ठेवून सीता निर्भयपणानें त्यांसह रहात आहे. तिच्या ठिकाणीं अतिशय थोडें देखील दैन्य दिसून येत नाहीं; इतकेंच नव्हे तर प्रवासांची जणूं काय तिला नेहमीं संवयच आहे अशा प्रकारें मला सीता भासत आहे. नगरांतील उपवनामध्यें गेल्यावर जसें सीतेचें मन पूर्वी रमत असे, तसेंच निर्जन वनामध्येंही तिचें मन रमत अस-लेलें दिसतें. नुकत्याच उगवलेल्या चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त आणि मनोहर अशी सीता निर्जन वनामध्यें असूनही रामाविषयींच्या आनंदरूपी उप-वनांत एखाद्या बालेप्रमाणें हर्षभरित होऊन क्रीडा करीत आहे. ( ४-१० )

"त्या सीतेचें मन रामाच्याच ठिकाणीं जडून गेलें असून तिचें जीवितही रामा-वरच अवलंबून आहे यामुळें रामावांचून असलेली ही अयोध्यानगरी देखील तिला वनासारखीच वाटत आहे. आणि रामाजवळ असल्यामुळें तें वनच तिला अयोध्येप्रमाणें भासत आहे. गांव, नगरें, नद्यांचे प्रवाह आणि नाना प्रकारचे

रामं वा लक्ष्मणं वापि दृष्ट्वा जानाति जानकी ।
अयोध्या क्रोशमात्रे तु विहारमिव संश्रिता १३
इदमेव स्मराम्यस्याः सहसैवोपजल्पितम् ।
कैकेयीसंश्रितं जल्पं नेदानीं प्रतिभाति माम् १४
ध्वंसयित्वा तु तद्वाक्यं प्रमादात्पर्युपस्थितम् ।
ह्लादनं वचनं सूतो देव्या मधुरमब्रवीत् १५
अध्वना वातवेगेन संभ्रमेणातपेन च ।
न विगच्छति वैदेह्याश्चन्द्रांशुसदृशी प्रभा १६
सदृशं शतपत्रस्य पूर्णचन्द्रोपमप्रभम् ।
वदनं तद्वदान्याया वैदेह्या न विकम्पते १७
अलक्तरसरक्ताभावलक्तरसवर्जितौ ।
अद्यापि चरणौ तस्याः पद्मकोशसमप्रभौ १८
नूपुरोत्कृष्टलीलेव खेलं गच्छति भामिनी ।

वृक्ष पाहून सीता रामाला अथवा लक्ष्मणाला त्यांच्यासंबंधींची माहिती विचारून समजून घेत असते आणि अयोध्येपासून एका कोसावरच फिरावयास गेलो आहे कीं काय, अशा उत्साहानें ती वनामध्यें असते. हें गांवें, नगर, वृक्ष वगैरेबद्दल तिनें केलेलें भाषण एवढेंच काय तें मला आठवतें; कैकेयीसंबंधानें ती काय बोलली, तें आतां मला आठवत नाहीं." (११–१४)

याप्रमाणें सारथी कौसल्येला सांगत असतांना अवधान न राहिल्यामुळें कैकेयीसंबंधाचें सीतेचें बोलणें एकाएकीं त्याच्या तोंडांत आलें होतें; परंतु तें जिभेवर आलेले शब्द एकाएकीं दाबून टाकून कौसल्येला ज्यानें आनंद होईल, असें मधुर भाषण तो तिच्याशीं करूं लागला. तो म्हणाला, "वाट चालण्यानें, पुष्कळ वारा लागल्यानें, व्याघ्रादिक दिसल्यामुळें भीतीनें अथवा उन्हानेंही चंद्रकिरणांप्रमाणें असलेली सीतेची कांति कमी होत नाहीं. त्या उदार सीतेचें तें पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी असलेलें व कमलासारखें मुख म्लान होत नाहीं. अळत्याचा रस लावलेला नसून देखील तो लावल्याप्रमाणें लाल असे तिचे पावलें अद्यापि कमलांच्या कळ्याप्रमाणेंच सुकुमार आहेत. नूपुरांच्या योगानें जिच्या लीलेंत अधिकाधिक

इदानीमपि वैदेही तद्रागान्यस्तभूषणा १९
गजं वा वीक्ष्य सिंहं वा व्याघ्रं वा वनमाश्रिता ।
नाहारयति संत्रासं बाहू रामस्य संश्रिता २०
न शोच्यास्ते न चात्मा ते शोच्यो नापि जनाधिपः ।
इदं हि चरितं लोके प्रतिष्ठास्यति शाश्वतम् २१
विधूय शोकं परिहृष्टमानसा महर्षियाते पथि सुव्यवस्थिताः ।
वने रता वन्यफलाशनाः पितुः शुभां प्रतिज्ञां प्रतिपालयन्ति ते २२
तथापि सूतेन सुयुक्तवादिना निवार्यमाणा सुतशोककर्शिता ।
न चैव देवी विरराम कूजितात्प्रियेति पुत्रेति च राघवेति च २३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षष्टितमः सर्गः ॥६०॥

[२३९५]

भर पडते, अशी ती सीता वनांतून विलासपूर्वक जात आहे आणि पतिप्रेम वाढविणाऱ्या भूषणांची आवड असल्यामुळेंच कीं काय, तिनें अद्यापीही आपल्या भूषणांचा त्याग केलेला नाहीं. ( १५-१९ )

"वनामध्यें रहात असलेली सीता रामाच्या बाहूंचा आश्रय असल्याकारणानें हत्ती, सिंह अथवा वाघ दृष्टीस पडला तरी मुळींच भीत नाहीं. तात्पर्य त्यांच्याबद्दल, स्वतः-बद्दल अथवा राजाबद्दल तुला शोक करण्याचें मुळींच कारण नाही. हें रामचरित्र या जगांत शाश्वत राहील. शोक टाकून देऊन व आनंदित अंतःकरणानें युक्त होऊन त्या तिघांनीं महर्षीनीं आचरलेल्या मार्गाचा अगदीं उत्तम रीतीनें अव-लंब केलेला आहे. वनांमध्यें त्यांचें मन रमत आहे आणि वनांतील फलांवर उपजीविका करून पित्याची शुभ प्रतिज्ञा ते शेवटास नेत आहेत." याप्रमाणें अत्यंत योग्य भाषण करणाऱ्या त्या सारथ्यानें जरी कौसल्येचें निवारण केलें, तरी पुत्रशोकानें कृश झालेली ती कौसल्या " हे प्रिय पुत्रा ! हे रामा !" असा अधिकाधिक शोक करूं लागली ( २०-२३ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं साठावा सर्ग संपला. ॥६०॥

एकषष्टितमः सर्गः ।

वनं गते धर्मरते रामे रमयतां वरे ।
कौसल्या रुदती चार्ता भर्तारमिदमब्रवीत् १
यद्यपि त्रिषु लोकेषु प्रथितं ते महद्यशः ।
सानुक्रोशो वदान्यश्च प्रियवादी च राघवः २
कथं नरवरश्रेष्ठ पुत्रौ तौ सह सीतया ।
दुःखितौ सुखसंवृद्धौ कथं दुःखं सहिष्यतः ३
सा नूनं तरुणी श्यामा सुकुमारी सुखोचिता ।
कथमुष्णं च शीतं च मैथिली विसहिष्यते ४
भुक्त्वाशनं विशालाक्षी सूपदंशान्वितं शुभम् ।
वन्यं नैवारमाहारं कथं सीतोपभोक्ष्यते ५
गीतवादित्रनिर्घोषं श्रुत्वा शुभसमन्विता ।
कथं क्रव्यादसिंहानां शब्दं श्रोष्यत्यशोभनम् ६
महेन्द्रध्वजसङ्काशः क्व नु शेते महाभुजः ।
भुजं परिघसङ्काशमुपाधाय महाबलः ७

---

मनोविनोदन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आणि धर्माच्या ठिकाणीं रत असलेला राम वनांत गेला असतां दुःखानें व्याकुळ झालेली कौसल्या रडत रडत आपल्या पतीला म्हणाली, " रघुवंशांत उत्पन्न झालेला दशरथ राजा दयाळु, दाता आणि प्रिय भाषण करणारा आहे, अशी त्रैलोक्यामध्यें आपली कीर्ति पसरली आहे. तेव्हां हे राजश्रेष्ठा ! सीतेसह त्या पुत्रांना आरण कसें टाकलें ? सुखांत वाढलेल्या त्या पुत्रांना आज दुःख प्राप्त झालें आहे; परंतु त्यांना तें दुःख सहन कसें होईल ! खरोखर बाल्यावस्था संपून यौवनावस्थेंत पदार्पण केलेल्या सुकुमार आणि सुखाची संवय असलेल्या सीतेला ऊन व थंडी कशी सहन होईल ! आजपर्यंत चमचमीत चटण्या कोशिंबिरी वगैरेंनीं युक्त असें चांगलें भोजन करून ती विशालाक्षी सीता वनांतलि तृणधान्याचें अन्न कसें बरें खाऊं शकेल ! ( १-५ )

"गीत आणि वाद्य यांचा आवाज ऐकून नेहमीं मंगलयुक्त असलेल्या त्या सीतेला श्वापदें आणि सिंह यांचा अमंगल शब्द कसा बरें ऐकवेल! महाबलाढ्य आजानुबाहु

पद्मवर्णं सुकेशान्तं पद्मनिःश्वासमुत्तमम् ।
कदा द्रक्ष्यामि रामस्य वदनं पुष्करेक्षणम्  ८
वज्रसारमयं नूनं हृदयं मे न संशयः ।
अपश्यन्त्या न तं यद्वै फलतीदं सहस्रधा  ९
यत्त्वया करुणं कर्म व्यपोह्य मम बान्धवाः ।
निरस्ताः परिधावन्ति सुखार्हाः कृपणा वने  १०
यदि पञ्चदशे वर्षे राघवः पुनरेष्यति ।
जह्याद्राज्यं च कोशं च भरतो नोपलक्ष्यते  ११
भोजयन्ति किल श्राद्धे केचित्स्वानेव बान्धवान् ।
ततः पश्चात्समीक्षन्ते कृतकार्या द्विजोत्तमान्  १२
तत्र ये गुणवन्तश्च विद्वांसश्च द्विजातयः ।
न पश्चात्तेऽभिमन्यन्ते सुधामपि सुरोपमाः  १३
ब्राह्मणेष्वपि वृत्तेषु भुक्तशेषं द्विजोत्तमाः ।

---

राम आपला इंद्राच्या ध्वजाप्रमाणें असलेला व अडसरासारखा बाहु उशाशीं घेऊन कोठें बरें निजत असेल ! कमलाच्या पानासारखा रंग, कमलाप्रमाणें सुगंधि निःश्वास, उत्कृष्ट केश आणि कमलाप्रमाणें नेत्र यांनीं युक्त असलेलें रामाचें सुन्दर मुख माझ्या कधीं बरें दृष्टीस पडेल ! खरोखर माझें हृदय वज्रासारखें कठिण आहे, यांत संशय नाहीं. कारण राम माझ्या दृष्टीस पडत नसूनदेखील याचे हजारों तुकडे तुकडे होत नाहींत. विचार न करितां जें हें कैकेयीनें दुष्ट कृत्य केलें, त्यामुळें दूर केलेलीं माझीं माणसें सुखोपभोगाला योग्य असतांना सुद्धां दीन होऊन वनामध्यें भटकत आहेत. ( ६-१० )

"पंधराव्या वर्षी राम जरी परत आला तरी भरत राज्य आणि खजिना सोडून देईल, असा संभव दिसत नाहीं. कांहीं लोक खरोखर चांगल्या ब्राह्मणांना श्राद्धाचें आमंत्रण देऊन आपल्या बांधवांनाच श्राद्धाला त्यांना जेवावयास घालतात आणि श्राद्ध आटोपल्यावर निमंत्रित श्रेष्ठ ब्राह्मणांना इष्टांच्या पंक्तीला बसविण्याचा विचार करतात परंतु; त्या निमंत्रित ब्राह्मणांमध्यें जे कोणी गुणी, विद्वान्, देवासारखें असतात, त्यांना इष्ट पंक्तीला जरी अमृताप्रमाणें स्वादिष्ट अन्न असलें, तरी

नाभ्युपेतुमलं प्राज्ञाः शृङ्गच्छेदमिवर्षभाः १४
एवं कनीयसा भ्रात्रा भुक्तं राज्यं विशांपते ।
भ्राता ज्येष्ठो वरिष्ठश्च किमर्थं नावमन्यते १५
न परेणाहृतं भक्ष्यं व्याघ्रः खादितुमिच्छति ।
एवमेव नरव्याघ्रः परलीढं न मन्यते १६
हविराज्यं पुरोडाशः कुशा यूपाश्च खादिराः ।
नैतानि यातयामानि कुर्वन्ति पुनरध्वरे १७
तथा ह्यात्तमिदं राज्यं हृतसारां सुरामिव ।
नाभिमन्तुमलं रामो नष्टसोममिवाध्वरम् १८
नैवंविधमसत्कारं राघवो मर्षयिष्यति ।
बलवानिव शार्दूलो बालधेरभिमर्शनम् १९
नैतस्य सहिता लोका भयं कुर्युर्महामृधे ।

पसंत पडत नाहीं. सारांश जरी प्रथम ब्राह्मणच भोजन करून गेलेले असतात, तरी शिंगें उपटणें ज्याप्रमाणें बैलांना सहन होत नाहीं, त्याप्रमाणें श्रेष्ठ ब्राह्मणांना दुसरे लोक जेवण करून गेल्यावर शिल्लक राहिलेलें अन्न स्वीकारण्याचा अपमान सहन होत नाहीं. त्याचप्रमाणें हे राजा ! लहान भावानें उपभोगिलेलें राज्य मोठा आणि गुणांनीं श्रेष्ठ असा भाऊ कसें बरें स्वीकारील ? ( ११–१५ )

"ज्याप्रमाणें वाघ दुसऱ्या प्राण्यानें उष्टावलेलें भक्ष्य खाण्याची इच्छा करीत नाहीं, त्याचप्रमाणें नरव्याघ्र पुरुषश्रेष्ठ रामही दुसऱ्याचें उष्टें राज्य कधींही स्वीकारणार नाहीं. हविर्द्रव्यें, तूप, पुरोडाश, दर्भ आणि खदिरवृक्षाचे खांब हीं एकदां यज्ञामध्यें उपयोगांत आणलीं असतां पुनः यज्ञांत त्यांचा उपयोग करीत नाहींत, त्याचप्रमाणें भरतानें उपभोगलेलें हें राज्य सत्त्व काढून घेतलेल्या सुरे-प्रमाणें अथवा यज्ञ होऊन शिल्लक राहिलेल्या निरुपयोगी सोमाप्रमाणें त्याज्य झाल्यामुळें राम स्वीकार करील, असें वाटत नाही. बलाढ्य वाघाला ज्याप्रमाणें कोणी शेंपटीला स्पर्श केलेला सहन होत नाहीं, त्याचप्रमाणें अशा प्रकारचा अप-मान रामाला सहन होणार नाहीं. मोठ्या लढाईमध्यें देवदैत्यांसह जरी लोक आले तरी ते याला घाबरून सोडण्यास समर्थ होणार नाहींत. तेव्हा मीं सांगितलेलें न

अधर्मं त्विह धर्मात्मा लोकं धर्मेण योजयेत् २०
नन्वसौ काञ्चनैर्बाणैर्महावीर्यो महाभुजः ।
युगान्त इव भूतानि सागरानपि निर्दहेत् २१
स तादृशः सिंहबलो वृषभाक्षो नरर्षभः ।
स्वयमेव हतः पित्रा जलजेनात्मजो यथा २२
द्विजातिचरितो धर्मः शास्त्रे दृष्टः सनातनैः ।
यदि ते धर्मनिरते त्वया पुत्रे विवासिते २३
गतिरेका पतिर्नार्या द्वितीया गतिरात्मजः ।
तृतीया ज्ञातयो राजंश्चतुर्थी नैव विद्यते २४
तत्र त्वं मम नैवासि रामश्च वनमाहितः ।
न वनं गन्तुमिच्छामि सर्वथा हा हता त्वया २५

---

ऐकतां त्यानेंच ज्या अर्थी राज्याचा स्वीकार केला नाहीं, त्या अर्थी तो तसें करण्यास असमर्थ होता, अशी मात्र शंका आपण मनांत आणूं नका. कारण जो धर्मात्मा अधर्मनिष्ठ लोकांनाहि धर्माकडे वळवीत असतो, तो स्वतः पित्याच्या आज्ञेची अवहेलना करण्यास कसा बरें प्रवृत्त होईल ? ( १६–२० )

"युगांच्या शेवटीं ईश्वर ज्याप्रमाणें भूतांचा संहार करतो, त्याप्रमाणें हा महाशक्तिमान् व अतुलपराक्रमी राम आपल्या सोन्याच्या पिसांनीं युक्त असलेल्या बाणांच्या योगानें समुद्रांनाही जाळून टाकील. परंतु मासा ज्याप्रमाणें आपल्या पोटच्या पोरालाच खाऊन टाकतो, त्याप्रमाणें सिंहाप्रमाणें पराक्रमी व विशालनेत्र पुरुषश्रेष्ठ पुत्राला स्वतः पित्यानेंच राज्यभ्रष्ट केलें, धर्मनिष्ठ पुत्राला ज्या अर्थी आपण हांकून दिलें आहे, त्या अर्थी श्रेष्ठ अशा त्रैवर्णिक द्विजांनीं आचरलेला व पुरातन ऋषींनीं वेदामध्यें व शास्त्रामध्यें पाहिलेला सनातन धर्म आपल्याला मान्य नाहीं, असें दिसतें. हे राजा ! स्त्रीला एक पति, दुसरा पुत्र आणि तीसरे बांधव अशा तीनच गति शास्त्रानें सांगितल्या आहेत व यांशिवाय चवथी गति तिला सांगितली नाहीं. त्यांपैकीं आपण जी माझी पहिली गति ती मला असून नसल्यासारखीच आहे; कारण आपण माझ्या सवतीच्या आधीन आहांत. रामाला आपण वनांत पाठविलें आहे आणि मी सधवा असल्यामुळें वनांत

**हतं त्वया राष्ट्रमिदं सराज्यं हताः स्म सर्वाः सह मन्त्रिभिश्च ।**
**हता सपुत्रास्मि हताश्च पौराः सुतश्च भार्या च तव प्रहृष्टौ २६**
**इमां गिरं दारुणशब्दसंहितां निशम्य रामेति मुमोह दुःखितः ।**
**ततः स शोकं प्रविवेश पार्थिवः स्वदुष्कृतं चापि पुनस्तथास्मरत् २७**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकषष्टितमः सर्गः॥६१॥

द्विषष्टितमः सर्गः । [२४२२]

**एवं तु क्रुद्धया राजा राममात्रा सशोकया ।**
**श्रावितः परुषं वाक्यं चिन्तयामास दुःखितः १**
**चिन्तयित्वा स च नृपो मोहव्याकुलितेन्द्रियः ।**
**अथ दीर्घेण कालेन संज्ञामाप परंतपः २**
**स संज्ञामुपलभ्यैव दीर्घमुष्णं च निःश्वसन् ।**
**कौसल्यां पार्श्वतो दृष्ट्वा ततश्चिन्तामुपागमत् ३**

---

जाण्याची माझी इच्छा नाहीं. तेव्हां दुसरी गति मला नाहींच आणि तिसरी गति जीं माहेरचीं माणसें तीं मुळीं जवळच नाहींत. एकंदरींत सर्व प्रकार आपण माझा घात केला आहे. आपल्यामुळें राज्यासह सर्व राष्ट्राचा, मंत्र्यांसह सर्व स्त्रियांचा, पुत्रांसह माझा आणि प्रजाजनांचा घात झाला असून आपला पुत्र भरत आणि स्त्री कैकेयी यांना मात्र आनंद झाला आहे. (२१–२६)

हें प्रखर शब्दांनीं युक्त असलेलें भाषण ऐकून अधिकच दुःखी झालेला दशरथ राजा "हे रामा" असें म्हणून मूर्च्छित झाला. पुनः शुद्धीवर आल्यानंतर शोकाकुल झालेल्या आपल्या दुष्कृत्याची त्याला पुनः आठवण झाली. (२७)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकसष्टावा सर्ग संपला ॥ ६१ ॥

याप्रमाणें संतापलेली व शोकाकुल झालेली राममाता कठोर शब्दांनीं राजाला बोलली असतां तो दुःखित झालेला राजा विचार करूं लागला. विचार करतां करतां मोहानें त्याचें मन भारावलें व बराच काल लोटल्यावर तो शत्रूंना ताप देणारा भूपति शुद्धीवर आला. शुद्धीवर येतांक्षणींच दीर्घ आणि उष्ण असे सुस्कारे टाकूं लागलेला तो राजा बाजूला बसलेल्या कौसल्येकडे पाहून विचार करूं

तस्य चिन्तयमानस्य प्रत्यभात्कर्म दुष्कृतम्।
यदनेन कृतं पूर्वमज्ञानाच्छब्दवेधिना ४
अमनास्तेन शोकेन रामशोकेन च प्रभुः।
द्वाभ्यामपि महाराजः शोकाभ्यामभितप्यते ५
दह्यमानस्तु शोकाभ्यां कौसल्यामाह दुःखितः।
वेपमानोऽञ्जलिं कृत्वा प्रसादार्थमवाङ्मुखः ६
प्रसादये त्वां कौसल्ये रचितोऽयं मयाञ्जलिः।
वत्सला चानृशंसा च त्वं हि नित्यं परेष्वपि ७
भर्ता तु खलु नारीणां गुणवान्निर्गुणोऽपि वा।
धर्मं विमृशमानानां प्रत्यक्षं देवि दैवतम् ८
सा त्वं धर्मपरा नित्यं दृष्टलोकपरावरा।
नार्हसे विप्रियं वक्तुं दुःखितापि सुदुःखितम् ९
तद्वाक्यं करुणं राज्ञः श्रुत्वा दीनस्य भाषितम्।
कौसल्या व्यसृजद्बाष्पं प्रणालीव नवोदकम् १०

लागला. तेव्हां त्या केवळ शब्दानें वेध घेतलेल्या राजानें अज्ञानामुळें जें एक दुष्कर्म पूर्वी केलें होतें, त्याची त्याला विचार करतां करतां आठवण आली. तो शोक आणि रामसंबंधीं शोक अशा दुहेरी शोकानें ज्याचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालें आहे, असा तो राजा दशरथ फारच व्याकुल झाला. ( १-५ )

आणि दग्ध होत असलेला तो दुःखाकुल राजा तोंड खालीं घालून आणि हात जोडून कौसल्येला प्रसन्न करून घेण्याकरितां कांपत कांपत म्हणाला, "हे कौसल्ये! माझ्याकर कृपा कर; हे मी हात जोडले आहेत. तूं शत्रूंशींही नेहमीं प्रेमानें व चांगुलपणानें वागणारी आहेस. यासाठीं माझ्यावर कृपा कर. हे देवि! पति जरी गुणी अथवा निर्गुणी असला तरी धर्म जाणणाऱ्या स्त्रियांचा तो प्रत्यक्ष देवच आहे. तूं नेहमीं धर्माविषयीं तत्पर असून जगांतील बऱ्या वाईट गोष्टी पाहिलेल्या आहेस. तेव्हां तूं स्वतः जरी दुःखी झाली असलीस, तरी अत्यंत दुःखित झालेल्या पतीला उद्देशून असें कठोर भाषण करणें तुला योग्य नाहीं." याप्रमाणें दीन झालेल्या त्या दशरथ राजाचें तें करुणाजनक भाषण ऐकल्यावर पन्हाळ्यांतून

सा मूर्ध्नि बद्ध्वा रुदती राज्ञः पद्ममिवाञ्जलिम् ।
संभ्रमादब्रवीत्त्रस्ता त्वरमाणाक्षरं वचः ११
प्रसीद शिरसा याचे भूमौ निपतितास्मि ते ।
याचितास्मि हता देव क्षन्तव्याहं नहि त्वया १२
नैषा हि सा स्त्री भवति श्लाघनीयेन धीमता ।
उभयोर्लोकयोर्लोके पत्या या संप्रसाद्यते १३
जानामि धर्मं धर्मज्ञ त्वां जाने सत्यवादिनम् ।
पुत्रशोकार्तया तत्तु मया किमपि भाषितम् १४
शोको नाशयते धैर्यं शोको नाशयते श्रुतम् ।
शोको नाशयते सर्वं नास्ति शोकसमो रिपुः १५
शक्यमापतितः सोढुं प्रहारो रिपुहस्ततः ।
सोढुमापतितः शोकः सुसूक्ष्मोऽपि न शक्यते १६

---

ज्याप्रमाणें पावसाचें पाणी वाहूं लागावें, त्याप्रमाणें कौसल्येच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. (६-१०)

रडत रडत कौसल्येनें राजाला उद्देशून आपले कमलाप्रमाणें असलेले हात राजापुढें जोडले आणि घाबरलेली अशी ती घाईघाईनें अत्यंत आदरपूर्वक राजाला म्हणाली, "आपण कृपा करा; मी मस्तक नमवून आपली प्रार्थना करतें, आपल्याला साष्टांग नमस्कार घालतें. पतिदेव! माझी प्रार्थना करण्याचा आपल्यावर प्रसंग आला, हा माझा घातच झाला आहे कारण, पतीनें स्त्रीला हात जोडणें योग्य नव्हे. म्हणून मला आपण कधींही क्षमा करणें योग्य नाहीं. दोन्ही लोकांमध्यें स्तुत्य व विचारी पतीकडून जी हात जोडून घेणारी स्त्री असेल, ती खरोखर जगामध्यें कुलीन समजली जात नाहीं. हे धर्मज्ञ! मला पातिव्रत्य धर्म माहीत असून आपण सत्यवचनी आहांत याचीहि मला जाणीव आहे. केवळ पुत्रशोकानें व्याकुल झाल्यामुळें तें मी कांहीं तरी बोलून गेलें. शोक धैर्याचा नाश करतो; शोकामुळें शास्त्रज्ञान व्यर्थ होतें आणि शोकामुळें यश, पराक्रम इत्यादि सर्वांचाच नाश होतो. सारांश शोकासारखा शत्रु नाहीं. (११-१५)

"शत्रूच्या हातांनीं झालेला शस्त्रप्रहार सहन करणें शक्य आहे; परंतु, अगदीं

वनवासाय रामस्य पञ्चरात्रोऽत्र गण्यते ।
यः शोकहतहर्षायाः पञ्चवर्षोपमो मम १७
तं हि चिन्तयमानायाः शोकोऽयं हृदि वर्धते ।
नदीनामिव वेगेन समुद्रसलिलं महत् १८
एवं हि कथयन्त्यास्तु कौसल्यायाः शुभं वचः ।
मन्दरश्मिरभूत्सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १९
अथ प्रह्लादितो वाक्यैर्देव्या कौसल्यया नृपः ।
शोकेन च समाक्रान्तो निद्राया वशमेयिवान् २०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥६२॥

त्रिषष्टितमः सर्गः । [२४४२]

प्रतिबुद्धो मुहूर्तेन शोकोपहतचेतनः ।
अथ राजा दशरथः स चिन्तामभ्यपद्यत १
रामलक्ष्मणयोश्चैव विवासाद्वासवोपमम् ।
आपेदे उपसर्गस्तं तमः सूर्यमिवासुरम् २

---

थोडा देखील शोक झाला असतां तो सहन होणें शक्य नाहीं. रामाच्या वनवासाला आज पांच रात्री उलटून गेल्या व या पांच रात्री शोकानें माझा आनंद मावळून गेल्यामुळें मला पांच वर्षांप्रमाणें वाटल्या. समुद्राला भरती आली असतां त्याचें वाढलेलें पाणी भरतीच्या वेगानें ज्याप्रमाणें मिळालेल्या नद्यांच्या पात्रांतून वाढूं लागतें, त्याचप्रमाणें रामाचें चिंतन करतां करतां हा शोक माझ्या अन्तःकरणामध्यें दाटून येत आहे." याप्रमाणें कौसल्या उत्तम भाषण करीत असतांना सूर्यकिरणांचा प्रकाश कमी होऊन रात्र पडूं लागली. तेव्हां शोकानें व्याकुल झालेल्या राजाला राणी कौसल्या आपल्या गोड भाषणांनीं आनंदित करीत असतां त्याला डुलकी लागली. (१६-२०)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बासष्टावा सर्ग संपला ॥ ६२ ॥

नंतर शोकानें मूर्च्छित झालेला तो दशरथ राजा कांहीं वेळानें शुद्धीवर आला आणि विचार करूं लागला. राहूची छाया ज्याप्रमाणें सूर्याला आच्छादून टाकते,

सभार्ये हि गते रामे कौसल्यां कोसलेश्वरः ।
विवक्षुरसितापाङ्गीं स्मृत्वा दुष्कृतमात्मनः ३
स राजा रजनीं षष्ठीं रामे प्रव्राजिते वनम् ।
अर्धरात्रे दशरथः सोऽस्मरद् दुष्कृतं कृतम् ४
स राजा पुत्रशोकार्तः स्मृत्वा दुष्कृतमात्मनः ।
कौसल्यां पुत्रशोकार्तामिदं वचनमब्रवीत् ५
यदाचरति कल्याणि शुभं वा यदि वाशुभम् ।
तदेव लभते भद्रे कर्ता कर्मजमात्मनः ६
गुरुलाघवमर्थानामारम्भे कर्मणां फलम् ।
दोषं वा यो न जानाति स बाल इति होच्यते ७
कश्चिदाम्रवणं छित्त्वा पलाशांश्च निषिञ्चति ।
पुष्पं दृष्ट्वा फले गृध्नुः स शोचति फलागमे ८
अविज्ञाय फलं यो हि कर्म त्वेवानुधावति ।

---

त्याप्रमाणें त्या इंद्रासारख्या दशरथ राजाला राम-लक्ष्मणांना हांकून देण्यामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें घेरून टाकलें. सारांश याप्रमाणें राम आपल्या स्त्रीसह वनामध्यें निघून गेला असतां कोसलाधिपति दशरथराजाला आपल्या दुष्कृत्याची आठवण झाली. सुनेत्रा कौसल्येला तें सांगण्याची त्याची इच्छा झाली. राम वनामध्यें जाऊन सहावी रात्र आली असतां मध्यरात्रीं त्या दशरथाला आपल्या हातून घडलेल्या दुष्कृत्याची पुनः आठवण झाली. त्यानंतर पुत्रशोकानें व्याकुल झालेला तो दशरथराजा पुत्रशोकानें अत्यन्त दुःखी झालेल्या कौसल्येला म्हणाला. (१–५)

" हे कल्याणकारक स्त्रिये ! शुभ अथवा अशुभ जें कांहीं पुरुष करतो, त्याचें फल त्या कर्त्या पुरुषाला मिळतेंच. ऐहिक आणि पारलौकिक कर्मांना आरंभ करतांना त्यांच्या फलासंबंधानें उच्चनीच भाव आणि गुणदोष जो जाणत नाहीं, तो मूर्ख गणला जातो. फूल पाहून तशाच प्रकारचें फल प्राप्त होईल, या आशेनें आंबराई तोडून टाकून जो पळसांची लागवड करून पाणी घालून त्यांना वाढवितो, त्याला फलप्राप्तीच्या बाबतींत रडत बसण्याची पाळी येते. तेव्हां विचार न करतां

स शोचेत्फलवेलायां यथा किंशुकसेवकः ९
सोऽहमाम्रवणं छित्त्वा पलाशांश्च न्यषेचयम् ।
रामं फलागमे त्यक्त्वा पश्चाच्छोचामि दुर्मतिः १०
लब्धशब्देन कौसल्ये कुमारेण धनुष्मता ।
कुमारः शब्दवेधीति मया पापमिदं कृतम् ११
तदिदं मेऽनुसंप्राप्तं देवि दुःखं स्वयंकृतम् ।
संमोहादिह बालेन यथा स्याद्भक्षितं विषम् १२
यथान्यः पुरुषः कश्चित्पलाशैर्मोहितो भवेत् ।
एवं मयाप्यविज्ञातं शब्दवेध्यमिदं फलम् १३
देव्यनूढा त्वमभवो युवराजो भवाम्यहम् ।
ततः प्रावृडनुप्राप्ता मम कामविवर्धिनी १४
अपास्य हि रसान्भौमांस्तप्त्वा च जगदंशुभिः ।
परेताचरितां भीमां रविराचरते दिशम् १५

जो उतावीळ होऊन कार्य करूं लागतो, त्याला फलप्राप्तीचे वेळीं पळसांना पाणी घालणाऱ्या पुरुषाप्रमाणें शोक करण्याची पाळी येते. सारांश रामाला टाकून देऊन कैकेयीच्या मताप्रमाणें वागण्यांत मी आंबराई तोडून पळसांना पाणी घातलें आहे. तेव्हां फलप्राप्तीचे वेळीं आतां अविचारी अशा मला पश्चात्ताप होत आहे. (९-१०)

"अजराजाचा पुत्र शब्दानें वेध साधणारा आहे, अशी माझी प्रसिद्धि झाली होती. हे कौसल्ये! मी धनुष्य धारण करून लहानपणीं, हें पाप केलें आहे. तेव्हां हे देवी! न समजतांही लहान मुलानें खाल्लेलें विष जसा त्याचा घात करतें, त्याचप्रमाणें स्वतः केलेल्या त्या पापकर्माचें हें दुःखरूप फल मजपुढें आतां वाढून आलें आहे. ज्याप्रमाणें एखादा अज्ञानी पुरुष फळ माहीत नसल्यामुळें पळसाच्या फुलांनीं मोहित होऊन जातो, त्याचप्रमाणें शब्दानें वेध साधण्याच्या गुणाला भुलून जाऊन याप्रमाणें उत्पन्न होणारें त्याचें भयंकर फल मी जाणलें नाहीं. हे देवी! तुझें पाणिग्रहण होण्याचें पूर्वी मी ज्या वेळीं युवराज होतों, त्या वेळीं माझ्या इच्छेला वाढीस लावणारा वर्षाकाल आला. जमिनींतील रसांना शोषून घेऊन आणि आपल्या किरणांनीं सर्व जगाला ताप देऊन सूर्य घोर अशा दक्षिण दिशेला जाऊं लागला

उष्णमन्तर्दधे सद्यः स्निग्धा ददृशिरे घनाः ।
ततो जहृषिरे सर्वे भेकसारङ्गबर्हिणः १६
क्लिन्नपक्षोत्तराः स्नाताः कृच्छ्रादिव पतत्रिणः ।
वृष्टिवातावधूताग्रान्पादपानभिपेदिरे १७
पतितेनाम्भसा च्छन्नः पतमानेन चासकृत् ।
आबभौ मत्तसारङ्गस्तोयराशिरिवाचलः १८
पाण्डुरारुणवर्णानि स्रोतांसि विमलान्यपि ।
सुस्रुवुर्गिरिधातुभ्यः सभस्मानि भुजङ्गवत् १९
तास्मन्नतिसुखे काले धनुष्मानिषुमान्रथी ।
व्यायामकृतसंकल्पः सरयूमन्वगां नदीम् २०
निपाने महिषं रात्रौ गजं वाभ्यागतं मृगम् ।
अन्यद्वा श्वापदं किंचिज्जिघांसुरजितेन्द्रियः २१
अथान्धकारे त्वश्रौषं जले कुम्भस्य पूर्यतः ।
अचक्षुर्विषये घोषं वारणस्येव नर्दतः २२

---

असतां एकाएकीं उष्मा नाहींसा होऊन पाण्यानें भरलेले मेघ दृष्टीस पडूं लागले आणि त्यामुळें सर्व बेडूक, चातक व मोर यांना आनंद झाला ( ११-१६ )

"पंखांचे पृष्ठभाग ओले होऊन गेल्यामुळें तपश्चर्येसाठीं स्नान केल्याप्रमाणेंच जणूं काय दिसूं लागलेले पक्षी पावसाळ्यांतील वाऱ्यानें शेंडे हालणाऱ्या वृक्षांचा आश्रय घेऊं लागले. पडलेल्या आणि सारख्या पडणाऱ्या पावसामुळें मत्त चातक पक्ष्यांनीं युक्त असलेला पर्वत जलराशीप्रमाणें दिसूं लागला. पर्वतावरील धातूमुळें कोठें कोठें पांढरा वर्ण, कोठें तांबडा वर्ण व कोठें भस्ममिश्रित असे निर्मल प्रवाह सर्पासारख्या वाकड्या गतीनें पर्वतावरून वाहूं लागले. तेव्हां त्या अत्यंत सुखकर वेळीं मृगया करण्याचा विचार करून मी रथ, धनुष्य व बाण यांसह निघालों आणि रात्रीं पाण्यावर आलेला रेडा, हत्ती, हरिण अथवा दुसरें कांहीं श्वापद मारण्याची इच्छा धरून मी मन स्वाधीन न ठेवितां सरयू नदीच्या तीरावर गेलों. ( १७-२१ )

"तेव्हां अंधार पडल्यानंतर दृष्टीच्या टप्प्यांत नसलेल्या पाण्यामध्यें कोणी घागर

ततोऽहं शरमुद्धृत्य दीप्तमाशीविषोपमम् २३
शब्दं प्रति गजप्रेप्सुरभिलक्ष्यमपातयम्।
अमुञ्चं निशितं बाणमहमाशीविषोपमम् २४
तत्र वागुषसि व्यक्ता प्रादुरासीद्वनौकसः।
हा हेति पततस्तोये बाणाद्व्यथितमर्मणः २५
तस्मिन्निपतिते भूमौ वागभूत्तत्र मानुषी।
कथमस्मद्विधे शस्त्रं निपतेच्च तपस्विनि २६
प्रविविक्तां नदीं रात्रावुदहारोऽहमागतः।
इषुणाभिहतः केन कस्य वापकृतं मया २७
ऋषेर्हि न्यस्तदण्डस्य वने वन्येन जीवतः।
कथं नु शस्त्रेण वधो मद्विधस्य विधीयते २८
जटाभारधरस्यैव वल्कलाजिनवाससः।
को वधेन ममार्थी स्यात्किं वास्यापकृतं मया २९

---

भरून नेत असतांना शब्द करणाऱ्या हत्तीच्या ध्वनीप्रमाणें तो शब्द माझ्या कानीं आला. तेव्हां त्या हत्तीचा वध करण्याच्या इच्छेनें मी भात्यांतून बाण काढला आणि जिकडून शब्द आला, तिकडे नेम धरून सर्पाच्या विषाप्रमाणें तीक्ष्ण असलेला तो प्रखर बाण सोडला. तेव्हां ज्या ठिकाणीं मी तो सापाच्या विषासारखा बाण सोडला होता, त्या ठिकाणीं, बाण मर्मी लागून पाण्यांत पडत असलेल्या अरण्यवासी पुरुषाच्या तोंडांतून " हाय हाय " असे शब्द उषःकालीं स्पष्टपणें निघाले. ( २२–२५ )

" तो भूमीवर पडल्यानंतर चांगली मनुष्यवाणीच तेथें ऐकूं येऊं लागली. तो म्हणाला– 'माझ्यासारख्या तपस्व्यावर शस्त्र कां बरें सोडलें असावें? पाणी नेण्याकरितां मी रात्रीं निर्जन नदीवर आलों असतांना मला कोणी बरें बाण मारला ? मी कोणाचा बरें अपराध केला आहे ? परपीडेचा त्याग करून ऋषींप्रमाणें वनामध्यें वन्य आहारावर उपजीविका करणाऱ्या माझ्या पारख्याचा शस्त्रानें वध कां बरें केला आहे ? अरे, जटा धारण करून वल्कलें व अजिनें परिधान करून राहणाऱ्या माझा वध करण्यापासून कोणाचा बरें लाभ होणार होता ? आणि

एवं निष्फलमारब्धं केवलानर्थसंहितम् ।
न कश्चित्साधु मन्येत यथैव गुरुतल्पगम् ३०
नेमं तथानुशोचामि जीवितक्षयमात्मनः ।
मातरं पितरं चोभावनुशोचामि मद्वधे ३१
तदेतन्मिथुनं वृद्धं चिरकालभृतं मया ।
मयि पञ्चत्वमापन्ने कां वृत्तिं वर्तयिष्यति ३२
वृद्धौ च मातापितरावहं चैकेषुणा हतः ।
केन स्म निहताः सर्वे सुबलेनाकृतात्मना ३३
तां गिरं करुणं श्रुत्वा मम धर्मानुकाङ्क्षिणः ।
कराभ्यां सशरं चापं व्यथितस्यापतद्भुवि ३४
तस्याहं करुणं श्रुत्वा ऋषेर्विलपतो निशि ।
संभ्रान्तः शोकवेगेन भृशमासं विचेतनः ।
तं देशमहमागम्य दीनसत्त्वः सुदुर्मनाः ३५

---

या वध करणाऱ्याचा मी तरी काय बरें अपराध केला होता ? ज्याप्रमाणें मातृगमन करणाऱ्याला इहलोकीं अथवा परलोकीं कोणीही चांगलें म्हणणार नाहीं, त्याचप्रमाणें केवळ अनर्थालाच कारण होणारें व या लोकींही कांहीं एक फल न देणारें असें जें कृत्य कोणी केलें आहे, तें करणाऱ्याला कोणीही चांगलें म्हणणार नाहीं. ( २६–३० )

"माझ्या या जीविताचा नाश झाला, याबद्दल मला विशेषसें वाईट वाटत नाहीं, परंतु माझा वध झाल्यामुळें माझ्या उभयतां मातापितरांचा वध झाल्याबद्दल मला फार वाईट वाटत आहे. या वृद्ध दंपतीचें मीं पुष्कळ दिवसपर्यंत पोषण केलें आहे. तेव्हां आतां मी मेल्यानंतर हे आपली उपजीविका कशी करणार ? आईबाप वृद्ध असून माझा तर एकाच बाणानें वध झाला आहे. तेव्हां अजितेंद्रिय अशा कोणी बरें महामूर्खानें आम्हां सर्वांचा वध केला आहे ?" ( ३१–३३ )

"असें करुणाजनक भाषण ऐकल्याबरोबर मला दुःख झालें आणि धर्माला अनुसरून वागणाऱ्या माझ्या हातांतून बाणासह धनुष्य गळून खालीं पडलें. शोक करीत असलेल्या त्या ऋषितुल्य पुरुषाचे ते करुणा आणणारे शब्द रात्रीं ऐकतांक्षणीं मी

अपश्यमिषुणा तीरे सरय्वास्तापसं हतम् ३६
अवकीर्णजटाभारं प्रविद्धकलशोदकम् ।
पांसुशोणितदिग्धाङ्गं शयानं शल्यवेधितम ३७
स मामुद्वीक्ष्य नेत्राभ्यां त्रस्तमस्वस्थचेतनम् ।
इत्युवाच वचः क्रूरं दिधक्षन्निव तेजसा ३८
किं तवापकृतं राजन्वने निवसता मया ।
जिहीर्षुरम्भो गुर्वर्थं यदहं ताडितस्त्वया ३९
एकेन खलु बाणेन मर्मण्यभिहते मयि ।
द्वावन्धौ निहतौ वृद्धौ माता जनयिता च मे ४०
तौ नूनं दुर्बलावन्धौ मत्प्रतीक्षौ पिपासितौ ।
चिरमाशां कृतां कष्टां तृष्णां संधारयिष्यतः ४१
न नूनं तपसो वास्ति फलयोगः श्रुतस्य वा ।

---

घाबरून गेलों आणि अतिशयच दुःख झाल्यामुळें मला कांहीं सुचेनासें झालें माझें मन विषण्ण झालें आणि अत्यंत खिन्न होऊन मी त्या ठिकाणीं गेलों असतां सरयू नदीचे तीरावर बाण लागून पडलेला एक तपस्वी माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या जटा विखुरलेल्या होत्या, घागरींतील पाणी सांडून गेलें होतें आणि बाण लागून पडलेला तो तपस्वी धुळीनें व रक्तानें माखून गेलेला तेथें लोळत पडला होता. (३४-३७)

घाबरून व मनामध्यें अस्वस्थ होऊन तेथें गेलेल्या मला पाहिल्यावर तेजानें मला जाळून टाकण्याचाच विचार करणारा कीं काय, असा तो तपस्वी माझ्याशीं क्रूर भाषण करूं लागला, " हे राजा ! वनांत रहाणाऱ्या माझ्या हातून तुझा काय बरें अपराध झाला होता ? म्हणून वडिलांकरितां पाणी नेण्यासाठीं मीं येथें आलों असतांना तूं माझा बाणानें वध केलास. एक बाण मला मर्मी मारल्यानें तूं खरोखर माझी माता आणि माझा पिता अशा दोन वृद्ध अंधांचाही घात केला आहेस. ते खरोखर दुर्बल, आंधळे व तहानलेले असून माझी वाट पहात आहेत. इकडे काय प्रकार घडला याची त्यांना वार्ताच नसल्यामुळें इतक्यांत आपला पुत्र पाणी घेऊन येईल, अशी आशा धरून पुष्कळ वेळपर्यंत ते तहान दाबून ठेवतील. ( ३८-४१ )

पिता यन्मां न जानीते शयानं पतितं भुवि ४२
जानन्नपि च किं कुर्यादशक्तश्चापरिक्रमः ।
भिद्यमानमिवाशक्तस्त्रातुमन्यो नगो नगम् ४३
पितुस्त्वमेव मे गत्वा शीघ्रमाचक्ष्व राघव ।
न त्वामनुदहेत्क्रुद्धो वनमग्निरिवैधितः ४४
इयमेकपदी राजन्यतो मे पितुराश्रमः ।
तं प्रसादय गत्वा त्वं न त्वा संकुपितः शपेत् ४५
विशल्यं कुरु मां राजन्मर्म मे निशितः शरः ।
रुणद्धि मृदु सोत्सेधं तीरमम्बुरयो यथा ४६
सशल्यः क्लिश्यते प्राणैर्विशल्यो विनशिष्यति ।
इति मामविशच्चिन्ता तस्य शल्यापकर्षणे ४७
दुःखितस्य च दीनस्य मम शोकातुरस्य च ।
लक्षयामास स ऋषिश्चिन्तां मुनिसुतस्तदा ४८

" मी येथें भूमीवर लोळत पडलों आहें, ही बातमीहि पित्याला नाहीं. यावरून माझ्या तपाचें अथवा विद्येचें कांहींच फल नाहीं. अथवा ही वार्ता जरी त्याला कळली तरी अशक्त व पंगु असल्यामुळें तो करणार काय ? एक वृक्ष मोडून पडूं लागला असतां दुसरा वृक्ष त्याचें रक्षण करण्यास जसा असमर्थ असतो, तसा माझें रक्षण करण्यास तो असमर्थ आहे. यासाठीं हे रघुकुलोत्पन्न राजा ! तूंच माझ्या पित्याकडे लवकर जाऊन त्याला हा वृत्तांत कळव. वृद्धिंगत झालेला अग्नि ज्याप्रमाणें वन जाळून टाकतो, त्याप्रमाणें तो तुला क्रुद्ध होऊन जाळून भस्म न करो. हे राजा! ही पाऊलवाट आहे. या वाटेनें गेलें असतां माझ्या पित्याचा आश्रम लागतो. त्या पाऊलवाटेनें तूं जा आणि ज्या रीतीनें तो रागावून तुला शाप देणार नाहीं, अशा रीतीनें त्याला प्रसन्न करून घे. हे राजा ! माझ्या शरिरांत रुतलेला हा बाण काढून टाक; भुसभुशीत नदीतीराला पाण्याचा वेग ज्याप्रमाणें पीडा देतो, त्याप्रमाणें हा तीक्ष्ण बाण माझ्या मर्माला पीडा देत आहे. " ( ४२–४६ )

" याप्रमाणें त्या तपस्व्यानें सांगितलें असतां याचें शल्य जर न काढलें तर याच्या प्राणांना क्लेश होतील आणि काढलें तर हा मृत्यु पावेल, अशी त्याचें

ताम्यमानं स मां कृच्छ्रादुवाच परमार्थवित् ।
सीदमानो विवृत्ताङ्गो चेष्टमानो गतः क्षयम् ४९
संस्तभ्य शोकं धैर्येण स्थिरचित्तो भवाम्यहम् ।
ब्रह्महत्याकृतं तापं हृदयादपनीयताम् ५०
न द्विजातिरहं राजन्मा भूत्ते मनसो व्यथा ।
शूद्रायामस्मि वैश्येन जातो नरवराधिप ५१
इतीव वदतः कृच्छ्राद्बाणाभिहतमर्मणः ।
विघूर्णतो विचेष्टस्य वेपमानस्य भूतले ५२
तस्य त्वाताम्यमानस्य तं बाणमहमुद्धरम् ।
स मामुद्वीक्ष्य संत्रस्तो जहौ प्राणांस्तपोधनः ५३
जलार्द्रगात्रं तु विलप्य कृच्छ्रं मर्मव्रणं संततमुच्छ्वसन्तम् ।
ततः सरय्वां तमहं शयानं समीक्ष्य भद्रे सुभृशं विषण्णः ५४

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥६३॥ [२४९६]

---

शल्य काढण्यासंबंधानें मला काळजी वाटूं लागली. तेव्हां दुःखित, दीन व शोकाकुल झालेल्या माझी ती चिंता त्या ज्ञानी ऋषितुल्य मुनिपुत्रानें जाणली. तेव्हां शक्तिपात होऊन हालचाल बंद पडत चाललेला व गरगरां डोळे फिरवूं लागलेला तो ज्ञानी तपस्वी धैर्यानें शोक आंवरून धरून मोठ्या कष्टानें, दुःख करीत असलेल्या मला म्हणाला- "माझें मन स्वस्थ आहे; ब्रह्महत्येच्या पातकासंबंधाची भीति तूं आपल्या हृदयांतून काढून टाक." (४७-५०)

"हे राजा! मी ब्राह्मण नव्हे; तुझ्या मनाला ब्रह्महत्येची रुखरुख नको. हे राजाधिराज! वैश्यापासून शूद्र स्त्रीचे ठिकाणीं मी उत्पन्न झालों आहे.' बाण मर्मी लागल्यामुळें अत्यन्त वेदना होत असलेला व सर्वांगास कंप सुटून जमिनीवर तडफड करीत लोळत असलेला तो तपस्वी कष्टानें बोलत असतां मी तो बाण उपसून काढला व बाण निघाल्यानंतर अतिशय व्याकुल झालेल्या त्या तपस्व्यानें माझ्याकडे पाहून प्राण सोडले. तेव्हां पाण्यानें भिजलेल्या व भयंकर मर्माघात झाल्यामुळें विलाप करून आणि एकसारखा कण्हून कण्हून सरयूचे

चतुःषष्टितमः सर्गः ।

**वधमप्रतिरूपं तु महर्षेस्तस्य राघवः ।**
**विलपन्नेव धर्मात्मा कौसल्यामिदमब्रवीत्** १
**तदज्ञानान्महत्पापं कृत्वा संकुलितेन्द्रियः ।**
**एकस्त्वचिन्तयं बुद्ध्या कथं नु सुकृतं भवेत्** २
**ततस्तं घटमादाय पूर्णं परमवारिणा ।**
**आश्रमं तमहं प्राप्य यथाख्यातपथं गतः** ३
**तत्राहं दुर्बलावन्धौ वृद्धावपरिणायकौ ।**
**अपश्यं तस्य पितरौ लूनपक्षाविव द्विजौ** ४
**तन्निमित्ताभिरासीनौ कथाभिरपरिश्रमौ ।**
**तामाशां मत्कृते हीनावुपासीनावनाथवत्** ५
**शोकोपहतचित्तश्च भयसंत्रस्तचेतनः ।**

---

तीरावर मरून पडलेल्या त्या तपस्व्याला पाहून, हे भद्रे कौसल्ये ! मी अतिशयच खिन्न झालों.'' ( ५१–५४ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग संपला ॥ ६३॥

याप्रमाणें आपल्या हातून त्या महर्षीसारख्या तपस्व्याचा अयोग्य वध झाल्याची आठवण येऊन तो दशरथराजा पुत्राकरितां शोक करीत करीतच कौसल्येला म्हणाला, '' अज्ञानामुळें तें महापाप घडून आल्यावर माझीं इंद्रियें व्याकुल झालीं आणि आतां आपलें कल्याण कसें होईल, म्हणून मी एकटाच आपल्या मनानें विचार करूं लागलों. त्यानंतर उत्कृष्ट पाण्यानें भरलेली ती घागर घेऊन सांगितलेल्या मार्गानें मी त्या आश्रमाला गेल्यावर तेथें अशक्त, आंधळ्या व म्हाताऱ्या आणि हातांत धरून नेणारा दुसरा कोणी नसल्यामुळें पंख तुटलेल्या पक्ष्याप्रमाणें झालेल्या त्याच्या आईबापांना पाहिलें. तीं पुत्रावर ओढवलेल्या संकटाची कल्पना नसल्याकारणानें त्या पुत्रासंबधानें गोष्टी बोलत बोलत ते सुखानें बसले होते आणि वस्तुतः जरी माझ्यामुळें त्यांची निराशाच व्हावयास पाहिजे होती, तरी आतां आपला पुत्र उदक घेऊन येईल, अशी अनाथाप्रमाणें ते आशा धरून राहिले होते. ( १–५ )

तच्चाश्रमपदं गत्वा भूयः शोकमहं गतः ६
पदशब्दं तु मे श्रुत्वा मुनिर्वाक्यमभाषत ।
किं चिरायसि मे पुत्र पानीयं क्षिप्रमानय ७
यन्निमित्तमिदं तात सलिले क्रीडितं त्वया ।
उत्कण्ठिता ते मातेयं प्रविश क्षिप्रमाश्रमम् ८
यद्व्यलीकं कृतं पुत्र मात्रा ते यदि वा मया ।
न तन्मनसि कर्तव्यं त्वया तात तपस्विना ९
त्वं गतिस्त्वगतीनां च चक्षुस्त्वं हीनचक्षुषाम् ।
समासक्तास्त्वयि प्राणाः कथं त्वं नाभिभाषसे १०
मुनिमव्यक्तया वाचा तमहं सज्जमानया ।
हीनव्यञ्जनया प्रेक्ष्य भीतचित्त इव ब्रुवम् ११
मनसः कर्म चेष्टाभिरभिसंस्तभ्य वाग्बलम् ।
आचचक्षे त्वहं तस्मै पुत्रव्यसनजं भयम् १२

"माझें मन शोकाकुल होऊन मी भीतीनें अगदीं घाबरून गेलों होतों आणि त्या आश्रमामध्यें गेल्यावर तर मी अधिकच शोकाकुल झालों. माझ्या पावलांचा आवाज ऐकतांक्षणीं तो त्याचा बिचारा बाप म्हणाला, "अरे मुला! उशीर कां बरें लावीत आहेस? लवकर पाणी घेऊन ये. तूं आतांपर्यंत पाण्यामध्यें खेळत होतास, त्यामुळें ही तुझी आई फारच उत्सुक झाली आहे. तेव्हां तूं लवकर आश्रमांत ये मुला! तुझ्या आईच्या हातून अथवा माझ्या हातून जी कांहीं गोष्ट तुझ्या मन विरुद्ध झाली असेल, ती तूं मनामध्यें ठेवूं नकोस. आम्हां पंगूंची गति तूंच असून, आम्हां आंधळ्यांची दृष्टीही तूंच आहेस व तुझ्यावर आमचे प्राण अवलंबून आहेत. पण तूं आज असा बोलत कां नाहींस ?" (६-१०)

"याप्रमाणें अत्यंत वार्धक्यामुळें मुखांतून अक्षरें नीट उमटत नसल्यामुळें अस्पष्टपणें व अडखळत अडखळत भाषण करीत असलेल्या त्या बिचाऱ्या म्हाताऱ्याला पाहून मनांत अत्यन्त भिऊन गेलेला मी त्याच्याशीं बोलण्याचें ठरविलें. कशीबसी मनांतली भीति मी आवरून धरली आणि बोलण्याचा नेट करून मी त्याला त्याच्या पुत्राच्या मृत्यूची भीतिदायक वार्ता सांगितली. मी म्हणालों,

क्षत्रियोऽहं दशरथो नाहं पुत्रो महात्मनः ।
सज्जनावमतं दुःखमिदं प्राप्तं स्वकर्मजम् १३
भगवंश्चापहस्तोऽहं सरयूतीरमागतः ।
जिघांसुः श्वापदं किंचिन्निपाने वागतं गजम् १४
ततः श्रुतो मया शब्दो जले कुम्भस्य पूर्यतः ।
द्विपोऽयमिति मत्वाहं बाणेनाभिहतो मया १५
गत्वा तस्यास्ततस्तीरमपश्यमिषुणा हृदि ।
विनिर्भिन्नं गतप्राणं शयानं भुवि तापसम् १६
ततस्तस्यैव वचनादुपेत्य परितप्यतः ।
स मया सहसा बाण उद्धृतो मर्मतस्तदा १७
स चोद्धृतेन बाणेन सहसा स्वर्गमास्थितः ।
भगवन्तावुभौ शोचन्नन्धाविति विलप्य च १८
अज्ञानाद्भवतः पुत्रः सहसाभिहतो मया ।
शेषमेवं गते यत्स्यात्तत्प्रसीदतु मे मुनिः १९

"मी क्षत्रिय दशरथ आहें; आपणां महात्म्यांचा पुत्र नव्हे. सज्जनांनीं निंद्य मानलेली अशी ही दुःखकारक गोष्ट पूर्वसंचितामुळें माझ्या हातून घडली आहे. हे भगवन्! पाण्याजवळ आलेला हत्ती अथवा कांहीं श्वापद मारावें, या उद्देशानें मी हातांत धनुष्य घेऊन सरयू नदीच्या तीरावर आलों असतां, उदकामध्यें भरणाऱ्या घागरीचा मी शब्द ऐकला आणि हा हत्ती असावा, असें समजून मीं त्याला बाण मारला. (११-१५)

"त्यानंतर त्या तीरापाशीं गेल्यावर एक तपस्वी बाणानें हृदय फुटून जाऊन जीव जाण्याचा बेतांत आलेला आहे आणि भुईवर पडला आहे असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें. तेव्हां त्यानेंच सांगितल्यावरून मी त्याच्या शेजारीं गेलों आणि त्याला वेदना होत असतांना मीं तो बाण एकदम त्याच्या मर्मापासून उपसून काढला. तेव्हां बाण निघाल्याबरोबर 'आंधळ्या मातापितरांचें आतां कोण रक्षण करील?' असा तुम्हां उभयतां श्रेष्ठांना उद्देशून शोक करून तो एकदम स्वर्गाला गेला. याप्रमाणें न समजतां आपल्या पुत्राचा माझ्या हातून वध झाला.

स तच्छ्रुत्वा वचः क्रूरं मया तदघशंसिना ।
नाशकत्तीव्रमायासं स कर्तुं भगवानृषिः २०
स बाष्पपूर्णवदनो निःश्वसञ्शोकमूर्छितः ।
मामुवाच महातेजाः कृताञ्जलिमुपस्थितम् २१
यद्येतदशुभं कर्म न स्म मे कथयेः स्वयम् ।
फलेन्मूर्धा स्म ते राजन्सद्यः शतसहस्रधा २२
क्षत्रियेण वधो राजन्वानप्रस्थे विशेषतः ।
ज्ञानपूर्वं कृतः स्थानाच्च्यावयेदपि वज्रिणम् २३
सप्तधा तु भवेन्मूर्धा मुनौ तपसि तिष्ठति ।
ज्ञानाद्विसृजतः शस्त्रं तादृशे ब्रह्मवादिनि २४
अज्ञानाद्धि कृतं यस्मादिदं तेन जीवसे ।
अपि ह्यकुशलं न स्याद्राघवाणां कुतो भवान् २५

आहे. तेव्हां असा प्रकार झाल्यावर मला क्षमा करून आतां पुढें काय करावयाचें त्याविषयीं आपण मुनींनीं मला आज्ञा करावी. " असें तें आपल्या हातून घडलेलें पाप आपल्या स्वतःच्या मुखानेंच सांगणाऱ्या माझें भयंकर भाषण ऐकल्यावर तो भगवान् ऋषि मला भयंकर शाप देण्यास समर्थ होईना. (१६–२०)

" तेव्हां ज्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वहात आहेत असा व शोकानें व्याकुल झालेला महातेजस्वी वृद्ध सुस्कारे टाकीत टाकीत हात जोडून उभा राहिलेल्या मला म्हणाला, " हे राजा ! हें अशुभ कर्म जर तूं स्वतः मला सांगितलें नसतेंस तर तुझ्या मस्तकाचे शेंकडों किंवा हजारों तुकडे तुकडे होऊन गेले असते. हे राजा ! विशेषतः वानप्रस्थ धर्मानें वागणाऱ्याचा समजून उमजून जर क्षत्रियानें वध केला तर तो वध करणारा प्रत्यक्ष इंद्र जरी असला तरी त्याला देखील तो वध स्थानभ्रष्ट करील; मग तुझ्यासारख्या गरिबाची कथा काय ? खरें म्हटलें तर आईबापांच्या सेवेविषयीं तत्पर व वेदवेत्त्या ब्राह्मणासारख्या असलेल्या मुनितुल्य माझ्या पुत्रावर समजून उमजून शस्त्र सोडणाऱ्या तुझ्या मस्तकाचे सात तुकडे व्हावेत; परंतु हें कृत्य अज्ञानानें तुझ्या हातून घडल्यामुळें तूं जिवंत राहिला आहेस. बुद्धिपूर्वक जर ही गोष्ट झाली असती तर सर्व रघुवंश-

नय नौ नृप तं देशमिति मां चाभ्यभाषत ।
अद्य तं द्रष्टुमिच्छावः पुत्रं पश्चिमदर्शनम् २६
रुधिरेणावसिक्ताङ्गं प्रकीर्णाजिनवाससम् ।
शयानं भुवि निःसंज्ञं धर्मराजवशं गतम् २७
अथाहमेकस्तं देशं नीत्वा तौ भृशदुःखितौ ।
अस्पर्शयमहं पुत्रं तं मुनिं सह भार्यया २८
तौ पुत्रमात्मनः स्पृष्ट्वा तमासाद्य तपस्विनौ ।
निपेततुः शरीरेऽस्य पिता चैनमुवाच ह २९
नाभिवादयसे माद्य न च मामभिभाषसे ।
किं च शेषे तु भूमौ त्वं वत्स किं कुपितो ह्यसि ३०
नन्वहं तेऽप्रियः पुत्र मातरं पश्य धार्मिकीम् ।
किं च नालिङ्गसे पुत्र सुकुमार वचो वदः ३१
कस्य वा पररात्रेऽहं श्रोष्यामि हृदयंगमम् ।

जांचें कुलच राहिलें नसतें. मग तूं कोठून जिवंत राहिला असतास ? हे राजा ! तूं आम्हांला त्या ठिकाणीं घेऊन जा. रक्तानें शरीर माखलेल्या व ज्याचीं अजिनें व वस्त्रें अस्ताव्यस्त झालेलीं आहेत, अशा त्या मृत्यूच्या अधीन होऊन व गतप्राण होऊन भूमीवर पडलेल्या पुत्राची आज शेवटची भेट घ्यावी, अशी आमची इच्छा आहे. " ( २१-२६ )

"याप्रमाणें त्यानें सांगितल्यानंतर अत्यंत दुःखित झालेल्या त्या उभयतांना मी एकटाच त्या प्रदेशाकडे घेऊन गेलों आणि स्त्रीसह त्या बिचाऱ्या मुनीकडून त्या पुत्राला मी स्पर्श करविला. आपल्या पुत्राच्या जवळ येऊन व त्याला स्पर्श करून ते बिचारे आईबाप त्याच्या शरिरावर पडले. त्याचा बाप त्याला उद्देशून बोलूं लागला, " आज तूं मला नमस्कार करीत नाहींस, माझ्याशीं भाषणही करीत नाहींस व जमिनीवरच स्वस्थ पडून आहेस. तेव्हां मुला ! तूं माझ्यावर रागावला का आहेस ? हे पुत्रा ! अरे, मी जरी तुला अप्रिय असलों, तरी या धर्मानें वागणाऱ्या आपल्या मातेकडे तरी तूं पहा. तूं आम्हांला आलिंगन कां बरें देत नाहींस? हे पुत्रा ! हे सुकुमारा, आमच्याशीं एकदां बोल रे! ( २७-३१ )

अधीयानस्य मधुरं शास्त्रं वान्यद्विशेषतः ३२
को मां संध्यामुपास्यैव स्नात्वा हुतहुताशनः ।
श्लाघयिष्यत्युपासीनः पुत्रशोकभयार्दितम् ३३
कन्दमूलफलं हृत्वा यो मां प्रियमिवातिथिम् ।
भोजयिष्यत्यकर्मण्यमप्रग्रहमनायकम् ३४
इमामन्धां च वृद्धां च मातरं ते तपस्विनीम् ।
कथं पुत्र भरिष्यामि कृपणां पुत्रगर्धिनीम् ३५
तिष्ठ मा मागमः पुत्र यमस्य सदनं प्रति ।
श्वो मया सह गन्तासि जनन्या च समेधितः ३६
उभावपि च शोकार्तावनाथौ कृपणौ वने ।
क्षिप्रमेव गमिष्यावस्त्वया हीनौ यमक्षयम् ३७
ततो वैवस्वतं दृष्ट्वा तं प्रवक्ष्यामि भारतीम् ।
क्षमतां धर्मराजो मे बिभृयात्पितरावयम् ३८
दातुमर्हति धर्मात्मा लोकपालो महायशाः ।

---

"अरे ! शास्त्र अथवा दुसरें कांहीं म्हणत असलेल्या कोणाचें बरें मी आतां चित्तवेधक अध्ययन पहाटेस ऐकूं ! संध्या करून व होम आटोपून तुझ्याप्रमाणें शुश्रूषा करण्याविषयीं तत्पर असलेला असा कोण रे आतां पुत्रशोकानें व्याकुळ झालेल्या मला उद्वर्तनपूर्वक स्नान घालील ? कंद, मुळें व फळें आणून आतां निश्चेष्ट, निराधार व अनाथ अशा मला कोण रे प्रिय अतिथीप्रमाणें जेवूं घालील ? हे पुत्रा ! आंधळ्या, म्हाताऱ्या, दीन आणि पुत्राकरितां हळहळणाऱ्या या बिचाऱ्या तुझ्या मातेचें मी आतां कसें रे पोषण करूं ? हे पुत्रा ! माझ्याकरितां थांब; इतक्यांत यमसदनाला जाऊं नको; तूं माझ्या आणि आपल्या मातेबरोबर उद्यां जाशील. (३२-३६)

"मुला ! शोकाकुल, अनाथ, दीन आणि वनामध्यें तुझा वियोग होऊन पडलेले आम्ही उभयतां आतां लवकरच यमसदनाला चालते होऊं. तेथें गेल्यावर "धर्मराजानें माझ्या अपराधाची क्षमा करावी आणि या माझ्या पुत्रानें आतां आपल्या मातापितरांचें परिपालन करावें," अशी मी त्या यमधर्माला पाहून प्रार्थना

ईदृशस्य ममाक्षय्यामेकामभयदक्षिणाम् ३९
अपापोऽसि यथा पुत्र निहतः पापकर्मणा ।
तेन सत्येन गच्छाशु ये लोकास्त्वस्त्रयोधिनाम् ४०
यां हि शूरा गतिं यान्ति सङ्ग्रामेष्वनिवर्तिनः ।
हतास्त्वभिमुखाः पुत्र गतिं यां परमां व्रज ४१
यां गतिं सगरः शैब्यो दिलीपो जनमेजयः ।
नहुषो धुन्धुमारश्च प्राप्तास्तां गच्छ पुत्रक ४२
या गतिः सर्वभूतानां स्वाध्यायात्तपसश्च या ।
भूमिदस्याहिताग्नेश्च एकपत्नीव्रतस्य च ४३
गोसहस्रप्रदातॄणां गुरुसेवाभृतामपि ।
देहन्यासकृतां या च तां गतिं गच्छ पुत्रक ४४
न हि त्वस्मिन्कुले जातो गच्छत्यकुशलां गतिम् ।
स तु यास्यति येन त्वं निहतो मम बान्धवः ४५

करीन. कारण मी असा अनाथ असल्यामुळें तो महायशस्वी धर्मात्मा लोकपाल मला अभय देईलच. हे पुत्रा! तूं निरपराधी असतांनाही पापकर्म करणाऱ्यानें तुझा वध केला आहे आणि हें जर खरें असेल, तर अस्त्रयुद्धामध्यें देह ठेवणाऱ्यांना जे लोक प्राप्त होत असतात, त्या लोकांना तूं लवकर जा. (३७–४०)

"हे पुत्रा! संग्रामापासून परावृत्त न होतां समोरासमोर युद्ध करतां करतां मृत्यु पावलेल्या शूरांना जी गति प्राप्त होत असते, त्या उत्कृष्ट गतीला तूं जा. हे पुत्रा! सगर, शैब्य, दिलीप, जनमेजय, नहुष आणि धुंधुमार यांना जी गति प्राप्त झाली, ती गति तुला प्राप्त होवो. प्राणिमात्रांचा आश्रय जें ब्रह्म तें तुला प्राप्त होवो. वेदाध्ययन व तप करणारे, पृथ्वी दान करणारे, आहिताग्नि, एकपत्नी व्रतानें वागणारे, हजारों गाईंचें दान देणारे, गुरुसेवा करणारे आणि महाप्रस्थानादि साधनांनीं परलोकप्राप्तीकरितां देहत्याग करणारे यांना जी गति मिळत असते, ती गति, हे पुत्रा! तुला प्राप्त होवो. आमच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या तुला वाईट गति मिळणार नाहीं. ज्यानें माझा पुत्र असणाऱ्या तुझा वध केला, त्याला ती असद्गति मिळेल." (४१–४५)

एवं स कृपणं तत्र पर्यदेवयतासकृत् ।
तथोक्त्वा कर्तुमुदकं प्रवृत्तः सह भार्यया ४६
स तु दिव्येन रूपेण मुनिपुत्रः स्वकर्मभिः ।
स्वर्गमध्यारुहत्क्षिप्रं शक्रेण सह धर्मवित् ४७
आवभाषे च तौ वृद्धौ शक्रेण सह तापसः ।
आश्वस्य च मुहूर्तं तु पितरौ वाक्यमब्रवीत् ४८
स्थानमस्मि महत्प्राप्तो भवतोः परिचारणात् ।
भवन्तावपि च क्षिप्रं मम मूलमुपैष्यतः ४९
एवमुक्त्वा तु दिव्येन विमानेन वपुष्मता ।
आरुरोह दिवं क्षिप्रं मुनिपुत्रो जितेन्द्रियः ५०
स कृत्वाथोदकं तूर्णं तापसः सह भार्यया ।
मामुवाच महातेजा कृताञ्जलिमुपस्थितम् ५१
अद्यैव जहि मां राजन्मरणे नास्ति मे व्यथा ।
यः शरेणैकपुत्रं मां त्वमकार्षीरपुत्रकम् ५२

"याप्रमाणें करुण स्वरानें एकसारखा विलाप करणारा तो त्याचा बाप तसें म्हणून आपल्या स्त्रीसह आपल्या पुत्राला संस्कारपूर्वक पाणी देण्यास तयार झाला व तो धर्मज्ञ मुनिपुत्रतपस्वी तर ' तूं अस्त्रयुद्धामध्यें पडणाऱ्यांना जे लोक प्राप्त होत असतात, त्या लोकांना जा ' असे शब्द पित्यानें उच्चारल्यावर तत्क्षणींच दिव्य देह धारण करून आपल्याला नेण्याकरितां आलेल्या इंद्राबरोबर स्वर्गाला जाऊं लागला असतां क्षणभर थांबून, त्या वृद्ध मातापितरांशीं आश्वासनपूर्वक बोलूं लागला. तो आपल्या पित्याला म्हणाला, " तुमच्या शुश्रूषेमुळें मला मोठें स्थान मिळालें आहे व तुम्हींही लवकर माझ्याजवळच याल. " याप्रमाणें सांगितल्यानंतर तो तेजस्वी व जितेंद्रिय मुनिपुत्र दिव्य विमानांत बसून स्वर्गाला गेला. (४६–५०)

"इकडे तो महातेजस्वी वृद्ध तापस आपल्या स्त्रीसह लवकरच पुत्राला उदक देऊन हात जोडून उभा असलेल्या मला म्हणाला, " हे राजा ! ज्या तूं एकच पुत्र असलेल्या मला एकाच बाणानें निपुत्रिक करून टाकलेंच आहेस, तसें आतां

त्वयापि च यदज्ञानान्निहतो मे स बालकः ।
तेन त्वामपि शप्स्येऽहं सुदुःखमतिदारुणम् ५३
पुत्रव्यसनजं दुःखं यदेतन्मम सांप्रतम् ।
एवं त्वं पुत्रशोकेन राजन्कालं करिष्यसि ५४
अज्ञानात्तु हतो यस्मात्क्षत्रियेण त्वया मुनिः ।
तस्मात्त्वां नाविशत्याशु ब्रह्महत्या नराधिप ५५
त्वामप्येतादृशो भावः क्षिप्रमेव गमिष्यति ।
जीवितान्तकरो घोरो दातारमिव दक्षिणाम् ५६
एवं शापं मयि न्यस्य विलप्य करुणं बहु ।
चितामारोप्य देहं तन्मिथुनं स्वर्गमभ्ययात् ५७
तदेतच्चिन्तयानेन स्मृतं पापं मया स्वयम् ।
तदा बाल्यात्कृतं देवि शब्दवेध्यनुकर्षिणा ५८
तस्यायं कर्मणो देवि विपाकः समुपस्थितः ।
अपथ्यैः सह संभुक्ते व्याधिरन्नरसे यथा ५९

मला आजच ठार करून टाक. मला मरणापासून मुळींच दुःख होणार नाहीं. ज्याअर्थी अज्ञानानें तूं माझ्या बालकाचा वध केला आहेस, त्याअर्थी मीही तुला अत्यंत दुःखकारक व भयंकर शाप देतों. आतां ज्याप्रमाणें हें पुत्रमरणापासून उत्पन्न झालेलें दुःख माझ्यावर कोसळलें आहे, त्याचप्रमाणें हे राजा ! तुलाही पुत्रशोकानेंच मृत्यु येईल. ज्याअर्थी तूं क्षत्रियानें न समजून माझ्या मुनीसारख्या पुत्राचा वध केला आहेस, त्याअर्थी हे राजा ! तुला एकदम ब्रह्महत्येसारखें पातक लागणार नाहीं; परंतु दिलेली दक्षिणा ज्याप्रमाणें दात्याला परलोकीं मिळते, त्याचप्रमाणें तुलाही अशाच प्रकारची प्राणनाशक घोर अवस्था एकाएकीं प्राप्त होईल." ( ५१-५६ )

"याप्रमाणें करुण स्वरानें अतिशय विलाप केल्यावर त्या स्त्रीपुरुषांनीं मला शाप दिला आणि देह चितेवर ठेवून ते स्वर्गाला चालते झाले. सारांश, हे देवि ! शब्दवेध करून आणि त्यानंतर शल्य काढून टाकणाऱ्या माझ्या हातून मूर्खपणामुळें जें हें पातक घडलें आहे, त्याची मला विचार करतां करतां आठवण झाली

तस्मान्मामागतं भद्रे तस्योदारस्य तद्वचः ।
इत्युक्त्वा स रुदंस्त्रस्तो भार्यामाह तु भूमिपः ६०
यदहं पुत्रशोकेन संत्यजिष्यामि जीवितम् ।
चक्षुर्भ्यां त्वां न पश्यामि कौसल्ये त्वं हि मां स्पृश ।
यमक्षयमनुप्राप्ता द्रक्ष्यन्ति नहि मानवाः ६१
यदि मां संस्पृशेद्रामः सकृदन्वारभेत वा ।
धनं वा यौवराज्यं वा जीवेयमिति मे मतिः ६२
न तन्मे सदृशं देवि यन्मया राघवे कृतम् ।
सदृशं तत्तु तस्यैव यदनेन कृतं मयि ६३
दुर्वृत्तमपि कः पुत्रं त्यजेद्भुवि विचक्षणः ।
कश्च प्रव्राज्यमानो वा नासूयेत्पितरं सुतः ६४
चक्षुषा त्वां न पश्यामि स्मृतिर्मम विलुप्यते ।

आहे. देवि ! जेवतांना अपथ्यकारक पदार्थांचें सेवन केलें असतां ज्याप्रमाणें निश्चित रोगवृद्धि होऊं शकते, त्याचप्रमाणें त्या कर्माचें हें फल मला प्राप्त झालें आहे. कल्याणि ! त्या श्रेष्ठ पुरुषाच्या त्या शापाचें हें फल मला मिळालें आहे." (५७–६०)

याप्रमाणें बोलून मरणाच्या भीतीनें त्रस्त झालेला तो राजा पुनः राणीला म्हणाला, " कौसल्ये ! पुत्रशोकानें माझे आतां प्राण जाऊं पहात आहेत व डोळ्यांनींही तूं मला दिसत नाहींस, यासाठीं तूं मला स्पर्श कर. कारण यम-सदनाला निघालेल्या मानवांना कांहीं दिसेनासें होतें. जर मला एकदां राम स्वतः स्पर्श करील तर अथवा तो संपत्ति आणि यौवराज्य यांचा स्वीकार करील तर मी जगेन असें मला वाटतें. हे देवी ! मी जें रामाबरोबर वर्तन केलें, तें मला योग्य नाहीं; परंतु त्यानें मात्र जी माझ्याशीं वर्तणूक ठेविली, ती फक्त त्यालाच योग्य आहे. पुत्र दुराचारी जरी असला तरी कोण बरें समंजस पुरुष त्याचा त्याग करील ? आणि पिता हांकून देऊं लागला असतां कोणता बरें पुत्र त्या पित्याचा प्रतिरोध करणार नाहीं ? ( ६०–६४ )

"असो. माझ्या डोळ्यांना तूं दिसत नाहींस व माझी स्मरणशक्तीही नष्ट होत

दूता वैवस्वतस्यैते कौसल्ये त्वरयन्ति माम् ६५
अतस्तु किं दुःखतरं यदहं जीवितक्षये ।
न हि पश्यामि धर्मज्ञं रामं सत्यपराक्रमम् ६६
तस्यादर्शनजः शोकः सुतस्याप्रतिकर्मणः ।
उच्छोषयति वै प्राणान्वारि स्तोकमिवातपः ६७
न ते मनुष्या देवास्ते ये चारुशुभकुण्डलम् ।
मुखं द्रक्ष्यन्ति रामस्य वर्षे पञ्चदशे पुनः ६८
पद्मपत्रेक्षणं सुभ्रु सुदंष्ट्रं चारुनासिकम् ।
धन्या द्रक्ष्यन्ति रामस्य ताराधिपसमं मुखम् ६९
सदृशं शारदस्येन्दोः फुल्लस्य कमलस्य च ।
सुगन्धि मम रामस्य धन्या द्रक्ष्यन्ति ये मुखम् ७०
निवृत्तवनवासं तमयोध्यां पुनरागतम् ।
द्रक्ष्यन्ति सुखिनो रामं शुक्रं मार्गगतं यथा ७१
कौसल्ये चित्तमोहेन हृदयं सीदतेतराम् ।

---

चालली आहे. यावरून हे कौसल्ये! यमधर्माचे दूत मला घाई करीत आहेत, असें दिसतें. सत्यपराक्रमी व धर्मवेत्त्या रामाचें मरणसमयींही मला दर्शन होऊं नये, यापेक्षां आणखी दुःखकारक गोष्ट ती कोणती ? ज्याच्या कृतीला कोठें जोड नाहीं, अशा त्या पुत्राचें दर्शन होत नसल्यामुळें उत्पन्न झालेला शोक थोडयाशा पाण्याला शुष्क करून टाकणाऱ्या सूर्याच्या तापाप्रमाणें, माझे प्राण शोषून घेत आहे. पंधरा वर्षांनंतर मनोहर व शुभ कुंडलांनीं युक्त असलेल्या रामाच्या मुखाचें दर्शन ज्यांना होईल, ते मनुष्य नव्हेत तर त्यांची देवांतच गणना केली पाहिजे. कमलाच्या पाकळ्यांप्रमाणें डोळे, उत्कृष्ट भिंवया, उत्तम दांत व मनोहर नाक यांनीं युक्त असलेलें रामाचें चंद्रासारखें मुख जे पाहतील, ते धन्य होत! शरदृतूंतील चंद्राप्रमाणें आल्हादकारक व फुललेल्या कमलाप्रमाणें सुगंधि असें रामाच्या मुखाचें दर्शन घेतील ते खरोखर धन्य होय. ( ६५-७० )

पूर्वीं वक्री झालेला असून नंतर मार्गाला लागलेल्या शुक्राप्रमाणें वनवास संपवून अयोध्येला पुनः परत आलेल्या रामाला जे पाहतील, ते सुखी होत.

वेदये न च संयुक्ताञ्शब्दस्पर्शरसानहम् ७२
चित्तनाशाद्विपद्यन्ते सर्वाण्येवेन्द्रियाणि हि ।
क्षीणस्नेहस्य दीपस्य संरक्ता रश्मयो यथा ७३
अयमात्मभवः शोको मामनाथमचेतनम् ।
संसाधयति वेगेन यथा कूलं नदीरयः ७४
हा राघव महाबाहो हा ममायासनाशन ।
हा पितृप्रिय मे नाथ हा ममासि गतः सुत ७५
हा कौसल्ये न पश्यामि हा सुमित्रे तपस्विनि ।
हा नृशंसे ममामित्रे कैकेयि कुलपांसनि ७६
इति मातुश्च रामस्य सुमित्रायाश्च संनिधौ ।
राजा दशरथः शोचञ्जीवितान्तमुपागमत् ७७
तथा तु दीनः कथयन्नराधिपः प्रियस्य पुत्रस्य विवासनातुरः ।
गतेऽर्धरात्रे भृशदुःखपीडितस्तदा जहौ प्राणमुदारदर्शनः ७८

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥६४॥ [२५७४]

---

कौसल्ये ! चित्ताला भ्रम झाल्यामुळें माझा धीर फारच सुटत चालला आहे. कानांनीं मला ऐकूं येत नाहीं, त्वगिंद्रियाला स्पर्श समजत नाहीं आणि जिव्हेला रसही उमगत नाहींसा झाला आहे. तेल संपून गेलेल्या दिव्याचीं किरणें जशीं निस्तेज होऊन नाश पावतात, तशीं चित्त नाश होत चालल्यामुळें माझीं सर्वच इंद्रियें नाहींशीं होत चाललीं आहेत. ज्याप्रमाणें नदीचा वेग जोराजोरानें तीराचा नाश करतो त्याचप्रमाणें हा मानसिक शोक जवळजवळ मूर्च्छित व अनाथ झालेल्या माझा जोराजोरानें नाश करीत आहे. हे रामा ! हे महाबाहो ! हें माझें दुःख नाहींसें करणाऱ्या ! हे पित्याला प्रिय असणाऱ्या ! हे नाथा ! हे पुत्रा ! तूं माझा असून मला टाकून गेला आहेस रे ! कौसल्ये ! हे निरुपद्रवी सुमित्रे ! तुम्ही मला दिसत नाहीं. हे दुष्टे ! हे शत्रूप्रमाणें झालेल्या कैकेयि ! हे कुलाला कलंक लावणाऱ्या स्त्रिये ! तुला धिक्कार असो." ( ७१-७६ )

याप्रमाणें राममाता कौसल्या आणि सुमित्रा यांच्या जवळच शोक करीत असलेला दशरथराजा मृत्यु पावला. मध्यरात्र उलटून गेल्यावर प्रियपुत्राला हांकून

पञ्चषष्टितमः सर्गः ।

अथ रात्र्यां व्यतीतायां प्रातरेवापरेऽहनि ।
बन्दिनः पर्युपातिष्ठंस्तत्पार्थिवनिवेशनम् १
सूताः परमसंस्कारा मागधाश्चोत्तमश्रुताः ।
गायकाः श्रुतिशीलाश्च निगदन्तः पृथक्पृथक् २
राजानं स्तुवतां तेषामुदात्ताभिहिताशिषाम् ।
प्रासादाभोगविस्तीर्णः स्तुतिशब्दो ह्यवर्तत ३
ततस्तु स्तुवतां तेषां सूतानां पाणिवादकाः ।
अपदानान्युदाहृत्य पाणिवादान्यवादयन् ४
तेन शब्देन विहगाः प्रतिबुद्धाश्च सस्वनुः ।
शाखास्थाः पञ्जरस्थाश्च ये राजकुलगोचराः ५
व्याहृताः पुण्यशब्दाश्च वीणानां चापि निःस्वनाः ।
आशीर्गेयं च गाथानां पूरयामास वेश्म तत् ६

दिल्यामुळें अत्यंत पीडित, दीन व अतिशय दुःखी झालेला तो विशाल बुद्धिमान् दशरथराजा बोलतां बोलतां मृत्यु पावला. ( ७७-७८ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौसष्टावा सर्ग संपला ॥ ६४ ॥

त्यानंतर रात्र निघून गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्या राजवाड्यामध्यें भाट आले आणि महाविद्वान् पुराणिक, वंशपरंपरेविषयीं उत्कृष्ट माहिती असलेले वंशस्तावक, मागध आणि गायन वाद्यकलेंत निपुण असणारे गवई वगैरे वेग-वेगळी राजाची स्तुति करूं लागले. याप्रमाणें मोठ्या स्वरांत आशीर्वाद देऊन ते राजाची स्तुति करूं लागले असतां त्यांच्या स्तुतीचा ध्वनि प्रतिध्वनि-रूपानें राजवाड्यामध्यें पसरला. त्यानंतर ते सूत आदिकरून स्तुति करीत असतांनाच हातानें ताल धरणारे राजाच्या चरित्राचा व अद्भुत कर्माचा उल्लेख करून हातांनीं ताल धरूं लागले. राजवाड्यामध्यें असणारे पिंजऱ्यांतील व झाडांच्या फांद्यांवरील पक्षी त्या ध्वनींच्या योगानें जागे होऊन शब्द करूं लागले. ( १-५ )

पुराणिक आदिलोकांनीं उच्चारलेले मंगलकारक ध्वनि, वीणांचे आवाज आणि गवई लोकांचें आशीर्वादप्रधान गायन यांच्या योगानें तो राजवाडा दुमदुमून गेला.

ततः शुचिसमाचाराः पर्युपस्थानकोविदाः ।
स्त्रीवर्षवरभूयिष्ठा उपतस्थुर्यथा पुरा ७
हरिचन्दनसंपृक्तमुदकं काञ्चनैर्घटैः ।
आनिन्युः स्नानशिक्षाज्ञा यथाकालं यथाविधि ८
मङ्गलालम्भनीयानि प्राशनीयान्युपस्करान् ।
उपानिन्युस्तथा पुण्याः कुमारीबहुलाः स्त्रियः ९
सर्वलक्षणसंपन्नं सर्वं विधिवदर्चितम् ।
सर्वं सगुणलक्ष्मीवत्तद्बभूवाभिहारिकम् १०
ततः सूर्योदयं यावत्सर्वं परिसमुत्सुकम् ।
तस्थावनुपसंप्राप्तं किंस्विदित्युपशङ्कितम् ११
अथ याः कोशलेन्द्रस्य शयनं प्रत्यनन्तराः ।
ताः स्त्रियस्तु समागम्य भर्तारं प्रत्यबोधयन् १२
अथाप्युचितवृत्तास्ता विनयेन नयेन च ।

---

त्यानंतर स्त्रिया आणि षंढ यांचीच संख्या ज्यांच्यामध्यें पुष्कळ आहे, असे सेवेविषयीं निपुण व शुद्ध आचरण करणारे नोकर पूर्वीप्रमाणें तेथें आले. तसेंच स्नानविधि जाणणारे सेवक केशर घातलेलें पाणी सोन्याच्या घागरींतून वेळेवर आणि योग्य प्रकारानें आणून ठेऊं लागले. ज्यांत कुमारिका मुलींची संख्या पुष्कळ आहे, अशा पवित्र स्त्रिया, मंगलदर्शक म्हणून स्पर्श करण्यास योग्य असलेल्या गाई, वगैरे मुखशुद्धीनंतर पिण्यासाठीं योग्य (असलेलें नारळाचें) पाणी वगैरे आणि आरसा, वस्त्रें, भूषणें इत्यादि सामान घेऊन आल्या. सारांश प्रातःकालीं राजाकडे मंगलसूचक म्हणून आणावयाचे जे पदार्थ ते सर्व कांहीं तेथें आणून ठेविले होते. ते सर्व पदार्थ सर्व लक्षणांनीं युक्त होते, यथायोग्य प्रकारें आदरपूर्वक ते ठेविलेले होते व ते सर्वही गुणसंपन्न असून वैभवदायक होते. ( ६-१० )

त्यानंतर सूर्योदयापर्यंत राजाचें दर्शन न झाल्यामुळें ते सर्वही सेवक " आज हें असें कां बरें ! " अशी शंका येऊन मोठ्या उत्सुकतेनें उभे राहिले. त्यानंतर कोसलाधिपति दशरथाच्या शय्येजवळच नेहमीं राहणाऱ्या मानकरणी ज्या स्त्रिया होत्या, त्या जवळ येऊन राजाला उठवूं लागल्या; परंतु विनय आणि

नह्यस्य शयनं स्पृष्ट्वा किंचिदप्युपलेभिरे १३
ताः स्त्रियः स्वप्नशीलज्ञाश्चेष्टां संचलनादिषु ।
ता वेपथुपरीताश्च राज्ञः प्राणेषु शङ्किताः १४
प्रतिस्रोतस्तृणाग्राणां सदृशं संचकाशिरे १५
अथ संदेहमानानां स्त्रीणां दृष्ट्वा च पार्थिवम् ।
यत्तदाशाङ्कितं पापं तदा जज्ञे विनिश्चयः १६
कौसल्या च सुमित्रा च पुत्रशोकपराजिते ।
प्रसुप्ते न प्रबुद्ध्येते यथाकालसमन्विते १७
निष्प्रभा सा विवर्णा च सन्ना शोकेन संनता ।
न व्यराजत कौसल्या तारेव तिमिरावृता १८
कौसल्यानन्तरं राज्ञः सुमित्रा तदनन्तरम् ।
न स्म विभ्राजते देवी शोकाश्रुलुलितानना १९
ते च दृष्ट्वा तदा सुप्ते उभे देव्यौ च तं नृपम् ।

योग्य वर्तणूक यांच्या योगानें ज्यांना राजाला स्पर्श वगैरे करण्याची योग्यता आलेली होती, अशा स्त्रियांनीं त्याची शय्या चाचपून पाहिली असतांही कांहींएक हालचाल त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं. तेव्हां झोंपेची स्थिति जाणणाऱ्या त्या स्त्रिया चलन पावणाऱ्या नाड्या तपासून पाहूं लागल्या असतां कांहीं चलनवलन त्यांच्या अनुभवास येईना. तेव्हां राजाच्या प्राणांविषयीं शंका येऊन त्या थरथर कांपूं लागल्या. प्रवाहाचे जवळ असलेल्या वेतांच्या शेंड्यांप्रमाणें त्या कांपत असतांना दिसूं लागल्या. ( ११–१५ )

नंतर राजाकडे निरखून पाहिल्यावर तर संशययुक्त झालेल्या त्या स्त्रियांना ज्या वाईट गोष्टीची शंका आली होती, तिचा निश्चयच झाला. कौसल्या व सुमित्रा पुत्रशोकानें व्याकुळ झाल्यामुळें काळझोंप लागून अगदीं मेल्याप्रमाणें पडल्या होत्या, त्या जाग्याच झाल्या नाहींत. शोकानें जर्जर झालेली व हात पाय पोटाशीं धरून पडलेली कौसल्या काळवंडून गेलेली होती आणि त्यामुळें अंधारानें व्याप्त झालेल्या तारकेप्रमाणें निस्तेज दिसत होती. राजाच्या जवळच झोंपीं गेलेली कौसल्या व तिच्याच शेजारीं झोपलेली राजपत्नी सुमित्रा, या दोघीही दुःखाश्रूंचे

सुप्तमेवोद्गतप्राणमन्तःपुरमदृश्यत　२०
ततः प्रचुक्रुशुर्दीनाः सुस्वरं ता वराङ्गनाः ।
करेणव इवारण्ये स्थानप्रच्युतयूथपाः　२१
तासामाक्रन्दशब्देन सहसोद्गतचेतने ।
कौसल्या च सुमित्रा च त्यक्तनिद्रे बभूवतुः　२२
कौसल्या च सुमित्रा च दृष्ट्वा स्पृष्ट्वा च पार्थिवम् ।
हा भर्तेति परिक्रुश्य पेततुर्धरणीतले　२३
सा कोशलेन्द्रदुहिता चेष्टमाना महीतले ।
न भ्राजते रजोध्वस्ता तारेव गगनच्युता　२४
नृपे शान्तगुणे जाते कौसल्यां पतितां भुवि ।
अपश्यंस्ताः स्त्रियः सर्वा हतां नागवधूमिव　२५
ततः सर्वा नरेन्द्रस्य कैकेयीप्रमुखाः स्त्रियः ।
रुदत्यः शोकसंतप्ता निपेतुर्गतचेतनाः　२६

---

ओघळ तोंडावर आल्यामुळें अत्यन्त निस्तेज दिसत होत्या. त्या उभयतां राजस्त्रिया कौसल्या आणि सुमित्रा झोंपीं गेल्या असून राजाचे तर झोंपेमध्येंच प्राण गेलेले आहेत असें आढळून आल्यावर तें सर्व अंतःपुर गतप्राण झाल्यासारखें कांहीं वेळ दिसूं लागलें. ( १६-२० )

त्यानंतर कळपाचें रक्षण करणारा मोठा हत्ती निवासस्थानांतून नाहींसा झाला असतां हत्तिणी ज्याप्रमाणें अरण्यामध्यें आक्रोश करूं लागतात, त्याचप्रमाणें त्या अनाथ झालेल्या श्रेष्ठ स्त्रिया मोठ्या स्वरानें आक्रोश करूं लागल्या. त्यांच्या रडण्याच्या अवाजानें कौसल्या आणि सुमित्रा एकाएकीं दचकून जाग्या झाल्या आणि राजाला पाहून व स्पर्श करून कौसल्या व सुमित्रा या दोघींहि " नाथ ! " अशी किंकाळी फोडून जमिनीवर पडल्या. तेव्हां आकाशांतून गळून पडलेली तारका ज्याप्रमाणें झळकेनाशी होते, त्याप्रमाणें कोसलराजकन्या कौसल्या धुळीनें भरून जाऊन भूतलावर गडबडा लोळूं लागली असतां निस्तेज दिसूं लागली. राजा गतप्राण झाल्यानंतर भूमीवर पडलेली ती कौसल्या सर्व स्त्रियांना, मारून टाकलेल्या नागिणीप्रमाणें दिसूं लागली. ( २१-२५ )

ताभिः स बलवान्नादः क्रोशन्तीभिरनुद्रुतः ।
येन स्फीतीकृतो भूयस्तद्गृहं समनादयत् २७
तत्परित्रस्तसंभ्रान्तपर्युत्सुकजनाकुलम् ।
सर्वतस्तुमुलाक्रन्दं परितापार्तबान्धवम् २८
सद्योनिपतितानन्दं दीनं विक्लवदर्शनम् ।
बभूव नरदेवस्य सद्म दिष्टान्तमीयुषः २९
अतीतमाज्ञाय तु पार्थिवर्षभं यशस्विनं तं परिवार्य पत्नयः ।
भृशं रुदन्त्यः करुणं सुदुःखिताः प्रगृह्य बाहू व्यलपन्ननाथवत् ३०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥६५॥

षट्षष्टितमः सर्गः । [२६०४]

तमग्निमिव संशान्तमम्बुहीनमिवार्णवम् ।
गतप्रभमिवादित्यं स्वर्गस्थं प्रेक्ष्य भूमिपम् १

तेव्हां राजाच्या कैकेयी आदि करून सर्व स्त्रिया शोकाकुल होऊन रडूं लागल्या आणि कांहीं सुचेनासें होऊन तिकडेच धांवत आल्या. त्या मागून आलेल्या स्त्रिया आक्रोश करूं लागल्या असतां प्रथम तेथें सुरू झालेल्या प्रचंड ध्वनीमध्यें अधिकच भर पडली व त्याच्या योगानें वृद्धिंगत झालेल्या त्या नादानें तो प्रासाद दणाणून गेला. त्या वाड्यामध्यें जिकडे तिकडे प्रचंड आक्रोश होऊं लागला. आंतील सर्व लोक शोकाकुल झाले आणि रडारड ऐकल्यामुळें भयभीत होऊन व गोंधळून जाऊन काय झालें हें समजून घेण्यासाठीं उत्सुक झालेल्या लोकांची येथें गर्दी झाली. सारांश, गतप्राण होऊन पडलेल्या राजाचें तें गृह एकाएकीं आनंदरहित, दीन व भयाण असें दिसूं लागलें; तो यशस्वी राजाधिराज परलोकास गेला असें समजून आल्यावर अत्यंत दुःखी झालेल्या त्या स्त्रियांनीं त्याच्या सभोंवतीं गराडा घातला आणि अत्यंत करुण स्वरानें शोक करणाऱ्या त्या स्त्रिया कपाळावर हात मारून घेऊन अनाथाप्रमाणें रडूं लागल्या. (२६-३०)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पासष्टावा सर्ग संपला ॥६५॥

विझून गेलेल्या अग्नीप्रमाणें, शुष्क झालेल्या समुद्राप्रमाणें किंवा प्रभारहित

कौसल्या बाष्पपूर्णाक्षी विविधं शोककर्शिता ।
उपगृह्य शिरो राज्ञः कैकेयीं प्रत्यभाषत     २
सकामा भव कैकेयि भुङ्क्ष्व राज्यमकण्टकम् ।
त्यक्त्वा राजानमेकाग्रा नृशंसे दुष्टचारिणि     ३
विहाय मां गतो रामो भर्ता च स्वर्गतो मम ।
विपथे सार्थहीनेव नाहं जीवितुमुत्सहे     ४
भर्तारं तु परित्यज्य का स्त्री दैवतमात्मनः ।
इच्छेज्जीवितुमन्यत्र कैकेय्यास्त्यक्तधर्मणः     ५
न लुब्धो बुध्यते दोषान्किंपाकमिव भक्षयन् ।
कुब्जानिमित्तं कैकेय्या राघवाणां कुलं हतम्     ६
अनियोगे नियुक्तेन राज्ञा रामं विवासितम् ।
सभार्यं जनकः श्रुत्वा परितप्स्यत्यहं यथा     ७
स मामनाथां विधवां नाद्य जानाति धार्मिकः ।

---

झालेल्या सूर्याप्रमाणें स्वर्गस्थ झालेल्या त्या राजाला पाहून अश्रूंनीं नेत्र भरून आलेली व अनेक प्रकारें शोक करून जर्जर झालेली कौसल्या राजाचें मस्तक मांडीवर घेऊन कैकेयीला म्हणाली, " हे कैकेयि ! आतां आपले मनोरथ परिपूर्ण करून घे. पापिणि ! दुराचारिणि ! राजाला मारून तूंच एकटी आतां या निष्कंटक झालेल्या राज्याचा उपभोग घे. राम मला सोडून वनांत गेला आणि माझा भर्ताही स्वर्गाला गेला. तेव्हां वाटसरूंच्या तांड्यांतून अरण्यांत चुकलेल्या स्त्री-प्रमाणें माझी अवस्था झाली असल्यामुळें मला आतां जगण्याची इच्छा नाहीं. आपलें दैवत जो भर्ता त्याला सोडून धर्माचा त्याग केलेल्या कैकेयीवांचून इतर कोणती बरें स्त्री जिवंत राहण्याची इच्छा करील ? धनाला लुब्ध होऊन दुसऱ्याला विष घालण्यास उद्युक्त होणाऱ्याला त्यांत ज्याप्रमाणें दोष दिसत नाहींत, त्याच-प्रमाणें राज्यवैभवाला लुब्ध होऊन रामाला वनवासांत पाठविण्याचा परिणाम काय होईल याचा विचार न करितां कैकेयीनें कुबडीच्या प्रेरणेमुळें रघुवंशजांच्या कुलाचा घात केला. ( १-६ )

" अयोग्य कृत्य करण्यास भाग पाडलेल्या राजानें रामाला भार्येसह वनामध्यें

रामः कमलपत्राक्षो जीवन्नाशमितो गतः ८
विदेहराजस्य सुता तथा चारुतपस्विनी ।
दुःखस्यानुचिता दुःखं वने पर्युद्विजिष्यति ९
नदतां भीमघोषाणां निशासु मृगपक्षिणाम् ।
निशम्यमाना संत्रस्ता राघवं संश्रयिष्यति १०
वृद्धश्चैवाल्पपुत्रश्च वैदेहीमनुचिन्तयन् ।
सोऽपि शोकसमाविष्टो नूनं त्यक्षति जीवितम् ११
साहमद्यैव दिष्टान्तं गमिष्यामि पतिव्रता ।
इदं शरीरमालिङ्ग्य प्रवेक्ष्यामि हुताशनम् १२
तां ततः संपरिष्वज्य विलपन्तीं तपस्विनीम् ।
व्यपनिन्युः सुदुःखार्तां कौसल्यां व्यावहारिकाः १३
तैलद्रोण्यां तदामात्याः संवेश्य जगतीपतिम् ।

हांकून दिलें, हें ऐकून जनकही माझ्याप्रमाणेंच तळमळूं लागेल. जिवंत असूनही नाश पावल्याप्रमाणें येथून माझ्या दृष्टीआड गेलेल्या त्या कमलनयन धर्मनिष्ठ रामाला मी आज अनाथ व विधवा झालें आहें, हें माहीत नाहीं. असो. दुःखाचा जिला कधीं अनुभव नाहीं, अशी ती पतीची सेवारूपी उत्कृष्ट तपश्चर्या करणारी विदेहराजकन्या सीता वनामध्यें दुःखांनीं अगदीं गांगरून जाईल आणि भयंकर गर्जना करणारे पशुपक्षी रात्रीं गर्जना करूं लागले असतां त्यांची गर्जना ऐकून ती भयभीत होईल आणि रामाचा आश्रय घेईल. एकटी सीता हीच एकुलती एक मुलगी असलेला तो वृद्ध जनक सीतेविषयीं विचार करूं लागला म्हणजे शोकाकुल होईल आणि खरोखर प्राणत्याग करील. मी तर पतिव्रता असल्यामुळें आजच मृत्यूची वाट धरणार आणि या राजाच्या शरिराला आलिंगन देऊन अग्नीमध्यें प्रवेश करणार." ( ७–१२ )

याप्रमाणें ती बिचारी कौसल्या अत्यंत दुःखाकुल होऊन विलाप करूं लागली असतां राज्यव्यवहार पाहण्याकरितां नेमलेल्या अमात्यांनीं अंतःपुरांतील स्त्रियांकडून दशरथापासून तिला सोडविलें आणि तेथून एकीकडे नेलें. त्यानंतर तेलानें भरलेल्या एका मोठ्या डोणीमध्यें अमात्यांनीं त्या राजाला निजविलें आणि वसिष्ठा-

राज्ञः सर्वाण्यथादिष्टाश्चक्रुः कर्माण्यनन्तरम् १४
न तु संकालनं राज्ञो विना पुत्रेण मन्त्रिणः ।
सर्वज्ञाः कर्तुमीषुस्ते ततो रक्षन्ति भूमिपम् १५
तैलद्रोण्यां शायितं तं सचिवैस्तु नराधिपम् ।
हा मृतोऽयमिति ज्ञात्वा स्त्रियस्ताः पर्यदेवयन् १६
बाहूनुच्छ्रित्य कृपणा नेत्रप्रस्रवणैर्मुखैः ।
रुदत्यः शोकसंतप्ताः कृपणं पर्यदेवयन् १७
हा महाराज रामेण संततं प्रियवादिना ।
विहीनाः सत्यसंधेन किमर्थं विजहासि नः १८
कैकेय्या दुष्टभावाया राघवेण विवर्जिताः ।
कथं सपत्न्या वत्स्यामः समीपे विधवा वयम् १९
स हि नाथः स चास्माकं तव च प्रभुरात्मवान् ।
वनं रामो गतः श्रीमान्विहाय नृपतिश्रियम् २०
त्वया तेन च वीरेण विना व्यसनमोहिताः ।

दिकांच्या आज्ञेनें राजाच्या सर्व पुढल्या कर्माची व्यवस्था ते करूं लागले. त्या सर्वज्ञ मंत्र्यांना पुत्रावांचून राजाचें प्रेत नेणें योग्य न वाटल्यामुळें ते त्या राजाला तेलाच्या डोणींत ठेवून रक्षण करीत बसले. अमात्यांनीं त्या राजाला तेलाच्या डोणीमध्यें निजविलें असें कळून आल्यावर त्या स्त्रिया "हाय हाय ! हा मृत्यु पावला" असा विलाप करूं लागल्या. त्यांच्या मुखांवरून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या आणि शोकानें व्याकुल व दीन झालेल्या त्या स्त्रिया हात उभारून रडत रडत करुण स्वरानें शोक करूं लागल्या. ( १३–१७ )

" हे महाराजा ! नेहमीं प्रिय भाषण करणाऱ्या सत्यप्रतिज्ञ अशा रामाचा आधींच वियोग झाला असतां आणखी तूं ही कशाकरितां आम्हांला सोडून जात आहेस ? दुष्ट बुद्धीच्या या कैकेयी सवतीच्या जवळ रामरहित झालेल्या आम्हीं विधवांनीं कसें बरें रहावें ! तो राम आमचा नाथ असून आपल्या व आमच्या उभयतांच्या जीविताचा प्रभुही तोच आहे; असें असतां ज्याअर्थीं तो जितेंद्रिय व वैभवशाली राम राज्यलक्ष्मीचा त्याग करून वनामध्यें चालता झाला, त्याअर्थीं

कथं वयं निवत्स्यामः कैकेय्या च विदूषिताः २१
यया च राजा रामश्च लक्ष्मणश्च महाबलः ।
सीतया सह संत्यक्ताः सा कमन्यं न हास्यति २२
ता बाष्पेण च संवीताः शोकेन विपुलेन च ।
व्याचेष्टन्त निरानन्दा राघवस्य वरस्त्रियः २३
निशा नक्षत्रहीनेव स्त्रीव भर्तृविवर्जिता ।
पुरी नाराजतायोध्या हीना राज्ञा महात्मना २४
बाष्पपर्याकुलजना हाहाभूतकुलाङ्गना ।
शून्यचत्वरवेश्मान्ता न बभ्राज यथापुरम् २५

गते तु शोकात्त्रिदिवं नराधिपे महीतलस्थासु नृपाङ्गनासु च ।
निवृत्तचारः सहसा गतो रविः प्रवृत्तचारा रजनी ह्युपस्थिता २६
ऋते तु पुत्राद्दहनं महीपतेर्नारोचयंस्ते सुहृदः समागताः ।
इतीव तस्मिञ्छयने न्यवेशयन्विचिन्त्य राजानमचिन्त्यदर्शनम् २७

कैकयीनें तिरस्कार केलेल्या आणि शोकानें व दुःखानें गांजून गेलेल्या आम्ही आपल्यावांचून आणि त्या वीरावांचून कशा बरें येथें राहूं ? राजा, राम व महाबलाढ्य लक्ष्मण या तिघांचा सीतेसह जिनें त्याग केला, ती दुसऱ्या कोणाचा बरें त्याग करण्यास मागें पुढें पाहील ?" (१८–२२)

याप्रमाणें अतिशय शोकानें व अश्रूंनीं व्याप्त झालेल्या दशरथ राजाच्या त्या दुःखीकष्टी श्रेष्ठ स्त्रिया दुःखानें तळमळूं लागल्या, त्या वेळीं महात्म्या राजानें रहित झालेली ती अयोध्यानगरी नक्षत्रानें विरहित रात्रीप्रमाणें अथवा पतिरहित स्त्रीप्रमाणें शोभेनाशी झाली. सारांश त्या नगरींतील लोक दुःखानें व्याप्त होऊन गेले, कुलस्त्रिया हाहाकार करूं लागल्या, अंगणांतून व घरांतून सडासंमार्जन होईनासें झालें आणि त्यामुळें त्या नगरीची पूर्वींची सर्व शोभा नष्ट झाली. पुत्रशोकामुळें राजा स्वर्गाला जाऊन राजस्त्रिया जमिनीवर पडल्या असतांना सूर्यानें एकाएकीं आपला प्रवास आटोपला आणि रात्र पडून तिनें अंधकारानें आपला पगडा बसविण्यास सुरवात केली ( २३–२६ )

तेथें जमलेल्या बांधवांना, पुत्रावांचून राजाचें दहन करणें, बरोबर वाटलें

गतप्रभा द्यौरिव भास्करं विना व्यपेतनक्षत्रगणेव शर्वरी ।
पुरी बभासे रहिता महात्मना कण्ठास्रकण्ठाकुलमार्गचत्वरा   २८
नराश्च नार्यश्च समेत्य संघशो विगर्हमाणा भरतस्य मातरम् ।
तदा नगर्यां नरदेवसंक्षये बभूवुरार्ता न च शर्म लेभिरे   २९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्षष्टितमः सर्गः॥६६॥

सप्तषष्टितमः सर्गः ।      [२६३३]

आक्रन्दिता निरानन्दा सास्रकण्ठजनाविला ।
अयोध्यायामवतता सा व्यतीयाय शर्वरी   १
व्यतीतायां तु शर्वर्यामादित्यस्योदये ततः ।
समेत्य राजकर्तारः सभामीयुर्द्विजातयः   २
मार्कण्डेयोऽथ मौद्गल्यो वामदेवश्च कश्यपः ।
कात्यायनो गौतमश्च जाबालिश्च महायशाः   ३
एते द्विजाः सहामात्यैः पृथग्वाचमुदीरयन् ।
वसिष्ठमेवाभिमुखाः श्रेष्ठं राजपुरोहितम्   ४

---

नाहीं. म्हणून त्यांनीं ज्याचें यापुढें दर्शन होईल ही गोष्ट अशक्य आहे, अशा त्या राजाला तेलाच्या डोणरूपी शय्येवर निजविलें. त्या नगरीला महात्म्या राजाचा वियोग झाला असतां ज्यांच्या नेत्रांतील अश्रूंच्या धारा कंठापर्यंत येऊन त्यायोगें कंठ दाटून आले आहेत, अशा लोकांनीं तिच्यांतील मार्ग व चवाठे गजबजून गेले आणि सूर्यरहित आकाशाप्रमाणें अथवा नक्षत्ररहित रात्रीप्रमाणें ती नगरी भयाण दिसूं लागली; त्या वेळीं अयोध्यानगरींत त्या राजवाड्यामध्यें स्त्रिया व पुरुष यांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या आणि भरताच्या मातेची निंदा करून अधिकच दुःखी झाल्या ( २७–२९ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सहासष्टावा सर्ग संपला ॥ ६६ ॥

आक्रोशयुक्त, आनंदरहित व अश्रूंनीं कंठ दाटून आलेल्या लोकांनीं कंठत असलेली ती रात्र अयोध्येमध्यें दुःखामुळें फारच लांबल्यासारखी कंटाळवाणी वाटून एकदांची सरली. रात्र संपून सूर्योदय झाल्यावर राजकार्यधुरंधर ब्राह्मण

अतीता शर्वरी दुःखं या नो वर्षशतोपमा ।
अस्मिन्पञ्चत्वमापन्ने पुत्रशोकेन पार्थिवे ५
स्वर्गस्थश्च महाराजो रामश्चारण्यमाश्रितः ।
लक्ष्मणश्चापि तेजस्वी रामेणैव गतः सह ६
उभौ भरतशत्रुघ्नौ केकयेषु परंतपौ ।
पुरे राजगृहे रम्ये मातामहनिवेशने ७
इक्ष्वाकूणामिहाद्यैव कश्चिद्राजा विधीयताम् ।
अराजकं हि नो राष्ट्रं विनाशं समवाप्नुयात् ८
नाराजके जनपदे विद्युन्माली महास्वनः ।
अभिवर्षति पर्जन्यो महीं दिव्येन वारिणा ९
नाराजके जनपदे बीजमुष्टिः प्रकीर्यते ।
नाराजके पितुः पुत्रो भार्या वा वर्तते वशे १०
अराजके धनं नास्ति नास्ति भार्याप्यराजके ।
इदमत्याहितं चान्यत्कुतः सत्यमराजके ११

---

सभेमध्यें आले. मार्कंडेय, मौद्गल्य, वामदेव, कश्यप, कात्यायन, गौतम आणि महायशस्वी जाबालि हे ज्ञानी विप्र अमात्यांसह श्रेष्ठ राजपुरोहित वसिष्ठमुनींच्या समोर आणि राजकार्यासंबंधानें वेगवेगळीं बोलणीं बोलूं लागले. (१–४)

ते म्हणाले, "पुत्रशोकानें हा राजा मृत्यु पावल्यामुळें दुःखानें आम्हांला शंभर वर्षांसारखी भासणारी ती रात्र एकदाची गेली. राजा दशरथ स्वर्गवासी झाला आहे, राम अरण्यांत गेला आहे, तेजस्वी लक्ष्मणही रामाबरोबरच चालता झाला आहे आणि शत्रूंना ताप देणारे उभयतां भरत व शत्रुघ्न केकय देशांतील राजधानीमध्यें रमणीय राजवाड्यांत आपल्या अजोळीं आहेत. तेव्हां इक्ष्वाकुवंशजांपैकीं आजच्या आज कोणी तरी तात्पुरता राजा नेमावा. कारण हें आपलें राष्ट्र असेंच अराजक राहूं दिलें असतां नाश पावेल. अराजक देशामध्यें विजांचा कडकडाट होऊन व मोठी गर्जना करणारा पर्जन्य पृथ्वीवर दिव्य वर्षाव करीत नाहीं. अराजक राष्ट्रामध्यें कोणी मूठभर देखील बीं पेरीत नाहीं व राज्य अराजक झालें असतां पुत्र पित्याच्या अथवा स्त्री भर्त्याच्या आधीन रहात नाहीं. (५-१०)

नाराजके जनपदे कारयन्ति सभां नराः ।
उद्यानानि च रम्याणि हृष्टाः पुण्यगृहाणि च १२
नाराजके जनपदे यज्ञशीला द्विजातयः ।
सत्राण्यन्वासते दान्ता ब्राह्मणाः संशितव्रताः १३
नाराजके जनपदे महायज्ञेषु यज्वनः ।
ब्राह्मणा वसुसंपूर्णा विसृजन्त्याप्तदक्षिणाः १४
नाराजके जनपदे प्रहृष्टनटनर्तकाः ।
उत्सवाश्च समाजाश्च वर्धन्ते राष्ट्रवर्धनाः १५

"अराजकतेमध्यें धन नाहीं आणि अराजकतेमध्यें भार्याही नाहीं, हें एक मोठेंच भय असतें. जर पितापुत्ररूप आणि स्त्रीपुरुषरूप सत्याला जर ठिकाणच नाहीं तर मग क्रयविक्रयादिरूप व्यवहारांत, अराजकतेमध्यें सत्याची गोष्टच कोठली? राष्ट्र अराजक झालें असतां लोक सभा भरवीत नाहींत, रम्य बागा तयार करीत नाहींत व आनंदित होऊन पुण्य पदरीं पडेल, अशा धर्मशाळा वगैरेही बांधीत नाहींत. अराजक देशामध्यें यज्ञयाग करणारे ब्राह्मण नाहींसे होतात आणि कडकडीत व्रतानें चालणारे जितेंद्रिय ज्ञानीही सत्रांचें अनुष्ठान करीनासे होतात. अराजक देशामध्यें मोठमोठ्या यागांमध्यें धनसंपन्न ब्राह्मण शास्त्रविहित दक्षिणा ऋत्विजांना देऊं शकत नाहींत. अराजक देशामध्यें आनंदित नट व नर्तक ज्यामध्यें रंग आणतात असे देवादिकांचे, राष्ट्राच्या अभ्युदयाला कारण होणारे, उत्सव* आणि समाज वाढीस लागत नाहींत. (११-१५)

* देवादिकांचे उत्सव राष्ट्राचा अभ्युदय करणारे आहेत, हें तत्त्व फार प्राचीन कालापासून या भरतभूमीमध्यें प्रसिद्ध आहे आणि उत्सवामध्यें देवांना वगैरे उद्देशून भजन वगैरे करणारे लोकही समाजाच्या अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न करून राष्ट्राचा अभ्युदयच करणारे आहेत, हेंही तत्त्व या भरतभूमीमध्यें फार प्राचीन कालापासून चालत आलेलें आहे, असें या श्लोकावरून निःसंशय ठरतें. असे उत्सव सुरू न होणें अथवा जे पूर्वापार चालत आले आहेत, त्यांचाही प्रचार कमी होत जाणें, हें राष्ट्राच्या ऱ्हासाचें लक्षण असून कांहीं अंशीं अराजक स्थितीचें द्योतक आहे.

*

नाराजके जनपदे सिद्धार्था व्यवहारिणः ।
कथाभिरभिरज्यन्ते कथाशीलाः कथाप्रियैः १६
नाराजके जनपदे तूद्यानानि समागताः ।
सायाह्ने क्रीडितुं यान्ति कुमार्यो हेमभूषिताः १७
नाराजके जनपदे धनवन्तः सुरक्षिताः ।
शेरते विवृतद्वाराः कृषिगोरक्षजीविनः १८
नाराजके जनपदे वाहनैः शीघ्रवाहिभिः ।
नरा निर्यान्त्यरण्यानि नारीभिः सह कामिनः १९
नाराजके जनपदे बद्धघण्टा विषाणिनः ।
अटन्ति राजमार्गेषु कुञ्जराः षष्टिहायनाः २०
नाराजके जनपदे शरान्संततमस्यताम् ।
श्रूयते तलनिर्घोष इष्वस्त्राणामुपासने २१
नाराजके जनपदे वणिजो दूरगामिनः ।
गच्छन्ति क्षेममध्वानं बहुपण्यसमाचिताः २२

"अराजक राष्ट्रमध्यें व्यापार-धन्दा नीट न चालल्या कारणानें मनोरंजक कथा-ऐकण्याची ज्यांना गोडी आहे अशा व्यापारी लोकांचें, कथाप्रिय लोकांनीं सांगितलेल्या कथांच्या योगानें चित्तरंजन होईनासें होतें. अराजक देशामध्यें सुवर्णालंकारांनीं नटलेल्या कुमारिका एकत्र मिळून सायंकाळीं बागांतून क्रीडा करावयास जात नाहींत. अराजक देशामध्यें धनिक लोक सुरक्षित नसतात आणि शेतकी व गोरक्षण यांच्यावर उपजीविका करणाऱ्या लोकांनाही घराचीं दारें उघडीं टाकून सुखानें झोंप घेतां येत नाहीं. अराजक राष्ट्रामध्यें कामी पुरुष वेगानें नेणाऱ्या वाहनांच्या सहाय्यानें स्त्रियांसह सहल करण्यासाठीं वनांत जाऊं शकत नाहींत. अराजक देशामध्यें उत्कृष्ट दांतांनीं युक्त व घंटा बांधलेले असे साठ वर्षांचे तरुण हत्ती राजमार्गावरून फिरत नाहींत (१६-२०)

"अराजक देशामध्यें बाण व अस्त्रें यांचा अभ्यास सुरू राहून एकासारखे बाण मारून पाहणाऱ्या लोकांच्या धनुष्यांचे टणत्कार वगैरे ऐकूं येत नाहींत. अराजक देशामध्यें दूर प्रदेशाला निघालेले व्यापारी पुष्कळ माल बरोबर घेऊन मार्गानें

नाराजके जनपदे चरत्येकचरो वशी ।
भावयन्नात्मनात्मानं यत्र सायंगृहो मुनिः　२३
नाराजके जनपदे योगक्षेमः प्रवर्तते ।
न चाप्यराजके सेना शत्रून्विषहते युधि　२४
नाराजके जनपदे हृष्टैः परमवाजिभिः ।
नराः संयान्ति सहसा रथैश्च प्रतिमण्डिताः　२५
नाराजके जनपदे नराः शास्त्रविशारदाः ।
संवदन्तोऽपतिष्ठन्ते वनेषूपवनेषु वा　२६
नाराजके जनपदे माल्यमोदकदक्षिणाः ।
देवताभ्यर्चनार्थाय कल्प्यन्ते नियतैर्जनैः　२७
नाराजके जनपदे चन्दनागुरुरूषिताः ।
राजपुत्रा विराजन्ते वसन्ते इव शालिनः　२८
यथा ह्यनुदका नद्यो यथा वाप्यतृणं वनम् ।
अगोपाला यथा गावस्तथा राष्ट्रमराजकम् ।　२९

---

सुखरूप पणें जाऊं शकत नाहींत. अराजक देशामध्यें चालतां चालतां जेथें सायंकाळ होईल तेथेंच राहणारे, मनानें ब्रह्मचिंतन करणारे आणि एकटेच संचार करणारे जितेंद्रिय यति दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. अराजक देशामध्यें योगक्षेम नीटपणें चालत नाहींत म्हणजे निर्वाहापुरती प्राप्ति होत नाहीं व जी कांहीं झाली असेल ती सुरक्षित राहूं शकत नाहीं. आणि राज्य अराजक झालें असतां युद्धामध्यें सेना शत्रूंशीं तोंड देण्यास समर्थही होत नाहीं. अराजक देशामध्यें उत्साही व उत्कृष्ट घोडे ज्यांना जुंपले आहेत अशा स्थानीं शोभणारे पुरुष वनामध्यें फिरावयास जाऊं शकत नाहींत (२१–२५)

"अराजक देशामध्यें शास्त्रामध्यें प्रवीण असलेले पुरुष वनांतून अथवा उपवनांतून वादविवाद करीत उभे राहूं शकत नाहींत. अराजक देशामध्यें नियमानें वागणारे लोक देवतांच्या पूजनाकरितां फुलें, नैवेद्य व दक्षिणा यांची व्यवस्था नीटपणें करूं शकत नाहींत व अराजक देशामध्यें चंदन आणि अगुरु यांच्या उट्या लावलेले राजपुत्र वसंत ऋतूंतील शालवृक्षाप्रमाणें झळकत नाहींत. उदकरहित

ध्वजो रथस्य प्रज्ञानं धूमो ज्ञानं विभावसोः ।
तेषां यो नो ध्वजो राजा स देवत्वमितो गतः ३०
नाराजके जनपदे स्वकं भवति कस्यचित् ।
मत्स्या इव जना नित्यं भक्षयन्ति परस्परम् ३१
ये हि संभिन्नमर्यादा नास्तिकाश्छिन्नसंशयाः ।
तेऽपि भावाय कल्पन्ते राजदण्डनिपीडिताः ३२
यथा दृष्टिः शरीरस्य नित्यमेव प्रवर्तते ।
तथा नरेन्द्रो राष्ट्रस्य प्रभवः सत्यधर्मयोः ३३
राजा सत्यं च धर्मश्च राजा कुलवतां कुलम् ।
राजा माता पिता चैव राजा हितकरो नृणाम् ३४
यमो वैश्रवणः शक्रो वरुणश्च महाबलः ।
विशिष्यन्ते नरेन्द्रेण वृत्तेन महता ततः ३५

---

जशा नद्या, तृणरहित जसें वन आणि गोपालरहित जशा गाई, तसेंच राजानें विरहित असलेलें राष्ट्र होय. ध्वज ज्याप्रमाणें रथाची खूण आहे, अथवा धूम ज्याप्रमाणें अग्नीची खूण आहे, त्याचप्रमाणें जे राजकर्ते आहेत, त्यांची राजा ही खूण आहे; परंतु, तो राजाच येथून स्वर्गलोकाला निघून गेला आहे. यामुळें आतां आम्हांला कोणीही मानणार नाहीं. ( २६-३० )

"अराजक देशामध्यें कोणाचें ही जीवित व मालमत्ता हीं सुरक्षित राहूं शकत नाहींत. कारण लोक मत्स्याप्रमाणें नेहमीं एकमेकाला खाऊं लागतात. मर्यादेचें उल्लंघन केल्यामुळें पूर्वी शिक्षा भोगलेले जे नास्तिक असतात, तेही शिक्षेविषयीं निर्भय होऊन अशा वेळीं आपला प्रभाव दाखवूं लागतात. ज्याप्रमाणें शरिराचें हिताहित पाहण्याविषयीं दृष्टि नेहमीं तत्पर असते, त्याचप्रमाणें सत्य आणि धर्म यांचा प्रसार करणारा राजा राष्ट्राच्या हिताहिताविषयीं नेहमीं दक्ष असतो. * सत्य, धर्म आणि कुलवानांचें कुल यांचा प्रवर्तक राजाच असून माता, पिता व प्रजा

---

* राष्ट्राचा राजा राष्ट्रांतीलच असला पाहिजे, असें गृहीत धरून हा श्लोक महर्षि वाल्मीकींनीं लिहिलेला दिसत आहे. तेव्हां सर्वच राष्ट्रांसंबंधानें ही गोष्ट खरी ठरत नसल्यास त्याबद्दल त्या महर्षींना दोष देणें योग्य होणार नाहीं.

अहो तम इवेदं स्यान्न प्रज्ञायेत किंचन ।
राजा चेन्न भवेल्लोके विभजन्साध्वसाधुनी ३६
जीवत्यपि महाराजे तवैव वचनं वयम् ।
नातिक्रमामहे सर्वे वेलां प्राप्येव सागरः ३७
स नः समीक्ष्य द्विजवर्य वृत्तं नृपं विना राष्ट्रमरण्यभूतम् ।
कुमारमिक्ष्वाकुसुतं तथान्यं त्वमेव राजानमिहाभिषेचय ३८
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः॥ ६७॥

अष्टषष्टितमः सर्गः । [२६७१]

तेषां तद्वचनं श्रुत्वा वसिष्ठः प्रत्युवाच ह ।
मित्रामात्यजनान्सर्वान्ब्राह्मणांस्तानिदं वचः १

यांचें हित पहाणारा तोच आहे.‡ (३१–३४)

"यम, कुबेर, इंद्र आणि महाबलाढ्य वरुण यांना उदार आचरणानें युक्त असलेला राजा मागें टाकतो. यमाचे ठिकाणीं अपराध्याला दंड करणें एवढाच गुण आहे, कुबेराचे ठिकाणीं द्रव्य देणें एवढाच गुण आहे, इंद्राचे ठिकाणीं रक्षण करणें एवढाच गुण आहे आणि वरुणाचे ठिकाणीं प्रजेला सदाचारामध्यें ठेवणें एवढाच गुण आहे. तेव्हां हे चारी गुण ज्याचे ठिकाणीं आहेत, तो राजा या सर्वांपेक्षां श्रेष्ठ असणार, हें उघड आहे. अहो! बऱ्यावाईटाची व्यवस्था लावणारा राजा जर जगतामध्यें नसेल, तर हें जगत् अंधकारानें व्याप्त झाल्यासारखें

‡ असा राजा ज्या देशाला प्राप्त झाला असेल, तोच देश खरोखर भाग्यवान् होय. देशांतील राजा या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आहे किंवा नाहीं, हें समजण्याचें एक साधन रामायणादि ग्रंथांतून ठिकठिकाणीं आढळतें. तें साधन म्हणजे "हृष्टपुष्टजनाकीर्ण" हें विशेषण राष्ट्राला लावून पाहणें होय. हें विशेषण ज्या राष्ट्राला लागत असेल, त्या राष्ट्रांतील राजाचे अंगीं या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व गुण आहेत, असें समजण्यास हरकत नाहीं. हें विशेषण न लागतां "कृशाऽहृष्टजनाकीर्ण" अशा प्रकारचें विशेषण ज्या राष्ट्राला लागू पडत असेल, त्या राष्ट्रांतील राजाच्या अंगीं या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व अथवा एखादा तरी गुण असेल किंवा नाहीं, याचा काय तो निश्चय सुज्ञ पुरुषांनींच करणें योग्य आहे.

यदसौ मातुलकुले दत्तराज्यः परं सुखी ।
भरतो वसति भ्रात्रा शत्रुघ्नेन मुदान्वितः २
तच्छीघ्रं जवना दूता गच्छन्तु त्वरितं हयैः ।
आनेतुं भ्रातरौ वीरौ किं समीक्षामहे वयम् ३
गच्छन्त्विति ततः सर्वे वसिष्ठं वाक्यमब्रुवन् ।
तेषां तद्वचनं श्रुत्वा वसिष्ठो वाक्यमब्रवीत् ४
एहि सिद्धार्थ विजय जयन्ताशोकनन्दन ।
श्रूयतामिति कर्तव्यं सर्वानेव ब्रवीमि वः ५
पुरं राजगृहं गत्वा शीघ्रं शीघ्रजवैर्हयैः ।
त्यक्तशोकैरिदं वाच्यः शासनाद्भरतो मम ६

---

होऊन कोणत्याच गोष्टीचा उमज पडणार नाहीं. असो, महाराज दशरथ जिवंत असतांनाही, समुद्र ज्याप्रमाणें मर्यादेपर्यंत आल्यावर तिचें कधींही अतिक्रमण करीत नाहीं, त्याचप्रमाणें आम्हीं आपल्या आज्ञेचें कधींही अतिक्रमण केलेलें नाहीं. हे द्विजश्रेष्ठ वासिष्ठमुने ! आपण आमच्या म्हणण्याकडे लक्ष द्या आणि इक्ष्वाकु कुलांतील एखाद्या राजपुत्राला अथवा दुसऱ्या कोणाला तरी आपण आजच्या आजच या राज्यावर राज्याभिषेक करा. कारण राजावांचून हें राष्ट्र अरण्यासारखें झालेलें आहे.'' ( ३५-२ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग संपला. ॥६७॥

त्यांचें तें भाषण ऐकून सुमंत्र आदि मित्र व अमात्यांना आणि मार्कंडेय आदि करून ब्राह्मणांना वासिष्ठ म्हणाले, "ज्या अर्थीं दशरथानें ज्याला राज्य अर्पण केलें आहे तो भरत आपला भाऊ शत्रुघ्न यासह आपल्या मामाच्या घरीं मोठ्या आनंदानें राहिला आहे, त्या अर्थीं वेगानें जाणारे दूत त्या वीर भावांना आणण्याकरितां घोडे घेऊन लवकर जाऊं देत. विचार करावयाचें कांहीं कारण नाहीं. कारण राजानेंच भरताला राज्य देऊन ठेविलें आहे." (१-३)

यावर "जाऊं द्या" असें सर्वांनीं वासिष्ठांना म्हटलें असतां त्यांचें तें म्हणणें ऐकून घेऊन वासिष्ठ म्हणाले, "हे सिद्धार्था ! हे विजया ! हे जयंता ! हे

पुरोहितस्त्वां कुशलं प्राह सर्वे च मन्त्रिणः ।
त्वरमाणश्च निर्याहि कृत्यमात्ययिकं त्वया ७
मा चास्मै प्रोषितं रामं मा चास्मै पितरं मृतम् ।
भवन्तः शंसिपुर्गत्वा राघवाणामितः क्षयम् ८
कौशेयानि च वस्त्राणि भूषणानि वराणि च ।
क्षिप्रमादाय राज्ञश्च भरतस्य च गच्छत ९
दत्तपथ्यशना दूता जग्मुः स्वं स्वं निवेशनम् ।
केकयांस्ते गमिष्यन्तो हयानारुह्य संमतान् १०
ततः प्रास्थानिकं कृत्वा कार्यशेषमनन्तरम् ।
वसिष्ठेनाभ्यनुज्ञाता दूताः संत्वरितं ययुः ११
न्यन्ते नापरतालस्य प्रलम्बस्योत्तरं प्रति ।
निषेवमाणास्ते जग्मुर्नदीं मध्येन मालिनीम् १२
ते हास्तिनपुरे गङ्गां तीर्त्वा प्रत्यङ्मुखा ययुः ।

---

अशोकनंदना ! आतां काय करावयाचें तें ऐका; मी तुम्हांला सर्वांनाच सांगतों. वेगशाली घोडे घेऊन केकयदेशाच्या राजधानीमध्यें असलेल्या राजवाड्यांत जाऊन दूतांनीं शोकाचें चिन्ह आपल्या चेहऱ्यावर यत्किंचितही दिसूं न देतां माझ्या आज्ञेवरून भरताला म्हणावें कीं, " पुरोहित वसिष्ठ आणि सर्व मंत्री यांनीं तुला कुशल विचारिलें आहे, आतां तूं लवकर येथून नीघ; तुझ्याशीं मोठें जरूरीचें काम आहे. " राम वनवासांत गेला, पिता परलोकवासी झाला आणि कैकेयीमुळें या रघुकुलाचा घात झाला. यांतलें कांहींएक तुम्हीं तेथें गेल्यावर त्याला सांगूं नका. रेशमी वस्त्रें आणि उत्कृष्ट अलंकार केकयराजाला व भरताला देण्याकरितां घेऊन तुम्हीं लवकरच चालू लागा." (४–९)

याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यावर व मार्गांत भोजनाकरितां लागणारें द्रव्य त्यांच्याजवळ दिल्यावर ते दूत आपणाला पसंत असलेल्या घोड्यांवर स्वार होऊन केकय देशाला जाण्याकरितां आपापल्या घरीं गेले. त्यानंतर जाण्यासंबंधानें उरली सुरलेली तयारी करून वसिष्ठमुनींनीं आज्ञा दिल्यावर ते दूत तावडतोब चालते झाले. अपरताल देशाच्या पश्चिम बाजूला आणि प्रलंब देशाच्या उत्तर बाजूला

पञ्चालदेशमासाद्य मध्येन कुरुजाङ्गलम् १३
सरांसि च सुफुल्लानि नदीश्च विमलोदकाः ।
निरीक्षमाणा जग्मुस्ते दूताः कार्यवशाद् द्रुतम १४
ते प्रसन्नोदकां दिव्यां नानाविहगसेविताम् ।
उपातिजग्मुर्वेगेन शरदण्डां जलाकुलाम् १५
निकूलवृक्षमासाद्य दिव्यं सत्योपयाचनम् ।
अभिगम्याभिवाद्य तं कुलिङ्गा प्राविशन्पुरीम् १६
अभिकालं ततः प्राप्य तेजोऽभिभवनाच्च्युताः ।
पितृपैतामहीं पुण्यां तेरुरिक्षुमतीं नदीम् १७
अवेक्ष्याञ्जलिपानांश्च ब्राह्मणान्वेदपारगान् ।
ययुर्मध्येन बाल्हीकान्सुदामानं च पर्वतम् १८
विष्णोः पदं प्रेक्षमाणा विपाशां चापि शाल्मलीम्
नदीर्वापीतटाकानि पल्वलानि सरांसि च १९

---

असलेल्या मालतीनदीवर उतरून ते त्या नदींतून पलीकडे गेले. ईशान्य दिशेस जाण्याकरितां निघालेले ते दूत पंचालदेशाला येऊन हस्तिनापुराजवळ गंगा उतरल्यावर पश्चिमेकडे वळून कुरुजांगलदेशाला जाणाऱ्या मधल्या रस्त्यानें चालले. पुष्पांनीं फुललेलीं सरोवरें आणि निर्मल उदकानें युक्त असलेल्या नद्या मार्गामध्यें दृष्टीस पडत असतांनाही ते दूत मध्यें न थांबतां निकडीच्या कामामुळे घाईनेंच पुढे चालते झाले. निर्मल उदक, नाना प्रकारचे पक्षी आणि उदकानें क्षुब्ध अशा शरदंडा नामक दिव्य नदीसमीप जाऊन ते ती नदी ओलांडून पुढें गेले.(१०–१५)

शरदंडानदीच्या पश्चिम तीरावर नमस्कार करण्यास योग्य असलेल्या सत्योपयाचननामक दिव्य वृक्षाशीं गेल्यावर दूतांनीं त्याला प्रदक्षिणा केली आणि नंतर त्यांनीं कुलिंगा नांवाच्या राजधानीमध्यें प्रवेश केला. त्यानंतर तेजोभिभवन गांवांतून निघून अभिकालनामक गांवाला आल्यावर इक्ष्वाकूंचा पिता व पितामह यांचा जिच्याशीं संबंध आहे, अशी पुण्य इक्षुमतीनदी ते तरून गेले. बाल्हीक देशांत राहणाऱ्या वेदपारंगत ब्राह्मणांनाही सदाचाराची पर्वा न करतां ओंजळींनीं पाणी पितांना पाहून विशेष आश्चर्य न दाखवितां ते दूत बाल्हीकदेशांतून सुदामपर्वताला

पश्यन्तो विविधांश्चापि सिंहान्व्याघ्रान्मृगान्द्विपान् ।
ययुः पथाति महता शासनं भर्तुरीप्सवः    २०
ते श्रान्तवाहना दूता विकृष्टेन सता पथा ।
गिरिव्रजं पुरवरं शीघ्रमासेदुरञ्जसा    २१
भर्तुः प्रियार्थं कुलरक्षणार्थं भर्तुश्च वंशस्य परिग्रहार्थम् ।
अहेडमानास्त्वरया स्म दूता रात्र्यां तु ते तत्पुरमेव याताः २२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥६८॥

एकोनसप्ततितमः सर्गः ।    [२६९३]

यामेव रात्रिं ते दूताः प्रविशन्ति स्म तां पुरीम् ।
भरतेनापि तां रात्रिं स्वप्नो दृष्टोऽयमप्रियः    १
व्युष्टामेव तु तां रात्रिं दृष्ट्वा तं स्वप्नमप्रियम् ।
पुत्रो राजाधिराजस्य सुभृशं पर्यतप्यत    २

---

चालते झाले. त्यानंतर सुदाम पर्वतावर असलेलें विष्णूचें स्थान पाहण्याचा उद्देश मनांत धरून आणि विपाशा व शाल्मली या नद्या पाहून नद्या, तलाव, तळीं, सरोवरें. नाना प्रकारचे सिंह, वाघ, हरण आणि हत्ती पहात पहात आपल्याला पाठविणाऱ्या श्रेष्ठ वसिष्ठांची आज्ञा सिद्धीस नेण्याची इच्छा बाळगणारे ते दूत मोठ्या मार्गानें चालते झाले. ( १६–२० )

नंतर उपद्रवरहित असा बराच लांब मार्ग चालून आल्यामुळें त्यांचे घोडे बरेच थकले होते, तरी पण ते दूत गिरिव्रजनामक श्रेष्ठ नगराजवळ जाऊन पोंचले. सारांश श्रेष्ठ वसिष्ठांची मर्जी संपादन करण्याकरितां, प्रजेचें रक्षण करण्याकरितां आणि दशरथराजाच्या वंशजांच्या वंशपरंपरागत राज्याचा भरता-कडून स्वीकार करविण्याकरितां उपेक्षा न करणारे ते दूत रात्रीच्या रात्रींच त्वरेनें त्या नगरास जाऊन पोंचले. ( २१–२२ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अडसष्टावा सर्ग संपला ॥६८॥

ज्या रात्रीं त्या दूतांनीं त्या नगरीमध्यें प्रवेश केला, त्याच रात्रीं भरतालाही एक अभद्र स्वप्न पडलें. ती रात्र उजाडण्याचे सुमारासच तें अमंगल स्वप्न

तप्यमानं तमाज्ञाय वयस्याः प्रियवादिनः ।
आयासं विनयिष्यन्तः सभायां चक्रिरे कथाः ३
वादयन्ति तदा शान्तिं लासयन्त्यपि चापरे ।
नाटकान्यपरे स्माहुर्हास्यानि विविधानि च ४
स तैर्महात्मा भरतः सखिभिः प्रियवादिभिः ।
गोष्ठीहास्यानि कुर्वद्भिर्न प्राहृष्यत राघवः ५
तमब्रवीत्प्रियसखो भरतं सखिभिर्वृतम् ।
सुहृद्भिः पर्युपासीनः किं सखे नानुमोदसे ६
एवं ब्रुवाणं सुहृदं भरतः प्रत्युवाच ह ।
शृणु त्वं यन्निमित्तं मे दैन्यमेतदुपागतम् ७
स्वप्ने पितरमद्राक्षं मलिनं मुक्तमूर्धजम् ।
पतन्तमद्रिशिखरात्कलुषे गोमये ह्रदे ८
प्लवमानश्च मे दृष्टः स तस्मिन्गोमये ह्रदे ।
पिबन्नञ्जलिना तैलं हसन्निव मुहुर्मुहुः ९

---

पाहिल्यावर राजा दशरथाचा पुत्र भरत अत्यंत चिंताक्रांत झाला. तो चिंताक्रांत झाला आहे असें समजून प्रिय भाषण करणारे त्याचे मित्र स्वप्नामुळे उत्पन्न झालेल्या विषण्णतेचा त्याला विसर पडावा यासाठीं सभेमध्यें त्याला नानाप्रकारच्या गोष्टी सांगूं लागले. त्याचा खेद दूर करण्याकरितां कांहीं मित्र वाद्यें वाजवूं लागले, कांहीं नर्तकांकडून नृत्य करवूं लागले आणि कांहींनीं हास्यरसप्रधान अशा नाना प्रकारच्या नाटकांचा प्रयोग सुरू केला; परंतु नेहमीं वार्तालाप करणारे ते मित्र हितकारक गोष्टी आणि हास्योत्पादक थट्टा जरी करीत होते, तरी त्याच्या योगानें रघुवंश भरताला आनंद झाला नाहीं. ( १–५ )

त्यानंतर मित्रांच्या घोळक्यांत बसलेल्या त्या भरताला मित्रांसह सभेमध्यें बसलेला एक प्रिय मित्र " मित्रा, आज तुला या गायनानें वगैरे आनंद कां होत नाहीं ? " असें म्हणाला. तेव्हां असा प्रश्न विचारणाऱ्या त्या मित्राला भरत म्हणाला, " मला हें दैन्य प्राप्त होण्याचें कारण काय तें ऐक. घाणेरड्या व केस मोकळे सुटलेल्या अशा माझ्या वडिलांना पर्वतशिखरापासून शेणानें भरलेल्या

ततस्तिलोदनं भुक्त्वा पुनः पुनरधः शिराः ।
तैलेनाभ्यक्तसर्वाङ्गस्तैलमेवान्वगाहत १०
स्वप्नेऽपि सागरं शुष्कं चन्द्रं च पतितं भुवि ।
उपरुद्धां च जगतीं तमसेव समावृताम् ११
औपवाह्यस्य नागस्य विषाणं शकलीकृतम् ।
सहसा चापि संशान्ता ज्वलिता जातवेदसः १२
अवदीर्णां च पृथिवीं शुष्कांश्च विविधान्द्रुमान् ।
अहं पश्यामि विध्वस्तान्सधूमांश्चैव पर्वतान् १३
पीठे कार्ष्णायसे चैव निषण्णं कृष्णवाससम् ।
प्रहरन्ति स्म राजानं प्रमदाः कृष्णपिङ्गलाः १४
त्वरमाणश्च धर्मात्मा रक्तमाल्यानुलेपनः ।
रथेन खरयुक्तेन प्रयातो दक्षिणामुखः १५

एका घाणेरड्या डबक्यांत पडतांना मीं स्वप्नामध्यें पाहिलें. गाईच्या शेणानें भरलेल्या त्या डबक्यांत ते तरंगत आहेत व ओंजळीनें तेल पिऊन वारंवार हंसत आहेत असें मीं पाहिलें. त्यानंतर तिळांनीं युक्त असा भात खाऊन फिरून फिरून खालीं मान घालीत असलेल्या तेलानें सर्वांग चोपडून गेलेल्या तेलांतच ते बुचकळ्या मारीत आहेत, असें मीं पाहिलें ( ६-१० )

"सागर शुष्क झाला आहे, चंद्र भूमीवर पडला आहे, पृथ्वी अंधकारानें व्याप्त होऊन असुरांनीं व राक्षसांनीं ग्रासून टाकिली आहे व राजाची स्वारी ज्याच्यावर बसून निघते, त्या हत्तीच्या दातांचे तुकडे तुकडे झाले आहेत असें मी स्वप्नामध्यें पाहिलें; आणि प्रज्वलित झालेले अग्नि एकाएकीं विझून गेले असेंही मला दिसलें. दुभंगलेली पृथ्वी, शुष्क होऊन गेलेले नाना प्रकारचे वृक्ष आणि जमीनदोस्त झालेलें व धुरानें व्यापलेले पर्वतही मीं पाहिले. लोखंडाच्या आसनावर कृष्णवस्त्रें परिधान करून बसलेल्या राजाला काळ्याकुट्ट व पिंगटवर्णाच्या स्त्रिया मारीत आहेत असें मी पाहिलें. तांबड्या फुलांच्या माला धारण करून वर रक्तचंदन अंगाला लावून तो धर्मात्मा राजा गाढवें जुंपलेल्या रथांत बसून घाईनें दक्षिण दिशेकडे निघून गेला, असें मी पाहिलें. ( ११-१५ )

प्रहसन्तीव राजानं प्रमदा रक्तवासिनी ।
प्रकर्षन्ती मया दृष्टा राक्षसी विकृतानना १६
एवमेतन्मया दृष्टमिमां रात्रिं भयावहाम् ।
अहं रामोऽथवा राजा लक्ष्मणो वा मरिष्यति १७
नरो यानेन यः स्वप्ने खरयुक्तेन याति हि ।
अचिरात्तस्य धूम्राग्रं चितायां संप्रदृश्यते १८
एतन्निमित्तं दीनोऽहं न वचः प्रतिपूजये ।
शुष्यतीव च मे कण्ठो न स्वस्थमिव मे मनः १९
न पश्यामि भयस्थानं भयं चैवोपधारये ।
भ्रष्टश्च स्वरयोगो मे छाया चापगता मम ।
जुगुप्स इव चात्मानं न च पश्यामि कारणम् २०
इमां च दुःस्वप्नगतिं निशाम्य हि त्वनेकरूपामवितर्कितां पुरा ।
भयं महत्तद्धृदयान्न याति मे विचिन्त्य राजानमचिन्त्यदर्शनम् २१
इत्यार्षे श्री०वा०आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनसप्ततितमः सर्गः॥६९॥ [२७१४]

---

"अक्राळविक्राळ तोंडाची व रक्तवस्त्रें परिधान केलेली एक तरुण राक्षसी हंसत हंसत राजाला ओढून नेत असतांना मी पाहिली. याप्रमाणें असलीं भयंकर दृश्यें रात्रीं माझ्या दृष्टीस पडलीं. तेव्हां मी, राम, राजा, अथवा लक्ष्मण कोणी तरी मृत्यु पावणार. स्वप्नामध्यें जो पुरुष गाढवें जुंपलेल्या रथांत बसून जातो, त्याची धूमशिखा चितेवर लवकरच दृष्टोत्पत्तीस येते. याकरितां मी खिन्न झालों आहें. तुमच्या भाषणाचें अभिनंदन करावेंसें मला वाटत नाहीं, माझ्या घशाला जशी कांहीं कोरड पडत आहे असें वाटतें व माझें मन फारच अस्वस्थ झालें आहे. भयाचें कारण तर प्रत्यक्ष मला दिसत नाहीं; परंतु भीति तर वाटत आहे. माझा शब्द खोल गेला आहे आणि माझ्या तोंडावरची कळाही गेल्यासारखी झाली आहे. स्वतःबद्दल मला वाईट मात्र वाटत आहे; परंतु वाईट वाटण्याचें कारण काय, हें लक्षांत येत नाहीं. पूर्वीं ज्याच्याबद्दल कधीं तर्कही झालेला नाहीं, असें हें अनेक देखाव्यांनीं युक्त असलेलें दुःस्वप्न पडलेलें आठवलें म्हणजे राजाची भेट तरी होईल कीं नाहीं, अशी काळजी वाटते व माझ्या अंतः-

सप्ततितमः सर्गः ।

भरते ब्रुवति स्वप्नं दूतास्ते क्लान्तवाहनाः ।
प्रविश्यासह्यपरिखं रम्यं राजगृहं पुरम् १
समागम्य च राज्ञा ते राजपुत्रेण चार्चिताः ।
राज्ञः पादौ गृहित्वा च तमूचुर्भरतं वचः २
पुरोहितस्त्वां कुशलं प्राह सर्वे च मन्त्रिणः ।
त्वरमाणश्च निर्याहि कृत्यमात्ययिकं त्वया ३
इमानि च महार्हाणि वस्त्राण्याभरणानि च ।
प्रतिगृह्य विशालाक्ष मातुलस्य च दापय ४
अत्र विंशतिकोट्यस्तु नृपतेर्मातुलस्य ते ।
दशकोट्यस्तु संपूर्णास्तथैव च नृपात्मज ५
प्रतिगृह्य तु तत्सर्वं स्वनुरक्तः सुहृज्जने ।
दूतानुवाच भरतः कामैः संप्रतिपूज्य तान् ६

करणांतून तें भयच जात नाहीं. " ( १६-२१ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणसत्तरावा सर्ग संपला ॥ ६९ ॥

याप्रमाणें भरत स्वप्नाची हकीकत सांगत आहे, तोंच ज्यांचे घोडे थकून गेलेले आहेत, अशा त्या दूतांनीं ओलांडण्यास अशक्य असा खंदक ज्याच्या भोंवतालीं आहे अशा त्या नगरांत प्रवेश केला व ते रम्य राजवाड्यापाशीं आले. त्या राजाची भेट झाल्यावर व राजपुत्रानें त्यांचें आदरातिथ्य केल्यावर राजाला पुनः एकवार वंदन करून ते त्या भरताला म्हणाले, " पुरोहित वसिष्ठ आणि सर्व मंत्री यांनीं तुला आपल्याकडे सर्व कुशल आहे असें सांगितलें आहे. आतां लवकरच येथून निघण्याची तयारी कर; तुझ्याशीं अत्यंत निकडीचें काम आहे. हे कमलनयना ! हीं मोठमोठीं मौल्यवान् वस्त्रें व भूषणें तूं घे आणि आपल्या मामालाही दे. या वस्त्रांपैकीं वीस कोटींचीं वस्त्रें केकय राजाला दिलीं असून, तुझ्या मामासाठीं हे राजकुमारा, दहा कोटींचीं वस्त्रें दिलीं आहेत. " ( १-५ )

याप्रमाणें दूतांनीं सांगितल्यावर मित्रांवर अतिशय प्रेम करणारा तो भरत

कच्चित्स कुशली राजा पिता दशरथो मम ।
कच्चिदारोग्यता रामे लक्ष्मणे च महात्मनि ७
आर्या च धर्मनिरता धर्मज्ञा धर्मवादिनी ।
अरोगा चापि कौसल्या माता रामस्य धीमतः ८
कच्चित्सुमित्रा धर्मज्ञा जननी लक्ष्मणस्य या ।
शत्रुघ्नस्य च वीरस्य अरोगा चापि मध्यमा ९
आत्मकामा सदा चण्डी क्रोधना प्राज्ञमानिनी ।
अरोगा चापि मे माता कैकेयी किमुवाच ह § १०
एवमुक्तास्तु ते दूता भरतेन महात्मना ।
ऊचुः संप्रश्रितं वाक्यमिदं तं भरतं तदा ११
कुशलास्ते नरव्याघ्र येषां कुशलमिच्छसि ।
श्रीश्च त्वां वृणुते पद्मा युज्यतां चापि ते रथः १२

तें सर्व स्वीकारून आणि त्यांना हव्या असलेल्या पदार्थांनीं घास, शिधा, दाणा, इत्यादि त्यांची विचारपूस करून त्यांना म्हणाला कीं, " माझा पिता दशरथ राजा कुशल आहे ना? आणि राम व महात्मा लक्ष्मण सुखरूप आहेत ना? सभ्य, धर्मनिष्ठ, धर्मज्ञ आणि धर्माला अनुसरून भाषण करणारी अशी विचारी रामाची माता कौसल्या कुशल आहे ना? लक्ष्मण व वीर शत्रुघ्न यांची माता जी मध्यम राजपत्नी धर्मज्ञ सुमित्रा तीहि सुखरूप आहे ना? स्वार्थाकडेच दृष्टि देणारी, नेहमींच जहाल, रागीट स्वभावाची आणि आपणाला शहाणी समजणारी माझी माता कैकेयीही बरी असून तिनें मला कांहीं सांगितलें आहे काय ?" ( ६–१० )

याप्रमाणें महात्म्या भरतानें प्रश्न केला असतां, ते दूत विनयपूर्वक आणि थोडक्यांत त्या भरताला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा ! ज्यांचें कुशल तूं इच्छीत

§ दूत म्हणजे नोकर माणसें ! त्यांना भरतासारखा राजपुत्र आपल्या जन्मदात्री मातेसंबंधानें अशा प्रकारें विचारपूस करील, हें संभवत नाहीं. तें बरें तरी दिसत नाहीं. मुळांत श्लोक उत्तरार्धापुरताच असावा. पूर्वार्ध मागाहून कोणी तरी घालून श्लोक पूर्ण केला असावा.

भरतश्चापि तान्दूतानेवमुक्तोऽभ्यभाषत ।
आपृच्छेऽहं महाराजं दूताः संत्वरयन्ति माम् १३
एवमुक्त्वा तु तान्दूतान्भरतः पार्थिवात्मजः ।
दूतैः संचोदितो वाक्यं मातामहमुवाच ह १४
राजन्पितुर्गमिष्यामि सकाशं दूतचोदितः ।
पुनरप्यहमेष्यामि यदा मे त्वं स्मरिष्यसि १५
भरतेनैव मुक्तस्तु नृपो मातामहस्तदा ।
तमुवाच शुभं वाक्यं शिरस्याघ्राय राघवम् १६
गच्छ तातानुजाने त्वां कैकेयी सुप्रजास्त्वया ।
मातरं कुशलं ब्रूयाः पितरं च परंतप १७
पुरोहितं च कुशलं ये चान्ये द्विजसत्तमाः ।
तौ च तात महेष्वासौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ १८
तस्मै हस्त्युत्तमांश्चित्रान्कम्बलानजिनानि च ।

---

आहेस, ते सर्वहि कुशल आहेत; कमलामध्यें निवास करणारी लक्ष्मी तुला वरण्यास तयार आहे. तर आतां प्रयाणाकरितां तुझा रथ जोडून तूं तयार हो." याप्रमाणें त्यांनीं भरताला सांगितलें असतां "दूत मला घाई करीत आहेत, असें सांगून मी महाराज केकयाधिपतीचा निरोप घेतों," असें भरतानें त्या दूतांना सांगितलें. दूतांना असें सांगितल्यावर दूतांनीं "सत्वर जा" म्हणून सांगितलें व तो राजकुमार भरत आपल्या आजोबांना म्हणाला, "हे राजा! मी पित्याकडे जातों; दूत मला त्वरा करीत आहेत. जेव्हां आपणाला माझी आठवण होईल, तेव्हां मी पुनः येईन." ( ११-१५ )

याप्रमाणें भरतानें सांगितलें असतां त्याचा आजा केकयदेशाधिपति रघुवंशज भरताचें मस्तक हुंगून शुभ शब्दांनीं त्याला म्हणाला "भरता! जा; मी तुला परवानगी देतों कैकेयीचा योग्य सुपुत्र असणाऱ्या व शत्रूंना संताप देणाऱ्या मुला! आपल्या मातेला व पित्याला आम्ही खुशाल आहोंत म्हणून सांग; आणि त्याचप्रमाणें पुरोहित व इतरही जे कांहीं द्विजश्रेष्ठ असतील, त्यांना आणि त्या महाधनुर्धारी राम-लक्ष्मण यांनाही कुशल सांग." असें सांगितल्यावर उत्कृष्ट

सत्कृत्य केकयो राजा भरताय ददौ धनम् १९
अन्तःपुरेऽतिसंवृद्धान्व्याघ्रवीर्यबलोपमान् ।
दंष्ट्रायुक्तान्महाकायाञ्शुनश्चोपायनं ददौ २०
रुक्मनिष्कसहस्रे द्वे षोडशाश्वशतानि च ।
सत्कृत्य कैकयीपुत्रं केकयो धनमादिशत् २१
तदामात्यानभिप्रेतान्विश्वास्यांश्च गुणान्वितान् ।
ददावश्वपतिः शीघ्रं भरतायानुयायिनः २२
ऐरावतानैन्द्रशिरान्नागान्वै प्रियदर्शनान् ।
खराञ्शीघ्रान्सुसंयुक्तान्मातुलोऽस्मै धनं ददौ २३
स दत्तं केकयेन्द्रेण धनं तन्नाभ्यनन्दत ।
भरतः कैकयीपुत्रो गमनत्वरया तदा २४
बभूव ह्यस्य हृदये चिन्ता सुमहती तदा ।
त्वरया चापिदूतानां स्वप्नस्यापि च दर्शनात् २५

हत्ती, परोपरीचीं लोकरींचीं वस्त्रें, सिंह-व्याघ्रादिकांचीं अजिनें आणि द्रव्य, सत्कार-पूर्वक केकयराजानें त्या भरताला दिलें. अंतःपुरामध्यें प्रयासानें वाढविलेले, पराक्रम आणि बल यामध्यें वाघाची बरोबरी करणारे आणि मोठमोठ्या दाढांनीं युक्त असलेले असे धिप्पाड कुत्रे देणगीदाखल त्याला दिले. ( १६–२० )

सोन्याच्या दोन हजार मोहोरा आणि सोळाशें घोडे इतकें धन कैकेयीच्या पुत्राचा सत्कार करून त्याला केकयराजानें दिलें. त्या वेळीं सोबतीसाठीं म्हणून आपणाला पसंत असलेले विश्वासु आणि गुणी असे अमात्यही अश्वपति केकयराजानें भरताच्या बरोबर दिले. याप्रमाणें केकयराजानें देणगी दिल्यावर ऐरावत कुलांतील आणि इंद्रशिर नामक देशांतील दिसण्यांतही मनोहर असलेले हत्ती आणि उत्कृष्ट रीतीचें सामानसुमान घातलेलीं व वेगानें जाणारीं खेचरें, असें द्रव्य त्याच्या मामानेंही त्याला दिलें. परंतु कैकेयीपुत्र भरतानें जाण्याच्या घाईमुळें त्या वेळीं केकयराजानें दिलेल्या द्रव्याबद्दल आनंद दाखविला नाहीं; कारण दूतांच्या घाईमुळें आणि स्वप्न पाहिल्यामुळें त्याच्या अंतःकरणाला फारच मोठी चिंता लागून राहिली होती. ( २१–२५ )

स स्ववेश्माभ्यतिक्रम्य नरनागाश्वसंकुलम् ।
प्रपेदे सुमहच्छ्रीमान्राजमार्गमनुत्तमम् २६
अभ्यतीत्य ततोऽपश्यदन्तःपुरमनुत्तमम् ।
ततस्तद्भरतः श्रीमानाविवेशानिवारितः २७
स मातामहमापृच्छ्य मातुलं च युधाजितम् ।
रथमारुह्य भरतः शत्रुघ्नसहितो ययौ २८
रथान्मण्डलचक्रांश्च योजयित्वा परं शतम् ।
उष्ट्रगोश्वखरैर्भृत्या भरतं यान्तमन्वयुः २९
बलेन गुप्तो भरतो महात्मा सहार्यकस्यात्मसमैरमात्यैः ।
आदाय शत्रुघ्नमपेतशत्रुर्गृहाद्ययौ सिद्ध इवेन्द्रलोकात् ३०

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्ततितमः सर्गः ॥७०॥ [२७४४]

---

असो. तो महावैभवशाली भरत आपल्या निवास-स्थानांतून बाहेर पडला आणि पुरुष, हत्ती व घोडे यांनीं गजबजून गेलेल्या उत्कृष्ट * राजमार्गावर आला. त्यानंतर आपल्या घरापासून राजवाड्यापर्यंत राजमार्गानें गेल्यावर तो उत्कृष्ट अन्तःपुरापाशीं येऊन थांबला आणि त्या अंतःपुरामध्यें त्या वैभवशाली भरतानें मज्जाव न होतां प्रवेश केला. त्यानंतर आजोबा व मामा युधाजित् यांचा निरोप घेऊन व रथावर आरूढ होऊन तो भरत शत्रुघ्नासह मार्गस्थ झाला. रथ झटदिशीं वळवून घेण्याकरितां चार चक्रांच्यामध्यें असलेलें मंडलचक्र ज्या रथांना आहे, अशा आणखी शंभर रथांना उंट, बैल, घोडे व खेचरें लावून अयोध्येला निघालेल्या भरताच्या मागोमाग नोकर लोकही गेले. आजोबानें बरोबर दिलेले स्वतःच्या तोडीचे अमात्य आणि सैन्य यांनीं सुरक्षित झालेला तो महात्मा शत्रुरहित भरत इन्द्रलोकांतून निघणाऱ्या सिद्धाप्रमाणें शत्रुघ्नाला बरोबर घेऊन आपल्या आजोळांतून बाहेर पडला. ( २६-३० )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्तरावा सर्ग संपला ॥ ७० ॥

---

* हा राजमार्ग राजवाड्याच्या आवारांतील होय.

❁

एकसप्ततितमः सर्गः ।

स प्राङ्मुखो राजगृहादभिनिर्याय वीर्यवान् ।
ततः सुदामां द्युतिमान्संतीर्यावेक्ष्य तां नदीम् १
ह्लादिनीं दूरपारां च प्रत्यक्स्रोतस्तरङ्गिणीम् ।
शतद्रूमतरच्छ्रीमान्नदीमिक्ष्वाकुनन्दनः २
ऐलधाने नदीं तीर्त्वा प्राप्य चापरपर्वतान् ।
शिलामाकुर्वतीं तीर्त्वा आग्नेयं शल्यकर्षणम् ३
सत्यसंधः शुचिर्भूत्वा प्रेक्षमाणः शिलावहाम् ।
अभ्यगात्स महाशैलान्वनं चैत्ररथं प्रति ४
सरस्वतीं च गङ्गां च युग्मेन प्रतिपद्य च ।
उत्तरान्वीरमत्स्यानां भारुण्डं प्राविशद्वनम् ५
वेगिनीं च कुलिङ्गाख्यां ह्लादिनीं पर्वतावृताम् ।
यमुनां प्राप्य संतीर्णो बलमाश्वासयत्तदा ६
शीतीकृत्वा तु गात्राणि क्लान्तानाश्वास्य वाजिनः ।

---

राजगृहांतून पूर्वेकडे तोंड करून बाहेर पडल्यावर त्या तेजस्वी व वीर्यवान् भरतानें सुदामा नदी गांठली व ती तरून अलीकडे आला. त्यानंतर अफाट पात्र असलेल्या व जिचा प्रवाह पश्चिमेकडे वहात जात आहे, अशी ऱ्हादिनी नदी व नंतर शतद्रूनदी तो इक्ष्वाकुवंशज वैभवशाली भरत तरून आणखी अलीकडे आला. नंतर ऐलधान गांवापाशी तेथील नदी उतरून तो अपरपर्वत नांवाच्या देशाला आला आणि आपल्या पात्रांत पडलेली वस्तु पाषाणासारखी कठीण करून टाकणारी शिलानदी तरून जाऊन आग्नेय दिशेस असलेल्या शल्यकर्षण देशाला तो आला. त्यानंतर शिलावहा नदी पहात पहात तिच्यामध्यें स्नान करून व शुचिर्भूत होऊन तो सत्यप्रतिज्ञ भरत मोठमोठे पर्वत ओलांडून चैत्ररथ वनाला आला नंतर गंगा आणि सरस्वती यांच्या तीरावर संगमस्थलीं तो आला आणि वीरमत्स्य देशाच्या उत्तरेस असलेल्या देशांना आल्यावर तो भारुंड नामक वनामध्यें येऊन पोंचला. ( १-५ )

त्यानंतर अतिओढ असलेली आणि पर्वतांनीं व्याप्त अशी कुलिंगा नदी उतरल्यानंतर यमुनेवर येऊन त्यानें आपल्या सैन्याला विसावा दिला. तेथें घोड्यांचीं

तत्र स्नात्वा च पीत्वा च प्रायादादाय चोदकम् ७
राजपुत्रो महारण्यमनभीक्ष्णोपसेवितम् ।
भद्रो भद्रेण यानेन मारुतः खमिवात्यगात् ८
भागीरथीं दुष्प्रतरां सोंऽशुधाने महानदीम् ।
उपायाद्राघवस्तूर्णं प्राग्वटे विश्रुते पुरे ९
स गङ्गां प्राग्वटे तीर्त्वा समायात्कुटिकोष्ठिकाम् ।
सबलस्तां स तीर्त्वाथ समगाद्धर्मवर्धनम् १०
तोरणं दक्षिणार्धेन जम्बूप्रस्थं समागमत् ।
वरूथं च ययौ रम्यं ग्रामं दशरथात्मजः ११
तत्र रम्ये वने वासं कृत्वासौ प्राङ्मुखो ययौ ।
उद्यानमुज्जिहानायाः प्रियका यत्र पादपाः १२
स तांस्तु प्रियकान्प्राप्य शीघ्रानास्थाय वाजिनः ।
अनुज्ञाप्याथ भरतो वाहिनीं त्वरितो ययौ १३

शरीरें पाण्यानें गार करून त्या श्रमलेल्या घोड्यांना त्यानें विसावा दिला आणि तेथें स्नान व खाणेंपिणें करून व तीर्थ म्हणून यमुनेचें पाणी बरोबर घेऊन तो पुढें जावयास निघाला. त्यानंतर वायु ज्याप्रमाणें आकाशाला ओलांडून जातो, त्याप्रमाणें उत्तम रथामध्यें बसलेला तो कल्याणसंपन्न राजकुमार भरत ज्यामध्यें मनुष्यांचा फारसा संचार नाहीं, अशा त्या अरण्यांतून अति त्वरेनें पार निघून गेला. अंशुधान गांवापाशीं महानदी गंगा उतरून जाणें फार कठीण आहे, असें समजून आल्यावर तो प्राग्वट म्हणून प्रसिद्ध असलेल्या नगराकडे लवकरच चालता झाला. प्राग्वट नगराजवळ गंगा उतरून तो कुटिकोष्ठिका नदीच्या तीरावर आला आणि सैन्यासह ती नदी उतरून गेल्यावर तो भरत धर्मवर्धन गांवाकडे चालता झाला. ( ६–१० )

तेथून तोरण नामक गांवाच्या दक्षिण बाजूला असलेल्या जंबुप्रस्थ नामक गांवाला गेला आणि तेथूनही तो दशरथपुत्र भरत वरूथ नामक रम्य गांवाकडे चालता झाला. तेथें रम्य वनामध्यें वास्तव्य केल्यावर तो भरत पूर्वेकडे वळून प्रियक नांवाचे वृक्ष ज्या ठिकाणीं आहेत, अशा उज्जिहाना नामक नगरीच्या

वासं कृत्वा सर्वतीर्थे तीर्त्वा चोत्तरगां नदीम् ।
अन्या नदीश्च विविधैः पार्वतीयैस्तुरङ्गमैः १४
हस्तिपृष्ठकमासाद्य कुटिकामप्यवर्तत १५
ततार च नरव्याघ्रो लोहित्ये च कपीवतीम् ।
एकसाले स्थाणुमतीं विनते गोमतीं नदीम् १६
कलिङ्गनगरे चापि प्राप्य सालवनं तदा ।
भरतः क्षिप्रमागच्छत्सुपरिश्रान्तवाहनः १७
वनं च समतीत्याशु शर्वर्यामरुणोदये ।
अयोध्यां मनुना राज्ञा निर्मितां स ददर्श ह १८
तां पुरीं पुरुषव्याघ्रः सप्तरात्रोषितः पथि ।
अयोध्यामग्रतो दृष्ट्वा सारथिं चेदमब्रवीत् १९
एषा नातिप्रतीता मे पुण्योद्याना यशस्विनी ।
अयोध्या दृश्यते दूरात्सारथे पाण्डुमृत्तिका २०

बागेंत येऊन पोंचला. प्रियक वृक्षाजवळ आल्यावर वेगशाली घोडे भरतानें आपल्या रथाला लाविले आणि उज्जिहाना नामकनगरीपासून आपला मुलूख जवळ असल्या कारणानें व भय बाळगण्याचें कारण नसल्यामुळें, तुम्ही मागून सावकास या, अशी सैन्याला आज्ञा देऊन तो भरत घाईनें पुढें येण्यास निघाला. सर्वतीर्थ-ग्रामामध्यें वास्तव्य करून येथील उत्तरगामिनी नदी आणि इतरही नद्या नाना-प्रकारच्या डोंगरी घोड्यांच्या सहाय्यानें उतरून गेला. पुढें हस्तिपृष्ठक गांवाला आल्यानंतर कुटिका नदीही तो ओलांडून गेला. (११-१५)

नंतर लोहित्य गांवापाशीं कपीवती, एकसाल गांवापाशीं स्थानुमती आणि विनत गांवापाशीं गोमतीनदी अशा नद्या उतरून तो पुरुषश्रेष्ठ भरत पुढें येण्यास निघाला. त्यानंतर कलिंग नगरामध्यें सालवनापाशीं आल्यावर भरत वेगानें अयोध्येकडे आला असतां त्याचे घोडे अतिशय थकून गेले. तथापि तें वन रातोरातच सत्वर ओलांडल्यावर अरुणोदयाच्या वेळीं मनु राजानें, वसविलेली अयोध्यानगरी त्याला दिसली. सात रात्री प्रवास करणारा तो पुरुषश्रेष्ठ भरत पुढें असलेल्या त्या अयोध्यानगरीकडे पाहून सारथ्याला म्हणाला. (१६-१९)

यज्वभिर्गुणसंपन्नैर्ब्राह्मणैर्वेदपारगैः ।
भूयिष्ठमृद्धैराकीर्णा राजर्षिवरपालिता २१
अयोध्यायां पुरा शब्दः श्रूयते तुमुलो महान् ।
समंतान्नरनारीणां तमद्य न शृणोम्यहम् २२
उद्यानानि हि सायाह्ने क्रीडित्वोपरतैर्नरैः ।
समंताद्विप्रधावद्भिः प्रकाशन्ते ममान्यथा २३
तान्यद्यानुरुदन्तीव परित्यक्तानि कामिभिः ।
अरण्यभूतेव पुरी सारथे प्रतिभाति माम् २४
नह्यत्र यानैर्दृश्यन्ते न गजैर्न च वाजिभिः ।
निर्यान्तो वाभियान्तो वा नरमुख्या यथा पुरा २५
उद्यानानि पुरा भान्ति मत्तप्रमुदितानि च ।
जनानां रतिसंयोगेष्वत्यन्तगुणवन्ति च २६
तान्येतान्यद्य पश्यामि निरानन्दानि सर्वशः ।

"सारथे ! चांगल्या चांगल्या बागांनीं युक्त असलेली ही यशस्विनी अयोध्या मला आनंदित दिसत नाहीं. यथाविधि यज्ञयाग केलेल्या गुणसंपन्न वेदपारंगत समृद्ध ब्राह्मणांनीं जरी ही पुष्कळ अंशीं व्याप्त झालेली आहे आणि राजर्षिश्रेष्ठांनीं जरी हिचें रक्षण केलें आहे, तरी दुरून ती मला पांढऱ्या मृत्तिकेच्या ढिगाप्रमाणें निःसत्त्व दिसत आहे. अयोध्येमध्यें असलेल्या स्त्रीपुरुषांची पूर्वीं मोठी प्रचंड गडबड सभोंवतीं ऐकूं येत असे, ती आज ऐकूं येत नाहीं. सायंकाळीं आंत प्रवेश करून व रात्रीं तेथें क्रीडा करून विसांवा घेतलेले पुरुष सकाळीं घराकडे लगबगीनें जाऊं लागले असतां ज्यांच्या योगानें ज्या बागा पूर्वीं सुशोभित दिसत असत, त्या आज विषयी पुरुषांनीं त्याग केलेल्या व मला पाहून रडत असल्यासारख्या दिसत आहेत आणि मला विपरीतच भासत आहेत. हे सारथे ! ही नगरीही मला अरण्यरूप झाल्यासारखी भासत आहे. रथ, हत्ती अथवा घोडे यांवर बसून आंत जाणारे अथवा बाहेर येणारे मोठे मोठे लोक पूर्वींप्रमाणें यांत येतां जातांना दिसत नाहींत. ( २०-२५ )

त्रस्तपर्णैरनुपथं विक्रोशद्भिरिव द्रुमैः २७
नाद्यापि श्रूयते शब्दो मत्तानां मृगपक्षिणाम् ।
सरक्तां मधुरां वाणीं कलं व्याहरतां बहु २८
चन्दनागुरुसंपृक्तधूपसंमूर्छितोऽमलः ।
प्रवाति पवनः श्रीमान्कि नु नाद्य यथा पुरा २९
भेरीमृदङ्गवीणानां कोणसंघट्टितः पुनः ।
किमद्य शब्दो विरतः सदादीनगतिः पुरा ३०
अनिष्टानि च पापानि पश्यामि विविधानि च ।
निमित्तान्यमनोज्ञानि तेन सीदति मे मनः ३१
सर्वथा कुशलं सूत दुर्लभं मम बन्धुषु ।
तथा ह्यसति संमोहे हृदयं सीदतीव मे ३२
विषण्णः श्रान्तहृदयस्त्रस्तः संलुलितेन्द्रियः ।

"लोकांच्या रतिक्रीडा चालण्यास अत्यंत अनुकूल अशा ज्या बागा पूर्वी उल्हसित भासत असत, त्या आतां सर्व प्रकारें मला आनंदरहित दिसत आहेत. इतकेंच नव्हे, परंतु त्या बागांच्या रस्त्याजवळील असलेले वृक्षही पानें गळून पडल्यामुळें आक्रोश करीत असल्यासारखे दिसत आहेत. अतिशय अस्पष्ट आवाजांत प्रेमभरानें मधुर शब्द करणाऱ्या मत्त पशुपक्ष्यांचा ध्वनि अद्यापि सूर्योदय झाला असतांही व आम्ही अगदीं जवळ आलों असतांही ऐकूं येत नाहीं. चंदन आणि अगुरु व धूप यांच्या योगानें सुवासिक झालेला, निर्मल आणि टवटवी आणणारा असा वारा पूर्वीप्रमाणें आज कां बरें वहात नाहीं ? नगारे, मृदंग आणि वीणा यांचा टिपरें इत्यादि मारून निघालेला ध्वनि पूर्वी कधींही बंद न पडल्यामुळें एकसारखा ऐकूं येत असे, तो आज कां बरें बंद झाला आहे ? अनिष्टसूचक असे नाना प्रकारचे अपशकुन मला होत असून डावा डोळा लवणें इत्यादि अशुभसूचक चिन्हेंही होत आहेत व यांमुळें माझें मन खिन्न होत आहे. सूता ! माझ्या माणसांचें सर्व प्रकारें कुशल असणें मला अशक्य वाटत आहे. असें जर न म्हणावें तर कांहीं एक कारण नसतांना माझ्या मनाला असा कां बरें खेद वाटावा ? " ( २६-३२ )

भरतः प्रविवेशाशु पुरीमिक्ष्वाकुपालिताम् ३३
द्वारेण वैजयन्तेन प्राविशच्छ्रान्तवाहनः ।
द्वाःस्थैरुत्थाय विजयं पृष्टस्तैः सहितो ययौ ३४
स त्वनेकाग्रहृदयो द्वास्थं प्रत्यर्च्य तं जनम् ।
सूतमश्वपतेः क्लान्तमब्रवीत्तत्र राघवः ३५
किमहं त्वरयानीतः कारणेन विनानघ ।
अशुभाशङ्कि हृदयं शीलं च पततीव मे ३६
श्रुता नु यादृशाः पूर्वं नृपतीनां विनाशने ।
आकारांस्तानहं सर्वानिह पश्यामि सारथे ३७
संमार्जनविहीनानि परुषाण्युपलक्षये ।
असंयतकवाटानि श्रीविहीनानि सर्वशः ३८
बलिकर्मविहीनानि धूपसंमोदनेन च ।
अनाशितकुटुम्बानि प्रभाहीनजनानि च ३९

---

याप्रमाणें सारथ्याशीं बोलत असतां दीन, खिन्न, त्रस्त आणि अंतःकरणांत क्षुब्ध झालेल्या भरतानें इक्ष्वाकुवंशजांनीं रक्षण केलेल्या त्या अयोध्या नगरीमध्यें प्रवेश केला. अश्व थकून गेले आहेत, अशा स्थितींतच तो भरत वैजयंत नामक वेशीनें नगरीमध्यें प्रवेश करूं लागला असतां वेशींतील द्वारपालांनीं जयजयकार केल्यावर तो त्यांच्याबरोबर नगरीमध्यें गेला. त्यानंतर मनांत अस्वस्थ झालेला तो रघुवंशज भरत त्या द्वारपालांना संमानपूर्वक परत पाठवून अश्वपति केकयराजाच्या दमलेल्या सारथ्याला म्हणाला. ( ३३-३५ )

"हे निष्पापा ! कारणाशिवाय मला येथें घाईनें कां बरें आणलेंस ? माझ्या मनाला अशुभाची शंका येत असून माझें धैर्य ही गळत चाललें आहे. कारण हे सारथे ! राजांचा नाश झाला असतां जे प्रकार होत असल्याचें मी पूर्वी ऐकलें आहे, ते सर्व मला दिसत आहेत. सडासंमार्जन नसल्यामुळें कुटुंबी लोकांचीं घरें भयाण दिसत आहेत, त्यांचीं दारें अस्ताव्यस्त उघडींच पडलीं आहेत व कसल्याही प्रकारची शोभा त्यांना राहिलेली नाहीं. या घरांतून कोठें पूजा अर्चा चाललेली दिसत नाहीं; धूपांचा सुगंधही यांतून येत नाहीं, आंतील

अलक्ष्मीकानि पश्यामि कुटुम्बिभवनान्यहम् ।
अपेतमाल्यशोभानि असंमृष्टाजिराणि च ४०
देवागाराणि शून्यानि न भान्तीह यथा पुरा ।
देवतार्चाः प्रविद्धाश्च यज्ञगोष्ठास्तथैव च ४१
माल्यापणेषु राजन्ते नाद्य पण्यानि वा तथा ।
दृश्यन्ते वणिजोऽप्यद्य न यथापूर्वमत्र वै ४२
ध्यानसंविग्नहृदया नष्टव्यापारयन्त्रिताः ।
देवायतनचैत्येषु दीनाः पक्षिमृगास्तथा ४३
मलिनं चाश्रुपूर्णाक्षं दीनं ध्यानपरं कृशम् ।
सस्त्रीपुंसं च पश्यामि जनमुत्कण्ठितं पुरे ४४
इत्येवमुक्त्वा भरतः सूतं तं दीनमानसः ।
तान्यनिष्टान्ययोध्यायां प्रेक्ष्य राजगृहं ययौ ४५

कुटुंबेंही जेवल्यासारखीं दिसत नसून निस्तेज दिसत आहेत आणि म्हणूनच हीं कुटुंबी लोकांचीं घरें मला शोभा नष्ट झाल्यासारखीं वाटत आहेत. त्याचप्रमाणें पुष्पांचीही शोभा नाहींशी झाली असून आंतील पटांगणेंही झाडलीं नसल्यामुळें हीं शून्य देवालयें पूर्वीप्रमाणें शोभायमान मला येथें दिसत नाहींत. देवतांच्या पूजा बंद झाल्यासारख्या दिसत आहेत आणि यज्ञशालाही यज्ञकर्मांनीं विरहित दिसत आहेत. ( ३६–४१ )

" फुलांच्या बाजारामध्यें फुलांच्या वस्तु मांडलेल्या आज दिसत नाहींत आणि व्यापारी लोकही पूर्वींप्रमाणें आज येथें आढळत नाहींत. खरेदी, विक्री वगैरे व्यापार बंद पडल्यामुळें लोकांनीं आपआपलीं दुकानें लावलेलीं आहेत आणि मनामध्यें चिंताक्रांत होऊन दीन झालेले हे लोक देवालयांतून व पारावरून दृष्टीस पडत आहेत आणि नगरींतील पशुपक्षीही दीन झालेले दिसत आहेत. सारांश, स्त्रीपुरुषांसह नगरांतील लोक मलिन, अश्रुपूर्ण नेत्रांनीं युक्त, दीन, चिंताक्रांत व कृश दिसत असून स्त्रीपुरुषांसह सर्वही प्रजाजनांना हुरहुर लागल्यासारखी दिसत आहे. " ( ४२–४४ )

याप्रमाणें मनामध्यें खिन्न झालेला तो भरत त्या सारथ्याला सांगून आणि

तां शून्यशृङ्गाटकवेश्मरथ्यां रजोरुणद्वारकवाटयन्त्राम् ।
दृष्ट्वा पुरीमिन्द्रपुरीप्रकाशां दुःखेन संपूर्णतरो बभूव ४६
बभूव पश्यन्मनसोऽप्रियाणि यान्यन्यदा नास्य पुरे बभूवुः ।
अवाक्शिरा दीनमना न हृष्टः पितुर्महात्मा प्रविवेश वेश्म ४७

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकसप्ततितमः सर्गः ॥७१॥ [२७९१]

द्विसप्ततितमः सर्गः ।

अपश्यंस्तु ततस्तत्र पितरं पितुरालये ।
जगाम भरतो द्रष्टुं मातरं मातुरालये १
अनुप्राप्तं तु तं दृष्ट्वा कैकेयी प्रोषितं सुतम् ।
उत्पपात तदा हृष्टा त्यक्त्वा सौवर्णमासनम् २
स प्रविश्यैव धर्मात्मा स्वगृहं श्रीविवर्जितम् ।
भरतः प्रेक्ष्य जग्राह जनन्याश्चरणौ शुभौ ३

अयोध्येमध्यें तीं अनिष्टसूचक चिन्हें पाहून राजवाड्याकडे गेला. सारांश, इंद्राच्या अमरावतीनगरीप्रमाणें असलेल्या त्या आपल्या अयोध्यानगरींतील चौक, घरें आणि मार्ग अगदीं सामसूम झाले आहेत आणि आंतील दरवाजेही मळानें घाणेरडे होऊन गेले आहेत, असें पाहिल्यावर त्या भरताला दुःखाचें अतिशयच भरतें आलें. पूर्वीं आपल्या नगरामध्यें कधींही दृष्टोत्पत्तीस न आलेले असे व मनाला प्रिय नसलेले प्रकार पाहणाऱ्या त्या भरतानें आपली मान खालीं घातली आणि मनामध्यें खिन्न झालेल्या त्या हर्षरहित माहात्म्या भरतानें आपल्या पित्याच्या गृहामध्यें प्रवेश केला. (४५-४७)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग संपला. ॥ ७१ ॥

पित्याच्या महालांत गेल्यावर तेथें पिता दृष्टीस पडत नाहीं, असें पाहून भरत मातेचें दर्शन घेण्याकरितां मातेच्या वाड्यांत गेला. तेव्हां परगांवीं गेलेला तो आपला पुत्र परत आलेला पाहतांच कैकयी आनंदित झाली आणि सुवर्णाच्या पलंगावरून उठून तिनें त्याच्याकडे धांव घेतली. आंत जातांच शोभारहित झालेलें मातृगृह पाहून त्या धर्मात्म्या भरतानें आपल्या मातेचे पवित्र

तं मूर्ध्नि समुपाघ्राय परिष्वज्य यशस्विनम् ।
अङ्के भरतमारोप्य प्रष्टुं समुपचक्रमे 4
अद्य ते कतिचिद्रात्र्यश्च्युतस्यार्यकवेश्मनः ।
अपि नाध्वश्रमः शीघ्रं रथेनापततस्तव 5
आर्यकस्ते सुकुशली युधाजिन्मातुलस्तव ।
प्रवासाच्च सुखं पुत्र सर्वं मे वक्तुमर्हसि 6
एवं पृष्टस्तु कैकेय्या प्रियं पार्थिवनन्दनः ।
आचष्ट भरतः सर्वं मात्रे राजीवलोचनः । 7
अद्य मे सप्तमी रात्रिश्च्युतस्यार्यकवेश्मनः ।
अम्बायाः कुशली तातो युधाजिन्मातुलश्च मे 8
यन्मे धनं च रत्नं च ददौ राजा परन्तपः ।
परिश्रान्तं पथ्यभवत्ततोऽहं पूर्वमागतः 9
राजवाक्यहरैर्दूतैस्त्वर्यमाणोऽहमागतः ।
यदहं प्रष्टुमिच्छामि तदम्बा वक्तुमर्हति 10

चरण धरले. तेव्हां त्याचें मस्तक हुंगून कैकेयीनें त्या यशस्वी भरताला आलिंगन दिलें आणि त्याला मांडीवर बसवून ती त्याला विचारूं लागली. (१–४)

" आजोबांच्या घरून निघून आज तुला किती दिवस झाले ? रथांत बसून वेगानें व तांतडीनें आल्यामुळें तुला प्रवासाचे श्रम झाले नाहींत ना ? तुझे आजोबा व मामा युधाजित् हे चांगले कुशल आहेत नां ? मुला ! येथून तूं प्रवासाला गेल्यापासून आजोळीं तुला सुख झालें किंवा नाहीं, हें सर्व तूं मला सांग. " ( ५–६ )

याप्रमाणें कैकेयीनें विचारलें असतां त्या कमलासारखे नेत्र असलेल्या राजकुमार भरतानें आपल्या मातेला सर्व कांहीं प्रिय वृत्तांत सांगितला. तो म्हणाला, " आजोबांच्या घरून मी निघाल्याला आज सातवा दिवस. माझे आजोबा, मामा युधाजित् हे खुशाल आहेत. शत्रूला ताप देणाऱ्या केकयराजानें जें धन व रत्नें मला दिलीं होतीं, तीं वाहून आणणारीं वाहनें मार्गांत थकून गेलीं आणि म्हणून मी पुढें निघून आलों. राजाचा निरोप घेऊन येणाऱ्या दूतांनीं घाई केल्यामुळें मी

शून्योऽयं शयनीयस्ते पर्यङ्को हेमभूषितः ।
न चायमिक्ष्वाकुजनः प्रहृष्टः प्रतिभाति मे ११
राजा भवति भूयिष्ठमिहाम्बाया निवेशने ।
तमहं नाद्य पश्यामि द्रष्टुमिच्छन्निहागतः १२
पितुर्ग्रहिष्ये पादौ च तं ममाख्याहि पृच्छतः ।
आहोस्विदम्बा ज्येष्ठायाः कौसल्याया निवेशने १३
तं प्रत्युवाच कैकेयी प्रियवद्घोरमप्रियम् ।
अजानन्तं प्रजानन्ती राज्यलोभेन मोहिता १४
या गतिः सर्वभूतानां तां गतिं ते पिता गतः ।
राजा महात्मा तेजस्वी यायजूकः सतां गतिः १५
तच्छ्रुत्वा भरतो वाक्यं धर्माभिजनवाञ्छुचिः ।
पपात सहसा भूमौ पितृशोकबलार्दितः १६
हा हतोऽस्मीति कृपणं दीनां वाचमुदीरयन् ।

---

आधीं आलों आहे. तेव्हां मला जें विचारावेंसें वाटतें तें तूं मांगावेंस. (७-१०)

"हा तुझा रोज झोंपण्याचा सुवर्णभूषित पलंग आज शून्य दिसत आहे आणि इक्ष्वाकुकुलांतील हे लोकही आज मला आनंदित दिसत नाहींत. येथें माझ्या आईच्या अन्तःपुरामध्येंच बहुतेक राजा असावयाचा; परंतु आज त्याचें दर्शन घेण्याकरितां मी येथें आलों असतां तो कोठें माझ्या दृष्टीस पडत नाहीं. मला आधीं वडिलांच्या पायांवर मस्तक ठेवावयाचें आहे, तेव्हां ते कोठें आहेत, हें मी विचारीत आहें, तें मला सांग. ज्येष्ठ माता कौसल्येच्या अन्तःपुरांत ते आहेत काय?" याप्रमाणें त्यानें विचारलें असतां राज्यलोभानें मोहित झालेली व सर्व कांहीं जाणीत असलेली ती कैकेयी पूर्वी घडलेली हकीकत ज्याला कांहींच माहीत नाहीं, त्या भरताला भयंकर आणि अप्रिय असलेलीही ती हकीकत प्रिय असल्याप्रमाणें सांगूं लागली. ती म्हणाली, "सर्व प्राण्यांची जी गति होत असते, ती तेजस्वी यज्ञशील व महात्म्या अशा त्या राजाची, तुझ्या पित्याची झाली आहे." (११-१५)

तें मातेचें भाषण ऐकतांच आचरणानें पवित्र व धर्मनिष्ठ वंशांत उत्पन्न झालेला तो भरत पितृशोकाच्या वेगानें धक्का बसल्यासारखा होऊन एकाएकीं भूमीवर

निपपात महाबाहुर्बाहू विक्षिप्य वीर्यवान् १७
ततः शोकेन संवीतः पितुर्मरणदुःखितः ।
विललाप महातेजा भ्रान्ताकुलितचेतनः १८
एतत्सुरुचिरं भाति पितुर्मे शयनं पुरा ।
शशिनेवामलं रात्रौ गगनं तोयदात्यये १९
तदिदं न विभात्यद्य विहीनं तेन धीमता ।
व्योमेव शशिना हीनमप्शुष्क इव सागरः २०
बाष्पमुत्सृज्य कण्ठेन स्वात्मना परिपीडितः ।
प्रच्छाद्य वदनं श्रीमद्वस्त्रेण जयतां वरः २१
तमार्तं देवसंकाशं समीक्ष्य पतितं भुवि ।
निकृत्तमिव सालस्य स्कन्धं परशुना वने २२
माता मातङ्गसंकाशं चन्द्रार्कसदृशं सुतम् ।
उत्थापयित्वा शोकार्तं वचनं चेदमब्रवीत् २३
उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे राजपुत्र महायशः ।

---

पडला. "हाय हाय ! माझा घात झाला !" असे करुणा उत्पन्न करणारे शोकपूर्ण शब्द उच्चारीत उच्चारीत तो महापराक्रमी वीर्यवान् भरत हात आपटून भूमीवर पडला असतां, बापाच्या मरणानें दुःखित होऊन शोकाकुल झाल्यामुळें त्याचें मन अनवस्थित व व्याकुल झालें व तो महातेजस्वी भरत अशा प्रकारें विलाप करूं लागला- "मेघ निघून गेल्यावर चंद्राच्या योगानें रात्रीं शोभणाऱ्या निर्मल आकाशाप्रमाणें जी ही माझ्या पित्याची शय्या अत्यंत मनोहर दिसत असे, ती आज त्यानें रहित झाल्यामुळें चंद्ररहित आकाशाप्रमाणें अथवा शुष्क सागराप्रमाणें निस्तेज दिसत आहे." (१६-२०)

मनामध्यें अतिशय दुःखित झालेला तो विजयी श्रेष्ठ भरत वस्त्रानें आपलें सुंदर मुख झांकून घेऊन आणि शोकानें अश्रु ढाळीत याप्रमाणें विलाप करूं लागला. तेव्हां कुऱ्हाडीनें तुटून जाऊन वनामध्यें पडलेल्या शाल वृक्षाच्या खोडाप्रमाणें दुःखाकुल होऊन जमिनीवर पडलेल्या भरताला पाहून कैकेयीनें, गतीनें गजासारखा आणि तेजानें चंद्रसूर्यासमान असलेल्या आपल्या पुत्राला जमिनीवरून उठविलें

त्वद्विधा नहि शोचन्ति सन्तः सदसि संमताः   २४
दानयज्ञाधिकारा हि शीलश्रुतितपोऽनुगा ।
बुद्धिस्ते बुद्धिसंपन्न प्रभेवार्कस्य मन्दिरे   २५
स रुदित्वा चिरं कालं भूमौ परिविवृत्य च ।
जननीं प्रत्युवाचेदं शोकैर्बहुभिरावृतः   २६
अभिषेक्ष्यति रामं तु राजा यज्ञं नु यक्ष्यते ।
इत्यहं कृतसंकल्पो हृष्टो यात्रामयासिषम्   २७
तदिदं ह्यन्यथा भूतं व्यवदीर्णं मनो मम ।
पितरं यो न पश्यामि नित्यं प्रियहिते रतम्   २८
अम्ब केनात्यगाद्राजा व्याधिना मय्यनागते ।
धन्या रामादयः सर्वे यैः पिता संस्कृतः स्वयम्   २९
न नूनं मां महाराजः प्राप्तं जानाति किर्तिमान् ।
उपाजिघ्रेत्तु मां मूर्ध्नि तातः सन्नाम्य सत्वरम्   ३०

---

आणि ती कैकेयी शोकाकुल झालेल्या त्या भरताला म्हणाली, " हे महाकीर्तिमान् राजा ! ऊठ, ऊठ; असा येथें कां पडलास ? अरे, सभेमध्यें प्रसिद्ध असलेले तुझ्यारखे सज्जन शोक करीत नसतात. हे बुद्धिमान् मुला ! दान व यज्ञ यांतच रममाण झालेली तुझी बुद्धि ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा सूर्यमंडलाला अनुसरून असते, त्याप्रमाणें सद्वर्तन, विद्या व तप यांना अनुसरून आहे. " ( २१-२५ )

याप्रमाणें कैकयीनें सांगितलें असतांही अनेक प्रकारें शोकांनीं व्याकुल झालेला तो भरत पुष्कळ वेळपर्यंत रडून आणि भूमीवर लोळतच आपल्या आईला म्हणाला, " दूत जेव्हां मला येथें घाईनें आणूं लागले, तेव्हां राजा रामाला राज्याभिषेक तरी करीत असला पाहिजे किंवा यज्ञ तरी करीत असला पाहिजे, असा माझ्या मनांत विचार आला आणि आनंदित होऊन येथें निघून आलों. परंतु तें हें सर्वच विपरीत झाल्यामुळें माझी छाती फाटून गेली आहे. कारण नेहमीं प्रिय आणि हित करण्याविषयीं रत असलेले माझे वडील आज माझ्या दृष्टीस पडत नाहींत. आई ! मी येथें नसतांना कोणत्या रोगानें राजाचा अंत झाला बरें ? ज्यांनीं आपल्या पित्याचा स्वतःसंस्कार केला, ते राम आदिकरून धन्य होत. त्या कीर्तिमान्

क स पाणिः सुखस्पर्शस्तातस्याक्लिष्टकर्मणः ।
यो हि मां रजसा ध्वस्तमभीक्ष्णं परिमार्जति ३१
यो मे भ्राता पिता बन्धुर्यस्य दासोऽस्मि संमतः ।
तस्य मां शीघ्रमाख्याहि रामस्याक्लिष्टकर्मणः ३२
पिता हि भवति ज्येष्ठो धर्ममार्यस्य जानतः ।
तस्य पादौ ग्रहीष्यामि स हीदानीं गतिर्मम ३३
धर्मविद्धर्मशीलश्च महाभागो दृढव्रतः ।
आर्ये किमब्रवीद्राजा पिता मे सत्यविक्रमः ३४
पश्चिमं साधुसंदेशमिच्छामि श्रोतुमात्मनः ।
इति पृष्टा यथा तत्त्वं कैकयी वाक्यमब्रवीत् ३५
रामेति राजा विलपन्हा सीते लक्ष्मणेति च ।
स महात्मा परं लोकं गतो मतिमतां वरः ३६
इतीमां पश्चिमां वाचं व्याजहार पिता तव ।

---

महाराजाची आज खरोखर वार्ताच नाहीं. नाहींतर माझें मस्तक लववून पित्यानें सत्वर माझ्या मस्तकाचें अवघ्राण केलें असतें. ( २६-३० )

"धुळीनें माझें अंग भरून गेलें असतां वेळोवेळीं ती झाडून टाकणारा व स्पर्श झाला असतां सुखदायक वाटणारा तो सरळ स्वभावाच्या माझ्या पित्याचा हात कोठें आहे? जो माझा भाऊ, पिता व बंधु असून ज्याचा मी दास आहे, असें मला वाटतें, त्या सरळ स्वभावाच्या रामाला मी आल्याचा निरोप सांग. कारण धर्मवेत्त्या सभ्य पुरुषाचा ज्येष्ठ भ्राता हाच पिता होय. तेव्हां मी त्याचे पाय धरीन. आतां तोच माझा आधार आहे. हे श्रेष्ठ माते ! धर्मशील, महाभाग्यवान् स्वीकारलेलें व्रत निश्चयपणें चालविणारा आणि अमोघ पराक्रमी असा माझा पिता काय म्हणाला ? माझ्यासंबंधानें जो कांहीं त्यानें चांगला निरोप सांगितला असेल, तो ऐकण्याची माझी इच्छा आहे." ( ३१-३५ )

याप्रमाणें भरतानें विचारलें असतां कैकेयी त्याला खरें खरें सांगूं लागली- " हे रामा ! हे सीते ! अरे लक्ष्मणा ! असा विलाप करीत करीत बुद्धिमानांत श्रेष्ठ असलेला तो महात्मा राजा परलोकीं गेला. पाशांनीं जखडलेल्या मोठ्या

कालधर्मं परिक्षिप्तः पाशैरिव महागजः ३७
सिद्धार्थास्तु नरा राममागतं सह सीतया ।
लक्ष्मणं च महाबाहुं द्रक्ष्यन्ति पुनरागतम् ३८
तच्छ्रुत्वा विषसादैवं द्वितीयाप्रियशंसनात् ।
विषण्णवदनो भूत्वा भूयः पप्रच्छ मातरम् ३९
क्व चेदानीं स धर्मात्मा कौसल्यानन्दवर्धनः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया च समागतः ४०
तथा पृष्टा यथान्यायमाख्यातुमुपचक्रमे ।
मातास्य युगपद्वाक्यं विप्रियं प्रियशंसया ४१
स हि राजसुतः पुत्रचीरवासा महावनम् ।
दण्डकान्सह वैदेह्या लक्ष्मणानुचरो गतः ४२
तच्छ्रुत्वा भरतस्त्रस्तो भ्रातुश्चारित्रशङ्कया
स्वयं वंशस्य माहात्म्यात्प्रष्टुं समुपचक्रमे ४३
कच्चिन्न ब्राह्मणधनं हृतं रामेण कस्यचित् ।
कच्चिन्नाढ्यो दरिद्रो वा तेनापापो विहिंसितः ४४

---

वृत्तीप्रमाण ग्रस्त झालेल्या तुझ्या पित्यानें -सीतेसह परत आलेल्या रामाला आणि महापराक्रमी लक्ष्मणाला जे पुरुष पाहतील ते धन्य होत–असेंही शेवटीं म्हटलें. कैकेयीचें भाषण ऐकून दुसरी अप्रिय गोष्ट तिनें सांगितल्यामुळें तो आणखीहि जास्तच खिन्न झाला आणि दीनवदन होऊन पुनः मातेला म्हणाला, " कौसल्येचा आनंद वाढविणारा तो धर्मात्मा, भाऊ लक्ष्मण आणि सीता यांच्या बरोबर सध्यां कोठें गेला आहे ! " ( ३५-४० )

असें भरतानें विचारलें असतां त्याची आई आपण सांगणार ही गोष्ट भरताला फार आवडेल या उद्देशानें, दुसरें एक अप्रिय वृत्त त्याला यथायोग्य रीतीनें एकदम सांगूं लागली. " हे पुत्रा ! राजकुमार राम लक्ष्मणासह सीतेला बरोबर घेऊन आणि वल्कलें परिधान करून दंडक नांवाच्या महारण्यामध्यें गेला. " हें ऐकून भावाच्या वर्तनाविषयीं शंका आल्यानें भरत भिऊन गेला आणि आपल्या वंशाचा मोठेपणा मनांत आणून तिला विचारूं लागला. " रामानें कोणा एखाद्या

कच्चिन्न परदारान्वा राजपुत्रोऽभिमन्यते ।
कस्मात्स दण्डकारण्ये भ्राता रामो विवासितः ४५
अथास्य चपला माता तत्स्वकर्म यथातथम् ।
तेनैव स्त्रीस्वभावेन व्याहर्तुमुपचक्रमे ४६
एवमुक्ता तु कैकेयी भरतेन महात्मना ।
उवाच वचनं हृष्टा वृथापण्डितमानिनी ४७
न ब्राह्मणधनं किंचिद्धृतं रामेण कस्यचित् ।
कश्चिन्नाढ्यो दरिद्रो वा तेनापापो विहिंसितः ।
न रामः परदारान्स चक्षुर्भ्यामपि पश्यति ४८
मया तु पुत्र श्रुत्वैव रामस्येहाभिषेचनम् ।
याचितस्ते पिता राज्यं रामस्य च विवासनम् ४९
स स्ववृत्तिं समास्थाय पिता ते तत्तथाकरोत् ।
रामस्तु सहसौमित्रिः प्रोषितः सह सीतया ५०

---

ब्राह्मणाचें धन तर हरण केलें नाहीं ना ? अथवा एखाद्या निरुपद्रवी धनाढ्याचा किंवा गरिबाचा त्यानें प्राण तर घेतला नाहीं ना ? किंवा एखाद्या परस्त्रीवर तर डोळा ठेवला नाहीं ना ? त्या माझ्या भावाला रामाला दंडकारण्यामध्यें कशाकरितां हांकून दिलें आहे ? " ( ४१-४५ )

असें भरतानें विचारल्यानंतर स्त्रीस्वभावामुळें उतावीळ झालेली त्याची आई स्वतःचें तें कर्म त्याला इत्थंभूत सांगूं लागली. याप्रमाणें महात्म्या भरतानें प्रश्न केला असतां स्वतःला विनाकारण शहाणी समजत असलेली कैकेयी आनंदित होऊन त्याला म्हणाली. " रामानें कोणत्याही ब्राह्मणाच्या धनाचा अपहार केला नाहीं. त्यानें निरपराधी अशा धनाढ्य पुरुषाचा अथवा दरिद्र्याचा प्राणही घेतला नाहीं. आणि परस्त्रीकडे तर राम कधीं नेत्रांनीं पहात देखील नाहीं. परंतु मुला ! रामाला येथें अभिषेक होणार हें ऐकतांक्षणीं तुला राज्य आणि रामाला वनवास हे दोन वर मी तुझ्या पित्यापासून मागून घेतले व दिलेलें वचन खरें करणें या आपल्या नीतीचा अवलंब करून तुझ्या पित्यानें तसें केलें आणि लक्ष्मण व सीता यांसह राम अरण्यांत निघून गेला. ( ४६-५० )

तमपश्यन्प्रियं पुत्रं महीपालो महायशाः ।
पुत्रशोकपरिद्यूनः पञ्चत्वमुपपेदिवान् ५१
त्वया त्विदानीं धर्मज्ञ राजत्वमवलम्ब्यताम् । ।
त्वत्कृते हि मया सर्वमिदमेवंविधं कृतम् ५२
मा शोकं मा च संतापं धैर्यमाश्रय पुत्रक ।
त्वदधीना हि नगरी राज्यं चैतदनामयम् ५३
तत्पुत्र शीघ्रं विधिना विधिज्ञैर्वसिष्ठमुख्यैः सहितो द्विजेन्द्रैः ।
संकाल्य राजानमदीनसत्त्वमात्मानमुर्व्यामभिषेचयस्व ५४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विसप्ततितमः सर्गः॥७२॥

त्रिसप्ततितमः सर्गः । [२८४५]

श्रुत्वा च स पितुर्वृत्तं भ्रातरौ च विवासितौ ।
भरतो दुःखसंतप्त इदं वचनमब्रवीत् १
किं नु कार्यं हतस्येह मम राज्येन शोचतः ।
विहीनस्याथ पित्रा च भ्रात्रा पितृसमेन च २
दुःखे मे दुःखमकरोर्व्रणे क्षारमिवाददाः ।

"तेव्हां आपला प्रिय पुत्र दृष्टीआड झाल्यामुळें पुत्रशोकानें अगदीं खंगून गेलेला तो महाकीर्तिमान् राजा मृत्यु पावला. आतां,हे धर्मज्ञ भरता! तूं राज्याचा स्वीकार कर. तुझ्याचकरितां मी हा सर्व अशा प्रकारचा खटाटोप केला आहे. आतां शोक व संताप न करतां, हे पुत्रा! धैर्य धर. अयोध्यानगरी आणि हें निष्कंटक राज्य हीं दोन्हीं तुझ्या आधीन आहेत. तर हे पुत्रा! शास्त्रज्ञ अशा वसिष्ठादि द्विजश्रेष्ठांसह तूं महात्म्या राजाचा यथाविधि और्ध्वदेहिक संस्कार कर व आपल्याला पृथ्वीचा राज्याभिषेक करून घे." (५१-५४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणित श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बहात्तरावा सर्ग संपला. ॥७२॥

पित्याचें मरण आणि भावांना वनवासासाठीं घालवून दिल्याचें ऐकून दुःखानें संतप्त झालेला तो भरत कैकेयीला म्हणाला. "पिता आणि पित्यासारखाच भाऊ यांचा वियोग होऊन सर्वस्वी घात झाल्यामुळें शोक करीत असलेल्या मला आतां

राजानं प्रेतभावस्थं कृत्वा रामं च तापसम् ३
कुलस्य त्वमभावाय कालरात्रिरिवागता ।
अङ्गारमुपगुह्य स्म पिता मे नावबुद्धवान् ४
मृत्युमापादितो राजा त्वया मे पापदर्शिनि ।
सुखं परिहृतं मोहात्कुलेऽस्मिन्कुलपांसनि ५
त्वां प्राप्य हि पिता मेऽद्य सत्यसंधो महायशाः ।
तीव्रदुःखाभिसंतप्तो वृत्तो दशरथो नृपः ६
विनाशितो महाराजः पिता मे धर्मवत्सलः ।
कस्मात्प्रव्राजितो रामः कस्मादेव वनं गतः ७
कौसल्या च सुमित्रा च पुत्रशोकाभिपीडिते ।
दुष्करं यदि जीवेतां प्राप्य त्वां जननीं मम ८
नन्वार्योऽपि च धर्मात्मा त्वयि वृत्तिमनुत्तमाम् ।
वर्तते गुरुवृत्तिज्ञो यथा मातरि वर्तते ९
तथा ज्येष्ठा हि मे माता कौसल्या दीर्घदर्शिनी ।

ह्या जगतामध्यें राज्य घेऊन काय करावयाचें आहे? राजाला मारून आणि रामाला तापस बनवून तूं माझ्या दुःखावर डाग देऊन जखमेवर मीठ चोळल्यासारखेंच केलें आहेस. आमच्या कुलाचा घात करण्याकरितां तूं जणूं काय काळरात्रच घरांत आली आहेस आणि तुला आलिंगन दिल्यानें आपण स्वतःला जाळून टाकणाऱ्या अग्नीला कवटाळीत आहोंत, हें माझ्या पित्याला समजलें नाहीं. हे पापिणि! तूं माझ्या राजाला मृत्यु आणलास आणि हे कुलकलंकिनी! तूं माहामुळें या कुलांतील सुखावर धाड आणलीस. ( १-५ )

"माझा सत्यप्रतिज्ञ व महाकीर्तिमान् पिता दशरथराजा तूं गळ्यांत पडल्यामुळें दुःसह दुःखानें संतप्त होऊन मृत्यु पावला. माझ्या धर्मवत्सल माहाराज पित्याचा तूं कां नाश केलास? रामाला तूं कशाकरितां वनामध्यें पाठविलेंस आणि तो तरी कां म्हणून वनामध्यें गेला? माझी आई म्हणवून घेणाऱ्या तुझ्याशीं प्रसंग पडल्यावर पुत्रशोकानें संतप्त झालेल्या कौसल्या व सुमित्रा जर जिवंत राहतील म्हणावें तर तेंही कठीणच दिसतें. खरोखर वडिलांशीं कसें वागावें हें जाणणारा धर्मात्मा श्रेष्ठ राम कौसल्या मातेप्रमाणेंच तुझ्याशींही उत्कृष्ट रीतीनें वागत होता आणि

त्वयि धर्मं समास्थाय भगिन्यामिव वर्तते १०
तस्याः पुत्रं महात्मानं चीरवल्कलवाससम् ।
प्रस्थाप्य वनवासाय कथं पापे न शोचसे ११
अपापदर्शिनं शूरं कृतात्मानं यशस्विनम् ।
प्रवाज्य चीरवसनं किं नु पश्यसि कारणम् १२
लुब्धाया विदितो मन्ये न तेऽहं राघवं यथा ।
तथा ह्यनर्थो राज्यार्थं त्वया नीतो महानयम् १३
अहं हि पुरुषव्याघ्रावपश्यन्रामलक्ष्मणौ ।
केन शक्तिप्रभावेण राज्यं रक्षितुमुत्सहे १४
तं हि नित्यं महाराजो बलवन्तं महौजसम् ।
उपाश्रितोऽभूद्धर्मात्मा मेरुर्मेरुवनं यथा १५
सोऽहं कथमिमं भारं महाधुर्यसमुद्यतम् ।
दम्यो धुरमिवासाद्य सहेयं केन चौजसा १६

ती दूरवर विचार करून पाहणारी माझी ज्येष्ठ माता कौसल्याही धर्माला स्मरून तुझ्याशीं अगदीं बहिणीप्रमाणें वागत असते. तेव्हां तिच्या महात्म्या पुत्राला वल्कलें परिधान करावयास लाऊन, त्याला अरण्यांत पाठविल्याबद्दल हे पापिणि ! तुला वाईट कसें वाटत नाहीं ? ( ६–११ )

" वाईट गोष्ट मनामध्येंही न आणणारा, शूर, जितेंद्रिय आणि यशस्वी अशा रामाला चीर वस्त्रें परिधान करावयाला लावून अरण्यांत हांकून देण्यापासून, तुला काय बरें फळ मिळणार आहे ? रामाशीं माझें वर्तन कसें आहे, हें राज्यलुब्ध झालेल्या तुला समजलें नाहीं असें मला वाटतें. खरोखर राज्याकरितां तूं हा मोठा अनर्थच उत्पन्न केला आहेस. पुरुषश्रेष्ठ राम व लक्ष्मण हे दोघेही येथें नसतांना कोणाच्या बळावर राज्यरक्षण करण्याचा मी उत्साह बाळगावा? मेरुपर्वत ज्याप्रमाणें स्वतः उत्पन्न केलेल्या आपल्या वनावरच स्वरक्षणार्थ अवलंबून राहिलेला असतो त्याचप्रमाणें महाराज दशरथ देखील त्या महातेजस्वी बलाढ्य रामावरच नेहमीं अवलंबून रहात होते. तेव्हां मोठमोठ्या धुरांना वाहणाऱ्या बैलांनीं उचललेलें जूं ज्याप्रमाणें वांसराच्या मानेवर ठेविलें असतां त्याला तें सहन करतां

अथवा मे भवेच्छक्तिर्योगैर्बुद्धिबलेन वा ।
सकामां न करिष्यामि त्वामहं पुत्रगर्धिनीम् १७
न मे विकाङ्क्षा जायेत त्यक्तुं त्वां पापनिश्चयाम् ।
यदि रामस्य नावेक्षा त्वयि स्यान्मातृवत्सदा १८
उत्पन्ना तु कथं बुद्धिस्तवेयं पापदर्शिनि ।
साधुचारित्रविभ्रष्टे पूर्वेषां नो विगर्हिता १९
अस्मिन्कुले हि सर्वेषां ज्येष्ठो राज्येऽभिषिच्यते ।
अपरे भ्रातरस्तस्मिन्प्रवर्तन्ते समाहिताः २०
न हि मन्ये नृशंसे त्वं राजधर्ममवेक्षसे ।
गतिं वा न विजानासि राजवृत्तस्य शाश्वतीम् २१
सततं राजपुत्रेषु ज्येष्ठो राजाभिषिच्यते ।
राज्ञामेतत्समं तत्स्यादिक्ष्वाकूणां विशेषतः २२

---

येत नाहीं त्याचप्रमाणें हा राज्यभार मी कोणाच्या बलानें सहन करूं ?(१२-१६)

" अथवा योगसाधनांनीं किंवा बुद्धिसामर्थ्यानें जरी मला राज्य हांकण्याची शक्ति सुदैवानें मिळाली तरी पुत्राकरितां राज्याचा अभिलाष करणाऱ्या तुझा मनोरथ मी कधींही सिद्धीस नेणार नाहीं. राम जर तुला नेहमीं आईप्रमाणें मानीत नसता तर दुष्ट हेतु मनांत धरून असलेल्या तुझा त्याग करण्यास मला कधींच शंका आली नसती; परंतु राम तुला स्वतःच्या मातिप्रमाणें समजत आहे. तेव्हां तुझा मी त्याग केला असतां त्यालाही दुःख होणार, म्हणून येथें माझा निरुपायच झाला आहे. हे सदाचरणापासून भ्रष्ट झालेल्या दुष्ट स्त्रिये ! आमच्या पूर्वजांनीं निंद्य मानिलेला हा कनिष्ठाला राज्याभिषेक करण्याचा विचार तुझ्या मनामध्यें आला कसा ? या कुलामध्यें जो सर्वांमध्यें ज्येष्ठ असेल, त्यालाच राज्याभिषेक होत असतो आणि दुसरे कनिष्ठ भाऊ त्याच्या अधीन होऊन वागत असतात. ( १७-२० )

" हे दुष्टे ! तुला राजधर्म माहीत आहे, असें मला वाटत नाहीं आणि राजधर्माचें निश्चित फलही तुला ठाऊक आहे, असें दिसत नाहीं. राजकुमारांमध्यें जो ज्येष्ठ असेल, त्यालाच नेहमीं राज्याभिषेक होत असतो; ही गोष्ट सर्व

तेषां धर्मैकरक्षाणां कुलचारित्रशोभिनाम् ।
अद्य चारित्रशौटीर्यं त्वां प्राप्य विनिवर्तितम् २३
तवापि सुमहाभागे जनेन्द्रकुलपूर्वके ।
बुद्धिमोहः कथमयं संभूतस्त्वयि गर्हितः २४
न तु कामं करिष्यामि तवाहं पापनिश्चये ।
यया व्यसनमारब्धं जीवितान्तकरं मम २५
एषा त्विदानीमेवाहमप्रियार्थं तवानघे ।
निवर्तयिष्यामि वनाद्भ्रातरं स्वजनप्रियम् २६
निवर्तयित्वा रामं च तस्याहं दीप्ततेजसः ।
दासभूतो भविष्यामि सुस्थितेनान्तरात्मना २७
इत्येवमुक्त्वा भरतो महात्मा प्रियेतरैर्वाक्यगणैस्तुदंस्ताम् ।
शोकार्दितश्चापि ननाद भूयः सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः २८

इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः॥ ७३॥ [ २८७३ ]

राजांना सारखीच लागूं असून इक्ष्वाकुकुलांतील राजांमध्यें तर विशेषेंकरून हा नियमच आहे. केवल धर्मानेंच ज्यांचें रक्षण झालेलें आहे आणि कुलपरंपरागत आलेल्या आचारानेंच ज्यांना शोभा आलेली आहे, त्यांचा स्वतःच्या वर्तणुकी-संबंधीचा अभिमान तुझ्याशीं प्रसंग पडल्यामुळें आज धुळीस मिळाला आहे. हे महाभाग्यवति ! केकयराजाच्या कुलाचा मूळ पुरुष जनेंद्र होता. तेव्हां अशा कुलामध्यें तूं उत्पन्न झाली असूनही सज्जनांनीं तिरस्कारिलेली अशी ही बुद्धि तुला कशी झाली ? हे दुष्टबुद्धे ! मी तुझी इच्छा कधींही परिपूर्ण करणार नाहीं. तूं माझ्या जीविताचा अंत करणारें संकट उत्पन्न केलें आहेस. हे महाघोरपापिणि! हा मी आतांच्या आतांच तुला नापसंत असलेलीच गोष्ट करण्याकरितां स्वजनांना प्रिय असलेल्या आपल्या भावाला वनांतून परत आणतों. रामाला परत आणल्यावर त्या उज्ज्वल तेजस्वी ज्येष्ठ भावाचा मी अगदीं आनंदानें दास होऊन राहीन.” कठोर वाक्प्रहारांनीं त्या कैकेयीला दुःख देणारा तो शोकाकुल झालेला महात्मा भरत याप्रमाणें तिला बोलून मंदरपर्वताच्या गुहेंतील सिंहाप्रमाणें आणखी गर्जना करूं लागला. ( २१–२८ )

चतुःसप्ततितमः सर्गः ।

तां तथा गर्हयित्वा तु मातरं भरतस्तदा ।
रोषेण महताविष्टः पुनरेवाब्रवीद्वचः १
राज्याद्भ्रंशस्व कैकेयि नृशंसे दुष्टचारिणि ।
परित्यक्तासि धर्मेण मा मृतं रुदती भव २
किं नु तेऽदूषयद्रामो राजा वा भृशधार्मिकः ।
ययोर्मृत्युर्विवासश्च त्वत्कृते तुल्यमागतौ ३
भ्रूणहत्यामसि प्राप्ता कुलस्यास्य विनाशनात् ।
कैकेयि नरकं गच्छ मा च तातसलोकताम् ४
यत्त्वया हीदृशं पापं कृतं घोरेण कर्मणा ।
सर्वलोकप्रियं हित्वा ममाप्यापादितं भयम् ५
त्वत्कृते मे पिता वृत्तो रामश्चारण्यमाश्रितः ।

---

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्र्याहत्तरावा सर्ग संपला ॥ ७३ ॥

याप्रमाणें त्या मातेची खरवड काढल्यावर अतिशय रागावलेला तो भरत पुनः तिला म्हणाला- " हे कैकेयि ! हे दुष्टे ! हे दुराचारिणी ! जा; तूं वनांत चालती हो; धर्मानें तुला कायमचें सोडलें आहे. तेव्हां तूं आतां स्वर्गवासी झालेल्या माझ्या पित्याबद्दल कधीं रडूं नकोस. कारण, त्याच्याशीं तुझें आतां भार्येचें नातें राहिलेलें नाहीं. ज्यांना मृत्यु आणि वनवास तुझ्याकरितां एकदम प्राप्त झाले आहेत, अशा त्या अत्यंत धार्मिक राजानें अथवा त्या रामानें तुझें काय वाईट केलें होतें ? या कुलाचा नाश केल्यामुळें तुला ब्रह्महत्येचें पातक लागलेलें आहे. तर हे कैकेयि ! तूं नरकांत जा; पित्याला मिळालेल्या लोकाला जाऊं नकोस. या घोर कृत्यानें सर्व लोकांना आवडत असलेल्या रामाचा त्याग करून हें जें ब्रह्महत्येसारखें पातक तूं केलें आहेस, त्याच्या योगानें मलाही तूं मोठी भीतीच उत्पन्न करून ठेविली आहेस. कारण रामाच्या वनवासाला आणि राजाच्या मरणाला तूंच कारण असल्यामुळें महापातक तुझ्या हातून घडलें आहे आणि महापातक केलेल्या तुझ्या संसर्गानें मलाही महापातकाचाच दोष लागणार आहे. ( १-५ )

अयशो जीवलोके च त्वयाहं प्रतिपादितः ६
मातृरूपे ममामित्रे नृशंसे राज्यकामुके ।
न तेऽहमभिभाष्योऽस्मि दुर्वृत्ते पतिघातिनि ७
कौसल्या च सुमित्रा च याश्चान्या मम मातरः ।
दुःखेन महताविष्टास्त्वां प्राप्य कुलदूषिणीम् ८
न त्वमश्वपतेः कन्या धर्मराजस्य धीमतः ।
राक्षसी तत्र जातासि कुलप्रध्वंसिनी पितुः † ९
यत्त्वया धार्मिको रामो नित्यं सत्यपरायणः ।
वनं प्रस्थापितो वीरः पितापि त्रिदिवं गतः १०
यत्प्रधानासि तत्पापं मयि पित्रा विना कृते ।

"तुझ्यापायीं माझा पिता मृत्यु पावला असून रामानें वनाचा स्वीकार केला आहे आणि यामुळें जगामध्यें सर्वत्र तूं माझी अपकीर्ति केलेली आहेस. मातेच्या रूपानें माझ्याशीं शत्रुत्व करणाऱ्या दुष्ट स्त्रिये ! हे राज्याभिलाष धरणाऱ्या दुराचारिणी स्त्रिये ! हे पतिघातिनी ! तूं माझ्याशीं भाषणही करीत जाऊं नकोस. तुज कुलकलंकिनीशीं प्रसंग पडल्यामुळें कौसल्या, सुमित्रा आणि इतरही माझ्या मातांवर दुर्धर दुःख कोसळलें आहे. त्या विचारी धर्मराज अश्वपतिराजाची मुलीं तूं कन्याच नव्हेस. आमच्या पित्याच्या कुलाचा घात करण्याकरितां तूं राक्षसिच त्या कुलामध्यें अवतीर्ण झाली आहेस. कारण नित्य सत्यावलंबन करून असणाऱ्या धर्मनिष्ठ वीर रामाला तूं वनांत घालविलेंस आणि माझा पिताही तूं येथून स्वर्गाला पोंचविलास. परंतु ज्या मुख्य हेतूनें मला राज्य प्राप्त व्हावें, म्हणून तूं हें पातक केलेंस, त्याचें कटु फल मला मात्र भोगावें लागत आहे. कारण पित्याचा मला

† श्लोक ९– या श्लोकांत "कुलप्रध्वंसिनी पितुः" या ठिकाणीं टीकाकार 'पितुः' या पूर्वी 'मम' अध्याहृत घेऊन, 'माझ्या पित्याच्या कुलाचा नाश करणारी' असा अर्थ मुख्यतः करतात व 'आपल्या पित्याच्या (माहेरच्या) कुलाचा' असाही अर्थ सुचवितात. लेलेशास्त्र्यांनीं हाच अर्थ स्वीकारला आहे. माझ्या मतानें "मम" अध्याहृत घेऊन माझ्या पित्याच्या म्हणजे "दशरथाच्या कुलाचा नाश" हाच अर्थ विशेष सयुक्तिक असल्यानें ग्राह्य आहे.

भ्रातृभ्यां च परित्यक्ते सर्वलोकस्य चाप्रिये ११
कौसल्यां धर्मसंयुक्तां वियुक्तां पापनिश्चये ।
कृत्वा कं प्राप्स्यसे ह्यद्य लोकं निरयगामिनी १२
किं नावबुध्यसे क्रूरे नियतं बन्धुसंश्रयम् ।
ज्येष्ठं पितृसमं रामं कौसल्यायात्मसंभवम् १३
अङ्गप्रत्यङ्गजः पुत्रो हृदयाच्चाभिजायते ।
तस्मात्प्रियतरो मातुः प्रिया एव तु बान्धवाः १४
अन्यदा किल धर्मज्ञा सुरभिः सुरसंमता ।
वहमानौ ददर्शोर्व्यां पुत्रौ विगतचेतसौ १५
तावर्धदिवसं श्रान्तौ दृष्ट्वा पुत्रौ महीतले ।
रुरोद पुत्रशोकेन बाष्पपर्याकुलेक्षणम् १६
अधस्ताद्व्रजतस्तस्याः सुरराज्ञो महात्मनः ।
बिन्दवः पतिता गात्रे सूक्ष्माः सुरभिगन्धिनः १७

---

वियोग झाला आणि भावांनींही माझा त्याग केला व सर्व लोकांना मी अप्रिय होऊन बसलों. ( ६–११ )

"हे दुष्टबुद्धि कैकेयि ! धर्माला अनुसरून वागणाऱ्या कौसल्येला, पतीचा व पुत्राचा वियोग करून आज तुला कोणता लोक मिळणार आहे ? तूं नरकांत जाणार, हें दिसतेंच आहे. हे क्रूर कैकेयि! सर्व बांधवांचा आश्रय आणि कौसल्येचा औरस पुत्र राम माझा ज्येष्ठ भाऊ असल्यामुळें मला पित्यासमान आहे, हें तुला ठाऊक नाहीं काय ? अंगप्रत्यंगापासून व हृदयापासून उत्पन्न होणारा पुत्र मातेला अतिशय प्रिय असतो आणि बांधव हे साधारणच प्रिय असतात. सारांश औरस पुत्राचें वियोग-दुःख तिला झाल्यामुळें तें असंत दुःसह आहे. असें सांगतात कीं, एकदां देवांना प्रिय असलेल्या कामधेनु धर्मज्ञ सुरभीनें, भान नाहींसे होऊन गेलेल्या आपल्या दोन पुत्रांना पृथ्वीवर पाहिलें. ( १२–१५ )

"दोनप्रहर उलटून जाईतोंपर्यंत ओढतां ओढतां थकलेल्या त्या मुलांना भूतलावर पाहून पुत्रशोकानें डोळ्यांत आंसवें भरून ती रडूं लागली. महात्मा देवांचा राजा इंद्र खालून जात असतांना त्याच्या शरिरावर तें तिचे सुगंधि लहान

निरीक्षमाणस्तां शक्रो ददर्श सुरभिं स्थिताम् ।
आकाशे विष्ठितां दीनां रुदतीं भृशदुःखिताम् १८
तां दृष्ट्वा शोकसंतप्तां वज्रपाणिर्यशस्विनीम् ।
इन्द्रः प्राञ्जलिरुद्विग्नः सुरराजोऽब्रवीद्वचः १९
भयं कच्चिन्न चास्मासु कुतश्चिद्विद्यते महत् ।
कुतोऽनिमित्तः शोकस्ते ब्रूहि सर्वहितैषिणि २०
एवमुक्ता तु सुरभिः सुरराजेन धीमता ।
प्रत्युवाच ततो धीरा वाक्यं वाक्यविशारदा २१
शान्तं पापं न वः किंचित्कुतश्चिदमराधिप ।
अहं तु मग्नौ शोचामि स्वपुत्रौ विषमे स्थितौ २२
एतौ दृष्ट्वा कृशौ दीनौ सूर्यरश्मिप्रतापितौ ।
वध्यमानौ बलीवर्दौ कर्षकेण दुरात्मना २३
मम कायात्प्रसूतौ हि दुःखितौ भारपीडितौ ।
यौ दृष्ट्वा परितप्येऽहं नास्ति पुत्रसमः प्रियः २४

अश्रुबिंदु पडले. तेव्हां इंद्र वर पाहूं लागला तों आकाशामध्यें उभी असलेली कामधेनु सुरभि अत्यंत दुःखित व दीन होऊन रडत बसली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ती यशस्विनी कामधेनु शोकाकुल झालेली पाहून उद्विग्न झालेला देवराज वज्रपाणि इंद्र हात जोडून तिला म्हणाला आमच्यावर कोठून मोठें संकट तर कोसळणार नाहीं ना ? हे सर्वलोकहितासाठीं तत्पर असणाऱ्या सुरभे ! कशाकरितां तूं हा शोक करीत आहेस, तें सांग. ( १९-२० )

"याप्रमाणें बुद्धिमान् देवराजानें सुरभीला विचारलें असतां संभाषण करण्यामध्यें निपुण असलेली ती विचारी कामधेनु त्याला म्हणाली, " इडापिडा टळो, हे देवराजा ! तुम्हांला कोठूनही यत्किंचितसुद्धां भय नाहीं, परंतु, संकटांत सांपडून दुःखमग्न झालेल्या दोन पुत्रांना पाहून मी शोक करीत आहें. हे माझे पुत्र बैल अधींच कृश व दीन झाले असून सूर्यकिरणांनीं तापून गेलेले आहेत आणि दुष्ट शेतकरी त्यांना मारीत आहेत. हे माझ्या शरिरापासून उत्पन्न झालेले पुत्र भाराखालीं दबल्यामुळें दुःखित झाले आहेत व त्यांना पाहून मी शोक

यस्याः पुत्रसहस्रैस्तु कृत्स्नं व्याप्तमिदं जगत् ।
तां दृष्ट्वा रुदतीं शक्रो न सुतान्मन्यते परम् २५
इन्द्रो ह्यश्रुनिपातं तं स्वगात्रे पुण्यगन्धिनम् ।
सुरभिं मन्यते दृष्ट्वा भूयसीं तामिहेश्वरः २६
समाप्रतिमवृत्ताया लोकधारणकाम्यया ।
श्रीमत्या गुणमुख्यायाः स्वभावपरिचेष्टया २७
यस्याः पुत्रसहस्राणि सापि शोचति कामधुक् ।
किं पुनर्या विना रामं कौसल्या वर्तयिष्यति २८
एकपुत्रा च साध्वी च विवत्सेयं त्वया कृता ।
तस्मात्त्वं सततं दुःखं प्रेत्य चेह च लप्स्यसे २९
अहं त्वपचितिं भ्रातुः पितुश्च सकलामिमाम् ।
वर्धनं यशसश्चापि करिष्यामि न संशयः ३०

करीत आहे. कारण पुत्रासारखा दुसरा कोणीच प्रिय नाहीं.' असो. जिच्या हजारों पुत्रांनीं हें संपूर्ण जग भरून गेलें आहे अशी कामधेनू ती दोघां पुत्रांकरितां रडतांना पाहिल्यापासून इंद्रालाही पुत्रापेक्षां कांहीं अधिक आहे असें वाटेनासें झालें. ( २१–२५ )

"आपल्या शरिरावर पडलेले ते सुगंधि अश्रूचे बिंदु पाहून देवराज इंद्र जगतामध्यें कामधेनूला सर्वोत्कृष्ट समजूं लागला. सर्वांशीं सारखें असें जिचें अप्रतिम वर्तन आहे, सत्य हा जिच्या ठिकाणीं मुख्य गुण आहे व वाटेल ती कामना परिपूर्ण करण्याचें जिचें सामर्थ्य आहे, अशा कामधेनूचे-जगताचें परिपालन करण्याच्या उद्देशानें सर्व सामान्य असलेल्या ग्रामधर्मसेवनाच्या द्वारें प्राप्त झालेले-हजारों पुत्र असतांना ती कामधेनुसुद्धां दोघां पुत्रांकरितांही जर शोक करते तर एकुलत्या एक रामाचा वियोग झालेली कौसल्या जिवंत राहील, ही गोष्ट तरी कशाला पाहिजे ? एकच पुत्र असलेल्या या साध्वी कौसल्येला तूं पुत्ररहित करून टाकलें आहेस. तर इहलोकीं आणि मेल्यानंतरही तुला नेहमीं दुःखच मिळत जाईल. मी पुढें सांगतों त्याप्रमाणें भावाच्या व पित्याच्या या ऋणांतून मुक्त होऊन आपली कीर्ति वाढवीन हा माझा निश्चय समज. ( २६–३० )

आनाय्य च महाबाहुं कोशलेन्द्रं महाबलम् ।
स्वयमेव प्रवेक्ष्यामि वनं मुनिनिषेवितम् ३१
नह्यहं पापसंकल्पे पापे पापं त्वया कृतम् ।
शक्तो धारयितुं पौरैरश्रुकण्ठैर्निरीक्षितः ३२
सा त्वमग्निं प्रविश वा स्वयं वा विश दण्डकान् ।
रज्जुं बध्वाथवा कण्ठे नहि तेऽन्यत्परायणम् ३३
अहमप्यवनीं प्राप्ते रामे सत्यपराक्रमे ।
कृतकृत्यो भविष्यामि विप्रवासितकल्मषः ३४
इति नाग इवारण्ये तोमराङ्कुशतोदितः ।
पपात भुवि संक्रुद्धो निःश्वसन्निव पन्नगः ३५
संरक्तनेत्रः शिथिलाम्बरस्तथा विधूतसर्वाभरणः परंतपः ।
बभूव भूमौ पतितो नृपात्मजः शचीपतेः केतुरिवोत्सवक्षये ३६
इत्यार्षे श्रीम०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ।७४। [२९०९]

"कोसलदेशाधिपति, महाबलाढ्य व महापराक्रमी रामाला येथें आणवून मी स्वतःच मुनींनीं आश्रय घेतलेल्या वनामध्यें प्रवेश करीन. परंतु हे दुष्टबुद्धे ! पापिणि! अश्रूंनीं कंठ दाटून येऊन नगरांतील लोक माझ्याकडे पाहूं लागले म्हणजे तूं केलेलें हें पातक सहन करण्यास मी समर्थ होणार नाहीं या पातकाचें परिमार्जन होण्याकरितां तूं हवी तर अग्नीमध्यें प्रवेश कर, पाहिजे तर स्वतःच दंडकारण्यांत चालती हो अथवा गळ्याला फांस लावून घेऊन मर. यावांचून आतां तुला दुसरी गति नाहीं. कारण असल्या महापातकाला असलेंच प्रायश्चित्त अवश्य आहे. अमोघपराक्रमी राम राज्यावर आला म्हणजे तुझ्यामुळें मला लागलेला हा कलंक धुतला जाऊन मीही कृतकृत्य होईन." याप्रमाणें विलाप करून बरच्या व अंकुशांनीं टोंचलेल्या अरण्यांतील हत्तीप्रमाणें अत्यंत रागावलेला तो भरत सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकीत भूमीवर पडला. तशा अवस्थेंत तेथें पडलेल्या शत्रुतापन भरताचे डोळे लाल झाले होते. वस्त्रें सैल झालीं होतीं, अंगावरील सर्व अलंकार अस्ताव्यस्त होऊन गेले होते आणि त्यामुळें तो राजकुमार उत्सव आटोपल्यानंतर खालीं पाडून ठेविलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें दिसत होता. (३१-३५)

पञ्चसप्ततितमः सर्गः ।

दीर्घकालात्समुत्थाय संज्ञां लब्ध्वा स वीर्यवान् ।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां दीनामुद्वीक्ष्य मातरम् १
सोमात्यमध्ये भरतो जननीमभ्यकुत्सयत् ।
राज्यं न कामये जातु मन्त्रये नापि मातरम् २
अभिषेकं न जानामि योऽभूद्राज्ञा समीक्षितः ।
विप्रकृष्टे ह्यहं देशे शत्रुघ्नसहितोऽभवम् ३
वनवासं न जानामि रामस्याहं महात्मनः ।
विवासनं च सौमित्रेः सीतायाश्च यथाभवत् ४
तथैव क्रोशतस्तस्य भरतस्य महात्मनः ।
कौसल्या शब्दमाज्ञाय सुमित्रां चेदमब्रवीत् ५
आगतः क्रूरकार्यायाः कैकेय्या भरतः सुतः ।
तमहं द्रष्टुमिच्छामि भरतं दीर्घदर्शिनम् ६
एवमुक्त्वा सुमित्रां तां विवर्णवदना कृशा ।
प्रतस्थे भरतो यत्र वेपमाना विचेतना ७

---

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग संपला. ॥ ७४ ॥

बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन उठल्यानंतर अश्रूंनीं नेत्र भरून येऊन व त्या दीन मातेकडे पाहून, तो भरत अमात्यांमध्येंही आपल्या मातेची निंदा करूं लागला. तो म्हणाला, " राज्याची मला मुळींच इच्छा नाहीं व मी आपल्या आईशीं कधीं भाषणही करणार नाहीं. राजानें जो माझा राज्याभिषेक ठरविला असेल, तो मला ठाऊक नाहीं. शत्रुघ्नासह मी त्या वेळीं येथून दूर असलेल्या त्या प्रदेशामध्यें होतों. महात्म्या रामाचा वनवास मी जाणीत नाहीं आणि सीतेला व लक्ष्मणाला कां हांकून दिलें, हेंही मला माहीत नाहीं. "याप्रमाणें तो महात्मा भरत पूर्वीप्रमाणेंच आक्रोश करूं लागला असतां त्याचा शब्द ऐकून कौसल्या सुमित्रेला म्हणाली, " क्रूर कर्म करणाऱ्या कैकेयीचा पुत्र आलेला दिसतो. तेव्हां दूरवर विचार करणाऱ्या त्या भरताला भेटण्याची मला इच्छा आहे." ( १–६ )

स तु राजात्मजश्चापि शत्रुघ्नसहितस्तदा ।
प्रतस्थे भरतो येन कौसल्याया निवेशनम् ८
ततः शत्रुघ्नभरतौ कौसल्यां प्रेक्ष्य दुःखितौ ।
पर्यष्वजेतां दुःखार्तां पतितां नष्टचेतनाम् ९
रुदन्तौ रुदती दुःखात्समेत्यार्या मनस्विनी ।
भरतं प्रत्युवाचेदं कौसल्या भृशदुःखिता १०
इदं ते राज्यकामस्य राज्यं प्राप्तमकण्टकम् ।
संप्राप्तं बत कैकेय्या शीघ्रं क्रूरेण कर्मणा ११
प्रस्थाप्य चीरवसनं पुत्रं मे वनवासिनम् ।
कैकेयी कं गुणं तत्र पश्यति क्रूरदर्शिनी १२
क्षिप्रं मामपि कैकेयी प्रस्थापयितुमर्हति ।
हिरण्यनाभो यत्रास्ते सुतो मे सुमहायशाः १३
अथवा स्वयमेवाहं सुमित्रानुचरा सुखम् ।
अग्निहोत्रं पुरस्कृत्य प्रस्थास्ये येन राघवः १४

याप्रमाणें त्या सुमित्रेला सांगून निस्तेज मुखानें युक्त, कृश आणि कांहीं सुचेनासें झालेली कौसल्या जिकडे भरत होता, तिकडे कांपत कांपत चालली. इकडे तो राजपुत्र भरतही शत्रुघ्नासह कौसल्येच्या निवासस्थानाला जाणाऱ्या मार्गानें तिच्याकडे निघाला. त्यानंतर दुःखित झालेले भरत शत्रुघ्न दुःखाकुल झाल्यामुळें मूर्च्छित होऊन मार्गामध्येंच पडलेल्या कौसल्येला कडकडून भेटले. तेव्हां रडत असलेल्या त्या भरतशत्रुघ्नांची दुःखानें भेट घेऊन ती अत्यंत दुःखित झालेली बिचारी श्रेष्ठ कौसल्या रडत रडत भरताला म्हणाली. ( ७–१० )

"राज्याचा अभिलाष धरणाऱ्या तुला हें निष्कंटक राज्य क्रूर कर्म करून कैकेयीनें मिळवून दिलें आहे. वृक्षाच्या साली नेसावयाला लावून वनवासी बनविलेल्या माझ्या पुत्राला रानांत पाठवून क्रूर विचार मनांत आणणाऱ्या कैकेयीला कोणता बरें लाभ झाला आहे ? सोन्यासारख्या नाभीनें युक्त असलेला माझा महायशस्वी पुत्र जिकडे असेल तिकडे मलाही कैकेयीनें लवकर पाठवून द्यावें. अथवा मी स्वतःच सुमित्रेला बरोबर घेऊन आणि अग्निहोत्र पुढें घालून ज्या

कामं वा स्वयमेवाद्य तत्र मां नेतुमर्हसि ।
यत्रासौ पुरुषव्याघ्रस्तप्यते मे सुतस्ततः १५
इदं हि तव विस्तीर्णं धनधान्यसमाचितम् ।
हस्त्यश्वरथसंपूर्णं राज्यं निर्यातितं तया १६
इत्यादिबहुभिर्वाक्यैः क्रूरैः संभर्त्सितोऽनघः ।
विव्यथे भरतो तीव्रव्रणे तुद्येव सूचिना १७
पपात चरणौ तस्यास्तदा संभ्रान्तचेतनः ।
विलप्य बहुधासंज्ञो लब्धसंज्ञस्तदाभवत् १८
एवं विलापमानां तां प्राञ्जलिर्भरतस्तदा ।
कौसल्यां प्रत्युवाचेदं शोकैर्बहुभिरावृताम् १९
आर्ये कस्मादजानन्तं गर्हसे मामकल्मषम् ।
विपुलां च मम प्रीतिं स्थितां जानासि राघवे २०
कृतशास्त्रानुगा बुद्धिर्मा भूत्तस्य कदाचन ।
सत्यसंधः सतां श्रेष्ठो यस्यार्योऽनुमते गतः २१

---

मार्गानें राम गेला अहे, त्या मार्गानें सुखानें वनांत चलती होईन, किंवा तो माझा पुरुषश्रेष्ठ पुत्र जिकडे तप करणार असेल तिकडे तूं स्वतःच आपल्या इच्छेनें मला नेऊन पोंचव. धनधान्यांनीं समृद्ध व हत्ती, घोडे आणि रथ यांनीं भरलेलें हें विस्तीर्ण राज्य तुला त्या कैकेयीनें दिलें आहे." (११-१६)

या व अशा प्रकारच्या अनेक कठोर शब्दांनीं निरपराधी भरताची कौसल्येनें निर्भर्त्सना केली असतां प्रखर व्रणावर सुई टोंचल्याप्रमाणें तो भरत पीडित झाला. मनामध्यें गोंधळून गेलेला तो भरत तिच्या पायां पडला, नानाप्रकारें विलाप करून मूर्च्छित झाला व कांहीं वेळानें शुद्धीवर आला. तेव्हां नानाप्रकारें शोकांनीं व्याप्त होऊन याप्रमाणें शोक करीत असलेल्या कौसल्येला भरत हात जोडून म्हणाला, "हे आर्ये ! मला यांपैकीं कांहींच माहीत नसतांना व मी अगदीं निरपराधी असतांना तूं मला कां बरें दोष देत आहेस ? रामावर असलेलें माझें पराकाष्ठेचें प्रेम तर तुला माहीतच आहे. सत्यप्रतिज्ञ आणि सज्जन श्रेष्ठ असा आर्य राम ज्याच्या अनुमतीनें वनांत गेला असेल, त्याची बुद्धि गुरूंनीं शिकविलेल्या

प्रैष्यं पापीयसां यातु सूर्यं च प्रति मेहतु ।
हन्तु पादेन गां सुप्तां यस्यार्योऽनुमते गतः　　२२
कारयित्वा महत्कर्म भर्ता भृत्यमनर्थकम् ।
अधर्मो योऽस्य सोऽस्यास्तु यस्यार्योऽनुमते गतः　२३
परिपालयमानस्य राज्ञो भूतानि पुत्रवत् ।
ततस्तु द्रुह्यतां पापं यस्यार्योऽनुमते गतः　　२४
बलिषड्भागमुद्धृत्य नृपस्यारक्षितुः प्रजाः ।
अधर्मो योऽस्य सोऽस्यास्तु यस्यार्योऽनुमते गतः २५
संश्रुत्य च तपस्विभ्यः सत्रे वै यज्ञदक्षिणाम् ।
तां चापलपतां पापं यस्यार्योऽनुमते गतः　　२६
हस्त्यश्वरथसंबाधे युद्धे शस्त्रसमाकुले ।
मा स्म कार्षीत्सतां धर्मं यस्यार्योऽनुमते गतः　　२७
उपदिष्टं सुसूक्ष्मार्थं शास्त्रं यत्नेन धीमता ।

---

शास्त्राचें कधींच अनुसरण करणार नाहीं. (१७–२१)

"ज्याच्या संमतीनें आर्य राम वनांत गेला असेल तो पापी लोकांचा दास होईल आणि सूर्याकडे तोंड करून लघ्वी केल्याचें व गाईला लाथ मारल्याचें पातक त्याला लागेल. सेवकाकडून मोठें काम करून घेऊन त्यास कांहीं एक न देणाऱ्या मालकाला जें पातक लागतें, तें पातक ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल. प्राणिमात्रांचें पुत्राप्रमाणें परिपालन करणाऱ्या राजाचा द्रोह करणाऱ्यांना जें पातक लागतें तें पातक ज्याच्या मतानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल. कराच्या रूपानें एकंदर उत्पन्नाचा सहावा अंश घेऊनही प्रजांचें परिपालन न करणाऱ्या राजांना जें पातक लागतें, तें पातक ज्याच्या इच्छेनें आर्य राम वनांत गेला असेल, त्याला लागेल. यज्ञांमध्यें तपस्वी ऋत्विजांना दक्षिणा देण्याचें वचन देऊनही ती न देणाऱ्यांना जें पातक लागतें, तें पातक ज्याच्या मतानें आर्य राम वनांत गेला असेल, त्याला लागेल. (२२–२६)

हत्ती, घोडे आणि रथ ह्यांची खेंचाखेंच होऊन शस्त्रांची गर्दी झालेल्या युद्धामध्यें जो सद्धर्मानें वागला नसेल म्हणजे पराङ्मुख होऊन शत्रूंशीं ज्यानें युद्ध केलें

स नाशयतु दुष्टात्मा यस्यार्योऽनुमते गतः २८
मा च तं व्यूढबाह्वंसं चन्द्रभास्करतेजसम् ।
द्राक्षीद्राजस्थमासीनं यस्यार्योऽनुमते गतः २९
पायसं कृसरं छागं वृथा सोऽश्नातु निर्घृणः ।
गुरूंश्चाप्यवजानातु यस्यार्योऽनुमते गतः ३०
गवां स्पृशतु पादेन गुरून्परिवदेत च ।
मित्रे द्रुह्येत सोऽत्यर्थं यस्यार्योऽनुमते गतः ३१
विश्वासात्कथितं किंचित्परिवादं मिथः क्वचित् ।
विवृणोतु स दुष्टात्मा यस्यार्योऽनुमते गतः ३२
अकर्ता चाकृतज्ञश्च त्यक्तश्च निरपत्रपः ।
लोके भवतु विद्विष्टो यस्यार्योऽनुमते गतः ३३
पुत्रैर्दासैश्च भृत्यैश्च स्वगृहे परिवारितः ।
स एको मृष्टमश्नातु यस्यार्योऽनुमते गतः ३४

---

नसेल, त्याला लागणारें पातक ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल, त्याला लागेल. ज्याच्या इच्छेनुसार आर्य राम वनवासांस गेला असेल त्या दुरात्म्याला विवेकी आचार्यानें प्रयत्नानें शिकविलेल्या शास्त्रांचा त्याग केल्याचें पातक लागेल. ज्याच्या सांगण्यावरून आर्य राम वनवासांत गेला असेल, त्याला विशाल बाहु व खांदे यांनीं युक्त असून चंद्र-सूर्यासमान तेजस्वी असलेला राम राज्यावर बसल्याचें पाहण्याचें भाग्य लाभणार नाहीं. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनवासास गेला असेल, त्या निर्दयाला खीर, तिलोदन व बोकडाचें मांस आदि पदार्थ देवता, अतिथि व पितरादिकांना समर्पण केल्यावांचून खाल्ल्याचें आणि गुरूंची अवज्ञा केल्याचें पातक लागेल. (२७-३०)

"ज्याच्या प्रेरणेनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला गाईंना लाथाडल्याचें, गुरूंची निंदा केल्याचें आणि मित्राचा अतिशय द्रोह केल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनवासास गेला असेल, त्या दुरात्म्याला बाहेर ज्याचा स्फोट करावयाचा नाहीं अशा विश्वासावर एखाद्यानें गुप्तपणें सांगितलेला वृत्तान्त बाहेर फोडल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासास

अप्राप्य सदृशान्दारानन्पत्यः प्रमीयताम् ।
अनवाप्य क्रियां धर्म्यां यस्यार्योऽनुमते गतः ३५
आत्मनः संततिं द्राक्षीत्स्वेषु दारेषु दुःखितः ।
आयुः समग्रमप्राप्य यस्यार्योऽनुमते गतः ३६
राजस्त्रीबालवृद्धानां वधे यत्पापमुच्यते ।
भृत्यत्यागे च यत्पापं तत्पापं प्रतिपद्यताम् ३७
लाक्षया मधुमांसेन लोहेन च विषेण च ।
सदैव बिभृयाद्भृत्यान्यस्यार्योऽनुमते गतः ३८
सङ्ग्रामे समुपोढे च शत्रुपक्षभयंकरे ।
पलायमानो वध्येत यस्यार्योऽनुमते गतः ३९
कपालपाणिः पृथिवीमटतां चीरसंवृतः ।
भिक्षमाणो यथोन्मत्तो यस्यार्योऽनुमते गतः ४०

गेला असेल, त्याचा लोक द्वेष करूं लागतील, त्याच्याशीं संबंध तोडून टाकतील, तो निर्लज्ज बनेल आणि एखाद्यावर प्रत्युपकार न करतां त्याच्याशीं कृतघ्न बनल्याचें त्याला पातक लागेल. ज्याच्या इच्छेनें श्रेष्ठ राम वनवासास गेला असेल, त्याला पुत्र, दास आणि सेवक यांच्यासह एका घरांत राहून त्यांना टाकून एकट्यानेंच मिष्टान्न सेवन केल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासास गेला असेल, त्याला योग्य स्त्रीचें पाणिग्रहण न करतां धर्मानुसार यज्ञयाग केल्यावांचून निपुत्रिकपणें मरण्याचें पातक लागेल. (३१–३५)

"ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनामध्यें गेला असेल, त्याला आपल्या स्त्रीचे ठिकाणीं झालेली स्वतःची संतती पहावयास मिळणार नाहीं आणि तो अल्पायुषीच मरण पावेल. इतकेंच नव्हे, परंतु राजा, स्त्री, बाल आणि वृद्ध यांच्या वध केल्यानें जें पातक सांगितलें आहे आणि सेवकांना सोडून दिल्यानें जें पातक सांगितलें आहे, तें पातक त्याला लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल, त्याला लाख, दारू, मांस, लोखंड आणि विष यांचा नेहमीं व्यापार करून सेवकांना पोसल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल, त्याला भयंकर शत्रूंनीं आक्रमण केलें असतां पळतां पळतां वध झाल्याचें पातक

*

मद्यप्रसक्तो भवतु स्त्रीष्वक्षेषु च नित्यशः ।
कामक्रोधाभिभूतश्च यस्यार्योऽनुमते गतः ४१
मास्य धर्मे मनो भूयादधर्मं स निषेवताम् ।
अपात्रवर्षी भवतु यस्यार्योऽनुमते गतः ४२
संचितान्यस्य वित्तानि विविधानि सहस्रशः ।
दस्युभिर्विप्रलुप्यन्तां यस्यार्योऽनुमते गतः ४३
उभे संध्ये शयानस्य यत्पापं परिकल्प्यते ।
तच्च पापं भवेत्तस्य यस्यार्योऽनुमते गतः ४४
यदग्निदायके पापं यत्पापं गुरुतल्पगे ।
मित्रद्रोहे च यत्पापं तत्पापं प्रतिपद्यताम् ४५
देवतानां पितॄणां च मातापित्रोस्तथैव च ।
मा स्म कार्षीत्स शुश्रूषां यस्यार्योऽनुमते गतः ४६
सतां लोकात्सतां कीर्त्याः सज्जुष्टात्कर्मणस्तथा ।

---

लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासास गेला असेल, तो हातांत मनुष्याच्या डोक्याची कवटी घेऊन आणि वल्कलें परिधान करून उन्मत्ताप्रमाणें पृथ्वीवर भिक्षा मागत हिंडूं लागेल. सारांश, त्याला ब्रह्महत्येचें पातक लागेल.(३६-४०)

" ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल, त्याला दारू, स्त्रिया आणि द्यूत यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेऊन नेहमीं काम व क्रोध यांत गुरफटल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासास गेला असेल, त्याच्या मनाची प्रवृत्ति धर्मामध्यें न होतां अधर्मपूर्वक करून अपात्रीं दान केल्याचें पाप लागेल. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल त्याचें नानाप्रकारचें सांठविलेलें द्रव्य चोर लुटून नेवोत. दोही संध्याकालांच्या वेळीं निजणाऱ्याला पातक लागत असतें तें पाप ज्याच्या संमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल. इतकेंच नव्हे, परंतु आग लावणाऱ्याला, गुरुपत्नीशीं समागम करणाऱ्याला आणि मित्रद्रोह करणाऱ्याला जें पातक लागत असतें, तेंही पाप त्याला लागेल.(४१-४५)

"ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांस गेला असेल त्याला देव,पितर आणि माता व पिता यांची शुश्रूषा न केल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य

भ्रश्यतु क्षिप्रमद्यैव यस्यार्योऽनुमते गतः ४७
अपास्य मातृशुश्रूषामनर्थे सोऽवतिष्ठताम् ।
दीर्घबाहुर्महावक्षा यस्यार्योऽनुमते गतः ४८
बहुभृत्यो दरिद्रश्च ज्वररोगसमन्वितः ।
समायात्सततं क्लेशं यस्यार्योऽनुमते गतः ४९
आशामाशंसमानानां दीनानामूर्ध्वचक्षुषाम् ।
अर्थिनां वितथां कुर्याद्यस्यार्योऽनुमते गतः ५०
मायया रमतां नित्यं पुरुषः पिशुनोऽशुचिः ।
राज्ञो भीतस्त्वधर्मात्मा यस्यार्योऽनुमते गतः ५१
ऋतुस्नातां सतीं भार्यामृतुकालानुरोधिनीम् ।
अतिवर्तेत दुष्टात्मा यस्यार्योऽनुमते गतः ५२
विप्रलुप्तप्रजातस्य दुष्कृतं ब्राह्मणस्य यत् ।
तदेतत्प्रतिपद्येत यस्यार्योऽनुमते गतः ५३

---

राम वनामध्यें गेला असेल, तो आजच्या आज सज्जनांना मिळणाऱ्या लोकांपासून सज्जनांच्या कीर्तीपासून आणि सज्जनांनीं करण्यास योग्य अशा कर्मांपासून भ्रष्ट होवो. आजानुबाहु व भव्य छाती यांनीं युक्त असलेल्या आर्य रामाला वनवासास जाण्यास ज्यानें संमती दिली असेल त्याला मातेची सेवा सोडून दिल्यानें अनर्थाचा आश्रय केल्याचें मोठें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल तो मोठा कुटुंबी होऊन दरिद्री होईल, नेहमीं ज्वरानें तो पीडित राहील आणि त्याला सतत क्लेशच होत राहतील. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल, त्याला मोठ्या आशेनें तोंडाकडे पहात असलेल्या दीन याचकांची आशा सामर्थ्य असून पूर्ण न केल्याचें पातक लागेल. (४६-५०)

"ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल, त्या धर्मशून्य पुरुषाला नेहमीं लोकांना फसविण्यांतच आनंद वाटूं लागेल, तो चहाडखोर होईल, अपवित्र राहील आणि राजापासून त्याला भीति उत्पन्न होईल. ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनांत गेला असेल त्या दुरात्म्याला, ऋतुकालीं जवळ असलेल्या पतिव्रता ऋतुस्नात भार्येशीं समागम न केल्याचें पातक लागेल. ज्याच्या अनुमतीनें आर्य

ब्राह्मणायोद्यतां पूजां विहन्तु कलुषेन्द्रियः ।
बालवत्सां च गां दोग्धुर्यस्यार्योऽनुमते गतः ५४
धर्मदारान्परित्यज्य परदारान्निषेवताम् ।
त्यक्तधर्मरतिर्मूढो यस्यार्योऽनुमते गतः ५५
पानीयदूषके पापं तथैव विषदायके ।
यत्तदेकः स लभतां यस्यार्योऽनुमते गतः ५६
तृषार्तं सति पानीये विप्रलम्भेन योजयन् ।
यत्पापं लभते तत्स्याद्यस्यार्योऽनुमते गतः ५७
भक्त्या विवदमानेषु मार्गमाश्रित्य पश्यतः ।
तेन पापेन युज्येत यस्यार्योऽनुमते गतः ५८
एवमाश्वासयन्नेव दुःखार्तोऽनुपपात ह ।
विहीनां पतिपुत्राभ्यां कौसल्यां पार्थिवात्मजः ५९
तदा तं शपथैः कष्टैः शपमानमचेतनम् ।

---

राम वनांत गेला असेल, त्याला संतान नष्ट झालेल्या ब्राह्मणाचें संताननाशाला कारण होणारें पातक लागेल. ज्याच्या संमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल, त्याला ब्राह्मणाकरितां केलेल्या पूजेच्या तयारीची नासाडी केल्याचें आणि मनाला मोह उत्पन्न होऊन वासरूं लहान असतांना त्याच्यापुरतें दूध राखून न ठेवितां गाईची धार काढल्याचें पातक लागेल. ज्याच्या इच्छेनें आर्य राम वनवासांस गेला असेल, त्या मूर्खाला धर्माची पर्वा न बाळगतां धर्मपत्नीचा त्याग करून परस्त्रीसेवन केल्याचें पातक लागेल. (५१–५५)

ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल, त्याला पाण्याची नासधूस केल्याचें आणि विष घातल्याचें पातक लागेल. पाणी असूनही तहानेलेल्याला तें न देणाऱ्याला जें पातक लागतें, तें पातक ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल. भिन्न भिन्न मार्ग स्वीकारून भक्तीविषयीं वाद करणाऱ्या पुरुषांना (म्हणजे शिवभक्ति श्रेष्ठ किंवा विष्णुभक्ति श्रेष्ठ इत्यादि प्रकारचा वाद-विवाद करणाऱ्यांना आणि) त्यांचें तें भांडण ऐकणाऱ्याला जें पाप लागतें, तें पाप ज्याच्या योगानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल.'' (५६–५८)

भरतं शोकसंतप्तं कौसल्या वाक्यमब्रवीत् ६०
मम दुःखमिदं पुत्र भूयः समुपजायते ।
शपथैः शपमानो हि प्राणानुपरुणत्सि मे ६१
दिष्ट्या न चलितो धर्मादात्मा ते सहलक्षणः * ।
वत्स सत्यप्रतिज्ञो हि सतां लोकानवाप्स्यसि ६२
इत्युक्त्वा चाङ्कमानीय भरतं भ्रातृवत्सलम् ।
परिष्वज्य महाबाहुं रुरोद भृशदुःखिता ६३
एवं विलपमानस्य दुःखार्तस्य महात्मनः ।
मोहाच्च शोकसंरम्भाद्बभूव लुलितं मनः ६४

याप्रमाणें आपल्या निरपराधीपणाविषयीं कौसल्येची खात्री करतांकरतांच तो राजकुमार भरत दुःखानें अतिशयच व्याकुळ होऊन पति व पुत्र ह्यांचा वियोग झालेल्या कौसल्येजवळच पडला. तेव्हां रामाला वनवासांत पाठविण्यास संमति देणाऱ्याला भयंकर प्रकारें शाप देत असलेल्या त्या शोकाकुल व मूर्च्छितावस्थेंत असलेल्या भरताला कौसल्या म्हणाली, "पुत्रा ! याच्या योगानें मला अधिकच दुःख होत आहे. असल्या शपथा वाहून रामाच्या वनवासाला संमति देणाऱ्याला शाप देणाऱ्या तुला पाहून माझे प्राण व्याकुळ होत आहेत. शुभ लक्षणांनीं युक्त असलेलें तुझें अंतःकरण धर्मापासून चळलें नाहीं, हें मोठें सुदैवच समजलें पाहिजे. मुला ! तूं आपली प्रतिज्ञा खरी केलीस, तर तुला सज्जनांना मिळणारे लोक मिळतील." असें बोलून कौसल्येनें भ्रातृवत्सल महापराक्रमी भरताला मांडीवर घेतलें आणि त्याला कडकडून भेटून अत्यंत दुःखित होऊन ती रडूं लागली. याप्रमाणें दुःखाकुल होऊन विलाप करणाऱ्या त्या महात्म्या भरताचें मन मोहामुळें

* श्लोक ६२ मध्यें निर्णयसागर व गुजराथी प्रिंटिंगच्या प्रतींत "सहलक्षणः" असा पाठ आहे व त्याचा अर्थ टीकाकार "शुभलक्षणैः सहितः" असा देत आहेत. "गोविन्दराजीय" आणि इतर मद्रासी प्रतींमधून "सहलक्ष्मणः" असा पाठ दिला आहे व त्याचा अर्थ "सहलक्ष्मणः लक्ष्मणवत्" असा दिला आहे म्हणजे "लक्ष्मणवत् सत्यप्रतिज्ञोऽसि" असा दिला आहे. माझ्या मतें "सहलक्षणः" हाच पाठ योग्य आहे.

लालप्यमानस्य विचेतनस्य प्रनष्टबुद्धेः पतितस्य भूमौ ।
मुहुर्मुहुर्निःश्वसतश्च दीर्घं सा तस्य शोकेन जगाम रात्रिः ६५

इत्यार्षे श्री०वा०आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥७५॥ [२९७४]

षट्सप्ततितमः सर्गः ।

तमेवं शोकसंतप्तं भरतं कैकयीसुतम् ।
उवाच वदतां श्रेष्ठो वसिष्ठः श्रेष्ठवागृषिः १
अलं शोकेन भद्रं ते राजपुत्र महायशः ।
प्राप्तकालं नरपतेः कुरु संयानमुत्तमम् २
वसिष्ठस्य वचः श्रुत्वा भरतो धरणीं गतः ।
प्रेतकृत्यानि सर्वाणि कारयामास धर्मवित् ३
उद्धृत्य तैलसंसेकात्स तु भूमौ निवेशितम् ।
आपीतवर्णवदनं प्रसुप्तमिव भूमिपम् ४
संवेश्य शयने चाग्र्ये नानारत्नपरिष्कृते ।
ततो दशरथं पुत्रो विललाप सुदुःखितः ५

---

व शोकाच्या अतिरेकामुळें क्षुब्ध झालें आणि कांहींएक सुचेनासें होऊन कसलेंही भान न राहतां भूमीवर पडून वारंवार दीर्घ सुस्कारे टाकीत आणि अति विलाप करीत असलेल्या त्या भरताची शोकामध्येंच रात्र निघून गेली. (५९-६५)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग संपला. ॥ ७५ ॥

याप्रमाणें शोकसंतप्त झालेल्या कैकेयीपुत्र भरताला उत्तम वक्ते असून आणि उत्कृष्ट व प्रिय बोलणारे वसिष्ठ ऋषि म्हणाले, " हे महाकीर्तिमान् राजपुत्रा ! तुझें कल्याण असो; आतां शोक पुरे कर. हा आतां करावयाचा राजाचा और्ध्वदेहिक संस्कार उत्कृष्ट रीतीनें कर. " हें वसिष्ठांचें भाषण ऐकल्यावर भरतानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला आणि त्या धर्मज्ञ भरतानें पित्याचीं सर्व और्ध्वदेहिक कर्में करण्याकरितां मंत्र्यांना सांगितलें. किंचित् पिवळटपणा ज्याच्या मुखावर आला आहे अशा आणि झोंपल्याप्रमाणें दिसत असलेल्या त्या राजा दशरथाला तेलाच्या कढईतून काढून प्रथम जमिनीवर व त्यानंतर नाना प्रकार-

किं ते व्यवसितं राजन्प्रोषिते मय्यनागते ।
विवास्य रामं धर्मज्ञं लक्ष्मणं च महाबलम् ६
क्व यास्यसे महाराज हित्वेमं दुःखितं जनम् ।
हीनं पुरुषसिंहेन रामेणाक्लिष्टकर्मणा ७
योगक्षेमं तु तेऽव्यग्रं कोऽस्मिन्कल्पयिता पुरे ।
त्वयि प्रयाते स्वस्तात रामे च वनमाश्रिते ८
विधवा पृथिवी राजंस्त्वया हीना न राजते ।
हीनचन्द्रेव रजनी नगरी प्रतिभाति माम् ९
एवं विलपमानं तं भरतं दीनमानसम् ।
अब्रवीद्वचनं भूयो वसिष्ठस्तु महामुनिः १०
प्रेतकार्याणि यान्यस्य कर्तव्यानि विशांपतेः ।
तान्यव्यग्रं महाबाहो क्रियतामविचारितम् ११
तथेति भरतो वाक्यं वसिष्ठस्याभिपूज्य तत् ।
ऋत्विक्पुरोहिताचार्यांस्त्वरयामास सर्वशः १२

---

च्या रत्नांनीं सुशोभित अशा उत्कृष्ट मंचकावर निजविलें असतां त्याला पाहून अत्यंत दुःखी झालेला तो भरत याप्रमाणें विलाप करूं लागला. (१–५)

" हे राजा ! मी दुसऱ्या देशीं गेलों असतांना माझ्या अनुपस्थितींत धर्मवेत्त्या रामाला व महाबलाढ्य लक्ष्मणाला वनांत हांकून देऊन तूं मनांत काय करावयाचें योजलें आहेस ? हे महाराजा ! सरळ स्वभावाच्या पुरुषश्रेष्ठ रामानें विरहित अशा दुःखी झालेल्या मला टाकून तूं कोठें जात आहेस ? बाबा ! रामानें तर वनाचा आश्रय केला आणि तुम्हीहि स्वर्गाला चालते झालां. आतां तुमच्या नगरींतील प्रजाजनांचा योगक्षेम दक्षतापूर्वक कोण बरें चालवील ? हे राजा ! तुझा वियोग झालेली ही पृथ्वी विधवा झाल्यामुळें पूर्वीप्रमाणें शोभत नाहीं आणि ही अयोध्या-नगरीही चंद्ररहित रात्रीप्रमाणें मला निस्तेज दिसत आहे." ( ६–९ )

याप्रमाणें मनामध्यें अत्यन्त खिन्न होऊन विलाप करीत असलेल्या भरताला महामुनि वसिष्ठ पुनः म्हणाले, " हे महापराक्रमी भरता ! या राजाचे जे कांहीं और्ध्वदेहिक संस्कार करावयाचे आहेत, ते तूं आतां विचार करीत न बसतां

ये त्वग्नयो नरेन्द्रस्य अग्न्यागाराद्बहिष्कृताः ।
ऋत्विग्भिर्याजकैश्चैव ते हूयन्ते यथाविधि १३
शिबिकायामथारोप्य राजानं गतचेतनम् ।
बाष्पकण्ठा विमनसस्तमूचुः परिचारकाः १४
हिरण्यं च सुवर्णं च वासांसि विविधानि च ।
प्रकिरन्तो जना मार्गं नृपतेरग्रतो ययुः १५
चन्दनागुरुनिर्यासान्सरलं पद्मकं तथा ।
देवदारूणि चाहृत्य क्षेपयन्ति तथापरे १६
गन्धानुच्चावचांश्चान्यांस्तत्र गत्वाथ भूमिपम् ।
तत्र संवेशयामासुश्चितामध्ये तमृत्विजः १७
तदा हुताशनं हुत्वा जेपुस्तस्य तदृत्विजः ।
जगुश्च ते यथाशास्त्रं तत्र सामानि सामगाः १८
शिबिकाभिश्च यानैश्च यथार्हं तस्य योषितः ।
नगरान्निर्ययुस्तत्र वृद्धैः परिवृतास्तथा १९

---

काळजीपूर्वक कर.'' याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां ठीक आहे' असें म्हणून त्यानें वसिष्ठांच्या त्या सांगण्याला मान दिला आणि ऋत्विज, पुरोहित व आचार्य यांना त्यानें ते संस्कार लवकर करण्याविषयीं सांगितलें. दशरथराजाचे जे अग्नि होमशालेंतून बाहेर ठेवले होते, त्यांच्यामध्यें ऋत्विज आणि याजक यांनीं यथाविधि हवन केलें. नंतर गतप्राण झालेल्या राजाला पालखीमध्यें ठेवल्यावर सर्व सेवकांचे कंठ अश्रूंनीं दाटून आले व ते खिन्न झाले आणि त्याच्याकडे पाहून शोक करूं लागले. त्यानंतर रुपें, सोनें आणि नाना प्रकारचीं वस्त्रें मार्गामध्यें उधळीत उधळीत लोक राजाच्या पुढें चालले आणि कांहीं लोक चंदन व अगुरु यांचा चीक, सरल व पद्मक यांची आणि देवदारुचीं लांकडें अग्नीमध्यें टाकूं लागले. (१०–१६)

नंतर जेथें चिता रचली होती तेथें गेल्यावर लहानमोठीं इतरही सुगंधी द्रव्यें चितेमध्यें घालून ऋत्विजांनीं त्या राजाला चितेवर निजविलें. तेव्हां अग्नीमध्यें हवन करून ऋत्विज त्या समयाला योग्य आणि आवश्यक असे मंत्र जपूं लागले आणि सामगायन करणारे त्या ठिकाणीं यथाविधि सामें गाऊं लागले. योग्यतेप्रमाणें

प्रसव्यं चापि तं चक्रुर्ऋत्विजोऽग्निचितं नृपम् ।
स्त्रियश्च शोकसंतप्ताः कौसल्याप्रमुखास्तदा २०
क्रौञ्चीनामिव नारीणां निनादस्तत्र शुश्रुवे ।
आर्तानां करुणं काले क्रोशन्तीनां सहस्रशः २१
ततो रुदन्त्यो विवशा विलप्य च पुनः पुनः ।
यानेभ्यः सरयूतीरमवतेरुर्नृपाङ्गनाः २२
कृत्वोदकं ते भरतेन सार्धं नृपाङ्गनामन्त्रिपुरोहिताश्च ।
पुरं प्रविश्याश्रुपरीतनेत्रा भूमौ दशाहं व्यनयन्त दुःखम् २३

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः ॥७६॥[२९९७]

सप्तसप्ततितमः सर्गः ।

ततो दशाहेऽतिगते कृतशौचो नृपात्मजः ।
द्वादशेऽहनि संप्राप्ते श्राद्धकर्माण्यकारयत् १
ब्राह्मणेभ्यो धनं रत्नं ददावन्नं च पुष्कलम् ।

---

पालख्यांत, रथांत बसून व बरोबर वृद्धांना घेऊन त्याच्या स्त्रिया नगरांतून निघून तेथें आल्या, अश्वमेधान्त यज्ञ केलेल्या त्या राजाला ऋत्विजांनीं उलट्या प्रदक्षिणा घातल्या त्या वेळीं कौसल्या आदिकरून स्त्रिया फारच शोक करूं लागल्या. दहनाच्या वेळीं हजारों स्त्रिया दुःखानें व्याकुळ होऊन करुण स्वरानें आक्रोश करूं लागल्या असतां, क्रौंचपक्षिणीप्रमाणें त्यांचा शब्द अधिकच भेदक वाटूं लागला. शोकाधीन होऊन रडत असलेल्या त्या सर्व राजस्त्रिया वारंवार विलाप करून सरयू नदीच्या किनाऱ्यावर आपापल्या वाहनांतून खालीं उतरल्या. राजाची उदकक्रिया झाल्यावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेले ते मंत्री, पुरोहित आणि राजस्त्रिया हे सर्व भरतासह नगरीकडे परतले आणि दहा दिवसपर्यंत जमिनीवर निजून व बसून त्या सर्वांनीं अशौच पाळलें.

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शहात्तरावा सर्ग संपला. ॥ ७६ ॥

त्यानंतर दहा दिवस उलटल्यावर बाराव्या दिवशीं प्रेतविमुक्तिदायक एकादशाह श्राद्ध करून शुद्ध झालेल्या भरतानें पुढलीं श्राद्धकर्में करविलीं. धन, रत्नें,

बास्तिकं बहु शुक्लं च गाश्चापि बहुशस्तदा २
दासीदासांश्च यानानि वेश्मानि सुमहान्ति च।
ब्राह्मणेभ्यो ददौ पुत्रो राज्ञस्तस्यौर्ध्वदेहिकम् ३
ततः प्रभातसमये दिवसे च त्रयोदशे।
विललाप महाबाहुर्भरतः शोकमूर्च्छितः ४
शब्दापिहितकण्ठश्च शोधनार्थमुपागतः।
चितामूले पितुर्वाक्यमिदमाह सुदुःखितः ५
तात यस्मिन्निसृष्टोऽहं त्वया भ्रातरि राघवे।
तस्मिन्वनं प्रव्राजिते शून्ये त्यक्तोऽस्म्यहं त्वया ६
यस्या गतिरनाथायाः पुत्रः प्रव्राजितो वनम्।
तामम्बां तात कौसल्यां त्यक्त्वा त्वं क्व गतो नृप ७
दृष्ट्वा भस्मारुणं तच्च दग्धास्थिस्थानमण्डलम्।
पितुः शरीरनिर्वाणं निष्टनन्विषसाद ह ८
स तु दृष्ट्वा रुदन्दीनः पपात धरणीतले।

---

विपुल अन्न, पुष्कळ बोकड, असंख्य रुपें आणि गाई त्यानें ब्राह्मणांना दान दिल्या. राजपुत्र भरतानें त्या राजाचें पारलौकिक हित व्हावें, यासाठीं दासी, दास, रथ आणि मोठमोठीं घरेंही ब्राह्मणांना दान दिलीं. त्यानंतर तेराव्या दिवशीं सकाळीं शोकाकुल झालेल्या त्या महापराक्रमी भरताला पुनः शोकाचें भरतें आलें आणि रडून रडून घसा बसलेला तो भरत चिताभस्म काढून टाकून भूमीची शुद्धि करण्याकरितां पित्याच्या चितेसमीप आल्यावर अत्यंत दुःखी होऊन म्हणाला.(१–५)

"बाबा! ज्या माझ्या भावाच्या रामाच्या–स्वाधीन तुम्ही मला केलें, तो राम वनामध्यें चालता झाल्यामुळें मला कांहीं एक आधार न ठेवतां अगदीच निराधार स्थितींत टाकून दिलें आहे. ज्या अनाथ कौसल्येचा मुख्य आधार असलेल्या पुत्राला वनामध्यें पाठविलें, त्या कौसल्या मातेचा त्याग करून तुम्ही कोठें हो चाललांत!" नंतर ज्यांतील भस्म तांबूस वर्णाचें झालें आहे, ज्यांतील अस्थि जळून गेल्या आहेत आणि ज्यावरील पित्याचें शरीर नाहींसें झालें आहे, असें तें चितास्थान पाहून अत्यंत शोक करूं लागलेला तो भरत फारच कष्टी झाला. इतकेंच

उत्थाप्यमानः शक्रस्य यन्त्रध्वज इवोच्छ्रितः　　९
अभिपेतुस्ततः सर्वे तस्यामात्याः शुचिव्रतम् ।
अन्तकाले निपतितं ययातिमृषयो यथा　　१०
शत्रुघ्नश्चापि भरतं दृष्ट्वा शोकपरिप्लुतम्
विसंज्ञो न्यपतद्भूमौ भूमिपालमनुस्मरन्　　११
उन्मत्त इव निश्चित्तो विललाप सुदुःखितः ।
स्मृत्वा पितुर्गुणाङ्गानि तानि तानि तदा तदा　　१२
मन्थराप्रभवस्तीव्रः कैकेयीग्राहसंकुलः ।
वरदानमयोऽक्षोभ्योऽमज्जयच्छोकसागरः　　१३
सुकुमारं च बालं च सततं लालितं त्वया ।
क्व तात भरतं हित्वा विलपन्तं गतो भवान्　　१४
ननु भोज्येषु पानेषु वस्त्रेष्वाभरणेषु च ।
प्रवारयति सर्वान्नस्तन्नः कोऽद्य करिष्यति　　१५

---

नव्हे तर, तें पाहतांक्षणींच ओक्साबोक्सीं रडूं लागलेला दीन झालेला भरत जमिनी-वर पडला आणि लोकांनीं ज्या वेळीं त्याला उठाविलें, त्या वेळीं तो उंच व धिप्पाड बांध्याचा भरत जमिनीवरून उभारल्या जाणाऱ्या व यंत्रांत कसलेल्या इंद्रध्वजा-प्रमाणें दिसूं लागला. पुण्याचा क्षय झाल्यावर स्वर्गांतून पृथ्वीवर पडलेल्या ययाती-कडे जसे ऋषि धांवून गेले, तसे त्या भरताचे सर्व अमात्य, आचरणानें शुद्ध असलेला तो भरत जमिनीवर पडला असतां, त्याच्याकडे धांवले. (६-१०)

शोकाकुल झालेल्या भरताला पाहून शत्रुघ्नालाहि रामाची आठवण झाली व मूर्च्छा येऊन तो जमिनीवर पडला. पित्याच्या गुणांच्या दर्शक असलेल्या त्या त्या गोष्टी आठवून तो अत्यंत दुःखित झालेला शत्रुघ्न उन्मत्त पुरुषाप्रमाणें भान नाहींसें होऊन विलाप करूं लागला. सारांश, मंथरेमुळें निर्माण झालेल्या, कैकेयीरूप सुसरीनें निवास केलेल्या आणि वरप्रदानरूपी पाण्यानें युक्त व अतिशय खोल अस-लेल्या प्रचंड शोकसागरानें त्या शत्रुघ्नाला बुडवून टाकलें होतें. (११-१३)

तो म्हणाला, " बाबा ! तुम्ही ज्याचे नेहमीं लाड केले, त्या विलाप करीत असलेल्या सुकुमार बालवयाच्या भरताला टाकून देऊन कोठें बरें गेलां आहांत?

अवदारणकाले तु पृथिवी नावदीर्यते ।
विहीना या त्वया राज्ञा धर्मज्ञेन महात्मना १६
पितरि स्वर्गमापन्ने रामे चारण्यमाश्रिते ।
किं मे जीवितसामर्थ्यं प्रवेक्ष्यामि हुताशनम् १७
हीनो भ्रात्रा च पित्रा च शून्यामिक्ष्वाकुपालिताम् ।
अयोध्यां न प्रवेक्ष्यामि प्रवेक्ष्यामि तपोवनम् १८
तयोर्विलपितं श्रुत्वा व्यसनं चाप्यवेक्ष्य तत् ।
भृशमार्ततरा भूयः सर्व एवानुगामिनः १९
ततो विषण्णौ श्रान्तौ च शत्रुघ्नभरतावुभौ ।
धरायां स्म व्यचेष्टेतां भग्नशृङ्गाविवर्षभौ २०
ततः प्रकृतिमान्वैद्यः पितुरेषां पुरोहितः ।
वसिष्ठो भरतं वाक्यमुत्थाप्य तमुवाच ह २१
त्रयोदशोऽयं दिवसः पितुर्वृत्तस्य ते विभो ।

अरे, खाणें पिणें वस्त्रें आणि आभरणें यासंबंधानें यांतलें तुला काय हवें तें घे, असें म्हणून तुम्ही आमची इच्छा तृप्त करीत होतां, ती खरोखर आतां आज कोण हो तृप्त करील? तुम्हासारख्या धर्मज्ञ महात्म्या राजाचा या पृथ्वीला वियोग झाल्यामुळें ती विदीर्ण होऊन जावयाची, पण अजूनहि ती विदीर्ण होऊन जात नाहीं, हें आश्चर्य आहे. पिता स्वर्गस्थ झाला असतां रामानेंही अरण्याचा स्वीकार केला असतां आतां मला जगण्याचें सामर्थ्यच कोठें राहिलें आहे ! मी अग्नीमध्यें प्रवेश करीन ! पिता व भाऊ यांनीं विरहित झालेला मी इक्ष्वाकुवंशजांनीं परिपालन केलेल्या शून्य अयोध्यानगरीमध्यें प्रवेश करणार नाहीं; मी तपोवनांत प्रवेश करीन.'' (१४-१८)

याप्रमाणें त्या दोघांचा विलाप ऐकून व त्यांचें तें दुःख पाहून त्यांच्याबरोबर गेलेले सर्वही लोक पुनः अत्यंत दुःखी झाले. त्यानंतर खिन्न व थकून गेलेले ते उभयतां भरत-शत्रुघ्न शिंगें मोडलेल्या बैलाप्रमाणें पृथ्वीवर लोळूं लागले. तेव्हां सत्त्वनिष्ठ व सर्वज्ञ असे त्यांच्या पित्याचे पुरोहित वसिष्ठमुनि त्या भरताला

सावशेषास्थिनिचये किमिह त्वं विलम्बसे २२
त्रीणि द्वन्द्वानि भूतेषु प्रवृत्तान्यविशेषतः ।
तेषु चापरिहार्येषु नैवं भवितुमर्हसि २३
सुमन्त्रश्चापि शत्रुघ्नमुत्थाप्याभिप्रसाद्य च ।
श्रावयामास तत्त्वज्ञः सर्वभूतभवाभवौ २४
उत्थितौ तौ नरव्याघ्रौ प्रकाशेते यशस्विनौ ।
वर्षातपपरिग्लानौ पृथगिन्द्रध्वजाविव २५
अश्रूणि परिमृन्दन्तौ रक्ताक्षौ दीनभाषिणौ ।
अमात्यास्त्वरयन्ति स्म तनयौ चापराः क्रियाः २६

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तसप्ततितमः सर्गः ॥७७॥ [३०२३]

अष्टसप्ततितमः सर्गः ।

अथ यात्रां समीहन्तं शत्रुघ्नो लक्ष्मणानुजः ।
भरतं शोकसंतप्तमिदं वचनमब्रवीत् १

---

उठवून म्हणाले, "हे प्रभो ! तुझ्या पित्याच्या मरणाला आज हा तेरावा दिवस. तेव्हां शिल्लक राहिलेल्या अस्थि गोळा करावयास तूं आतां येथें वेळ कां लावीत आहेस ? भूक व तहान, शोक आणि मोह व म्हातारपण आणि मरण या तीन दुकली प्राणिमात्रांना एकसारख्याच प्राप्त होत असतात. तेव्हां त्या जर अपरिहार्य आहेत, तर तुला आपली अशी अवस्था करून घेणें योग्य नव्हे." (१९–२३)

याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यानंतर तत्त्ववेत्त्या सुमंत्रानें शत्रुघ्नाला उठवून त्याचें सांत्वन केलें आणि प्राणिमात्रांच्या उत्पत्तिविनाशासंबंधानें त्यानेंही त्याला दोन गोष्टी सांगितल्या. त्यानंतर ते पुरुषश्रेष्ठ यशस्वी भरत–शत्रुघ्न उठले असतां पर्जन्य आणि उष्णता यांच्या योगानें म्लान होऊन गेलेल्या दोन इंद्रध्वजाप्रमाणें दिसूं लागले. ज्यांचे डोळे लाल झाले होते; वाणी अगदीं दीन झाली होती. व जे अश्रु ढाळीत होते, अशा त्या राजकुमारांना पुढची इतर कृत्यें करण्याविषयीं अमात्य घाई करूं लागले. (२४–२६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्याहत्तरावा सर्ग संपला. ॥७७॥

गतिर्यः सर्वभूतानां दुःखे किं पुनरात्मनः ।
स रामः सत्त्वसंपन्नः स्त्रिया प्रव्राजितो वनम् २
बलवान्वीर्यसंपन्नो लक्ष्मणो नाम योऽप्यसौ ।
किं न मोचयते रामं कृत्वापि पितृनिग्रहम् ३
पूर्वमेव तु निग्राह्यः समवेक्ष्य नयानयौ ।
उत्पथं यः समारूढो नार्या राजा वशं गतः ४
इति संभाषमाणे तु शत्रुघ्ने लक्ष्मणानुजे ।
प्राग्द्वारेऽभूत्तदा कुब्जा सर्वाभरणभूषिता ५
लिप्ता चन्दनसारेण राजवस्त्राणि बिभ्रती ।
विविधं विविधैस्तैस्तैर्भूषणैश्च विभूषिता ६
मेखलादामभिश्चित्रैरन्यैश्च वरभूषणैः ।
बभासे बहुभिर्बद्धा रज्जूभिरिव वानरी ७
तां समीक्ष्य तदा द्वाःस्थो भृशं पापस्य कारिणीम् ।
गृहीत्वाकरुणं कुब्जां शत्रुघ्नाय न्यवेदयत् ८

---

त्यानंतर रामाकडे जाण्याविषयीं विचार करणाऱ्या शोकसंतप्त भरताला लक्ष्मणाचा धाकटा भाऊ शत्रुघ्न म्हणाला, "आपली तर गोष्ट पाहिजे कशाला; परंतु दुःखाच्या वेळीं सर्व प्राण्यांनाही आधार असणाऱ्या त्या धैर्यवान् रामाला एका स्त्रीनें वनांत हांकून दिलें. परंतु, बलाढ्य आणि वीर्यवान् म्हणविणाऱ्या त्या लक्ष्मणानें तरी वडिलांना प्रतिबंध करून रामाला कां सोडविलें नाहीं? स्त्रीच्या ताब्यांत जाऊन राजानें जो वाईट मार्गाचा अवलंब केला, त्याचा न्यायान्याय पाहून पूर्वींच प्रतिबंध करणें योग्य होतें." (१–४)

याप्रमाणें लक्ष्मणाचा धाकटा भाऊ शत्रुघ्न बोलत असतांना पूर्वेकडील दरवाज्यांत सर्व प्रकारच्या अलंकारांनीं नटलेली कुबडी मंथरा उभी होती. तिनें उत्कृष्ट चंदनाची उटी लावून राजघराण्यांतील लोकांना योग्य असलेलीं मौल्यवान् वस्त्रें धारण केलीं होतीं, नाना प्रकारच्या भूषणांनीं ती अनेक प्रकारें सजली होती. आणि कमरपट्ट्याचें आश्चर्यकारक पदर आणि इतरही उत्कृष्ट भूषणें यांच्या योगानें ती मंथरा पुष्कळशा दोऱ्यांनीं बांधून ठेवलेल्या वानरीप्रमाणें दिसत होती. वारंवार अनर्थ उत्पन्न करणाऱ्या त्या कुबडीला पहातांक्षणींच तेथील द्वारपालानें निर्दय-

यस्याः कृते वने रामो न्यस्तदेहश्च वः पिता ।
सेयं पापा नृशंसा च तस्याः कुरु यथामति ९
शत्रुघ्नश्च तदाज्ञाय वचनं भृशदुःखितः ।
अन्तःपुरचरान्सर्वानित्युवाच धृतव्रतः १०
तीव्रमुत्पादितं दुःखं भ्रातृणां मे तथा पितुः ।
यथा सेयं नृशंसस्य कर्मणः फलमश्नुताम् ११
एवमुक्त्वा च तेनाशु सखीजनसमावृता ।
गृहीत्वा बलवत्कुब्जा सा तद्गृहमनादयत् १२
ततः सुभृशसंतप्तस्तस्याः सर्वः सखीजनः ।
क्रुद्धमाज्ञाय शत्रुघ्नं व्यपलायत सर्वशः १३
अमन्त्रयत कृत्स्नश्च तस्याः सर्वः सखीजनः ।
यथायं समुपक्रान्तो निःशेषं नः करिष्यति १४
सानुक्रोशां वदान्यां च धर्मज्ञां च यशस्विनीम् ।
कौसल्यां शरणं यामः सा हि नोऽस्ति ध्रुवा गतिः १५

---

पणानें तिला धरून शत्रुघ्नापुढें नेऊन उभी केली व म्हणाला, " जिच्यामुळें राम वनवासांत गेला व जिच्यामुळें तुमच्या पित्याला मृत्यु आला, ती ही दुष्ट पापिणी कुबडी; हिचें आपण हवें तें करा. " (५-९)

हे शब्द ऐकल्याबरोबर शत्रुघ्नाला अत्यंत दुःख झालें आणि व्रतस्थ असणारा तो अंतःपुरावरील सर्व लोकांना म्हणाला, " ज्या अर्थी हिनें माझ्या भावांना व पित्याला भयंकर दुःख दिलें आहे, त्या अर्थी हिला आतां आपल्या दुष्कर्माचें फल भोगूं द्या " असें म्हणून त्या शत्रुघ्नानें सख्यांनीं घेरलेल्या त्या कुबडीला बलात्कारानें एकदम धरली. तेव्हां तिनें तें घर दणाणून दिलें. हें पाहून तिच्या सर्व सख्या अतिशय घाबरून गेल्या आणि शत्रुघ्न रागावला आहे असें पाहून जिकडे वाट सांपडली तिकडे पळून गेल्या. त्यानंतर तिच्या त्या सर्व सख्या आपआपल्यांत म्हणाल्या " ज्या अर्थी हा शत्रुघ्न इतका रागावला आहे, त्या अर्थी हा आतां आपणापैकीं कोणालाही जिवंत ठेवीलसें दिसत नाहीं. तेव्हां दयाळू, उदार, धर्मज्ञ आणि यशस्विनी अशा कौसल्येला आपण शरण जाऊं; ती आपला आधार

स च रोषेण संवीतः शत्रुघ्नः शत्रुशासनः ।
संचकर्ष तदा कुब्जां क्रोशन्तीं पृथिवीतले १६
तस्यां ह्याकृष्यमाणायां मन्थरायां ततस्ततः ।
चित्रं बहुविधं भाण्डं पृथिव्यां तद्व्यशीर्यत १७
तेन भाण्डेन विस्तीर्णं श्रीमद्राजनिवेशनम् ।
अशोभत तदा भूयः शारदं गगनं यथा १८
स बली बलवत्क्रोधाद्गृहीत्वा पुरुषर्षभः ।
कैकेयीमभिनिर्भर्त्स्य बभाषे परुषं वचः १९
तैर्वाक्यैः परुषैर्दुःखैः कैकेयी भृशदुःखिता ।
शत्रुघ्नभयसंत्रस्ता पुत्रं शरणमागता २०
तं प्रेक्ष्य भरतः क्रुद्धं शत्रुघ्नमिदमब्रवीत् ।
अवध्याः सर्वभूतानां प्रमदाः क्षम्यतामिति २१
हन्यामहमिमां पापां कैकेयीं दुष्टचारिणीम् ।
यदि मां धार्मिको रामो नासूयेन्मातृघातकम् २२

---

आहेच आहे. " ( १०-१५ )

इकडे शत्रूंचें शासन करणारा तो शत्रुघ्न रागानें लाल होऊन आक्रोश करीत असलेल्या त्या कुबडीला जमिनीवरून फरफरा ओढूं लागला. त्या मंथरेला अशा तऱ्हेनें तो ओढूं लागला असतां नानाप्रकारचीं तिचीं चित्रविचित्र भूषणें जमिनीवर अस्ताव्यस्त पडलीं व त्या भूषणांनीं तो वैभवसंपन्न विस्तीर्ण राजमहाल शरदृतूंतील आकाशाप्रमाणें फारच शोभूं लागला. असो. त्या पुरुषश्रेष्ठ बलाढ्य शत्रुघ्नानें रागाच्या भरांत बलात्कारानें मंथरेला धरली, त्या वेळीं तिला सोडविण्यासाठीं कैकेयी धांवून आली असतां त्यानें तिला हातानें दूर लोटून अत्यंत मर्मघातक शब्दांनीं तिची निर्भर्त्सना केली. तेव्हां त्या दुःखदायक कठोर भाषणांनीं अत्यंत दुःखी झालेली कैकेयी शत्रुघ्नाच्या भीतीनें गांगरून जाऊन आपल्या पुत्राला-भरताला शरण गेली. ( १६-२० )

तेव्हां रागावलेल्या त्या शत्रुघ्नाकडे पाहून भरत म्हणाला, " स्त्रियांना ठार मारणें निषिद्ध असल्यानें तूं क्षमा कर. अरे ! धर्मनिष्ठ राम मातृघातक म्हणून

इमामपि हतां कुब्जां यदि जानाति राघवः ।
त्वां च मां चैव धर्मात्मा नाभिभाषिष्यते ध्रुवम् २३
भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नो लक्ष्मणानुजः ।
न्यवर्तत ततो दोषात्तां मुमोच च मूर्च्छिताम् २४
सा पादमूले कैकेय्या मन्थरा निपपात ह ।
निःश्वसन्ती सुदुःखार्ता कृपणं विललाप ह २५
शत्रुघ्नविक्षेपविमूढसंज्ञां समीक्ष्य कुब्जां भरतस्य माता ।
शनैः समाश्वासयदार्तरूपां क्रौञ्चीं विलग्नामिव वीक्षमाणाम् २६

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टसप्ततितमः सर्गः ॥७८॥ [३०४९]

एकोनाशीतितमः सर्गः ।

ततः प्रभातसमये दिवसेऽथ चतुर्दशे ।
समेत्य राजकर्तारो भरतं वाक्यमब्रुवन् १
गतो दशरथः स्वर्गं यो नो गुरुतरो गुरुः ।

---

जर मला दोष देणार नसेल तर मी या दुराचारिणी दुष्ट कैकेयीला ठार मारून टाकीन; परंतु या कुबडीलाही मारल्याचें जर त्याला समजलें तर तो धर्मात्मा राम खरोखर तुझ्याशीं आणि माझ्याशीं भाषणसुद्धां करणार नाहीं. ” हें भरताचें भाषण ऐकून लक्ष्मणाचा धाकटा भाऊ शत्रुघ्न त्या स्त्री–वधा पासून परावृत्त झाला आणि मूर्च्छित पडलेल्या त्या कुबड्या मंथरेला त्यानें सोडून दिलें. अत्यंत दुःखित झालेली ती मंथरा कैकेयीच्या पायांशीं येऊन पडली आणि हुंदके देत व सुस्कारे टाकीत टाकीत करुण स्वरानें विलाप करूं लागली. तेव्हां शत्रुघ्नाच्या हिसडाहिसडीमुळें बेशुद्ध होऊन, गांगरून गेलेल्या क्रौंच पक्षिणीप्रमाणें कैकेयीच्या तोंडाकडे पाहूं लागलेल्या त्या घाबरलेल्या कुबडीला पाहून भरताच्या आईनें हळूं हळूं तिचें सांत्वन केलें. ( २१-२६ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्ठयाहत्तरावा सर्ग संपला. ॥७८॥

त्यानंतर चौदाव्या दिवशीं सकाळच्या वेळीं राजकार्यधुरंधर पुरुष एकत्र जमून भरताला म्हणाले, “ आमच्या गुरूच्याही गुरु दशरथ राजानें ज्येष्ठ राम

रामं प्रव्राज्य वै ज्येष्ठं लक्ष्मणं च महाबलम् २
त्वमद्य भव नो राजा राजपुत्र महायशः ।
संगत्या नापराध्नोति राज्यमेतदनायकम् ३
आभिषेचनिकं सर्वमिदमादाय राघव ।
प्रतीक्षते त्वां स्वजनः श्रेणयश्च नृपात्मज ४
राज्यं गृहाण भरत पितृपैतामहं ध्रुवम् ।
अभिषेचय चात्मानं पाहि चास्मान्नरर्षभ ५
आभिषेचनिकं भाण्डं कृत्वा सर्वं प्रदक्षिणम् ।
भरतस्तं जनं सर्वं प्रत्युवाच धृतव्रतः ६
ज्येष्ठस्य राजता नित्यमुचिता हि कुलस्य नः ।
नैवं भवन्तो मां वक्तुमर्हन्ति कुशला जनाः ७
रामः पूर्वो हि नो भ्राता भविष्यति महीपतिः ।
अहं त्वरण्ये वत्स्यामि वर्षाणि नव पञ्च च ८
युज्यतां महती सेना चतुरङ्गमहाबला ।
आनयिष्याम्यहं ज्येष्ठं भ्रातरं राघवं वनात् ९

---

व महाबलाढ्य लक्ष्मण यांना वनवासांत पाठवून स्वर्गाचा मार्ग धरला. तेव्हां हे महाकीर्तिमान् राजपुत्रा ! तूं आमचा राजा हो. तूं राजा व्हावें, अशी तुझ्या वडिलांची आज्ञा असल्यामुळें तुझ्याकडे कांहींच दोष येणार नाहीं. हल्लीं या राज्याला कोणी नायक नाहीं. हे रघुवंशज राजपुत्रा ! अभिषेकाची सर्व तयारी करून हे आप्तेष्ट व नगरवासी लोक तुझी वाट पहात आहेत. भरता ! आजोबा व वडील यांच्या परंपरेनें चालत आलेल्या या अक्षय राज्याचा तूं स्वीकार कर आणि हे पुरुषश्रेष्ठा ! स्वतः राज्याभिषिक्त होऊन आमचें परिपालन कर.' (१–५)

याप्रमाणें त्यांनीं सांगितलें असतां अभिषेकाच्या त्या सर्व साहित्याला प्रदक्षिणा करून तो व्रतस्थ भरत तेथें जमलेल्या सर्व लोकांना म्हणाला, "हे श्रेष्ठ लोक हो ! ज्येष्ठाला राज्य मिळावें, ही आमच्या कुलांतील पद्धत आहे. तेव्हां मला उद्देशून असें बोलणें तुम्हांला योग्य नाहीं. आमचा ज्येष्ठ भाऊ रामच राजा होईल आणि मी अरण्यामध्यें चौदा वर्षें घालवीन. हत्ती, रथ, घोडेस्वार

आभिषेचनिकं चैव सर्वमेतदुपस्कृतम् ।
पुरस्कृत्य गमिष्यामि रामहेतोर्वनं प्रति १०
तत्रैव तं नरव्याघ्रमभिषिच्य पुरस्कृतम् ।
आनयिष्यामि वै रामं हव्यवाहमिवाध्वरात् ११
न सकामां करिष्यामि स्वामिमां पुत्रगृद्धिनीम् ।
वने वत्स्याम्यहं दुर्गे रामो राजा भविष्यति १२
क्रियतां शिल्पिभिः पन्थाः समानि विषमाणि च ।
रक्षिणश्चानुसंयान्तु पथि दुर्गविचारकाः १३
एवं संभाषमाणं तं रामहेतोर्नृपात्मजम् ।
प्रत्युवाच जनः सर्वः श्रीमद्वाक्यमनुत्तमम् १४
एवं ते भाषमाणस्य पद्मा श्रीरुपतिष्ठताम् ।
यस्त्वं ज्येष्ठे नृपसुते पृथिवीं दातुमिच्छसि १५
अनुत्तमं तद्वचनं नृपात्मजः प्रभाषितं संश्रवणे निशम्य च ।

आणि पायदळ अशा मोठ्या चतुरंगबलांनीं युक्त असलेली प्रचंड सेना तयार करा. मी ज्येष्ठ राघवाला–भावाला वनांतून घेऊन येतों. हें सर्व अभिषेकाचें सामान पुढें घालून मी रामाकरितां वनांत जाणार आणि तेथेंच त्या पुरुषश्रेष्ठ रामाला अभिषेक करून यज्ञशालेपासून अग्नि ज्याप्रमाणें घरीं आणतात, त्याप्रमाणें रामाला पुढें घालून मी त्याला घेऊन येईन. पुत्राकरितां राज्याचा अभिलाष धरणाऱ्या या माझ्या मातेचा मनोरथ मी सिद्धीस नेणार नाहीं. सारांश, दुर्गम वनामध्ये राहण्याचें मी पत्करीन आणि राम राजा होईल. मजुरांकडून मार्ग तयार करवा. ज्या प्रदेशांवर चढउतार असेल, तो प्रदेश रथ जातां येण्याजोगा सारखा करा आणि दुर्गम प्रदेशांतून सुरक्षितपणें नेणारे मार्गरक्षक बरोबर असूं द्या." ( ६-१३ )

याप्रमाणें भाषण करीत असलेल्या त्या राजकुमार भरताला तेथें जमलेले सर्व लोक शुभ शब्दांनीं म्हणाले, "ज्या अर्थी ज्येष्ठ राजपुत्राला पृथ्वी देण्याची इच्छा करीत आहेस, त्या अर्थी याप्रमाणें भाषण करणाऱ्या तुझ्या गळयांत कमल-निवासिनी लक्ष्मी माळ घालो!" लोकांनीं उच्चारलेलें तें उत्कृष्ट आशीर्वचन

प्रहर्षजास्तं प्रतिबाष्पबिन्दवो निपेतुरार्याननेत्रसंभवाः १६
ऊचुस्ते वचनमिदं निशम्यहृष्टाः सामात्याः सपरिषदो वियातशोका
पन्थानं नरवर भक्तिमाञ्जनश्च व्यादिष्टस्तव वचनाच्च शिल्पिवर्गः
इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकोनाशीतितमः सर्गः॥७९॥[२०६६]

अशीतितमः सर्गः ।

अथ भूमिप्रदेशज्ञाः सूत्रकर्मविशारदाः ।
स्वकर्माभिरताः शूराः खनका यन्त्रकास्तथा १
कर्मान्तिकाः स्थपतयः पुरुषा यन्त्रकोविदाः ।
तथावर्धकयश्चैव मार्गिणो वृक्षतक्षकाः २
सूपकाराः सुधाकारा वंशचर्मकृतस्तथा ।
समर्था ये च द्रष्टारः पुरतश्च प्रतस्थिरे ३
स तु हर्षात्तमुद्देशं जनौघो विपुलः प्रयान् ।
अशोभत महावेगः सागरस्येव पर्वणि ४

---

ऐकून राजकुमार भरताला आनंद झाला आणि त्या लोकांचें प्रेम पाहून त्याबद्दल आर्य भरताच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले. असो. हें भरताचें भाषण ऐकल्यावर सभेंतील लोक आणि अमात्य यांसह ते सर्व लोक अगदीं शोक-रहित होऊन आनंदीत झाले आणि त्याला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्यावर प्रेम करणाऱ्या या लोकांना तुझ्या सांगण्यावरून मार्ग तयार करण्याविषयीं आणि रक्षकांना रक्षण करण्याविषयीं आज्ञा केली आहे. "( १४-१७)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकूणऐंशीवा सर्ग संपला.॥ ७९ ॥

त्यानंतर त्या प्रदेशाची पूर्ण माहिती असणारे, गवंडी, खणणारे आणि जल-प्रवाहाला प्रतिबंध करणारे असे आपआपल्या कर्मामध्यें दक्ष असलेले कारागीर लोक, मजूर, रथ वगैरे करणारे, यंत्रांची माहिती असलेले लोक, सुतार, मार्ग-रक्षक, झाडें तोडणारे, आचारी, सफेती देणारे, बुरूड, चांभार आणि पुढचा मार्ग बिनधोक आहे हें नीट पाहून, त्या मार्गानें आपल्या मागाहून येणाऱ्यांस नेणारे मार्गदर्शक वाटाडे लोक पुढें निघाले. तो प्रचंड जनसमूह मोठ्या आनंदानें

ते स्ववारं समास्थाय वर्त्मकर्मणि कोविदाः।
करणैर्विविधोपेतैः पुरस्तात्संप्रतस्थिरे ५
लता वल्लीश्च गुल्मांश्च स्थाणूनश्मन एव च।
जनास्ते चक्रिरे मार्गं छिन्दन्तो विविधान्द्रुमान् ६
अवृक्षेषु च देशेषु केचिद्वृक्षानरोपयन्।
केचित्कुठारैष्टङ्कैश्च दात्रैश्छिन्दन्क्वचित् क्वचित् ७
अपरे वीरणस्तम्बान्बलिनो फलवत्तराः।
विधमन्ति स्म दुर्गाणि स्थलानि च ततस्ततः ८
अपरेऽपूरयन्कूपान्पांसुभिः श्वभ्रमायतम्।
निम्नभागास्तथैवाशु समांश्चक्रुः समन्ततः ९
बबन्धुर्बन्धनीयांश्च क्षोद्यान्संचुक्षुदुस्तथा।
बिभिदुर्भेदनीयांश्च तांस्तान्देशान्नरास्तदा १०

---

त्या प्रदेशावरून जाऊं लागला असतां पर्वकाळीं शोभणाऱ्या सागराच्या जलराशीप्रमाणें शोभूं लागला. ( १-४ )

मार्ग करण्यांत निपुण असलेले ते लोक आपापल्या समुदायाचा आश्रय करून नानाप्रकारच्या साधनांसह पुढें चालूं लागले आणि फांद्या, वेलीं, झुडपें, सड आणि धोंडे एकीकडे करून आणि अनेक प्रकारचे वृक्ष तोडून त्यांनीं मार्ग तयार केला. वृक्षविरहित प्रदेशामध्यें कांहींनीं नवीन वृक्ष लाविले, कांहीं लोक कुऱ्हाडी, टाक्या आणि कोयते घेऊन मार्गांतील झाडें तोडूं लागले व मोठमोठे धोंडे फोडून काढूं लागले. कांहीं फारच बलाढ्य लोक खोल मुळें गेलेलीं वाळ्याचीं बेटें हातांनींच उपटून टाकूं लागले आणि कांहीं लोक उंचसखल व अवघड ठिकाणें खोरीं कुदळीं घेऊन साफ करूं लागले. दुसरे कांहीं लोक मार्गामध्यें असलेले आड व तशाच प्रकारचे मोठमोठे खड्डे माती टाकून भरून काढूं लागले आणि त्याचप्रमाणें सखल प्रदेश माती टाकून साफ करूं लागले. कांहीं जण पाट वगैरे बांधून काढूं लागले, कांहीं पायाला बोचणाऱ्या खड्यांचें पीठ करूं लागले व मार्गांतील पाणी निघून जाण्याकरितां कांहीं जण त्यासाठीं वाट करून देऊं लागले. ( ५-१० )

अचिरेण तु कालेन परिवाहान्बहूदकान् ।
चक्रुर्बहुविधाकारान्सागरप्रतिमान्बहून् ११
निर्जलेषु च देशेषु खानयामासुरुत्तमान् ।
उदपानान्बहुविधान्वेदिकापरिमण्डितान् १२
ससुधाकुट्टिमतलः प्रपुष्पितमहीरुहः ।
मत्तोद्घुष्टद्विजगणः पताकाभिरलंकृतः १३
चन्दनोदकसंसिक्तो नानाकुसुमभूषितः ।
बह्वशोभत सेनायाः पन्थाः सुरपथोपमः १४
आज्ञाप्याथ यथाज्ञप्ति युक्तास्तेऽधिकृता नराः ।
रमणीयेषु देशेषु बहुस्वादुफलेषु च १५
यो निवेशस्त्वभिप्रेतो भरतस्य महात्मनः ।
भूयस्तं शोभयामासुर्भूषाभिर्भूषणोपमम् १६
नक्षत्रेषु प्रशस्तेषु मुहूर्तेषु च तद्विदः ।
निवेशान्स्थापयामासुर्भरतस्य महात्मनः १७

याप्रमाणें थोडक्याच वेळांत त्या लोकांनीं ठिकठिकाणच्या अनेक प्रदेशांना नानाप्रकारचे आकार आणले आणि जेथें पाण्याचे प्रवाह अगदीं लहान होते, तेथें बांध वगैरे घालून त्यांनीं ते प्रवाह सागराप्रमाणें भरपूर पाण्यानें युक्त करून सोडले. निर्जन प्रदेशामध्यें कांहीं लोकांनीं विहिरी वगैरे नानाप्रकारचे उत्कृष्ट जलाशय खणून तयार केले आणि भोंवतालीं कट्टे बांधून त्यांना सुशोभित केलें. तेव्हां विटेबंदी व फरशा यांनीं बांधून काढलेला, प्रफुल्लित वृक्ष व ध्वनि करणारे मत्त पक्षिसमुदाय यांनीं सुशोभित व रमणीय झालेला, पताकांनीं नटलेला, गंधोदक शिंपडलेला आणि नानाप्रकारच्या फुलांनीं शृंगारलेला असा तो देवाच्या मार्गाप्रमाणें झालेला सैनिकांचा मार्ग फारच शोभूं लागला. ( ११–१४ )

मार्ग तयार करण्याकडे नेमलेल्या अधिकारी पुरुषांनीं आज्ञेप्रमाणें मार्ग तयार झाल्याची वर्दी दिल्यानंतर रमणीय आणि विपुल व स्वादिष्ट फलांनीं युक्त अशा प्रदेशामध्यें, खास महात्म्या भरताच्या राहण्यासाठीं जीं शिबिरें उभारलीं होतीं, त्यांच्या योगानें मार्गाला शोभा यावी, म्हणून तीं अलंकारादिकांनीं अधिक

बहुपांसुचयाश्चापि परिखाः परिवारिताः ।
तत्रेन्द्रनीलप्रतिमाः प्रतोलीवरशोभिताः १८
प्रासादमालासंयुक्ताः सौधप्राकारसंवृताः ।
पताकाशोभिताः सर्वे सुनिर्मितमहापथाः १९
वितर्दिभिरिवाकाशे विटङ्काग्रविमानकैः ।
समुच्छ्रितैर्निवेशास्ते बभुः शक्रपुरोपमाः २०
जाह्नवीं तु समासाद्य विविधद्रुमकाननाम् ।
शीतलामलपानीयां महामीनसमाकुलाम् २१
सचन्द्रतारागणमण्डितं यथा नभः क्षपायाममलं विराजते ।
नरेन्द्रमार्गः स तदा व्यराजत क्रमेण रम्यः शुभशिल्पिनिर्मितः २२

इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽशीतितमः सर्गः ॥८०॥ [२०८८]

---

सुशोभित केलीं होतीं. या ठिकठिकाणीं महात्म्या भरताचीं शिबिरें उभारण्याच्या कामास शुभ नक्षत्रें व शुभ मुहूर्त पाहून तज्ज्ञ लोकांनीं आरंभ केला होता. त्या शिबिरांभोंवतीं खंदकासह बांधलेले कोट इंद्रकील पर्वताप्रमाणें उंच उंच असून उत्कृष्ट मार्गांनीं सुशोभित झालेले होते व मातीचे असंख्य गोळे एकावर एक रचून ते तयार केलेले होते. असो. ( १५-१८ )

त्या सर्व शिबिरांत मोठमोठे प्रासाद व मोठमोठे राजवाडे तयार केले असून ते पताकांनीं सुशोभित केलेले होते आणि त्यांत जाण्याकरितां मोठमोठे रस्ते उत्कृष्ट रीतीनें तयार केले होते. कबूतरांच्या घरट्यांनीं युक्त आणि आकाशांतील वेदीप्रमाणें दिसणाऱ्या सात सात मजली उंच इमारतींनीं युक्त असलेलीं तीं शिबिरें इंद्राच्या नगरीप्रमाणें दिसत होतीं. शीतल व निर्मल उदकानें युक्त, मोठमोठ्या जलचर प्राण्यांनीं व्याप्त आणि नानाप्रकारच्या वृक्षवनांनीं संपन्न अशा जान्हवीच्या उत्तरतीराला नेऊन भिडविलेला व कुशल कारागिरांनीं उत्तरोत्तर अधिकच रमणीय बनविलेला असा तो राजमार्ग-चंद्रासह तारांगणांनीं मंडित झालेलें निर्मल आकाश ज्याप्रमाणें रात्रीं शोभूं लागतें, त्याप्रमाणें, शोभूं लागला. ( १९-२२ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ऐंशींवा सर्ग संपला. ॥८०॥

एकाशीतितमः सर्गः ।

ततो नान्दीमुखीं रात्रिं भरतं सूतमागधाः ।
तुष्टुवुः सविशेषज्ञाः स्तवैर्मङ्गलसंस्तवैः १
सुवर्णकोणाभिहतः प्राणद्यामदुन्दुभिः ।
दध्मुः शङ्खांश्च शतशो वाद्यांश्चोच्चावचस्वरान् २
स तूर्यघोषः सुमहान्दिवमापूरयन्निव ।
भरतं शोकसंतप्तं भूयः शोकैररन्ध्रयत् ३
ततः प्रबुद्धो भरतस्तं घोषं संनिवर्त्य च ।
नाहं राजेति चोक्त्वा तं शत्रुघ्नमिदमब्रवीत् ४
पश्य शत्रुघ्न कैकेय्या लोकस्यापकृतं महत् ।
विसृज्य मयि दुःखानि राजा दशरथो गतः ५
तस्यैषा धर्मराजस्य धर्ममूला महात्मनः ।
परिभ्रमति राजश्रीर्नौरिवाकर्णिका जले ६
यो हि नः सुमहान्नाथः सोऽपि प्रव्राजितो वने ।

त्यानंतर भरताला ज्या दिवशीं अभिषेक करावयाचें वसिष्ठांनीं ठरविलें होतें, त्या दिवसापूर्वीची रात्र थोडीच राहिली आहे असें पाहून स्तुति करण्यांत विशेष वाकबगार असलेले सूत व मागध मंगलकारक स्तवांनीं भरताची स्तुति करूं लागले. प्रहराप्रहरानें वाजणारी नौबद सोन्याचीं टिपरीं वर पडूं लागलीं असतां वाजूं लागली आणि वाद्यें वाजविणारे लोक शंख व लहान मोठे ध्वनि निर्माण करणारीं इतरही शेंकडों वाद्यें वाजवूं लागले. परंतु आकाश दुमदुमून टाकणाऱ्या त्या प्रचंड वाद्यघोषानें आधींच शोकसंतप्त झालेल्या भरताला पुनः अधिकच शोकग्रस्त करून टाकलें. तेव्हां भरत जागा झाला आणि "मी राजा नव्हे" असें म्हणून तो वाद्यघोष बंद करवून शत्रुघ्नाला म्हणाला, "शत्रुघ्ना ! कैकेयीमुळें माझ्यासंबंधींचा लोकांचा हा मोठा अयोग्य कारभार पहा. अशा प्रकारचीं दुःखें माझ्यावर सोपवून जो राजा स्वर्गाला चालता झाला, त्या महात्म्या धर्मराज दशरथाची ही धर्ममूलक राज्यलक्ष्मी उदकांत गोते खाणाऱ्या व नावाडी नसलेल्या

अनया धर्ममुत्सृज्य मात्रा मे राघवः स्वयम् ७
इत्येवं भरतं वीक्ष्य विलपन्तमचेतनम् ।
कृपणा रुरुदुः सर्वाः सुस्वरं योषितस्तदा ८
तथा तस्मिन्विलपति वसिष्ठो राजधर्मवित् ।
सभामिक्ष्वाकुनाथस्य प्रविवेश महायशाः ९
शातकुम्भमयीं रम्यां मणिहेमसमाकुलाम् ।
सुधर्मामिव धर्मात्मा सगणः प्रत्यपद्यत १०
स काञ्चनमयं पीठं स्वस्त्यास्तरणसंवृतम् ।
अध्यास्त सर्ववेदज्ञो दूताननुशशास च ११
ब्राह्मणान्क्षत्रियान्योधानमात्यान् गणवल्लभान् ।
क्षिप्रमानयताव्यग्राः कृत्यमात्ययिकं हि नः १२
सराजपुत्रं शत्रुघ्नं भरतं च यशस्विनम् ।
युधाजितं सुमन्त्रं च ये च तत्र हिता जनाः १३

---

नौकेप्रमाणें हल्लीं भ्रमण करीत आहे. आमचा जो अतिपूज्य प्रभु राम त्यालाहीं या मातेनें धर्माकडे डोळेझांक करून स्वतः वनामध्यें हांकून दिलें आहे." (१-७)

याप्रमाणें भांबवून गेलेला तो भरत विलाप करीत असल्याचें पाहून त्या बापड्या सर्व स्त्रिया गळा काढून रडूं लागल्या. अशाप्रकारें तो भरत विलाप करीत असतांना राजधर्म जाणणारे महाकीर्तिमान् वसिष्ठमुनि इक्ष्वाकुराजाच्या सभेमध्यें आले. ती रमणीय सभा सुवर्णाचीच केलेली असून रत्नमय व सुवर्णमय सामानानें संपन्न होती आणि देवसभेप्रमाणें असलेल्या त्या सभेंत धर्मात्म्या वसिष्ठमुनींनी आपल्या शिष्यगणासह प्रवेश केला व स्वस्तिकाकार मंडलांनीं युक्त असलेलें आच्छादन ज्याच्यावर घातलें आहे अशा सुवर्णमय आसनावर बसल्यानंतर त्या सर्व वेदवेत्त्या वसिष्ठमुनींनीं दूतांना अशी आज्ञा केली-" हे स्वकार्यांत दक्ष असणाऱ्या दूतांनो! ब्राह्मण, क्षत्रिय, योद्धे, अमात्य, सेनानायक, इतर राजकुमारांसह शत्रुघ्न, यशस्वी भरत, युधाजित, सुमंत्र आणि जे कांहीं हित इच्छिणारे लोक असतील, ते अशा सर्वांना तुम्हीं लवकर आंत घेऊन या; आमचें अत्यंत निकडीचें काम आहे." (८-१३)

ततो हलहलाशब्दो महान्समुदपद्यत ।
रथैरश्वैर्गजैश्चापि जनानामुपगच्छताम् १४
ततो भरतमायान्तं शतक्रतुमिवामराः ।
प्रत्यनन्दन्प्रकृतयो यथा दशरथं तथा १५
ह्रद इव तिमिनागसंवृतः स्तिमितजलो मणिशङ्खशार्करः ।
दशरथसुतशोभिता सभा सदशरथेव बभूव सा पुरा १६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकाशीतितमः सर्गः॥८१॥

द्व्यशीतितमः सर्गः। [ ३१०४ ]

तामार्यगणसंपूर्णां भरतः प्रग्रहां सभाम् ।
ददर्श बुद्धिसंपन्नः पूर्णचन्द्रां निशामिव १
आसनानि यथान्यायमार्याणां विशतां तदा ।
वस्त्राङ्गरागप्रभया द्योतिता सा सभोत्तमा २

---

याप्रमाणें वसिष्ठांची आज्ञा झाल्यानंतर रथ, घोडे आणि हत्ती यांवर आरूढ होऊन लोक येऊं लागले असतां मोठाच कोलाहल माजला. इंद्र येऊं लागला असतां देव ज्याप्रमाणें त्याला अभिवंदन करूं लागतात, त्याप्रमाणें अमात्य, दशरथाला जसें अभिवादन करीत होते तशाच रीतीनें सभेंत येऊं लागलेल्या भरताचें अभिवादन करूं लागले. दशरथपुत्र भरताच्या आगमनानें सुशोभित झालेली ती सभा तेजोरूप जल, चित्रांतील तिमिमत्स्य, गज, शंख, भिंतीवरील सोनेरी रंग आणि खांबावर वगैरे असलेलीं रत्नें यांनीं युक्त असल्यामुळें तिमिमत्स्य व जलगज यांनीं व्याप्त, स्थिर पाण्यानें युक्त आणि रत्नें, शंख व सुवर्णमृत्तिका यांनीं युक्त असलेल्या डोहाप्रमाणें भासूं लागली आणि दशरथाप्रमाणेंच भरत असल्यामुळें पूर्वींप्रमाणें दशरथासहित असल्यासारखीच दिसूं लागली. ( १४–१६ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एक्यांयशीवा सर्ग संपला ॥ ८१ ॥

श्रेष्ठ लोकांनीं भरलेली आणि वसिष्ठप्रभृतींनीं अधिष्ठित असलेली ती सभा गुरु आदि करून श्रेष्ठ ग्रह व पूर्ण चंद्र यांनीं युक्त असलेल्या रात्रीप्रमाणें बुद्धिमान् भरतानें पाहिली. सभेंतील लोक आपआपल्या आसनावर बसूं लागले असतां

सा विद्वज्जनसंपूर्णा सभासु रुचिरा तथा।
अदृश्यत घनापाये पूर्णचन्द्रेव शर्वरी ३
राज्ञस्तु प्रकृतीः सर्वाः स संप्रेक्ष्य च धर्मवित्।
इदं पुरोहितो वाक्यं भरतं मृदु चाब्रवीत् ४
तात राजा दशरथः स्वर्गतो धर्ममाचरन्।
धनधान्यवतीं स्फीतां प्रदाय पृथिवीं तव ५
रामस्तथा सत्यवृत्तिः सतां धर्ममनुस्मरन्।
नाजहात्पितुरादेशं शशी ज्योत्स्नामिवोदितः ६
पित्रा भ्रात्रा च ते दत्तं राज्यं निहतकण्टकम्।
तद्भुङ्क्ष्व मुदितामात्यः क्षिप्रमेवाभिषेचय ७
उदीच्याश्च प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च केवलाः।
कोट्यापरान्ताः सामुद्रा रत्नान्युपहरन्तु ते ८
तच्छ्रुत्वा भरतो वाक्यं शोकेनाभिपरिप्लुतः।
जगाम मनसा रामं धर्मज्ञो धर्मकाङ्क्षया ९

---

त्यांचीं वस्त्रें व अंगाला लाविलेली उटी यांच्या प्रभेनें ती उत्कृष्ट सभा फारच सुशोभित दिसूं लागली आणि अत्यंत मनोहर अशी ती विद्वज्जनांनीं भरलेली सभा पूर्णचंद्रानें युक्त असलेल्या शरदृतूंतील रात्रीप्रमाणें दिसूं लागली. असो, भरत सभेमध्यें आल्यानंतर ते धर्मवेत्ते पुरोहित वसिष्ठमुनि राजाच्या सर्व अमात्यांकडे पाहून हलक्या आवाजांत भरताला म्हणाले, "भरता! सत्यपरिपालनरूपी धर्मानें वागणारा तुझा पिता दशरथराजा धनधान्यांनीं युक्त असलेली ही समृद्ध पृथ्वी तुला देऊन स्वर्गाला गेला व त्याप्रमाणें सत्यानें वागणाऱ्या रामानें सज्जनांनीं आचरिलेल्या धर्माकडे लक्ष देऊन, उदय पावलेला चंद्र ज्याप्रमाणें चंद्रिकेचा त्याग करीत नाहीं त्याचप्रमाणें, आपल्या पित्याच्या आज्ञेचा त्याग केला नाहीं. तर तूं स्वतःला अभिषेक करून घे आणि पित्यानें व भावानें तुला दिलेल्या या निष्कंटक राज्याचा तूं आनंदित अमात्यांसह उपभोग घे. उत्तरेकडील पश्चिमेकडील, दक्षिणेकडील व पूर्वेकडील देशांत राहणारे, समुद्रांत वास्तव्य करणारे मांडलिक राजे तुला रत्नांनीं युक्त नजराणे आणून देवोत." (१-८)

सबाष्पकलया वाचा कलहंसस्वरो युवा ।
विललाप सभामध्ये जगर्हे च पुरोहितम् १०
चरितब्रह्मचर्यस्य विद्यास्नातस्य धीमतः ।
धर्मे प्रयतमानस्य को राज्यं मद्विधो हरेत् ११
कथं दशरथाज्जातो भवेद्राज्यापहारकः ।
राज्यं चाहं च रामस्य धर्मं वक्तुमिहार्हसि १२
ज्येष्ठः श्रेष्ठश्च धर्मात्मा दिलीपनहुषोपमः ।
लब्धुमर्हति काकुत्स्थो राज्यं दशरथो यथा १३
अनार्यजुष्टमस्वर्ग्यं कुर्यां पापमहं यदि ।
इक्ष्वाकूणामहं लोके भवेयं कुलपांसनः १४

हें वसिष्ठांचें भाषण ऐकल्यावर भरताला पुनः शोकाचें भरतें आलें आणि तो धर्मज्ञ भरत धर्माला अनुसरून वागण्याची इच्छा धरून मनामध्यें रामाचें स्मरण करूं लागला व नंतर कलहंसाप्रमाणें मधुर स्वरानें युक्त असलेला तो तरुण भरत अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत सभेमध्यें विलाप करूं लागला व " आपण सर्वज्ञ असून असें अनुचित कर्म करण्याला मला कसें सांगतां ? " असें पुरोहित वसिष्ठांना भर सभेमध्यें बोलला. तो म्हणाला, " ब्रह्मचर्यव्रताचें परिपालन करून विद्यापारंगत झालेल्या धर्माविषयीं तत्पर असलेल्या विवेकी रामाचें राज्य हिरावून घेण्यास माझ्यासारखा कोण बरें तयार होईल ? दशरथापासून उत्पन्न झालेला पुत्र राज्याचा* अपहार करणारा कसा बरें होईल ? राज्य आणि मी या दोहोंचाही स्वामी रामच आहे. याचा विचार करून आपण आम्हांस धर्ममार्गाचाच उपदेश करीत जा ! दिलीप आणि नहुष यांची बरोबरी करणारा धर्मात्मा ककुत्स्थकुलोत्पन्न राम ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे आणि म्हणूनच दशरथाप्रमाणें त्यालाच राज्य मिळणें योग्य आहे. आर्यांनीं कधींही न केलेलें असें स्वर्गप्राप्तीस प्रतिबंधक पापकर्म जर मीं केलें

* कांहीं तरी निमित्त उपस्थित करून अगर आपोआप उपस्थित झालें असतां त्याचा फायदा घेऊन उगीच एखाद्याचें राज्य हरण करण्याची पद्धति या भरतखंडांतील धर्मज्ञ राजांनीं स्वीकारलेली नव्हती, असें या श्लोकांवरून दिसतें.

यदि मात्रा कृतं पापं नाहं तदपि रोचये ।
इहस्थो वनदुर्गस्थं नमस्यामि कृताञ्जलिः १५
राममेवानुगच्छामि स राजा द्विपदां वरः ।
त्रयाणामपि लोकानां राघवो राज्यमर्हति १६
तद्वाक्यं धर्मसंयुक्तं श्रुत्वा सर्वे सभासदः ।
हर्षान्मुमुचुरश्रूणि रामे निहितचेतसः १७
यदि त्वार्यं न शक्ष्यामि विनिवर्तयितुं वनात् ।
वने तत्रैव वत्स्यामि यथार्यो लक्ष्मणस्तथा १८
सर्वोपायं तु वर्तिष्ये विनिवर्तयितुं बलात् ।
समक्षमार्यमिश्राणां साधूनां गुणवर्तिनाम् १९
विष्टिकर्मान्तिकाः सर्वे मार्गशोधकदक्षकाः ।
प्रस्थापिता मया पूर्वं यात्रा च मम रोचते २०
एवमुक्त्वा तु धर्मात्मा भरतो भ्रातृवत्सलः ।
समीपस्थमुवाचेदं सुमन्त्रं मन्त्रकोविदम् २१

---

तर मी या जगामध्यें इक्ष्वाकूंच्या कुलाला कलंक लावल्याचें श्रेय मला मिळेल. मातेनें हें जें पाप केलें आहे, तेंही मला संमत नाहीं. वनरूपी भयंकर प्रदेशा-शामध्यें रहाणाऱ्या रामाला मी येथूनच नमस्कार करीत करीत जाईन. मी रामाच्याच पाठोपाठ चालला होतों. तो पुरुषश्रेष्ठ रामच या राज्याचा राजा आहे; इतकेंच नव्हे तर त्रैलोक्याचेंही राज्य करण्याला तो योग्य आहे.'' (९-१६)

हें धर्माला अनुसरून असलेलें भरताचें भाषण ऐकल्यावर रामाकडे अंतः-करण लागून राहिलेल्या सर्व सभासदांच्या नेत्रांतून आनंदाश्रु गळूं लागले. भरत पुनः म्हणाला, "आर्य रामाला वनांतून परत आणण्यास जर मी समर्थ झालों नाहीं, तर आर्य लक्ष्मणाप्रमाणें मीही तेथें वनांत राहीन. मी आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून सज्जन व गुणसंपन्न अशा तुम्हां पूज्य लोकांसमक्ष रामाला वनांतून परत आणण्याविषयीं सर्व उपाय अंमलांत आणीन. वेठ वाहणारे आणि मजुरीचे असे सर्व मार्गशोधक व दक्ष लोक मी आधींच पुढें पाठविले आहेत आणि रामाच्या मागोमाग वनांत जाणेंच मला इष्ट वाटत आहे'' याप्रमाणें बोलून

तूर्णमुत्थाय गच्छ त्वं सुमन्त्र मम शासनात् ।
यात्रामाज्ञापय क्षिप्रं बलं चैव समानय २२
एवमुक्तः सुमन्त्रस्तु भरतेन महात्मना ।
प्रहृष्टः सोऽदिशत्सर्वं यथासंदिष्टमिष्टवत् २३
ताः प्रहृष्टाः प्रकृतयो बलाध्यक्षा बलस्य च ।
श्रुत्वा यात्रां समाज्ञप्तां राघवस्य निवर्तने २४
ततो योधाङ्गनाः सर्वा भर्तॄन्सर्वान्गृहे गृहे ।
यात्रागमनमाज्ञाय त्वरयन्ति स्म हर्षिताः २५
ते हयैर्गोरथैः शीघ्रं स्यन्दनैश्च मनोजवैः ।
सहयोषिद्बलाध्यक्षा बलं सर्वमचोदयन् २६
सज्जं तु तद्बलं दृष्ट्वा भरतो गुरुसंनिधौ ।
रथं मे त्वरयस्वेति सुमन्त्रं पार्श्वतोऽब्रवीत् २७
भरतस्य तु तस्याज्ञां परिगृह्य प्रहर्षितः ।

तो धर्मात्मा भ्रातृवत्सल भरत सल्लामसलतीमध्यें निपुण अशा जवळच बसलेल्या सुमंत्र अमात्याला म्हणाला. ( १७-२१ )

"हे सुमंत्रा ! उठ, लवकर जा आणि माझ्या आज्ञेनें स्वारीच्या तयारीचा हुकूम काढून सैन्य तयार करून लवकर घेऊन ये." याप्रमाणें महात्म्या भरतानें सांगितलें असतां त्या सुमंत्राला आनंद झाला आणि आपल्या इच्छेप्रमाणें असलेली ती भरताची आज्ञा त्यानें जशी झाली होती त्याप्रमाणें सर्वांना कळविली. रामाला परत आणण्याकरितां सैन्याला स्वारीची तयारी करण्याविषयीं झालेली आज्ञा ऐकल्यावर ते अमात्य व सेनाधिपति यांना आनंद झाला. आणि स्वारी निघण्याची बातमी ऐकून आनंदित झालेल्या सर्व वीरांगना घरोघरीं आपआपल्या नवऱ्यांना घाई करूं लागल्या. नंतर घोडे, बैलगाड्या आणि मनाप्रमाणें वेगानें जाणारे रथ यांवर आरूढ होऊन स्त्रिया व सेनानायक यांसह त्या अमात्यांनीं सर्व सैन्याला प्रस्थान करण्यास आज्ञा दिली. ( २२-२६ )

तेव्हां गुरु वसिष्ठमुनींच्या जवळच बसलेला भरत तें सैन्य सज्ज झाल्याचें पाहून "माझा रथ लवकर घेऊन ये" असें बाजूला बसलेल्या सुमंत्राला म्हणाला

रथं गृहीत्वोपययौ युक्तं परमवाजिभिः २८
स राघवः सत्यधृतिः प्रतापवान्ब्रुवन्सुयुक्तं दृढसत्यविक्रमः ।
गुरुं महारण्यगतं यशस्विनं प्रसादयिष्यन्भरतोऽब्रवीत्तदा २९
तूर्णं त्वमुत्थाय सुमन्त्र गच्छ बलस्य योगाय बलप्रधानान् ।
आनेतुमिच्छामि हितं वनस्थं प्रसाद्य रामं जगतो हिताय ३०
स सूतपुत्रो भरतेन सम्यगाज्ञापितः संपरिपूर्णकामः ।
शशास सर्वान्प्रकृतिप्रधानान्बलस्य मुख्यांश्च सुहृज्जनं च ३१
ततः समुत्थाय कुले कुले ते राजन्यवैश्या वृषलाश्च विप्राः ।
अयूयुजन्नुष्ट्ररथान् खरांश्च नागान्हयांश्चैव कुलप्रसूतान् ३२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्व्यशीतितमः सर्गः ॥८२॥

त्र्यशीतितमः सर्गः । [३१३६]

ततः समुत्थितः कल्यमास्थाय स्यन्दनोत्तमम् ।

---

असतां सुमंत्रानें आनंदित मनानें त्या भरताची आज्ञा मान्य करून उत्कृष्ट घोडे जोडलेला रथ आणून हजर केला. तेव्हां सत्यनिष्ठ, प्रतापी, अतिशय योग्य भाषण करणारा, दृढ व अमोघपराक्रम करणारा आणि महावनांत गेलेल्या वडिलासारख्या यशस्वी रामाचें मन परत येण्याविषयीं वळविण्याची इच्छा करणारा तो भरत सुमंत्राला म्हणाला, " सुमंत्रा ! तूं लवकर जा आणि सैन्य शिस्तींत उभें करण्याकरितां सेनापतींना आज्ञा कर. कारण, वनामध्यें असलेल्या त्या रामाला प्रसन्न करून घेऊन जगाच्या हिताकरितां परत आणण्याची माझी इच्छा आहे. " ( २७-३० )

याप्रमाणें भरतानें स्पष्ट आज्ञा केली असतां मनोरथ परिपूर्ण झालेल्या त्या सुमंत्र सारथ्यानें सर्व मुख्य मुख्य अमात्य, सेनानायक आणि मित्रवर्ग यांना ती आज्ञा कळविली. तेव्हां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे उठले आणि उंटांच्या गाड्या, गाढवें, हत्ती आणि जातिवंत घोडे स्वारीला जाण्याकरितां त्यांनीं घरोघर तयार केले. ( ३१-३२ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ब्यायशीवा अध्याय संपला ॥ ८२ ॥

प्रययौ भरतः शीघ्रं रामदर्शनकाम्यया १
अग्रतः प्रययुस्तस्य सर्वे मन्त्रिपुरोहिताः ।
अधिरुह्य हयैर्युक्तान्रथान्सूर्यरथोपमान् २
नवनागसहस्राणि कल्पितानि यथाविधि ।
अन्वयुर्भरतं यान्तमिक्ष्वाकुकुलनन्दनम् ३
षष्टीरथसहस्राणि धन्विनो विविधायुधाः ।
अन्वयुर्भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ४
शतं सहस्राण्यश्वानां समारूढानि राघवम् ।
अन्वयुर्भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ५
कैकेयी च सुमित्रा च कौसल्या च यशस्विनी ।
रामानयनसंतुष्टा ययुर्यानेन भास्वता ६
प्रयाताश्चार्यसंघाता रामं द्रष्टुं सलक्ष्मणम् ।
तस्यैव च कथाश्चित्राः कुर्वाणा हृष्टमानसाः ७
मेघश्यामं महाबाहुं स्थिरसत्त्वं दृढव्रतम् ।

त्यानंतर भरत सकाळीं पहाटेसच उठला आणि रामाची भेट घेण्याच्या उद्देशानें चालूं लागला. मंत्री आणि पुरोहित हे सर्व घोडे जोडलेल्या सूर्याच्या रथासारख्या रथावर आरूढ होऊन त्याच्या पुढेंच चालूं लागले आणि तो इक्ष्वाकुकुलनंदन भरत जाऊं लागला असतां यथायोग्य रीतीनें सज्ज केलेले नऊ हजार हत्ती त्याच्या मागोमाग निघाले. नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले धनुर्धारी योद्धे राजपुत्र यशस्वी भरत जाऊं लागला असतां साठ हजार रथांवर आरूढ होऊन त्याच्या मागोमाग निघाले. एक लक्ष घोडेस्वार राजपुत्र यशस्वी भरत जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग जाण्यासाठीं घोड्यांवर बसून तयार झाले. कैकेयी, सुमित्रा व यशस्विनी कौसल्या रामाला आणावयाचें हें ऐकून आनंदित झाल्या आणि रथांत बसून भरताबरोबर निघाल्या. ( १-६ )

सभ्य लोकांचे समुदाय लक्ष्मणासह रामाची भेट घ्यावी म्हणून त्याच्याच अद्भुत गोष्टी एकमेकांस सांगत, मनामध्यें आनंदित होऊन मागाहून जाऊं लागले. " मेघाप्रमाणें श्यामवर्ण, महापराक्रमी, बुद्धीचा स्थिर, स्वीकारलेलें व्रत निश्चया-

कदा द्रक्ष्यामहे रामं जगतः शोकनाशनम्　८
दृष्ट एव हि नः शोकमपनेष्यति राघवः ।
तमः सर्वस्य लोकस्य समुद्यन्निव भास्करः　९
इत्येवं कथयन्तस्ते संप्रहृष्टाः कथाः शुभाः ।
परिष्वजानाश्चान्योन्यं ययुर्नागरिकास्तदा　१०
ये च तत्रापरे सर्वे संमता ये च नैगमाः ।
रामं प्रतिययुर्हृष्टाः सर्वाः प्रकृतयः शुभाः　११
मणिकाराश्च ये केचित्कुम्भकाराश्च शोभनाः ।
सूत्रकर्मविशेषज्ञा ये च शस्त्रोपजीविनः　१२
मायूरकाः क्राकचिका वेधका रोचकास्तथा ।
दन्तकाराः सुधाकारा ये च गन्धोपजीविनः　१३
सुवर्णकाराः प्रख्यातास्तथा कम्बलकारकाः ।
स्नापकोष्णोदका वैद्या धूपकाः शौण्डिकास्तथा　१४
रजकास्तुन्नवायाश्च ग्रामघोषमहत्तराः ।

---

नें चालविणाऱ्या आणि जगताचें दुःख नाहींसें करणाऱ्या रामाला आम्हीं केव्हां बरें पाहूं ?. उदय पावणारा सूर्य दृष्टीस पडतांक्षणीं ज्याप्रमाणें सर्व जगतावरील अंधार नाहींसा करतो, त्याप्रमाणें राम दृष्टीस पडतांक्षणीं आमचें दुःख नाहींसें करील." याप्रमाणें शुभ गोष्टी बोलत व एकमेकांला स्नेहभावानें मिठ्या मारीत ते अयोध्यानगरींतील लोक अत्यंत आनंदित होऊन चालूं लागले. ( ६–१० )

त्या अयोध्यानगरीमध्यें जे इतर प्रसिद्ध लोक होते आणि जे विख्यात व्यापारी होते, तेही सर्व रामाकडे जाण्यासाठीं निघाले, आणि हंगामी धंदा करणारे व्यापारी लोकांचे सर्व चांगले चांगले समुदायही मोठ्या आनंदानें रामाकडे जावयास निघाले. सराफ, प्रतिष्ठित कुंभार, साळी, शस्त्रें तयार करणारे लोक, मोरांच्या पिसांचे पंखे वगैरे करणारे, अरकस, विंधारी, काचेच्या कुप्या वगैरे करणारे, हस्तीदंती काम करणारे, सफेती देणारे, गंधी, विख्यात सोनार, धनगर, स्नान घालणारे, अंग चोळणारे, वैद्य, धूपावर उपजीविका करणारे, कलाल, धोबी,

शैलूषाश्च सह स्त्रीभिर्यान्ति कैवर्तकास्तथा १५
समाहिता वेदविदो ब्राह्मणा वृत्तसंमताः ।
गोरथैर्भरतं यान्तमनुजग्मुः सहस्रशः १६
सुवेषाः शुद्धवसनास्ताम्रमृष्टानुलेपिनः ।
सर्वे ते विमलैर्यानैः शनैर्भरतमन्वयुः १७
प्रहृष्टमुदिता सेना सान्वयात्कैकयीसुतम् ।
भ्रातुरानयने यातं भरतं भ्रातृवत्सलम् १८
ते गत्वा दूरमध्वानं रथयानाश्वकुञ्जरैः ।
समासेदुस्ततो गङ्गां शृङ्गवेरपुरं प्रति १९
यत्र रामसखा वीरो गुहो ज्ञातिगणैर्वृतः ।
निवसत्यप्रमादेन देशं तं परिपालयन् २०
उपेत्य तीरं गङ्गायाश्चक्रवाकैरलंकृतम् ।
व्यवतिष्ठत सा सेना भरतस्यानुयायिनी २१
निरीक्ष्यानुत्थितां सेनां तां च गङ्गां शिवोदकाम् ।

---

शिंपी, गांवांतून व खेड्यापाड्यांतून राहणारे, मोठेमोठे नट आणि नावाडी आपल्या स्त्रियांसह जाऊं लागले. ( ११–१५ )

स्वस्थ अंतःकरणानें युक्त आणि आचरणामुळें लोकांना मान्य असे वेदवेत्ते ब्राह्मण भरत जाऊं लागला असतां बैलगाड्यांतून बसून त्याच्या बरोबर जावयास निघाले. ते सर्व शुद्ध वस्त्रें परिधान करून तांबूस रंगाची व उज्ज्वल अशी उटी अंगाला लावून आणि चांगला पोशाख करून सुंदर वाहनांवर आरूढ होऊन हळूहळू भरताच्या मागोमाग चालले. भावाला आणण्याकरितां जाणाऱ्या कैकेयीपुत्र, भ्रातृवत्सल भरताच्या मागोमाग ती आनंदित सेना चालूं लागली. असो. रथ, गाड्या, घोडे आणि हत्ती यांवर आरूढ होऊन बराच मार्ग आक्रमण केल्यानंतर ते लोक शृंगवेरपुराजवळ गंगानदीच्या तीरावर जाऊन पोंचले. त्या ठिकाणीं आपल्या ज्ञातभाईंच्या टोळ्यांसह राहणारा, रामाचा मित्र म्हणविणारा वीर गुह त्या प्रदेशांचें दक्षतापूर्वक रक्षण करीत रहात होता. ( १६–२० )

चक्रवाक पक्ष्यांनीं गजबजून सोडलेल्या गंगातीरापाशी आल्यावर भरताच्या

भरतः सचिवान्सर्वानब्रवीद्वाक्यकोविदः २२
निवेशयत मे सैन्यमभिप्रायेण सर्वतः ।
विश्रान्ताः प्रतरिष्यामः श्व इमां सागरंगमाम् २३
दातुं च तावदिच्छामि स्वर्गतस्य महीपतेः ।
और्ध्वदेहनिमित्तार्थमवतीर्योदकं नदीम् २४
तस्यैवं ब्रुवतोऽमात्यास्तथेत्युक्त्वा समाहिताः ।
न्यवेशयंस्तां छन्देन स्वेन स्वेन पृथक्पृथक् २५
निवेश्य गङ्गामनु तां महानदीं चमूं विधानैः परिबर्हशोभिनीम् ।
उवास रामस्य तदा महात्मनो विचिन्तमानो भरतो निवर्तनम् २६

इत्यार्षे श्रीम०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्र्यशीतितमः सर्गः ॥८३॥ [३१६२]

चतुरशीतितमः सर्गः ।

ततो निविष्टां ध्वजिनीं गङ्गामन्वाश्रितां नदीम् ।
निषादराजो दृष्ट्वैव ज्ञातीन्स परितोऽब्रवीत् १

---

मागोमाग जाणारें तें सैन्य उभें राहिलें. तेव्हां पुढें जाण्याविषयीं तयार नसलेली सेना आणि पुण्य जलानें युक्त असलेल्या त्या गंगेला पाहून वक्ता भरत सर्व प्रधानांना म्हणाला, "सर्व सैन्यानें आज येथे तळ द्यावा, अशी माझी इच्छा आहे. आपण येथें विश्रांति घेतल्यावर उद्यां ही समुद्रगामिनी नदी तरून जाऊं. प्रथम आधी गंगेमध्यें उतरून स्वर्गस्थ झालेल्या राजाचें त्याला परलोकप्राप्ति व्हावी, यासाठी तर्पण करण्याची माझी इच्छा आहे." याप्रमाणें तो भरत बोलूं लागला असतां दक्ष असलेले त्याचे अमात्य "ठीक आहे" असें म्हणाले आणि आपल्या इच्छेप्रमाणें त्यांनीं त्या सैन्याला वेगवेगळे तळ देण्याचा हुकूम केला. सारांश, बाडबिछाईत वगैरे बरोबर घेतलेल्या व सामानानें शोभणाऱ्या त्या सैन्याची राहण्याची व्यवस्था लाऊन भरत, त्या महानदी गंगेशीं तळ दिल्यावर महात्म्या रामाला परत आणण्याविषयींचाच विचार करीत तेथें राहिला. ( २१-२६ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्र्यांयशीवा सर्ग संपला ॥ ८३ ॥

महतीयमितः सेना सागराभा प्रदृश्यते ।
नास्यान्तमवगच्छामि मनसापि विचिन्तयन् २
यदा नु खलु दुर्बुद्धिर्भरतः स्वयमागतः ।
स एष हि महाकायः कोविदारध्वजो रथे ३
बन्धयिष्यति वा पाशैरथमा स्मान्वधिष्यति ।
अनु दाशरथिं रामं पित्रा राज्याद्विवासितम् ४
संपन्नां श्रियमन्विच्छंस्तस्य राज्ञः सुदुर्लभाम् ।
भरतः कैकयीपुत्रो हन्तुं समधिगच्छति ५
भर्ता चैव सखा चैव रामो दाशरथिर्मम ।
तस्यार्थकामाः सन्नद्धा गङ्गानूपेऽत्र तिष्ठत ६
तिष्ठन्तु सर्वदाशाश्च गङ्गामन्वाश्रिता नदीम् ।
बलयुक्ता नदीरक्षा मांसमूलफलाशनाः ७
नावां शतानां पञ्चानां कैवर्तानां शतं शतम् ।

---

त्यानंतर गंगेचा आश्रय घेऊन त्या सैन्याचा तळ पडलेला पाहून तो निषधराज गुह आपल्या सर्व जातभाईंना म्हणाला, ''ही समुद्रासारखी प्रचंड सेना या गंगेच्या तीरावर उतरलेली दिसते व कितीहि विचार केला तरीहि हिचा उद्देश माझ्या लक्षांत येत नाहीं. ज्याअर्थी हा प्रचंड कोविदारध्वज रथावर दृष्टीस पडत आहे त्या अर्थी भरतच कांहीं दुष्ट बुद्धि बाळगून स्वत आला आहे असें दिसतें. हा कदाचित् अमात्यांकडून आमच्या मुसक्या बांधवील अथवा आम्हांला मारून टाकील आणि नंतर पित्यानें राज्यांतून हांकून दिलेल्या दाशरथि रामचाही हा वध करील असें वाटतें. त्या दशरथ राजाची अत्यंत दुर्लभ राज्यलक्ष्मी अक्षय भोगावयास मिळावी अशी इच्छा धरून कैकेयीचा पुत्र भरत रामाचा वध करण्याकरितां जात आहे. ( १–५ )

''दाशरथी राम माझा स्वामी व मित्र आहे. तेव्हां त्याचें हित करण्याची इच्छा धरून तुम्ही या गंगेच्या तीरावर माझ्यापाशीं उभे रहा. मांस, मुळें, फळें वगैरे आपलें खाणें बरोबर घेऊन माझ्या ताब्यांतील सर्व बलाढ्य कोळ्यांनीं गंगानदीचा आश्रय करून तिचें रक्षण करीत रहावें, कोणाला नदी उतरूं देऊं नये. युद्धाच्या

संनद्धानां तथा यूनां तिष्ठन्त्वित्यभ्यचोदयत् ८
यदि तुष्टस्तु भरतो रामस्येह भविष्यति ।
इयं स्वस्तिमती सेना गङ्गामद्य तरिष्यति ९
इत्युक्त्वोपायनं गृह्य मत्स्यमांसमधूनि च ।
अभिचक्राम भरतं निषादाधिपतिर्गुहः १०
तमायान्तं तु संप्रेक्ष्य सूतपुत्रः प्रतापवान् ।
भरतायाचचक्षेऽथ समयज्ञो विनीतवत् ११
एष ज्ञातिसहस्रेण स्थपतिः परिवारितः ।
कुशलो दण्डकारण्ये वृद्धो भ्रातुश्च ते सखा १२
तस्मात्पश्यतु काकुत्स्थ त्वां निषादाधिपो गुहः ।
असंशयं विजानीते यत्र तौ रामलक्ष्मणौ १३
एतत्तु वचनं श्रुत्वा सुमन्त्राद्भरतः शुभम् ।
उवाच वचनं शीघ्रं गुहः पश्यतु मामिति १४
लब्ध्वानुज्ञां संप्रहृष्टो ज्ञातिभिः परिवारितः ।

तयारीनें असलेले शंभर तरुण नावाडी प्रत्येक नावेंत ठेवून पांचशें नावा तयार करा." अशी त्या गुहानें आपल्या जातभाईंना आज्ञा केली. नंतर तो त्यांना म्हणाला, "भरत जर रामावर संतुष्ट असून निष्पाप अंतःकरणानें येथें उतरला असेल तरच ही सेना आज सुखरूप गंगा तरून पलीकडे जाईल." असें त्यांना सांगून आणि मत्स्य, मांस व मद्य यांचा नजराणा बरोबर घेऊन निषादराज गुह भरताकडे निघाला. (९-१०)

तेव्हां गुह येत आहे, असें पाहून वेळकाळ जाणणारा प्रतापी सुमंत्र सारथि भरताला म्हणाला, "दंडकारण्यामध्यें अधिकार चालवीत असलेला हा निषादांचा राजा वृद्ध गुह आपले हजार जातभाई बरोबर घेऊन इकडे येत आहे. हा तुझ्या भावाचा स्नेही आहे. तर हे ककुत्स्थकुलोत्पन्ना भरता ! त्या निषादराज गुहाला तुझी भेट घेऊं द्यावीस. ते राम-लक्ष्मण कोठें आहेत, हें याला निःसंशय माहीत आहे." सुमंत्राचें हें शुभ भाषण ऐकल्यावर, "गुहाला लवकरच माझी भेट घेऊं दे" असें भरतानें सांगितलें. (११-१४)

आगम्य भरतं प्रह्वो गुहो वचनमब्रवीत् १५
निष्कुटश्चैव देशोऽयं वञ्चिताश्चापि ते वयम् ।
निवेदयाम ते सर्वं स्वके दाशगृहे वस १६
अस्ति मूलफलं चैतन्निषादैः स्वयमार्जितम् ।
आर्द्रं शुष्कं यथा मांसं वन्यं चोच्चावचं तथा १७
आशंसे स्वाशिता सेना वत्स्यत्येनां विभावरीम् ।
अर्चितो विविधैः कामैः श्वः ससैन्यो गमिष्यसि १८

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुरशीतितमः सर्गः ॥८४॥ [३१८०]

पञ्चाशीतितमः सर्गः ।

एवमुक्तस्तु भरतो निषादाधिपतिं गुहम् ।
प्रत्युवाच महाप्राज्ञो वाक्यं हेत्वर्थसंहितम् १
ऊर्जितः खलु ते कामः कृतो मम गुरोः सखे ।

---

तेव्हां भेटीची अनुज्ञा मिळाल्यावर आपल्या जातभाईसह तो गुह आनंदित झाला आणि भरताजवळ येऊन नम्र होऊन म्हणाला, "हा प्रदेश तुला अगदीं आपल्या घरच्या बागेप्रमाणें आहे. आज तूं आम्हांला अगदींच फसविलें आहेस. कारण, येण्याची खबरदेखील आम्हांला दिली नाहींस; खबर दिली असतीस म्हणजे आम्ही कांहीं तरी तयारी करून ठेविली असती असो. आतां हें सर्व राज्य आम्ही तुला अर्पण करतों. तूं स्वतःचें घर समजून आम्हां धीवरांच्या गृहामध्यें रहा. निषादांचीं स्वतः गोळा करून आणिलेलीं हीं मुळें, फळें, ओलेंकोरडें मांस आणि इतरही बरेवाईट वन्य पदार्थ तयार आहेत. तर या सैन्यानें व्यवस्थित भोजन करून आजची रात्र येथेंच घालवावी आणि नानाप्रकारच्या भोग्य वस्तूंनीं मीं आदरातिथ्य केल्यावर सैन्यासह उद्यां तूं पुढें जावें, अशी माझी इच्छा आहे." (१५-१८)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौऱ्यांशीवा सर्ग संपला ॥ ८४ ॥

असें गुहानें सांगितलें असतां महाबुद्धिमान् भरतानें सहेतुक व अर्थपूर्ण शब्दांनीं निषादराज गुहाशीं बोलणें सुरू केलें, "गुरुमित्रा ! माझ्या या अशा-

यो मे त्वमीदृशीं सेनामभ्यर्चयितुमिच्छसि २
इत्युक्त्वा स महातेजा गुहं वचनमुत्तमम् ।
अब्रवीद्भरतः श्रीमान्पन्थानं दर्शयन्पुनः ३
कतरेण गमिष्यामि भरद्वाजाश्रमं पथा ।
गहनोऽयं भृशं देशो गङ्गानूपो दुरत्ययः ४
तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः ।
अब्रवीत्प्राञ्जलिर्भूत्वा गुहो गहनगोचरः ५
दाशास्त्वनुगमिष्यन्ति देशज्ञाः सुसमाहिताः ।
अहं चानुगमिष्यामि राजपुत्र महाबल ६
कच्चिन्न दुष्टो व्रजसि रामस्याक्लिष्टकर्मणः ।
इयं ते महती सेना शङ्कां जनयतीव मे ७
तमेवमभिभाषन्तमाकाश इव निर्मलः ।
भरतः श्लक्ष्णया वाचा गुहं वचनमब्रवीत् ८
मा भूत्स कालो यत्कष्टं न मां शङ्कितुमर्हसि ।

प्रकारच्या सैन्याचें आदरातिथ्य करण्याची तुझी इच्छा आहे, हें फारच उत्तम आहे आणि असें एवढ्या बोलण्यानेंच माझा सत्कार झाला आहे." असें गुहाला म्हटल्यानंतर तो महातेजस्वी व वैभवशाली भरत कांहीं मार्गाकडे बोट दाखवून पुनः त्याला म्हणाला, "कोणत्या मार्गानें मीं भरद्वाज मुनींच्या आश्रमाला जावें? गंगातीराचा हा प्रदेश अतिशय गहन असून जाण्याला अवघड आहे." (१-४)

हें त्या विचारी राजपुत्र भरताचें भाषण ऐकून गहन वनप्रदेशांत राहणारा गुह हात जोडून त्याला म्हणाला, "हे महाबलाढ्य राजपुत्रा! कर्तव्याविषयीं अतिशय दक्ष आणि या प्रदेशांतील माहीतगार असे धीवर तुझ्याबरोबर येतील आणि मीही तुझ्याबरोबर येईन; परंतु, सरळपणें वर्तन करणाऱ्या रामाविषयीं कांहीं दुष्टभाव मनांत धरून तर तूं जात नाहींस ना? या तुझ्या प्रचंड सेनेमुळें मला अशी शंका येत आहे." याप्रमाणें बोलत असलेल्या त्या गुहाला आकाशाप्रमाणें निर्मल असलेला भरत सौम्य शब्दांनीं म्हणाला, "तुला भीति उत्पन्न करणारें पाप माझ्या मनांत येईल अशी वेळ न येवो; माझ्यासंबंधानें तूं शंका घेऊं

राघवः स हि मे भ्राता ज्येष्ठः पितृसमो मतः ९
तं निवर्तयितुं यामि काकुत्स्थं वनवासिनम् ।
बुद्धिरन्या न मे कार्या गुह सत्यं ब्रवीमि ते १०
स तु संहृष्टवदनः श्रुत्वा भरतभाषितम् ।
पुनरेवाब्रवीद्वाक्यं भरतं प्रति हर्षितः ११
धन्यस्त्वं न त्वया तुल्यं पश्यामि जगतीतले ।
अयत्नादागतं राज्यं यस्त्वं त्यक्तुमिहेच्छसि १२
शाश्वती खलु ते कीर्तिर्लोकाननु चरिष्यति ।
यस्त्वं कृच्छ्रगतं रामं प्रत्यानयितुमिच्छसि १३
एवं संभाषमाणस्य गुहस्य भरतं तदा ।
बभौ नष्टप्रभः सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १४
संनिवेश्य स तां सेनां गुहेन परितोषितः ।
शत्रुघ्नेन समं श्रीमाञ्छयनं पुनरागमत् १५
रामचिन्तामयः शोको भरतस्य महात्मनः ।
उपस्थितो ह्यनर्हस्य धर्मप्रेक्षस्य तादृशः १६
अन्तर्दाहेन दहनः संतापयति राघवम् ।

---

नकोस. तो राम माझा मोठा भाऊ असून मला पित्याप्रमाणें मान्य आहे. त्या ककुत्स्थकुलोत्पन्न वनवासी रामाला परत नेण्याकरितां मी जात आहें. माझ्या-संबंधानें तूं दुसरा कांहीं एक विचार मनामध्यें आणूं नकोस. गुहा ! मी तुला खरें सांगत आहें." (५–१०)

याप्रमाणें भरताचें भाषण ऐकल्यावर त्या गुहाला मोठाच आनंद झाला आणि तो पुनः भरताला म्हणाला, "तूं धन्य आहेस. तुझ्यासारखा या पृथ्वीवर मला कोणीच दिसत नाहीं; कारण अनायासानें मिळत असलेल्या राज्याचा त्याग करण्याची तुझी इच्छा स्तुत्य आहे व संकटांत सांपडलेल्या रामाला परत आणण्याची तूं इच्छा करीत आहेस, यामुळें तुझी कीर्ति लोकांमध्यें अक्षय राहील." असें गुह भरताशीं भाषण करीत असतांना सूर्य निस्तेज होऊन रात्र पडूं लागली. तेव्हां गुहानें संतुष्ट केलेल्या त्या वैभवशाली भरतानें सैन्याची व्यवस्था लाविली आणि शत्रुघ्नासह तो बिछान्यावर येऊन पडला. (११–१५)

वनदाहाग्निसंततं गूढोऽग्निरिव पादपम् १७
प्रसृतः सर्वगात्रेभ्यः स्वेदं शोकाग्निसंभवम् ।
यथा सूर्याग्निसंततो हिमवान्प्रसृतो हिमम् १८
ध्याननिर्दरशैलेन विनिःश्वसितधातुना ।
दैन्यपादपसङ्घेन शोकायासाधिशृङ्गिणा १९
प्रमोहानन्तसत्त्वेन संतापौषधिवेणुना ।
आक्रान्तो दुःखशैलेन महता कैकयीसुतः २०
विनिःश्वसन्वै भृशदुर्मनास्ततः प्रमूढसंज्ञः परमापदं गतः ।
शमं न लेभे हृदयज्वरार्दितो नरर्षभो यूथहतो यथर्षभः २१
गुहेन सार्धं भरतः समागतो महानुभावः सजनः समाहितः ।
सुदुर्मनास्तं भरतं तदा पुनः शनैः समाश्वासयदग्रजं प्रति २२
इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चाशीतितमः सर्गः ॥८५॥[३२०२]

धर्मावर दृष्टि ठेऊन वागणाऱ्या आणि दुःखाचा अनुभव नसलेल्या महात्म्या भरताला रामाविषयींच्या चिंतेमुळें चैनच पडेना. आणि दावाग्नीनें वाळून गेलेल्या वृक्षाला आंत गुप्त असलेला अग्नि ज्याप्रमाणें जाळीत असतो, त्याप्रमाणें तो शोकाग्नि रघुवंशज भरताला अंतःस्थ दाहानें ताप देऊं लागला. ज्याप्रमाणें सूर्याच्या उन्हानें तापलेल्या हिमालय पर्वतापासून बर्फ वाहूं लागतें, त्याप्रमाणें भरताच्या शरिरांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या. रामासंबंधीं चिंता हेच ज्यांतील अभंग खडक, दुःखाचे सुस्कारे हेच ज्यांतील धातु, हात-पाय आदि इंद्रियांची विकलता हेच ज्यांतील वृक्षसमुदाय, शोकजन्य आयास हींच ज्याचीं शिखरें, मोह हेच ज्यावरील असंख्य वनपशु, संताप हाच ज्यावरील मोठा वृक्ष आणि वेळू अशा अधोगतीला नेणाऱ्या दुःखरूप पर्वतानें कैकेयीच्या पुत्राला-भरताला चेंपून टाकला होता. मनाच्या हुरहुरीनें व्याकुल, अत्यंत खिन्न व जवळ जवळ मूर्च्छित झालेल्या, दुःखाचे सुस्कारे टाकीत असलेल्या पुरुषश्रेष्ठ भरताला कळपांतून चुकलेल्या बैलाप्रमाणें चैन पडेनासें झालें. सारांश, परिवारासह असलेल्या त्या एकाग्रचित्त व महापराक्रमी भरताची गुहाशीं गांठ पडल्यावर तो रामासंबंधाच्या काळजीनें अतिशयच खिन्न झाला, परंतु त्या अवस्थेंत त्या भरताचें गुहानें सांत्वन केलें. ( १६-२२ )

षडशीतितमः सर्गः ।

आचचक्षेऽथ सद्भावं लक्ष्मणस्य महात्मनः ।
भरतायाप्रमेयाय गुहो गहनगोचरः १
तं जाग्रतं गुणैर्युक्तं वरचापेषुधारिणम् ।
भ्रातृगुप्त्यर्थमत्यन्तमहं लक्ष्मणमब्रुवम् २
इयं तात सुखा शय्या त्वदर्थमुपकल्पिता ।
प्रत्याश्वसिहि शेष्वास्यां सुखं राघवनन्दन ३
उचितोऽयं जनः सर्वो दुःखानां त्वं सुखोचितः ।
धर्मात्मस्तस्य गुप्त्यर्थं जागरिष्यामहे वयम् ४
न हि रामात्प्रियतरो ममास्ति भुवि कश्चन ।
मोत्सुको भूर्ब्रवीम्येतदथ सत्यं तवाग्रतः ५
अस्य प्रसादादाशंसे लोकेऽस्मिन्सुमहद्यशः ।
धर्मावाप्तिं च विपुलामर्थकामौ च केवलौ ६
सोऽहं प्रियसखं रामं शयानं सह सीतया ।

---

याप्रमाणें महामुनिवाल्मीकीप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंच्यांशीवा सर्ग संपला. ॥ ८५ ॥

त्यानंतर वनप्रदेशांत रहाणारा गुह महात्म्या लक्ष्मणाचा चांगुलपणा सांगण्याच्या उद्देशानें श्रेष्ठ भरताला म्हणाला, " अत्यंत गुणसंपन्न व श्रेष्ठ असा व धनुर्बाण धारण करून भावाच्या रक्षणासाठीं जागत बसलेल्या त्या लक्ष्मणाला मी म्हणालों, 'लक्ष्मणा ! तुझ्याकरितां ही सुखशय्या तयार केली आहे; तूं निर्धास्त रहा आणि या शय्येवर सुखानें झोंप घे. या आम्हां सर्व लोकांना दुःखें भोगण्याची संवय आहे व तूं आजपर्यंत सुखाचाच उपभोग घेत आला आहेस. तर धर्मज्ञा ! त्या रामाच्या रक्षणासाठीं आम्ही जागत बसूं. रामाहून अधिक प्रिय असा या पृथ्वीवर मला कोणीही नाही, तेव्हां तूं त्याच्या रक्षणासंबंधानें काळजी करूं नको. मी हें तुझ्यासमोर खरें बोलत आहें. या रामाच्या कृपेमुळेंच या जगामध्यें अतिशय मोठी कीर्ति आणि धर्म, अर्थ व काम यांची समृद्धि हीं प्राप्त होत असतात, असें मी समजतों. तेव्हां सीतेसह शयन करणाऱ्या प्रिय

रक्षिष्यामि धनुष्पाणिः सर्वैः स्वैर्ज्ञातिभिः सह ७
न हि मेऽविदितं किंचिद्वनेऽस्मिंश्चरतः सदा ।
चतुरङ्गं ह्यपि बलं प्रसहेम वयं युधि ८
एवमस्माभिरुक्तेन लक्ष्मणेन महात्मना ।
अनुनीता वयं सर्वे धर्ममेवानुपश्यता ९
कथं दाशरथौ भूमौ शयाने सह सीतया ।
शक्या निद्रा मया लब्धुं जीवितानि सुखानि वा १०
यो न देवासुरैः सर्वैः शक्यः प्रसहितुं युधि ।
तं पश्य गुह संविष्टं तृणेषु सह सीतया ११
महता तमसा लब्धो विविधैश्च परिश्रमैः ।
एको दशरथस्यैष पुत्रः सदृशलक्षणः १२
अस्मिन्प्रव्राजिते राजा न चिरं वर्तयिष्यति ।
विधवा मेदिनी नूनं क्षिप्रमेव भविष्यति १३
विनद्य सुमहानादं श्रमेणोपरताः स्त्रियः ।

---

मित्र रामाचें मी आपल्या सर्व जातभाईसह हातांत धनुष्य घेऊन रक्षण करीन. नेहमीं या वनांत भटकत असल्यानें माझ्या माहितींतलें नाहीं असें कांहीं एक नाहीं. शत्रूचें चतुरंग सैन्यही मी युद्धामध्यें जिंकून टाकीन.' (१-८)

याप्रमानें आम्ही सांगितलें असतां धर्मावर दृष्टि ठेऊन वागणाऱ्या महात्म्या लक्ष्मणानें आम्हां सर्वांचें सांत्वन केलें. तो म्हणाला, " दाशरथि राम सीतेसह जमिनीवर शयन करीत असतांना मला निद्रा, बिनधोक जीवित अथवा सुख कसें बरें मिळणें शक्य आहे ? गुहा ! सर्व देवदैत्यांनाही ज्याचा पराक्रम युद्धामध्यें सहन होणें अशक्य आहे, तो राम सीतेसह गवतावर निजला आहे, तें पहा. मोठें तप आणि कष्टानें केलेलीं नानाप्रकारचीं अनुष्ठानें यामुळें स्वतःसारखाच असलेला हा अद्वितीय पुत्र दशरथाला लाभला आहे. हा वनांत गेल्यावर राजा फार दिवस जगणार नाहीं. खरोखर पृथ्वी लवकरच विधवा होऊन जाईल. ( ९-१३ )

"हे गुहा, राजवाड्यांतील आणि अयोध्यानगरींतील स्त्रिया अतिशयच मोठा

निर्घोषो विरतो नूनमद्य राजनिवेशने १४
कौसल्या चैव राजा च तथैव जननी मम।
नाशंसे यदि ते सर्वे जीवेयुः शर्वरीमिमाम् १५
जीवेदपि च मे माता शत्रुघ्नस्यान्ववेक्षया।
दुःखिता या हि कौसल्या वीरसूर्विनशिष्यति १६
अतिक्रान्तमतिक्रान्तमनवाप्य मनोरथम्।
राज्ये राममनिक्षिप्य पिता मे विनशिष्यति १७
सिद्धार्थाः पितरं वृत्तं तस्मिन्काले ह्युपस्थिते।
प्रेतकार्येषु सर्वेषु संस्करिष्यन्ति भूमिपम् १८
रम्यचत्वरसंस्थानां सुविभक्तमहापथाम्।
हर्म्यप्रासादसंपन्नां सर्वरत्नविभूषिताम् १९
गजाश्वरथसंबाधां तूर्यनादविनादिताम्।
सर्वकल्याणसंपूर्णां हृष्टपुष्टजनाकुलाम् २०
आरामोद्यानसंपूर्णां समाजोत्सवशालिनीम्।
सुखिता विचरिष्यन्ति राजधानीं पितुर्मम २१

आक्रोश करून श्रम झाल्यामुळें स्वस्थ पडल्या असतील आणि राजवाड्यांतही आज विलापाचे शब्द बंद होऊन खरोखर सामसूम झालें असेल. कौसल्या, राजा आणि त्याचप्रमाणें माझी आई हे सर्व आजची रात्र तरी जिवंत राहतील किंवा नाहीं याबद्दल संशय आहे. शत्रुघ्नाकडे पाहून कदाचित् माझी आई जिवंत राहील. परंतु, दुःखी झालेली वीरमाता कौसल्या तर जगणार नाहींच. रामराज्याभिषेकाची इच्छा तृप्त न झाल्यामुळें "घात झाला, घात झाला" असें म्हणत म्हणत माझा पिता परत आलेल्या रामाला राज्यावर न बसवितांच मृत्यु पावेल व तसें घडून आल्यावर स्वर्गीं गेलेल्या पित्याचे ज्यांच्या हातून सर्व प्रकारचे और्ध्वदेहिक संस्कार होतील, ते खरोखर धन्य होत. रमणीय चवाठे, धर्मशाळा, वेगवेगळे राजमार्ग, वाडे आणि देवालयें यांनीं संपन्न, सर्व प्रकारच्या रत्नांनीं भूषित, हत्ती, घोडे आणि रथ यांनीं गजबलेली, तूर्यवाद्यांच्या ध्वनीनें निनादित, सर्व प्रकारच्या कल्याणांनीं संपूर्ण, आनंदित व सुखवस्तु लोकांनीं व्याप्त, उपवनें, बागा यांनीं पूर्ण

अपि सत्यप्रतिज्ञेन सार्धं कुशलिना वयम् ।
निवृत्ते समये ह्यस्मिन्सुखिताः प्रविशेमहि २२
परिदेवयमानस्य तस्यैवं हि महात्मनः ।
तिष्ठतो राजपुत्रस्य शर्वरी सात्यवर्तत २३
प्रभाते विमले सूर्ये कारयित्वा जटा उभौ ।
अस्मिन्भागीरथीतीरे सुखं संतारितौ मया २४
जटाधरौ तौ द्रुमचीरवाससौ महाबलौ कुञ्जरयूथपोपमौ ।
वरेषुधीचापधरौ परंतपौ व्यपेक्षमाणौ सह सीतया गतौ २५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षडशीतितमः सर्गः॥८६॥

सप्ताशीतितमः सर्गः । [३२२७]

गुहस्य वचनं श्रुत्वा भरतो भृशमप्रियम् ।
ध्यानं जगाम तत्रैव यत्र तच्छ्रुतमप्रियम् १
सुकुमारो महासत्त्वः सिंहस्कन्धो महाभुजः ।

---

व सामाजिक उत्सवांनीं शोभणाऱ्या माझ्या पित्याच्या राजधानीमध्यें भरत आदिकरून सुखी होऊन राहतील. ( १४–२१ )

"हा वनवासाचा काल निघून गेल्यावर सत्यप्रतिज्ञ व कुशल असलेल्या रामासह आम्ही सुखासमाधानें अयोध्येमध्यें पुनः परत जाऊं काय ?" याप्रमाणें तो राजपुत्र लक्ष्मण शोक करीत बसला असतांनाच ती रात्र निघून गेली, त्यानंतर सकाळ होऊन स्पष्ट सूर्योदय झाल्यावर या भागीरथीच्या किनाऱ्यावर उभयतांच्याही जटा बांधून मीं अनायासें पलीकडे नेलें. जटा धारण करणारे, वृक्षांच्या साली नेसणारे, हत्तींचे कळप रक्षण करणाऱ्या बलाढ्य हत्तीप्रमाणें असलेले आणि उत्कृष्ट भाते व धनुष्य धारण करणारे ते महाबलाढ्य व शत्रूंना ताप देणारे राम, लक्ष्मण परत येण्याच्या आशेनें सीतेसह निघून गेले." ( २२–२५ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शाऐंशीवा सर्ग संपला. ॥ ८६॥

अत्यंत अप्रिय असें तें गुहाचें भाषण ऐकल्याबरोबर भरत चिंतेनें भारावून गेला. सुकुमार, महाधैर्यवान्, महापराक्रमी, खांबासारखे खांदे आणि कमलपत्रा-

पुण्डरीकविशालाक्षस्तरुणः प्रियदर्शनः २
प्रत्याश्वस्य मुहूर्तं तु कालं परमदुर्मनाः ।
ससाद सहसा तोत्रैर्हृदि विद्ध इव द्विपः ३
भरतं मूर्च्छितं दृष्ट्वा विवर्णवदनो गुहः ।
बभूव व्यथितस्तत्र भूमिकम्पे यथा द्रुमः ४
तदवस्थं तु भरतं शत्रुघ्नोऽनन्तरास्थितः ।
परिष्वज्य रुरोदोच्चैर्विसंज्ञः शोककर्षितः ५
ततः सर्वाः समापेतुर्मातरो भरतस्य ताः ।
उपवासकृशा दीना भर्तृव्यसनकर्षिताः ६
ताश्च तं पतितं भूमौ रुदत्यः पर्यवारयन् ।
कौसल्या त्वनुसृत्यैनं दुर्मनाः परिषस्वजे ७
वत्सला स्वं यथा वत्समुपगुह्य तपस्विनी ।
परिपप्रच्छ भरतं रुदती शोकलालसा ८
पुत्र व्याधिर्न ते कच्चिच्छरीरं प्रति बाधते ।

प्रमाणें विशाल नेत्र यांनीं तरुण व आल्हादकारक मुद्रेनें युक्त असा तो भरत कांहीं वेळपर्यंत अत्यंत खिन्न होऊन पुनः सावध झाला आणि अंकुशांनीं विद्ध झालेल्या हत्तीप्रमाणें त्याचें एकाएकीं देहभान नाहींसें झालें. भूकंप होऊं लागला असतां वृक्ष ज्याप्रमाणें हादरून जातात, त्याप्रमाणें भरताची अवस्था झालेली पाहतांच गुहाचें मुख निस्तेज होऊन तो अतिशयच दुःखी झाला. तेव्हां शेजारींच बसलेल्या शत्रुघ्नानें भरताची तशी अवस्था झालेली पाहून त्याला कवटाळून धरलें आणि शोकाकुल होऊन मोठ्या आवाजांत रडून रडून तोही मूर्च्छित झाला. ( १–५ )

हें पाहून उपवासानें कृश, दीन आणि पतीच्या मृत्यूच्या दुःखानें जर्जर झालेल्या त्या सर्व भरताच्या माता त्याच्याजवळ धांवून गेल्या. भूमीवर पडलेल्या भरताच्या भोंवतीं त्या त्याला वेढा देऊन बसल्या आणि खिन्न झालेल्या कौसल्येनें त्याच्या जवळ जाऊन त्याला कवटाळून धरलें. नंतर आपल्या पुत्राप्रमाणें त्याला पोटाशीं धरल्यावर ती बिचारी दयार्द्र अन्तःकरणानें रडत रडत शोकाकुल झालेल्या भरताला विचारूं लागली, " सुला, तुझ्या शरिराला कांहीं व्याधि तर पीडा देत

अस्य राजकुलस्याद्य त्वदधीनं हि जीवितम् ९
त्वां दृष्ट्वा पुत्र जीवामि रामे सभ्रातृके गते।
वृत्ते दशरथे राज्ञि नाथ एकस्त्वमद्य नः १०
कच्चिन्न लक्ष्मणे पुत्र श्रुतं ते किंचिदप्रियम्।
पुत्रे वा ह्येकपुत्रायाः सहभार्ये वनं गते ११
स मुहूर्तं समाश्वस्य रुदन्नेव महायशाः।
कौसल्यां परिसान्त्व्येदं गुहं वचनमब्रवीत् १२
भ्राता मे क्वावसद्रात्रिं क्व सीता क्व च लक्ष्मणः।
अस्वपच्छयने कस्मिन् किं भुक्त्वा गुह शंस मे १३
सोऽब्रवीद्भरतं हृष्टो निषादाधिपतिर्गुहः।
यद्विधं प्रतिपेदे च रामे प्रियहिते तिथौ १४
अन्नमुच्चावचं भक्ष्याः फलानि विविधानि च।
रामायाभ्यवहारार्थं बहुशोऽपहृतं मया १५

नाहीं ना ? अरे ! आज या राजकुलाचें जीवित तुझ्या आधीन आहे. बाळा ! भावासह राम वनांत गेला असतां तुझ्याकडेच पाहून मी जिवंत राहिलें आहे व दशरथ राजा मरण पावल्यावर आतां तूंच एक आमचें रक्षण करणारा आहेस. पुत्रा ! लक्ष्मणासंबंधानें तूं कांहीं अनिष्ट बातमी तर ऐकिली नाहींस ना ? अथवा एकुलता एक असा माझा जो पुत्र भार्येसह वनांत गेला आहे, त्याच्याविषयीं तर कांहीं अनिष्ट वृत्तांत तुझ्या कानावर आला नाहीं ना ? " (६–११)

याप्रमाणें कौसल्या विचारूं लागली असतां क्षणभर मूर्च्छित पडलेला तो महायशस्वी भरत सावध झाला आणि रडत रडत कौसल्येचें सांत्वन करून गुहाला म्हणाला, " गुहा ! माझा भाऊ राम रात्रीं कोठें राहिला होता ? सीता कोठें राहिली होती ? लक्ष्मण कोठें होता ? कोणत्या शय्येवर राम झोपीं गेला होता ? आणि काय खाऊन त्यानें रात्र काढली, हें मला सांग. " यावर प्रिय व आपलें हित करणारा असा राम अतिथि म्हणून आला असतां गुहानें त्याच्याशीं जो व्यवहार केला होता, तो सर्व त्या निषादराजानें आनंदित होऊन भरताला सांगितला. (१२–१४)

तत्सर्वं प्रत्यनुज्ञासीद्रामः सत्यपराक्रमः ।
न हि तत्प्रत्यगृह्णात्स क्षत्रधर्ममनुस्मरन् १६
नह्यस्माभिः प्रतिग्राह्यं सखे देयं तु सर्वदा ।
इति तेन वयं सर्वे अनुनीता महात्मना १७
लक्ष्मणेन यदानीतं पीतं वारि महात्मना ।
औपवास्यं तदाकार्षीद्राघवः सह सीतया १८
ततस्तु जलशेषेण लक्ष्मणोऽप्यकरोत्तदा ।
वाग्यतास्ते त्रयः संध्यां समुपासन्त संहिताः १९
सौमित्रिस्तु ततः पश्चादकरोत्स्वास्तरं शुभम् ।
स्वयमानीय बर्हींषि क्षिप्रं राघवकारणात् २०
तस्मिन्समाविशद्रामः स्वास्तरे सहसीतया ।
प्रक्षाल्य च तयोः पादौ व्यपाक्रामत्स लक्ष्मणः २१
एतत्तदिङ्गुदीमूलमिदमेव च तत्तृणम् ।
अस्मिन्रामश्च सीता च रात्रिं तां शयितावुभौ २२

तो म्हणाला, "सरसनिरस अन्न, भक्ष्य पदार्थ आणि नानाप्रकारचीं फळें वगैरे रामाला मीं पुष्कळ आणून दिलीं; परंतु सत्यपराक्रमी रामानें संमानपूर्वक तें सर्व मला परत केलें. सत्यधर्माला स्मरून त्यानें तें घेतलें नाहीं. 'मित्रा गुहा! आम्हाला तुम्हांकडून घेतां येत नाहीं. आम्हीं नेहमीं लोकांना द्यावें'–अशी त्या महात्म्यानें आमची सर्वांची समजूत केली. लक्ष्मणानें जें पाणी आणलें होतें, तेवढ्याचा मात्र त्या महात्म्या रामानें स्वीकार केला आणि सीतेसह रघुवंशज रामाला त्या रात्रीं असाच उपवास घडला. नंतर शिल्लक राहिलेल्या पाण्याचें लक्ष्मणानेंही ग्रहण केलें आणि त्यानंतर मौन धारण करून स्वस्थ चित्तानें बसलेल्या त्या तिघांनीं संध्यावंदन केलें. ( १५–१९ )

"संध्यावंदन आटोपल्यानंतर सुमित्रा–पुत्र लक्ष्मणानें स्वतः लवकर जाऊन दर्भ आणले आणि रामाकरितां त्यानें उत्कृष्ट शय्या तयार केली. त्या उत्कृष्ट शय्येवर सीतेसह राम पहुडला असतां त्याचे पाय धुऊन, तो लक्ष्मण तेथून पलीकडे झाला. हाच तो इंगुदी वृक्षाचा खालचा भाग आणि हेंच तें गवत.

नियम्य पृष्ठे तु तलांगुलित्रवान्शरैः सुपूर्णाविषुधी परंतपः ।
महद्धनुः सज्जमुपोह्य लक्ष्मणो निशामतिष्ठत्परितोऽस्य केवलम् २३
ततस्त्वहं चोत्तमबाणचापभृत्स्थितोऽभवं तत्र स यत्र लक्ष्मणः ।
अतन्द्रितैर्ज्ञातिभिरात्तकार्मुकैर्महेन्द्रकल्पं परिपालयं तदा २४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्ताशीतितमः सर्गः॥८७॥

अष्टाशीतितमः सर्गः ।     [३२५१]

तच्छ्रुत्वा निपुणं सर्वं भरतः सह मन्त्रिभिः ।
इंगुदीमूलमागम्य रामशय्यामवेक्षत     १
अब्रवीज्जननीः सर्वा इह तस्य महात्मनः ।
शर्वरी शयिता भूमाविदमस्य विमर्दितम्     २
महाराजकुलीनेन महाभागेन धीमता ।
जातो दशरथेनोर्व्यां न रामः स्वप्तुमर्हति     ३
अजिनोत्तरसंस्तीर्णे वरास्तरणसंचये ।
शयित्वा पुरुषव्याघ्रः कथं शेते महीतले     ४

या ठिकाणींच राम व सीता हे उभयतां त्या रात्रीं झोपीं गेले होते. हातामध्यें अंगुलित्राण धारण करून बाणांनीं भरलेले अक्षय्य भाते आणि सज्ज केलेलें प्रचंड धनुष्य हातांत घेऊन तो शत्रूंना ताप देणारा लक्ष्मण रामाच्या भोंवतालीं सर्व रात्रभर हिंडत राहिला. तेव्हां जेथें लक्ष्मण होता, तेथें मीही उत्कृष्ट बाण व धनुष्य घेऊन उभा राहिलों आणि धनुष्यानिशीं असलेल्या जातभाईंसह त्या इंद्रासारख्या रामाचें रक्षण केलें." (२०–२४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील सत्यांशीवा सर्ग संपला ॥ ८७ ॥

गुहानें सांगितलेलें तें सर्व पूर्णपणें ऐकल्यावर मंत्र्यांसह भरत इंगुदीवृक्षाच्या मुळाशीं येऊन रामाच्या शय्येकडे पाहूं लागला आणि सर्व मातांना म्हणाला, "या ठिकाणीं त्या महात्म्यानें रात्रीं भूमीवर झोंप घेतली. हें त्याचें शरीर घसटल्याचें ठिकाण दिसतें. मोठ्या राजकुलामध्यें महाभाग्यवान् विवेकी दशरथापासून उत्पन्न झालेल्या रामानें भूमीवर निजणें केव्हांहि योग्य नव्हे. मोठमोठीं

प्रासादाग्रविमानेषु वलभीषु च सर्वदा ।
हैमराजतभौमेषु वरास्तरणशालिषु ५
पुष्पसंचयचित्रेषु चन्दनागुरुगन्धिषु ।
पाण्डुराभ्रप्रकाशेषु शुकसङ्घरुतेषु च ६
प्रासादवरवर्येषु शीतवत्सु सुगन्धिषु ।
उषित्वा मेरुकल्पेषु कृतकाञ्चनभित्तिषु ७
गीतवादित्रनिर्घोषैर्वराभरणनिःस्वनैः ।
मृदङ्गवरशब्दैश्च सततं प्रतिबोधितः ८
बन्दिभिर्वन्दितः काले बहुभिः सूतमागधैः ।
गाथाभिरनुरूपाभिस्तुतिभिश्च परंतपः ९
अश्रद्धेयमिदं लोके न सत्यं प्रतिभाति मा ।

---

आजिनें आणि उत्कृष्ट आस्तरणें ज्यावर पसरलेलीं आहेत, अशा मंचकावर आजपर्यंत झोंपणारा पुरुषश्रेष्ठ राम आतां जमिनीवर कशी बरें झोंप घेत आहे? (१–४)

"प्रासादांवरील विमानाप्रमाणें असलेल्या घरामध्यें आणि गच्चीसारख्या मोकळ्या ठिकाणीं आजपर्यंत झोंप घेणारा हा राम आतां जमिनीवर कसा बरें झोंपीं जातो ? सोन्यारुप्याच्या जमिनी ज्यामध्यें आहेत, उत्तम उत्तम आस्तरणें पसरलेलीं असल्यामुळें ज्यांना फारच शोभा आली आहे, पुष्पांच्या राशीमुळें जे चित्रविचित्र दिसत आहेत, चंदन आणि अगुरु यांचा जेथें सुवास दरवळला आहे, जे दिसण्यांत पांढऱ्या शुभ्र मेघांप्रमाणें दिसत आहेत, राघूंच्या झुंडी ज्यामध्यें शब्द करीत आहेत व ज्यांतील भिंती सोन्याच्या बनविल्या आहेत, असे जे मेरुपर्वतासारखे थंडगार, सुगंधित व उत्तमोत्तम राजवाडे त्यांमध्यें आजपर्यंत झोंप घेऊन या रामाला आतां जमिनीवर कशी बरें झोंप काढण्याचा प्रसंग आला ? गीत आणि वाद्य यांचे ध्वनि, उत्कृष्ट भूषणांचे आवाज आणि सर्वोत्कृष्ट मृदंगांचे शब्द यांच्या योगानें जो नेहमीं जागा होत असे, प्रभातकालीं भाट ज्याला वंदन करीत असत आणि योग्य अशा गद्यपद्यात्मक स्तुतींनीं असंख्य सूत व मागध ज्याची प्रशंसा करीत असत, त्या शत्रुतापन रामाला आज जमिनीवर झोंप काढण्याची वेळ यावी ना ? ( ५–९ )

मुह्यते खलु मे भावः स्वप्नोऽयमिति मे मतिः १०
न नूनं दैवतं किंचित्कालेन बलवत्तरम् ।
यत्र दाशरथी रामो भूमावेवमशेत सः ११
यस्मिन्विदेहराजस्य सुता च प्रियदर्शना ।
दयिता शयिता भूमौ स्नुषा दशरथस्य च १२
इयं शय्या मम भ्रातुरिदमावर्तितं शुभम् ।
स्थण्डिले कठिने सर्वं गात्रैर्विमृदितं तृणम् १३
मन्ये साभरणा सुप्ता सीतास्मिञ्शयने शुभा ।
तत्र तत्र हि दृश्यन्ते सक्ताः कनकबिन्दवः १४
उत्तरीयमिहासक्तं सुव्यक्तं सीतया तदा ।
तथा ह्येते प्रकाशन्ते सक्ताः कौशेयतन्तवः १५
मन्ये भर्तुः सुखा शय्या येन बाला तपस्विनी ।
सुकुमारी सती दुःखं न विजानाति मैथिली १६

"या गोष्टीवर माझा विश्वास बसत नसून हें मला खरेंहि वाटत नाहीं. तें मला मूर्च्छितावस्थेंत ऐकल्यासारखें वाटतें; अथवा हा वृत्तांत याच्या तोंडून मी स्वप्नामध्यें ऐकला असावा असें मला वाटत आहे, कारण स्वप्नामध्यें असंभाव्य गोष्टीही दृष्टीस पडतात. खरोखर कालापेक्षां कोणत्याही देवाचें सामर्थ्य अधिक नसावें, असें मला वाटतें. कारण कालाच्या प्रभावानें त्या दाशरथि रामावरही अशाप्रकारें भूमीवर निजण्याचा प्रसंग ओढवला, जिचें दर्शनही आल्हादकारक आहे अशी विदेहराजकन्या, दशरथाची आवडती सून सीता ज्या कालामध्यें भूमीवर पडून राहिली, त्या कालापेक्षां कोणाचेंही सामर्थ्य जास्त नाहीं. ही माझ्या भावाची शय्या. या शुभस्थानावर तो लोळल्यामुळें त्याच्या अवयवांच्या योगानें या कठिण प्रदेशावरचें सर्व गवत चुरगळून गेलेलें दिसत आहे. ठिकठिकाणीं सुवर्णकण विखुरलेले दृष्टीस पडत आहेत; यावरून ती कल्याणी सीता अलंकार घालूनच या शय्येवर झोंपी गेली असावी, असें वाटतें. या ठिकाणीं सीतेचा शेला अडकला होता असें स्पष्ट दिसत आहे; कारण अडकून राहिलेले हे रेशमाचे तंतू येथें झळकत आहेत. ( १०-१५ )

हा हतोऽस्मि नृशंसोऽस्मि यत्सभार्यः कृते मम ।
ईदृशीं राघवः शय्यामधिशेते ह्यनाथवत् १७
सार्वभौमकुले जातः सर्वलोकसुखावहः ।
सर्वप्रियकरस्त्यक्त्वा राज्यं प्रियमनुत्तमम् १८
कथमिन्दीवरश्यामो रक्ताक्षः प्रियदर्शनः ।
सुखभागी न दुःखार्हः शयितो भुवि राघवः १९
धन्यः खलु महाभागो लक्ष्मणः शुभलक्षणः ।
भ्रातरं विषमे काले यो राममनुवर्तते २०
सिद्धार्था खलु वैदेही पतिं यानुगता वनम् ।
वयं संशयिताः सर्वे हीनास्तेन महात्मना २१
अकर्णधारा पृथिवी शून्येव प्रतिभाति मे ।
गते दशरथे स्वर्गं रामे चारण्यमाश्रिते २२

---

" ज्याअर्थी अशा प्रकारच्या शय्येवर झोंप घेत असतांही बाला, निरपराधी, सुकुमार व साध्वी मैथिलकन्येला दुःख झालें नाहीं, त्याअर्थी नवऱ्याची शय्या जशी असेल तशी स्त्रियांना सुखकरच होते, असें मला वाटतें. अरे ! मी किती नीच व दुष्ट आहे ! कारण, माझ्याकरितां रामाला आपल्या पत्नीसह अनाथाप्रमाणें असल्या शय्येवर झोपावें लागलें आहे. सार्वभौम कुलामध्यें उत्पन्न झालेल्या, सर्व लोकांना सुख देणाऱ्या, सर्व लोकांचें प्रिय करणाऱ्या नील कमलाप्रमाणें श्यामवर्ण असलेल्या, आल्हादकारक मुद्रा आणि आरक्तवर्ण नेत्र यांनीं युक्त असलेल्या व सुखांत वाढलेला असूनहि दुःख भोगण्यास अयोग्य असलेल्या या रामानें उत्कृष्ट अशा राज्याचा त्याग करून भूमीवर निजण्याचें कसें पत्करलें ? संकटकालीं आपल्या भावाबरोबर, रामाबरोबर असणारा महाभाग्यवान् शुभलक्षणसंपन्न असा लक्ष्मण खरोखर धन्य होय ! ( १६–२० )

" पतीबरोबर वनांत गेलेली ती विदेहराजकन्या सीताही खरोखर कृतकृत्य झाली असून त्या महात्म्याचा वियोग झालेले आम्ही मात्र दुर्भागी आहों, यांत संशय नाहीं. रामानें अरण्याचा स्वीकार केल्यावर व दशरथराजाही स्वर्गाला गेला असतां नायकरहित झालेली ही पृथ्वी नावाड्यांनीं विरहित झालेल्या नावे-

न च प्रार्थयते कश्चिन्मनसापि वसुंधराम् ।
वने निवसतस्तस्य बाहुवीर्याभिरक्षिताम् २३
शून्यसंवरणारक्षामयन्त्रितहयद्विपाम् ।
अनावृतपुरद्वारां राजधानीमरक्षिताम् २४
अप्रहृष्टबलां शून्यां विषमस्थामनावृताम् ।
शत्रवो नाभिमन्यन्ते भक्ष्यान्विषकृतानिव २५
अद्यप्रभृति भूमौ तु शयिष्येऽहं तृणेषु वा ।
फलमूलाशनो नित्यं जटाचीराणि धारयन् २६
तस्याहमुत्तरं कालं निवत्स्यामि सुखं वने ।
तत्प्रतिश्रुतमार्यस्य नैव मिथ्या भविष्यति २७
वसन्तं भ्रातुरर्थाय शत्रुघ्नो मानुवत्स्यति ।
लक्ष्मणेन सहायोध्यामार्यो मे पालयिष्यति २८
अभिषेक्ष्यन्ति काकुत्स्थमयोध्यायां द्विजातयः ।

प्रमाणें मला शून्य दिसत आहे. तो राम वनामध्यें रहात असतांना त्याच्या बाहुवीर्यानेंच सुरक्षित असलेल्या या पृथ्वीची, माझ्यासारखा मनामध्यें कशी बरें इच्छा करील ? जिच्या सभोंवतीं असलेल्या कोटाचें रक्षण होत नाहीं, जिच्यांतील घोडे व हत्ती यांचें कोणी नियमन करीत नाहीं, जिचे दरवाजे कोणी लावीत नाहींत, जिच्यांतील सैन्य आनंदित नसून जी शून्य झालेली आहे व रक्षण करणारा कोणीच नसल्यामुळें जी मोकळी पडलेली आहे आणि जी विपन्न स्थितीमध्यें आहे, अशा त्या अरक्षित राजधानीचा विष मिसळलेल्या अन्नाप्रमाणें स्वीकार करण्याचें शत्रूही मनांत आणीत नाहीं. (२१-२५)

आजपासून मी जटा वाढवून व वल्कलें धारण करून नेहमीं फलमूलांवर उपजीविका करीत जाईन आणि जमिनीवर अथवा गवतावर झोंपी जात जाईन. त्या रामाचें व्रत स्वतः मीच घेईन आणि तें परिपालन करण्याकरितां पुढचीं चौदा वर्षे वनामध्यें घालवीन म्हणजे आर्य रामाची प्रतिज्ञा खोटी ठरणार नाहीं. भावाकरितां मी वनामध्यें राहूं लागलों असतां शत्रुघ्नही माझ्याबरोबर वनामध्यें राहील. माझा श्रेष्ठ भाऊ राम लक्ष्मणासह अयोध्येचें संरक्षण करील.

अपि मे देवताः कुर्युरिमं सत्यं मनोरथम् २९
प्रसाद्यमानः शिरसा मया स्वयं बहुप्रकारं यदि न प्रपत्स्यते ।
ततोऽनुवत्स्यामि चिराय राघवं वनेचरं नार्हति मामुपेक्षितुम् ३०

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टाशीतितमः सर्गः ॥८८॥ [३२८१]

एकोननवतितमः सर्गः ।

व्युष्य रात्रिं तु तत्रैव गङ्गाकूले स राघवः ।
काल्यमुत्थाय शत्रुघ्नमिदं वचनमब्रवीत् १
शत्रुघ्नोत्थाय किं शेषे निषादाधिपतिं गुहम् ।
शीघ्रमानय भद्रं ते तारयिष्यति वाहिनीम् २
जागर्मि नाहं स्वपिमि तथैवार्यं विचिन्तयन् ।
इत्येवमब्रवीद्भ्राता शत्रुघ्नो विप्रचोदितः ३
इति संवदतोरेवमन्योऽन्यं नरसिंहयोः ।
आगम्य प्राञ्जलिः काले गुहो वचनमब्रवीत् ४

त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला अयोध्येमध्यें ब्राह्मण राज्याभिषेक करतील; परंतु हा माझा मनोरथ देव शेवटास नेतील काय ? मी चरणांवर मस्तक ठेऊन अनेक प्रकारांनीं त्याचें मन वनांतून परत येण्याविषयीं वळवीत असतांनाही जर तो कृपा न करील, तर मीही वनांमध्यें राहणाऱ्या रामाबरोबर तेथेंच पुष्कळ दिवस राहीन, तो भक्तवत्सल असल्यामुळें माझा त्याग करणार नाहीं." (२६-३०)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं आठ्यांयशीवा सर्ग संपला ॥ ८८ ॥

त्याच ठिकाणीं गंगातीरावर रात्र काढून रघुवंशज भरत पहाटेस उठला आणि शत्रुघ्नाला म्हणाला, " शत्रुघ्ना ! ऊठ, निजलास काय ? उठ तुझें देव कल्याण करो; निषादराज गुहाला लवकर घेऊन ये म्हणजे तो आपली सेना गंगेतून पलीकडे नेईल. " याप्रमाणें भरतानें हांक मारून शत्रुघ्नाला सांगितलें असतां, " मी झोंपलों नाहीं, आपल्यासारखें रामाचेंच चिन्तन करीत रात्रभर जागाच आहें. " असें शत्रुघ्नही भरतास म्हणाला. याप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ भरत-शत्रुघ्न एकमेकाला सांगत आहेत, तोंच गुह त्यांच्या जवळ आला आणि

कच्चित्सुखं नदीतीरेऽवात्सीः काकुत्स्थ शर्वरीम् ।
कच्चिच्च सहसैन्यस्य तव नित्यमनामयम् ५
गुहस्य तत्तु वचनं श्रुत्वा स्नेहादुदीरितम् ।
रामस्यानुवशो वाक्यं भरतोऽपीदमब्रवीत् ६
सुखा नः शर्वरी धीमन्पूजिताश्चापि ते वयम् ।
गङ्गां तु नौभिर्बह्वीभिर्दाशाः संतारयन्तु नः ७
ततो गुहः संत्वरितः श्रुत्वा भरतशासनम् ।
प्रतिप्रविश्य नगरं तं ज्ञातिजनमब्रवीत् ८
उत्तिष्ठत प्रबुध्यध्वं भद्रमस्तु हि वः सदा ।
नावः समुपकर्षध्वं तारयिष्यामि वाहिनीम् ९
ते तथोक्ताः समुत्थाय त्वरिता राजशासनात् ।
पञ्च नावां शतान्येव समानिन्युः समन्ततः १०
अन्याः स्वस्तिकविज्ञेया महाघण्टाधराधराः ।
शोभमानाः पताकिन्यो युक्तवाहाः सुसंहताः ११

" ककुत्स्थकुलोत्पन्न भरता ! या नदीकिनाऱ्याबर तुझें रात्रीचें वास्तव्य सुखाचें झालें ना ? आणि सैन्यासह तुझें सर्व प्रकारें कुशल आहे ना ? " असें त्यांना विचारूं लागला. ( १-५ )

हें प्रेमानें केलेलें गुहाचें भाषण ऐकून रामाच्या आज्ञेंत वागणारा भरतही त्याला म्हणाला, " हे विचारी गुहा ! होय. ही रात्र आम्हांला खरोखरच सुखावह झाली आणि तूंही आमचा चांगल्या प्रकारें सत्कार केलास. आतां धीवरांनीं पुष्कळ नावांच्या सहाय्यानें आम्हांला गंगेतून पलीकडे न्यावें. " ही भरताची आज्ञा ऐकल्याबरोबर गुह तेथून परत फिरून घाईनें आपल्या नगरामध्यें गेला आणि आपल्या त्या जातभाईंना म्हणाला, " तुमचें नेहमीं कल्याण असो ! उठा, जागे व्हा, आणि नावा घेऊन या. मी भरताची सेना पलीकडे पोंचवून देतों. " याप्रमाणें गुहानें त्यांना सांगितल्याबरोबर राजाज्ञा झाल्याप्रमाणें ते लवकर उठले आणि चोहोंकडून पांचशें नावा घेऊन आले. (६-१०)

याशिवाय मोठमोठ्या घंटा लाविलेल्या, पताका, शिडें आणि नावाडी ज्यांवर

ततः स्वस्तिकविज्ञेयां पाण्डुकम्बलसंवृताम् ।
सनन्दिघोषां कल्याणीं गुहो नावमुपाहरत् १२
तामारुरोह भरतः शत्रुघ्नश्च महाबलः ।
कौसल्या च सुमित्रा च याश्चान्या राजयोषितः १३
पुरोहितश्च तत्पूर्वं गुरवो ब्राह्मणाश्च ये ।
अनन्तरं राजदारास्तथैव शकटापणाः १४
आवासमादीपयतां तीर्थं चाप्यवगाहताम् ।
भाण्डानि चाददानानां घोषस्तु दिवमस्पृशत् १५
पताकिन्यस्तु ता नावः स्वयं दाशैरधिष्ठिताः ।
वहन्त्यो जनमारूढं तदा संपेतुराशुगाः १६
नारीणामभिपूर्णास्तु काश्चित्काश्चित्तु वाजिनाम् ।
काश्चित्तत्र वहन्ति स्म यानयुग्यं महाधनम् १७
तास्तु गत्वा परं तीरमवरोप्य च तं जनम् ।

आहेत व चित्रादिकांच्या योगानें शोभिवंत असून ज्यांचे सांधे बळकट आहेत, अशा 'स्वस्तिक' नांवाच्या नावाही ते घेऊन आले. पांढऱ्या बनातीनें आच्छादिलेली आणि मंगलकारक वाद्यें जिच्यावर वाजत आहेत, अशी स्वस्तिक नांवाचीच एक उत्तम नौका गुह जवळ घेऊन आला असतां, भरत, महाबलाढ्य शत्रुघ्न, कौसल्या, सुमित्रा व इतरही राजस्त्रिया यांनीं त्या नौकेवर आरोहण केलें. त्यानंतर पुरोहित वसिष्ठ, गुरु, ब्राह्मण व बरोबर आलेल्या सरदारांच्या स्त्रिया त्या नौकेवर चढल्याबरोबर गाडे व सामानसुमान दुसऱ्या नौकांवर लादलें. सेनेंतील लोक आपली रात्रीं राहिलेली जागा चुडी पेटवून त्या प्रकाशांत शोधून पाहूं लागले असतां, नावेच्या उतारापाशी गंगेंत प्रवेश करूं लागले असतां आणि सामानसुमान घेऊं लागले असतां जो ध्वनि झाला त्यानें आकाश व्यापून टाकलें. त्यानंतर स्वतः धीवर लोक ज्यांवर बसले आहेत, अशा त्या व बसलेल्या लोकांना वाहून नेणाऱ्या व शिडांच्या योगानें वेगानें जाणाऱ्या नावा एकदम चालूं लागल्या. ( ११-१६ )

कांहीं नावा स्त्रियांनीं भरलेल्या होत्या, कांहीं घोड्यांनीं भरलेल्या होत्या, तर

निवृत्ताः काण्डचित्राणि क्रियन्ते दाशबन्धुभिः　१८
सवैजयन्तास्तु गजा गजारोहैः प्रचोदिताः ।
तरन्तः स्म प्रकाशन्ते सपक्षा इव पर्वताः　१९
नावश्चारुरुहुस्त्वन्ये प्लवैस्तेरुस्तथापरे ।
अन्ये कुम्भघटैस्तेरुरन्ये तेरुश्च बाहुभिः　२०
सा पुण्या ध्वजिनी गङ्गा दाशैः संतारिता स्वयम् ।
मैत्रे मुहूर्ते प्रययौ प्रयागवनमुत्तमम्　२१
आश्वासयित्वा च चमूं महात्मा निवेशयित्वा च यथोपजोषम् ।
द्रष्टुं भरद्वाजमृषिप्रवर्यं ऋत्विक्सदस्यैर्भरतः प्रतस्थे　२२
स ब्राह्मणस्याश्रममभ्युपेत्य महात्मनो देवपुरोहितस्य ।
ददर्श रम्योटजवृक्षदेशं महद्वनं विप्रवरस्य रम्यम्　२३

इत्यार्षे श्रीम०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकोननवतितमः सर्गः॥८९॥ [३३०४]

---

कांहीं गाड्या ओढणारे उत्कृष्ट बैल वगैरे वाहून नेत होत्या. त्या नावा पलीकडल्या तीराला पोंचून त्या लोकांना तेथें उतरून परत फिरल्या असतां धीवर लोक त्यांवर चढले आणि जलप्रवाहांतून वेगवेगळ्या गति घेऊन येऊं लागले. माहुतांनीं हाकारलेले, ध्वज लावलेले हत्ती नावांतून जाऊं लागले असतां पंख असलेल्या पर्वतांप्रमाणें दिसूं लागले. कांहीं सैनिक नावांवर बसून गेले, कांहीं पेटाऱ्यांच्या योगानें तरून गेले, कांहीं लहान तोंडाच्या व मोठ्या घागरींचा आश्रय करून गेले आणि कांहीं तर पोहूनच पार गेले. (१७-२०)

असो. स्वतः धीवरांनीं गंगेपलीकडे नेऊन पोंचविलेली ती पवित्र सेना चार घटिका दिवस आल्यानंतर मैत्रमुहूर्तावर उत्कृष्ट अशा प्रयागवनामध्यें जाऊन पोंचली. तेव्हां त्या सेनेला स्वस्थपणें विश्रांति देऊन आणि आपापल्या आवडीप्रमाणें राहुट्या वगैरे घालावयास अनुज्ञा देऊन व तिला प्रयागवनांतच ठेवून मुनिश्रेष्ठ भरद्वाजांचें दर्शन घेण्याकरितां ऋत्विज आणि सदस्य यांसह भरत पुढें निघाला. महात्म्या देवांचा पुरोहित असलेल्या भरद्वाजाच्या आश्रमाला गेल्यावर रमणीय पर्णकुटिका, वृक्ष आणि अन्य सुंदर भूविभाग यांनीं युक्त असलेलें त्या श्रेष्ठ मुनींचें तें रम्य महावन भरतानें पाहिलें. ( २१-२३ )

नवतितमः सर्गः ।

भरद्वाजाश्रमं गत्वा क्रोशादेव नरर्षभः ।
जनं सर्वमवस्थाप्य जगाम सह मन्त्रिभिः १
पद्भ्यामेव तु धर्मज्ञो न्यस्तशस्त्रपरिच्छदः ।
वसानो वाससी क्षौमे पुरोधाय पुरोहितम् २
ततः संदर्शने तस्य भरद्वाजस्य राघवः ।
मन्त्रिणस्तानवस्थाप्य जगामानुपुरोहितम् ३
वसिष्ठमथ दृष्ट्वैव भरद्वाजो महातपाः ।
संचचालासनात्तूर्णं शिष्यानर्घ्यमिति ब्रुवन् ४
समागम्य वसिष्ठेन भरतेनाभिवादितः ।
अबुध्यत महातेजाः सुतं दशरथस्य तम् ५
ताभ्यामर्घ्यं च पाद्यं च दत्त्वा पश्चात्फलानि च ।
आनुपूर्व्याच्च धर्मज्ञः पप्रच्छ कुशलं कुले ६

---

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणनवदावा अध्याय संपला. ॥ ८९ ॥

भरद्वाज मुनींच्या आश्रमाजवळ गेल्यानंतर सर्व लोकांना एक कोसभर दूरच ठेवून भरत आपल्या मंत्र्यांसह त्यांच्या दर्शनासाठीं निघाला. तो धर्मवेत्ता भरत शस्त्रें व लवाजमा मागें ठेवून देऊन व रेशमी वस्त्रें धारण करून, पुरोहित वसिष्ठांना पुढें घालून पायांनींच निघाला. त्यानंतर त्या भरद्वाज मुनींचें दर्शन घ्यावयाच्या वेळीं मंत्र्यांना मागें राहवयास सांगून वसिष्ठमुनींच्या मागोमाग तो भरत त्यांच्याकडे जाऊं लागला. वसिष्ठ मुनींना पाहिल्याबरोबर महातपस्वी भरद्वाज "पूजासाहित्य आणा; पूजासाहित्य आणा," असें शिष्यांना सांगत सांगत घाईघाईनें आसनावरून उठले. त्यांची व वसिष्ठांची भेट झाल्यावर भरतानें त्यांना नमस्कार केला असतां तो दशरथाचा पुत्र आहे, असें त्या भारद्वाजांना समजून आलें. त्यानंतर अर्घ्य, पाद्य आणि फळें त्या उभयतांना दिल्यावर धर्मवेत्त्या

अयोध्यायां बले कोशे मित्रेष्वपि च मंत्रिषु ।
जानन्दशरथं वृत्तं न राजानमुदाहरत्  ७
वसिष्ठो भरतश्चैनं पप्रच्छतुरनामयम् ।
शरीरेऽग्निषु शिष्येषु वृक्षेषु मृगपक्षिषु  ८
तथेति तु प्रतिज्ञाय भरद्वाजो महायशाः ।
भरतं प्रत्युवाचेदं राघवस्नेहबन्धनात्  ९
किमिहागमने कार्यं तव राज्यं प्रशासतः ।
एतदाचक्ष्व सर्वं मे न हि मे शुध्यते मनः  १०
सुषुवे यममित्रघ्नं कौसल्यानन्दवर्धनम् ।
भ्रात्रा सह सभार्यो यश्चिरं प्रव्राजितो वनम्  ११
नियुक्तः स्त्रीनिमित्तेन पित्रा योऽसौ महायशाः ।
वनवासी भवेतीह समाः किल चतुर्दश  १२
कच्चिन्न तस्यापापस्य पापं कर्तुमिहेच्छसि ।
अकण्टकं भोक्तुमना राज्यं तस्यानुजस्य च  १३

---

भरद्वाज मुनींनीं इक्ष्वाकुकुल, अयोध्या, सैन्य, कोश, मित्र आणि मंत्री याविषयीं क्रमानें कुशल प्रश्न केले. दशरथ राजा मृत्यु पावल्याचें त्यांना माहीतच असल्यामुळें, त्यांनीं आपण होऊन त्यासंबंधींचा उल्लेखच केला नाहीं. ( १–७ )

शरीरप्रकृति, अग्नि, शिष्य, वृक्ष, मृग आणि पक्षी यांसंबंधानें वसिष्ठ व भरत यांनीं त्यांना कुशल प्रश्न केले असतां, " ठीक आहे " असें म्हणून रामाच्या ठिकाणीं असलेल्या प्रेमबंधनामुळें ते महायशस्वी भरद्वाज मुनि भरताला म्हणाले " राज्यसूत्रें चालवीत असतांना तुला येथें येण्याचें कारण काय, हें सर्व मला सांग. तुझ्या येण्यांतील हेतु चांगला असेलच, अशाबद्दल माझ्या मनाला विश्वास वाटत नाहीं. ज्या शत्रुनाशक व आनंदवर्धक रामाला कौसल्येनें जन्म दिला, भाऊ लक्ष्मण आणि आपली पत्नी सीता यांसह ज्याला पुष्कळ दिवसपावेतों वनांत राहण्याच्या उद्देशानें हांकून दिलें आणि ज्या महायशस्वी रामाला " या दण्डकारण्यामध्यें चौदा वर्षेपर्यंत रहा " म्हणून पित्यानें स्त्रीचें प्रिय करण्याकरितां आज्ञा केली, त्या निष्पाप रामाचें व लक्ष्मणाचें कांहीं वाईट करण्याची तर–

एवमुक्तो भरद्वाजं भरतः प्रत्युवाच ह ।
पर्यश्रुनयनो दुःखाद्वाचा संसज्जमानया १४
हतोऽस्मि यदि मामेवं भगवानपि मन्यते ।
मत्तो न दोषमाशङ्के मैवं मामनुशाधिहि १५
न चैतदिष्टं माता मे यदवोचन्मदन्तरे ।
नाहमेतेन तुष्टश्च न तद्वचनमाददे १६
अहं तु तं नरव्याघ्रमुपयातः प्रसादकः ।
प्रतिनेतुमयोध्यायां पादौ चास्याभिवन्दितुम् १७
तं मामेवंगतं गत्वा प्रसादं कर्तुमर्हसि ।
शंस मे भगवन् रामः क संप्रति महीपतिः १८
वासिष्ठादिभिर्ऋत्विग्भिर्याचितो भगवांस्ततः ।
उवाच तं भरद्वाजः प्रसादाद्भरतं वचः १९

---

निष्कंटक राज्याचा उपभोग घेण्याचें मनांत येऊन–तुला इच्छा झाली नाहीं ना?" ( ८–१३ )

याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं विचारलें असतां, भरतांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले व तो अडखळत अडखळतच दुःखानें त्यांना म्हणाला, "आपण सुद्धा जर मला असेंच समजत असाल, तर माझा जन्मच व्यर्थ आहे, असें म्हटलें पाहिजे; परंतु झालेल्या गोष्टीचा दोष माझ्याकडे नाहीं, हें मी खरोखरच मनापासून सांगतों. याकरितां आपण तरी असें बोलूं नये. माझ्या संबंधानें मातेनें जें राजाला सांगितलें, तें मला बिलकूल इष्ट नाहीं, त्याच्या योगानें मला आनंदहि झाला नाहीं आणि तिच्या सांगण्याचा मी स्वीकारही करीत नाहीं. मी रामाच्या चरणांना वंदन करण्याकरितां व अयोध्येला परत येण्याविषयीं त्याचें मन वळवावें, म्हणून त्या पुरुषश्रेष्ठाकडे निघालों आहे. तेव्हां केवळ याच उद्देशानें मी इकडे आलों आहे, असें समजा आणि माझ्यावर कृपा करा. भगवन्! हल्लीं रामराजा कोठें आहे, तें आपण मला सांगा." ( १४–१८ )

यानंतर भरतावर कृपा करण्याविषयीं वसिष्ठ आदिकरून ऋत्विजांनींही विनंती केली असतां भगवान् भरद्वाजमुनि कृपाळू अन्तःकरणानें त्या भरताला

त्वय्येतत्पुरुषव्याघ्र युक्तं राघववंशजे ।
गुरुवृत्तिर्दमश्चैव साधूनां चानुयायिता २०
जाने चैतन्मनःस्थं ते दृढीकरणमस्त्विति ।
अपृच्छं त्वां तवात्यर्थं कीर्तिं समभिवर्धयन् २१
जाने च रामं धर्मज्ञं ससीतं सह लक्ष्मणम् ।
अयं वसति ते भ्राता चित्रकूटे महागिरौ २२
श्वस्तु गन्तासि तं देशं वसाद्य सह मन्त्रिभिः ।
एतं मे कुरु सुप्राज्ञ कामं कामार्थकोविद २३
ततस्तथेत्येवमुदारदर्शनः प्रतीतरूपो भरतोऽब्रवीद्वचः ।
चकार बुद्धिं च तदाश्रमे तदा निशानिवासाय नराधिपात्मजः २४

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे नवतितमः सर्गः ॥९०॥ [३३२८]

एकनवतितमः सर्गः ।

कृतबुद्धिं निवासाय तत्रैव स मुनिस्तदा ।
भरतं कैकयीपुत्रमातिथ्येन न्यमन्त्रयत् १

म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठ भरता ! राघववंशांत उत्पन्न झालेल्या तुझ्या ठिकाणीं गुरुसेवा, इंद्रियदमन आणि सज्जनांचें अनुकरण हें योग्यच आहे. ही तुझ्या मनांतील गोष्ट मला अगोदरच कळली होती. तथापि तुझी कीर्ति अत्यंत वृद्धिंगत करण्याच्या उद्देशानें ती दृढ व्हावी, म्हणून मीं तुला असें विचारलें. सीता आणि लक्ष्मण यांसह धर्मज्ञ राम कोठें रहात आहे, हें मला माहीत आहे. तुझा भावाचा हल्लीं चित्रकूट महापर्वतावर मुक्काम आहे. तूं उद्यां त्या प्रदेशाकडे जाण्यास नीघ. आज मंत्र्यांसह येथेंच रहा आणि हे अर्थकामसंपन्न व अत्यंत ज्ञानी भरता ! ही माझी एवढी इच्छा तूं पूर्ण कर." याप्रमाणें भरद्वाजांनीं सांगितल्यानंतर महाविचारी आणि प्रख्यात कीर्तिमान् भरतानें 'ठीक आहे.' असें म्हटलें आणि त्या भरद्वाज मुनींच्याच आश्रमामध्यें निवास करण्याचें त्या राजकुमारानेंच मनाममध्यें योजिलें. ( १९–२४ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं नव्वदावा सर्ग संपला ॥ ९० ॥

अब्रवीद्भरतस्त्वेनं नन्विदं भवता कृतम् ।
पाद्यमर्घ्यमथातिथ्यं वने यदुपपद्यते २
अथोवाच भरद्वाजो भरतं प्रहसन्निव ।
जाने त्वां प्रीतिसंयुक्तं तुष्येस्त्वं येनकेनचित् ३
सेनायास्तु तवैवास्याः कर्तुमिच्छामि भोजनम् ।
मम प्रीतिर्यथारूपा त्वमर्हो मनुजर्षभ ४
किमर्थं चापि निक्षिप्य दूरे बलमिहागतः ।
कस्मान्नेहोपयातोऽसि सबलः पुरुषर्षभ ५
भरतः प्रत्युवाचेदं प्राञ्जलिस्तं तपोधनम् ।
न सैन्येनोपयातोऽस्मि भगवन्भगवद्भयात् ६
राज्ञा हि भगवन्नित्यं राजपुत्रेण वा तथा ।
यत्नतः परिहर्तव्या विषयेषु तपस्विनः ७
वाजिमुख्या मनुष्याश्च मत्ताश्च वरवारणाः ।

त्या भरद्वाजाश्रमामध्येंच त्या रात्रीं निवास करण्याचा निश्चय केलेल्या त्या कैकेयीपुत्र भरताला त्या भरद्वाज मुनींनीं त्याचें आदरातिथ्य करावें म्हणून जेवण्याचें निमंत्रण दिलें. तेव्हां " पाद्य, अर्घ्य वगैरे यासाठीं ज्या वस्तु वनामध्यें मिळण्यासारख्या आहेत, त्यांच्यायोगानें आपण आदरातिथ्य केलेंच आहे." असें भरत त्यांना म्हणाला असतां, भरद्वाजमुनि हंसत हंसत त्याला म्हणाले, " तूं माझ्यावर प्रेम करणारा आहेस हें मला माहीत आहे व यामुळें तूं कशानेंही संतुष्ट होशील अशी माझी खात्री आहे; परंतु या तुझ्या सेनेला भोजन घालण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां, हे पुरुषश्रेष्ठा ! माझ्या इच्छेचा तूं स्वीकार करावास असें मला वाटतें. हे पुरुषश्रेष्ठा ! सैन्य दूर ठेवून येथें येण्याचें कारण काय? सैन्यासह कां नाहीं आलास ? ' '(१-५)

याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं विचारलें असतां भरत हात जोडून त्या तपस्वी भरद्वाज मुनींना म्हणाला, " महाराज ! आश्रमाला पीडा होईल या भीतीनें मी सैन्यासह येथें आलों नाहीं. कारण राजानें अथवा राजपुत्रानें आपल्या देशामध्यें असलेल्या तपस्वी लोकांना पीडा देण्याचें शक्य तों टाळलें पाहिजे. भगवन् !

प्रच्छाद्य भगवन्भूमिं महतीमनुयान्ति माम् ८
ते वृक्षानुदकं भूमिमाश्रमेषूटजांस्तथा ।
न हिंस्युरिति तेनाहमेक एवागतस्ततः ९
आनीयतामितः सेनेत्याज्ञप्तः परमर्षिणा ।
तथानुचक्रे भरतः सेनायाः समुपागमम् १०
अग्निशालां प्रविश्याथ पीत्वापः परिमृज्य च ।
आतिथ्यस्य क्रियाहेतोर्विश्वकर्माणमाह्वयत् ११
आह्वये विश्वकर्माणमहं त्वष्टारमेव च ।
आतिथ्यं कर्तुमिच्छामि तत्र मे संविधीयताम् १२
आह्वये लोकपालांस्त्रीन्देवाञ्शक्रपुरोगमान् ।
आतिथ्यं कर्तुमिच्छामि तत्र मे संविधीयताम् १३
प्राक्स्रोतसश्च या नद्यस्तिर्यक्स्रोतस एव च ।
पृथिव्यामन्तरिक्षे च समायान्त्वद्य सर्वशः १४
अन्याः स्रवन्तु मैरेयं सुरामन्याः सुनिष्ठिताम् ।

उत्कृष्ट घोडे, मनुष्यें आणि मदोन्मत्त हत्ती मोठा प्रदेश व्यापून माझ्या मागोमाग येत आहेत. त्यांनीं वृक्ष, जलाशय, भूमि आणि आश्रमांतील पर्णकुटिका यांचा नाश करूं नये, यासाठीं मी एकटाच त्यांना तेथें ठेवून येथें आलों आहे." यावर " येथें सेना घेऊन ये " अशी त्या महर्षींची आज्ञा झाल्याबरोबर भरत आपल्या सर्व सैन्याला तेथें घेऊन आला. ( ६-१० )

त्यानंतर अग्निशालेमध्यें जाऊन आणि तोंड धुवून व आचमन करून आतिथ्य करण्याकरितां भरद्वाजमुनींनीं विश्वकर्म्याला बोलावलें. ते म्हणाले, " या सैन्याचें आदरातिथ्य करण्याची माझी इच्छा आहे. यासाठीं, मी विश्वकर्म्याला व त्वष्ट्याला आमंत्रण करीत आहें. या आदरातिथ्यासंबंधानें माझी सर्व सिद्धता करून द्या. त्याचप्रमाणें यम, वरुण व कुबेर या तीन लोकपालांना आणि इंद्र आदिकरून देवांना मी बोलावीत आहें. सैन्याचें आदरातिथ्य करण्याची माझी इच्छा असल्यानें त्यासाठीं योग्य ती तयारी होऊं द्या. पूर्ववाहिन्या आणि उत्तर-वाहिन्या अशा ज्या कांहीं नद्या पृथ्वीवर व आकाशामध्यें असतील, त्या सर्व

अपराश्चोदकं शीतमिक्षुकाण्डरसोपमम् १५
आह्वये देवगन्धर्वान्विश्वावसुहहाहुहून्।
तथैवाप्सरसो देवगन्धर्वैश्चापि सर्वशः १६
घृताचीमथ विश्वाचीं मिश्रकेशीमलम्बुषाम्।
नागदत्तां च हेमां च सोमामद्रिकृतस्थलीम् १७
शक्रं याश्चोपतिष्ठन्ति ब्रह्माणं याश्च भामिनीः।
सर्वास्तुम्बुरुणा सार्धमाह्वये सपरिच्छदाः १८
वनं कुरुषु यद्दिव्यं वासोभूषणपत्रवत्।
दिव्यनारीफलं शश्वत्तत्कौबेरमिहैव तु १९
इह मे भगवान्सोमो विधत्तामन्नमुत्तमम्।
भक्ष्यं भोज्यं च चोष्यं च लेह्यं च विविधं बहु २०
विचित्राणि च माल्यानि पादपप्रच्युतानि च।
सुरादीनि च पेयानि मांसानि विविधानि च २१
एवं समाधिना युक्तस्तेजसाप्रतिमेन च।

---

आज येथें येवोत; त्यांपैकीं कांहीं नद्या मैरेय नांवाच्या मद्याचे प्रवाह सुरू करोत. दुसऱ्या कांहीं नद्या उत्तम रीतीनें तयार केलेल्या सुरेचा प्रवाह उत्पन्न करोत आणि कांहीं नद्या उसाच्या रसाप्रमाणें मधुर व थंडगार पाणी वाहून नेऊं लागोत. विश्वावसु, हाहा व हूहू या देवगंधर्वांना आणि त्याचप्रमाणें देवगंधर्वांसह राहणाऱ्या सर्व अप्सरांना मी आमंत्रण करीत आहें. ( ११-१६ )

" घृताची, विश्वाची, मिश्रकेशी, अलंबुषा, नागदत्ता, हेमा, पर्वतावर राहणारी सोमा, त्याचप्रमाणें इंद्र व ब्रह्मदेव यांची सेवा करणाऱ्या अशा सर्व सालंकार अप्सरांना तुंबुरूसह मी बोलावीत आहें. वस्त्रें व भूषणें हींच ज्यांतील वृक्षांचीं पानें आहेत आणि दिव्य स्त्रिया हींच ज्यांतील वृक्षांचीं फळें आहेत, असें जें उत्तर कुरुदेशामध्यें असलेलें कुबेराचें दिव्य व शाश्वत चैत्ररथ वन तेंच येथें येवो. भगवान् सोम उत्कृष्ट अन्न म्हणजे नानाप्रकारचें पुष्कळ खाण्याचे, चोखण्याचे व चाटण्याचे पदार्थ, सुरा आदिकरून पेयें आणि नानाप्रकारचीं मांसें तयार करो व वृक्षांना आपोआप आलेलीं अद्भुत फुलें तयार ठेवो. " (१७-२१)

शिक्षास्वरसमायुक्तं सुव्रतश्चाब्रवीन्मुनिः　२२
मनसा ध्यायतस्तस्य प्राङ्मुखस्य कृताञ्जलेः ।
आजग्मुस्तानि सर्वाणि दैवतानि पृथक्पृथक्　२३
मलयं दर्दुरं चैव ततः स्वेदनुदोऽनिलः ।
उपस्पृश्य ववौ युक्त्या सुप्रियात्मा सुखं शिवः　२४
ततोऽभ्यवर्षन्त घना दिव्याः कुसुमवृष्टयः ।
देवदुन्दुभिघोषश्च दिक्षु सर्वासु शुश्रुवे　२५
प्रववुश्चोत्तमा वाता ननृतुश्चाप्सरोगणाः ।
प्रजगुर्देवगन्धर्वा वीणाः प्रमुमुचुः स्वरान्　२६
स शब्दो द्यां च भूमिं च प्राणिनां श्रवणानि च ।
विवेशोच्चावचः श्लक्ष्णः समो लयगुणान्वितः　२७
तस्मिन्नेवं गते शब्दे दिव्ये श्रोत्रसुखे नृणाम् ।
ददर्श भारतं सैन्यं विधानं विश्वकर्मणः　२८
बभूव हि समा भूमिः समन्तात्पञ्चयोजनम् ।

---

याप्रमाणें अप्रतिम तेजस्वी आणि समाधि लावलेल्या व उत्तम व्रतस्थ असलेल्या त्या भरद्वाजमुनींनीं शिक्षेंत सांगितल्याप्रमाणें वर्णोच्चारानें देवतांना आह्वान केलें. हात-जोडून व पूर्वेकडे तोंड करून ते मुनि मनामध्यें ध्यान करीत बसले असतांना त्या सर्व देवता एकेक त्यांच्या जवळ येऊं लागल्या. मलय आणि दर्दुर या चंदन वृक्षांनीं भरलेल्या पर्वतांना स्पर्श करून घाम नाहींसा करणारा अतिशय चांगला, मनाला अत्यंत आल्हाद देणारा व सुखकारक वारा वाहूं लागला. मेघ दिव्य पुष्पांची वृष्टि करूं लागले आणि सर्व दिशांमध्यें देवांच्या दुंदुभि ऐकूं येऊं लागल्या. ( २२-२५ )

उत्कृष्ट वायु वाहूं लागले, अप्सरा नृत्य करूं लागल्या, देव व गंधर्व यांचें गायन चालू होऊन, वीणावाद्यांचे ध्वनि ऐकावयास येऊं लागले. तेव्हां मधुर, सम आणि मिलाफानें असलेला तो वाद्यांचा ध्वनि स्वर्ग, पृथ्वी आणि सर्व प्राणिमात्रांच्या कानावर पडूं लागला व याप्रमाणें मनुष्यांच्या कानाला सुखावह असा दिव्य ध्वनि सुरू झाला असतां भरताच्या सैन्याला विश्वकर्म्याची ती तयारी दृष्टीस

शाद्वलैर्बहुभिश्छन्ना नीलवैदूर्यसंनिभैः २९
तस्मिन्बिल्वाः कपित्थाश्च पनसा बीजपूरकाः ।
आमलक्यो बभूवुश्च चूताश्च फलभूषिताः ३०
उत्तरेभ्यः कुरुभ्यश्च वनं दिव्योपभोगवत् ।
आजगाम नदी सौम्या तीरजैर्बहुभिर्वृता ३१
चतुःशालानि शुभ्राणि शालाश्च गजवाजिनाम् ।
हर्म्यप्रासादसंयुक्ततोरणानि शुभानि च ३२
सितमेघनिभं चापि राजवेश्म सुतोरणम् ।
शुक्लमाल्यकृताकारं दिव्यगन्धसमुक्षितम् ३३
चतुरस्रमसंबाधं शयनासनयानवत् ।
दिव्यैः सर्वरसैर्युक्तं दिव्यभोजनवस्त्रवत् ३४
उपकल्पितसर्वान्नं धौतनिर्मलभाजनम् ।
क्लृप्तसर्वासनं श्रीमत्स्वास्तीर्णशयनोत्तमम् ३५

पडली. आसपास पांच योजनेंपर्यंत जमीन साफ होऊन नील व वैडूर्य मण्यांसारख्या कोमल गवतानें आच्छादित झाली. त्या प्रदेशामध्यें बेल, कवठ, फणस, बीजपूरक, आवळा व आम्र आदिकरून वृक्ष फलांनीं सुशोभित दिसूं लागले. (२६–३०)

दिव्य व भोग्य वस्तूंनीं भरून गेलेलें वन उत्तर कुरुदेशांतून तेथें आल्यासारखें वाटलें आणि तीरांवरील अनेक वृक्षांनीं व्याप्त अशी सुंदर नदीही तेथें उत्पन्न झाली. पांढरीं शुभ्र चौसोपी घरें, हत्ती व घोडे यांच्या पागा आणि वाडे व प्रासाद यांनीं युक्त अशा सुंदर वेशीही तेथें उत्पन्न झाल्या. त्या ठिकाणीं एक राजगृह उत्पन्न झालें. तें पांढऱ्या शुभ्र मेघासारखें असून त्याला उत्कृष्ट तोरणें लाविलेलीं होतीं. पांढऱ्या फुलांनीं तें शृंगारलेलें असून दिव्य चंदनाचे त्यांत सडेहि टाकले होते. तें आकारानें चौकोनी असून शांत होतें. शय्या, आसनें आणि वाहनें व सर्व प्रकारचे दिव्य रस, दिव्य भोग्य वस्तु आणि वस्त्रेंही तेथें होतीं. सर्व प्रकारचें अन्न त्यांत तयार केलेलें होतें; त्यांतील भांडीं धुतलेलीं व निर्मल होतीं; सर्व प्रकारचीं आसनें तेथें तयार होतीं आणि तें सुशोभित असून उत्कृष्ट प्रकारच्या

प्रविवेश महाबाहुरनुज्ञातो महर्षिणा ।
वेश्म तद्रत्नसंपूर्णं भरतः कैकयीसुतः ३६
अनुजग्मुश्च ते सर्वे मन्त्रिणः सपुरोहिताः ।
बभूवुश्च मुदा युक्तास्तं दृष्ट्वा वेश्मसंविधिम् ३७
तत्र राजासनं दिव्यं व्यजनं छत्रमेव च ।
भरतो मन्त्रिभिः सार्धमभ्यवर्तत राजवत् ३८
आसनं पूजयामास रामायाभिप्रणम्य च ।
वालव्यजनमादाय न्यषीदत्सचिवासने ३९
आनुपूर्व्यान्निषेदुश्च सर्वे मन्त्रिपुरोहिताः ।
ततः सेनापतिः पश्चात्प्रशास्ता च न्यषीदत ४०
ततस्तत्र मुहूर्तेन नद्यः पायसकर्दमाः ।
उपातिष्ठन्त भरतं भरद्वाजस्य शासनात् ४१
आसामुभयतः कूलं पाण्डुमृत्तिकलेपनाः ।
रम्याश्चावसथा दिव्या ब्राह्मणस्य प्रसादजाः ४२

---

शय्या त्यांत पसरलेल्या होत्या. (३१-३५)

अशा प्रकारच्या त्या रत्नांनीं भरलेल्या घरामध्यें त्या कैकेयीपुत्र महापराक्रमी भरतानें भरद्वाजमहर्षींची आज्ञा झाल्यावर प्रवेश केला. पुरोहितासह सर्व मंत्रीही त्याच्या मागोमाग गेले आणि तें घर निर्माण करण्याचें कौशल्य पाहून आनंदित झाले. तेथें राजाला योग्य असलेलें दिव्य सिंहासन, चामर व छत्र होतें; त्यानें त्याला मंत्र्यांसह प्रदक्षिणा केली. हें रामाचें आहे असें कळून आल्यावर प्रथम रामाला प्रणाम करून त्या सिंहासनाचें पूजन केलें आणि सिंहासनाच्या खालच्या भागीं सचिवांकरितां तयार केलेल्या आसनावर तो चवरी घेऊन बसला. तेव्हां सर्व मंत्री व पुरोहित आपापल्या योग्यतेप्रमाणें तेथें बसले आणि त्यानंतर सेनाधिपति व शिबिर-रक्षक हेही तेथें येऊन बसले. (३६-४०)

एका मुहूर्तानें भरद्वाजमुनींच्या आज्ञेवरून दुधाच्या चिखलानें युक्त असलेल्या नद्या भरताजवळ येऊन दाखल झाल्या. या नद्यांच्या दोन्ही तीरांवर भरद्वाज ब्राह्मणाच्या कृपेमुळें उत्पन्न झालेलीं दिव्य व रम्य वसतिस्थानें असून तीं सफेती

तेनैव च मुहूर्तेन दिव्याभरणभूषिताः ।
आगुर्विंशतिसाहस्रा ब्रह्मणा प्रहिताः स्त्रियः ४३
सुवर्णमणिमुक्तेन प्रवालेन च शोभिताः ।
आगुर्विंशतिसाहस्राः कुबेरप्रहिताः स्त्रियः ४४
याभिर्गृहीतः पुरुषः सोन्माद इव लक्ष्यते ।
आगुर्विंशतिसाहस्रा नन्दनादप्सरोगणाः ४५
नारदस्तुम्बुरुर्गोपः प्रभया सूर्यवर्चसः ।
एते गन्धर्वराजानो भरतस्याग्रतो जगुः ४६
अलम्बुषा मिश्रकेशी पुण्डरीकाथ वामना ।
उपानृत्यन्त भरतं भरद्वाजस्य शासनात् ४७
यानि माल्यानि देवेषु यानि चैत्ररथे वने ।
प्रयागे तान्यदृश्यन्त भरद्वाजस्य तेजसा ४८
बिल्वा मार्दङ्गिका आसञ्शम्याग्राहा बिभीतकाः ।
अश्वत्था नर्तकाश्चासन्भरद्वाजस्य तेजसा ४९
ततः सरलतालाश्च तिलकाः सतमालकाः ।

---

देऊन तयार ठेविलीं होती. त्याचवेळीं ब्रह्मदेवानें पाठविलेल्या, दिव्य अलंकारांनीं नटलेल्या वीस हजार स्त्रिया तेथें आल्या. सुवर्ण, रत्नें, मोत्यें व पोवळीं यांनीं सुशोभित झालेल्या अशा कुबेरानें पाठविलेल्या वीस हजार स्त्रियाहि तेथें येऊन पोंचल्या. पुरुषावर मोहिनी घातली असतां पुरुष उन्माद झाल्यासारखा दिसूं लागेल, असे वीस हजार अप्सरांचे तांडेच्या तांडेहि नंदनवनांतून तेथें आले. ( ४१-४५ )

तेजानें सूर्याप्रमाणें असलेले नारद, तुंबरु व गोप हे गंधर्वराज भरतापुढें गायन करूं लागले. अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका आणि वामना या अप्सरा भरद्वाज मुनींच्या आज्ञेवरून भरतासमोर नृत्य करूं लागल्या. देवांपाशीं आणि चैत्ररथ वनामध्यें जीं फुलें असावयाचीं, तीं भरद्वाज मुनींच्या तपःसामर्थ्यानें प्रयागामध्यें दृष्टीस पडूं लागलीं; इतकेंच नव्हे तर त्या भरद्वाज मुनींच्या तपःप्रभावानें बिल्ववृक्ष मृदंग वाजवूं लागले, बिभीतक वृक्षांनीं शम्या नांवाचा ताल धरला आणि अश्वत्थ वृक्ष नृत्य करूं लागले, तेव्हां देवदारु, ताल, तिलक आणि तमालक हे

प्रहृष्टास्तत्र संपेतुः कुब्जा भूत्वाथ वामनाः ५०
शिंशपामलकी जम्बूर्याश्चान्याः कानने लताः ।
प्रमदाविग्रहं कृत्वा भरद्वाजाश्रमेऽवसन् ५१
सुरां सुरापाः पिबत पायसं च बुभुक्षिताः ।
मांसानि च सुमेध्यानि भक्ष्यन्तां यो यदिच्छति ५२
उच्छोद्य स्नापयन्ति स्म नदीतीरेषु वल्गुषु ।
अप्येकमेकं पुरुषं प्रमदाः सप्त चाष्ट च ५३
संवाहन्त्यः समापेतुर्नार्यो विपुललोचनाः ।
परिमृज्य तदान्योऽन्यं पाययन्ति वराङ्गनाः ५४
हयान्गजान्खरानुष्ट्रांस्तथैव सुरभेः सुतान् ।
अभोजयन्वाहनपास्तेषां भोज्यं यथाविधि ५५
इक्षूंश्च मधुलाजांश्च भोजयन्ति स्म वाहनान् ।
इक्ष्वाकुवरयोधानां चोदयन्तो महाबलाः ५६

---

वृक्षही आनंदित होऊन कुब्ज व खुजे यांच्या रूपानें तेथें येऊन दाखल झाले. ( ४६–५० )

शिंशपा, आवळ्या, जांभळ्या आणि अरण्यांतील ज्या कांहीं दुसऱ्या लता त्या सर्व स्त्रीरूप धारण करून भरद्वाजांच्या आश्रमामध्यें त्या वेळीं येऊन राहूं लागल्या आणि "सुरापान करणाऱ्यांनीं सुरापान करावें, भुकेलेल्यांनीं खीर ओरपावी आणि मांस खाणाऱ्यांनीं चांगलीं पवित्र मांसें खावीं, ज्यांना ज्याची इच्छा असेल त्याचा त्यांनीं स्वीकार करावा" असें म्हणूं लागल्या. रमणीय अशा नदीतीरावर सात-सात आठ-आठ तरुण स्त्रिया एकेका पुरुषाला अंगाला ( तेल वगैरे ) लावून स्नान घालूं लागल्या. विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या स्त्रिया पुरुषांचे पाय चेपण्यासाठीं तेथें आल्या आणि स्नान घातल्यामुळें आपल्या भिजलेल्या शरिरांवर दुसरीं वस्त्रें घालून त्या श्रेष्ठ स्त्रिया एकमेकीला मद्य वगैरे पाजूं लागल्या. घोडे, हत्ती, गाढवें, उंट आणि बैल यांना वाहनसंरक्षक लोकांनीं चारापाणी दिलें. (५१–५५)

आणि इक्ष्वाकु घराण्यांतील श्रेष्ठ श्रेष्ठ योध्यांच्या वाहनांना हांकणाऱ्या त्या महाबलाढ्य वाहन-रक्षकांनीं ऊस, मध आणि लाह्या त्या वाहनांना खावयास

नाश्वबन्धोऽश्वमाजानन्न गजं कुञ्जरग्रहः ।
मत्तप्रमत्तमुदिता सा चमूस्तत्र संबभौ ५७
तर्पिताः सर्वकामैश्च रक्तचन्दनरूषिताः ।
अप्सरोगणसंयुक्ताः सैन्या वाचमुदीरयन् ५८
नैवायोध्यां गमिष्यामो न गमिष्याम दण्डकान् ।
कुशलं भरतस्यास्तु रामस्यास्तु तथा सुखम् ५९
इति पादातयोधाश्च हस्त्यश्वारोहबन्धकाः ।
अनाथास्तं विधिं लब्ध्वा वाचमेतामुदीरयन् ६०
संप्रहृष्टा विनेदुस्ते नरास्तत्र सहस्रशः ।
भरतस्यानुयातारः स्वर्गोऽयमिति चाब्रुवन् ६१
नृत्यन्तश्च हसन्तश्च गायन्तश्चैव सैनिकाः ।
समन्तात्परिधावन्तो माल्योपेताः सहस्रशः ६२
ततो भुक्तवतां तेषां तदन्नममृतोपमम् ।

घातल्या. मोतद्दाराला घोड्याचें भान राहिलें नाहीं व माहुताचें लक्ष हत्तीकडे राहिलें नाहीं; कारण त्या सैन्यांतील लोक कांहीं मादक द्रव्य सेवन केल्यामुळें मत्त झाले होते; कांहीं मद्यपानानें विवेकशून्य बनले होते आणि कांहीं चंदन, माला आदि पदार्थांच्या उपभोगानें आनंदांत दंग होऊन गेले होते. तेव्हां सर्व इच्छा परिपूर्ण करून घेत असलेले, रक्तचंदनाची उटी लाविलेले आणि अप्सरांच्या समुदायांत दंग झालेले सैनिक म्हणाले, "आम्ही आतां अयोध्येमध्यें जाऊं इच्छीत नाहीं व दंडकारण्यांतही जाणार नाहीं. भरताचें कुशल असो आणि रामही सुखी राहो!" याप्रमाणें ते पायदळांतील सैनिक, योद्धे, स्वार, माहुत आणि मोतद्दार अशा प्रकारचें आदरातिथ्य झाल्यामुळें स्वतंत्र झाल्यासारखे होऊन अशा तऱ्हेनें भाषण करूं लागले. (५६–६०)

भरताच्या मागोमाग गेलेले ते हजारों लोक अत्यंत आनंदित होऊन मोठमोठ्यानें ओरडूं लागले व हा स्वर्ग आहे, असें सांगूं लागले आणि हजारों सैनिक गळ्यांत फुलांच्या माळा घालून नाचत, हंसत व गात गात चोहोंकडे सैरावरा धांवूं लागले. तेथील अमृतासारखें अन्न भक्षण करूनहि त्या सैनिकां-

दिव्यानुद्वीक्ष्य भक्ष्यांस्तानभवद्भक्षणे मतिः ६३
प्रेष्याश्चेट्यश्च वध्वश्च बलस्थाश्चापि सर्वशः ।
बभूवुस्ते भृशं प्रीताः सर्वे चाहतवाससः ६४
कुञ्जराश्च खरोष्ट्राश्च गोऽश्वाश्च मृगपक्षिणः ।
बभूवुः सुभृतास्तत्र नातो ह्यन्यमकल्पयन् ६५
नाशुक्लवासास्तत्रासीत्क्षुधितो मलिनोऽपि वा ।
रजसा ध्वस्तकेशो वा नरः कश्चिदृदृश्यत ६६
आजैश्चापि च वाराहैर्निष्ठानवरसंचयैः ।
फलनिर्यूहसंसिद्धैः सूपैर्गन्धरसान्वितैः ६७
पुष्पध्वजवतीः पूर्णाः शुक्लस्यान्नस्य चाभितः ।
ददृशुर्विस्मितास्तत्र नरा लौहीः सहस्रशः ६८
बभूवुर्वनपार्श्वेषु कूपाः पायसकर्दमाः ।
ताश्च कामदुघा गावो द्रुमाश्चासन्मधुश्च्युतः ६९
वाप्यो मैरेयपूर्णाश्च मृष्टमांसचयैर्वृताः ।

ना दिव्य भक्ष्य पदार्थ पाहिल्यावर पुनः भोजन करण्याची इच्छा झाली. सैन्यांतील दास, दासी व स्त्रिया या सर्वांनीं नवीन वस्त्रें धारण केलेलीं होतीं आणि त्या सर्वांना अत्यंत आनंद झालेला होता. हत्ती, गाढवें, उंट, बैल, घोडे, हरिण आणि पक्षी यांनीं त्या ठिकाणीं इतकें कांहीं अन्न खाल्लें कीं, मुनींनीं दिलेल्या अन्नाशिवाय त्यांना दुसरें कांहीं खाण्याची इच्छाच राहिली नाहीं. ( ६१-६५ )

त्या ठिकाणीं पांढरें शुभ्र वस्त्र नेसलेला, भुकेलेला, घाणेरडा अथवा केसांत धूळ वगैरे उडालेला असा एकही पुरुष दिसत नव्हता. बोकड व वराह यांच्या मांसाचीं, उत्कृष्ट मसाला घातलेलीं, फळांच्या रसांनीं तयार केलेलीं स्वादिष्ट व रसाळ बनविलेलीं जीं वरणें भाताच्या भोंवतीं भरून ठेविलेलीं होतीं तीं आणि वर फुलें घातलेलीं अशीं हजारों सुवर्णादि धातूंचीं भांडीं पाहून त्या ठिकाणीं सैन्यांतील पुरुषांना फारच आश्चर्य वाटलें. त्या वनप्रदेशामध्यें दुधाच्या चिखलानें युक्त असलेल्या विहिरी, कामधेनु, गाई आणि मधुर रस ज्यांतून वहात

प्रतप्तपैठरैश्चापि मार्गमायूरकौक्कुटैः ७०
पात्रीणां च सहस्राणि स्थालीनां नियुतानि च।
न्यर्बुदानि च पात्राणि शातकुम्भमयानि च ७१
स्थाल्यः कुम्भ्यः करम्भ्यश्च दधिपूर्णाः सुसंस्कृताः।
यौवनस्थस्य गौरस्य कपित्थस्य सुगन्धिनः ७२
ह्रदाः पूर्णाः रसालस्य दध्नः श्वेतस्य चापरे।
बभूवुः पयसश्चान्ये शर्कराणां च संचयाः ७३
कल्कांश्चूर्णकषायांश्च स्नानानि विविधानि च।
ददृशुर्भाजनस्थानि तीर्थेषु सरितां नराः ७४
शुक्लानंशुमतश्चापि दन्तधावनसंचयान्।
शुक्लांश्चन्दनकल्कांश्च समुद्गेष्ववतिष्ठतः ७५
दर्पणान्परिमृष्टांश्च वाससां चापि संचयान्।
पादुकोपानहं चैव युग्मान्यत्र सहस्रशः ७६

---

आहे, असे वृक्ष उत्पन्न झालेले होते. मैरेय नांवाच्या मद्यानें परिपूर्ण असलेल्या विहिरी तेथें उत्पन्न झाल्या असून फक्त तापवून तयार केलेल्या व खापरावर भाजून तयार केलेल्या अशा हरिण, मोर व कोंबडीं आदिकरून पक्ष्यांच्या रुचिकर मांसांच्या पदार्थांनी युक्त होत्या. ( ६६-७० )

भातानें भरलेल्या सोन्याच्या हजारों पराती, भाज्या व कोशिंबिरी यांनीं भरलेलीं सोन्याचीं लाखों पातेलीं आणि सोन्याचींच कोट्यवधि ताटें तेथें उत्पन्न झालीं होतीं. पिवळ्या आणि सुगंधी द्रव्यांनीं युक्त अशा ताज्या मठ्यानें भरलेलीं व उत्कृष्ट रीतीनें अलंकृत केलेलीं अशीं भांडीं तेथें होतीं आणि पुष्कळ तपेलीं दह्यानें भरलेलीं होतीं व पाणी पिण्याचीं भांडींही तेथें होतीं. जिरें घातलेल्या ताकाचे कांहीं डोह भरलेले होते, पांढऱ्या शुभ्र दह्याचीं कांहीं तळीं भरलेलीं होतीं, दुधानें भरलेलीं कांहीं टाकीं तेथें होतीं आणि साखरेचा साठा असलेलीं कांहीं भुयारेंही तेथें होतीं. कल्क, चूर्ण, नानाप्रकारचीं उटणीं व स्नानाकरितां नानाप्रकारचें पाणी पात्रांतून भरून ठेविलेलें नदीतीर्थावर त्या सैन्यांतील लोकांनीं पाहिलें. निर्मल आणि टोंकाला कुंचल्यासारख्या केलेल्या दांत

आञ्जनीः कङ्कतान्कूर्चांश्छत्राणि च धनूंषि च ।
मर्मत्राणानि चित्राणि शयनान्यासनानि च ७७
प्रतिपानह्रदान्पूर्णान्खरोष्ट्रगजवाजिनाम् ।
अवगाह्य सुतीर्थांश्च ह्रदान्सोत्पलपुष्करान् ७८
आकाशवर्णप्रतिमान्स्वच्छतोयान्सुखाप्लवान् ७९
नीलवैदूर्यवर्णांश्च मृदून्यवससंचयान् ।
निर्वापार्थं पशूनां ते ददृशुस्तत्र सर्वशः ८०
व्यस्मयन्त मनुष्यास्ते स्वप्नकल्पं तदद्भुतम् ।
दृष्ट्वाऽऽतिथ्यं कृतं तावद्भरद्वाजमहर्षिणा ८१
इत्येवं रममाणानां देवानामिव नन्दने ।
भरद्वाजाश्रमे रम्ये सा रात्रिर्व्यत्यवर्तत ८२
प्रतिजग्मुश्च ताः सर्वा गन्धर्वाश्च यथागतम् ।
भरद्वाजमनुज्ञाप्य ताश्च सर्वा वराङ्गनाः ८३
तथैव मत्ता मदिरोत्कटा नरास्तथैव दिव्यागुरुचन्दनोक्षिताः ।

घासण्याच्या काड्या, पुडक्यांमध्यें उगाळून ठेविलेलीं शुभ्र गंधें, स्वच्छ स्वच्छ आरसे, हजारों खडावा-जोड व वहाणा, काजळाच्या डब्या, फण्या, कुंचल्या, छत्र्या, धनुष्यें, आश्चर्यकारक कवचें, शय्या, आसनें आणि गाढवें, उंट, हत्ती व घोडे, जातां येईल अशा उतारानें युक्त, आकाशाप्रमाणें नीलवर्ण, स्वच्छ जलानें भरलेलीं आणि सुखानें स्नान करतां येण्याजोगीं सरोवरें त्यांनीं पाहिलीं. पशूंनीं खाण्यासाठीं नील व वैडूर्यमणि याप्रमाणें दिसत असलेले कोवळ्या गवताचे हजारों ढीग तेथें पाहिले. ( ७१–८० )

अशाप्रकारें भरद्वाजमहर्षींनीं केलेलें तें स्वप्नासारखें अद्भुत आदरातिथ्य अनुभवून ते लोक आश्चर्यानें थक्क झाले व अशा रीतीनें नंदनवनामध्यें रममाण होणाऱ्या देवांप्रमाणें भरद्वाजमुनींच्या रम्य आश्रमामध्येंच दंग होऊन गेलेल्या त्या लोकांची ती रात्र निघून गेली. तेव्हां ते सर्व गंधर्व आणि त्या सर्व दिव्य स्त्रिया भरद्वाज मुनींची परवानगी घेऊन आल्या मार्गानें परत गेल्या; परंतु दिव्य अगरु आणि चंदन यांची उटी ज्यांच्या अंगाला लाविली आहे असे व मदिरा-

तथैव दिव्या विविधाः स्रगुत्तमाः पृथग्विकीर्णा मनुजैः प्रमर्दिताः८४

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकनवतितमः सर्गः ॥९१॥ [३४१२]

द्विनवतितमः सर्गः ।

ततस्तां रजनीं व्युष्य भरतः सपरिच्छदः ।
कृतातिथ्यो भरद्वाजं कामादभिजगाम ह १
तमृषिः पुरुषव्याघ्रं प्रेक्ष्य प्राञ्जलिमागतम् ।
हुताग्निहोत्रो भरतं भरद्वाजोऽभ्यभाषत २
कच्चिदत्र सुखा रात्रिस्तवास्मद्विषये गता ।
समग्रस्ते जनः कच्चिदातिथ्ये शंस मेऽनघ ३
तमुवाचाञ्जलिं कृत्वा भरतोऽभिप्रणम्य च ।
आश्रमादुपनिष्क्रान्तमृषिमुत्तमतेजसम् ४
सुखोषितोऽस्मि भगवन्समग्रबलवाहनः ।
बलवत्तर्पितश्चाहं बलवान्भगवंस्त्वया ५
अपेतक्लमसंतापाः सुभिक्षाः सुप्रतिश्रयाः ।

पानानें मत्त झालेले पुरुष आणि लोकांनीं चुरगळून टाकलेल्या व इकडे तिकडे उडवलेल्या अशा नानाप्रकारच्या उत्कृष्ट दिव्य फुलांच्या माळा हीं मात्र जागच्या-जागीं तेथें तशींच राहिलीं. ( ८१-८४ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एक्याण्णवावा सर्ग संपला. ॥ ९१ ॥

अशा प्रकारें परिवारासह ती रात्र तेथें घालविल्यावर व आदरातिथ्य अनुभविल्यावर भरत रामाच्या भेटीची इच्छा धरून भरद्वाजमुनींकडे गेला. त्या वेळीं अग्निहोत्र होम आटोपून बसलेले ते भरद्वाज मुनि हात जोडून आलेल्या त्या पुरुषश्रेष्ठ भरताला पाहून म्हणाले, " हे निष्पापा ! या आमच्या प्रदेशामध्यें तुझी रात्र सुखानें गेली ना ? आणि तुझे सर्व लोक आमच्या आतिथ्यानें संतुष्ट झाले ना ? " आश्रमांतून बाहेर निघतां निघतां याप्रमाणें त्यांनीं विचारलें असतां त्या उत्कृष्ट तेजस्वी भरद्वाज ऋषींना हात जोडून व प्रणाम करून भरत म्हणाला, " महाराज ! संपूर्ण सैन्य आणि वाहनें यांसह मला या ठिकाणीं अतिशयच सुख

अपि प्रेष्यानुपादाय सर्वे स्म सुसुखोषिताः ६
आमन्त्रयेऽहं भगवन्कामं त्वामृषिसत्तम ।
समीपं प्रस्थितं भ्रातुर्मैत्रेणेक्षस्व चक्षुषा ७
आश्रमं तस्य धर्मज्ञ धार्मिकस्य महात्मनः ।
आचक्ष्व कतमो मार्गः कियानिति च शंस मे ८
इति पृष्टस्तु भरतं भ्रातुर्दर्शनलालसम् ।
प्रत्युवाच महातेजा भरद्वाजो महातपाः ९
भरतार्धतृतीयेषु योजनेष्वजने वने ।
चित्रकूटगिरिस्तत्र रम्यनिर्दरकाननः १०
उत्तरं पार्श्वमासाद्य तस्य मन्दाकिनी नदी ।
पुष्पितद्रुमसंछन्ना रम्यपुष्पितकानना ११
अनन्तरं तत्सरितश्चित्रकूटं च पर्वतम् ।
तयोः पर्णकुटीं तात तत्र तौ वसतो ध्रुवम् १२

---

झालें आणि भगवन् ! सैन्यासह मी अत्यंत तृप्त झालों. दासांसह आम्ही सर्व अत्यंत सुखानें येथें राहिलों; आमचा थकवा व वाटेचे श्रम वगैरे यांचा परिहार झाला असून अन्नपानांची रेलचेल झाली आणि आम्हांला राहण्यास ठिकाणहि चांगलें मिळालें. आतां भगवन् ! मी आपली अनुज्ञा घेतों. हे ऋषिश्रेष्ठा ! भावाकडे जाण्यास निघालेल्या माझ्याकडे आपण अधिचच कृपादृष्टीनें पहात जावें आणि हे धर्मज्ञा ! त्या महात्म्या धर्मनिष्ठ रामाच्या आश्रमाला कोणता मार्ग जातो व तो किती दूर आहे, हें आपण मला सांगा." (१-८)

याप्रमाणें भरतानें विचारलें असतां ते महातेजस्वी व महातपस्वी भरद्वाजमुनि भावाच्या भेटीसाठीं उत्सुक झालेल्या भरताला म्हणाले, "हे भरता ! येथून अडीच योजनांवर म्हणजे दहा कोसांवर निर्जन वनामध्यें रम्य पाषाण आणि अरण्य यांनीं युक्त असलेला चित्रकूट पर्वत आहे. त्या पर्वताच्या उत्तर बाजूनें मंदाकिनी नदी वहात आहे. त्या नदीच्या तीरावर प्रफुल्ल वृक्ष असलेलीं सुंदर वनें आहेत. त्या नदीच्या पलीकडल्या बाजूला चित्रकूट पर्वत आणि राम-लक्ष्मणांची पर्णकुटिका हीं तुला दृष्टीस पडतील. त्या पर्वतावरच ते निःसंशय रहात आहेत.

दक्षिणेन च मार्गेण सव्यदक्षिणमेव च ।
गजवाजिसमाकीर्णां वाहिनीं वाहिनीपते १३
वाहयस्व महाभाग ततो द्रक्ष्यसि राघवम् ।
प्रयाणमिति च श्रुत्वा राजराजस्य योषितः १४
हित्वा यानानि यानार्हा ब्राह्मणं पर्यवारयन् ।
वेपमाना कृशा दीना सह देव्या सुमित्रया १५
कौसल्या तत्र जग्राह कराभ्यां चरणौ मुनेः ।
असमृद्धेन कामेन सर्वलोकस्य गर्हिता १६
कैकेयी तत्र जग्राह चरणौ सव्यपत्रपा ।
तं प्रदक्षिणमागम्य भगवन्तं महामुनिम् १७
अदूराद्भरतस्यैव तस्थौ दीनमनास्तदा ।
तत्र पप्रच्छ भरतं भरद्वाजो महामुनिः १८
विशेषं ज्ञातुमिच्छामि मातॄणां तव राघव ।
एवमुक्तस्तु भरतो भरद्वाजेन धार्मिकः १९

---

तेव्हां यमुनेच्या दक्षिण तीरानें जो मार्ग जातो, त्या मार्गानें तूं जा आणि कांहींसा दूर गेल्यावर त्या मार्गाच्या दोन बाजूनें दोन रस्ते जातात, त्या दोन रस्त्यांपैकीं डाव्या अंगाला दक्षिण दिशेला जाणारा जो रस्ता आहे, त्या रस्त्यानें सेनाधिपते ! हत्ती व घोडे यांनीं युक्त अशी तूं आपली सेना ने; म्हणजे हे महाभाग्यवान् भरता ! तुला रामाचें दर्शन होईल." (९-१४)

याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं सांगितल्यावर व पुढें जाण्याची तयारी झाली हें ऐकल्यावर राजाधिराज दशरथाच्या स्त्रिया रथामध्यें बसून जाण्याला योग्य असतांही आपापले रथ सोडून विद्वान् भरद्वाज मुनींना नमस्कार करण्याकरितां त्यांच्या सभोंवतीं जमल्या. प्रथमतः कांपत असलेल्या, कृश व दीन झालेल्या कौसल्येनें राजपत्नी सुमित्रेसह भरद्वाजमुनींचे पाय आपल्या हातांनीं धरून त्यांना वंदन केलें. त्यानंतर मनोरथ परिपूर्ण न झालेल्या, सर्व लोकांच्या निंदेस पात्र झालेल्या व ओशाळलेल्या कैकेयीनेंही त्यांचे पाय धरले आणि त्या भगवान् महर्षींना प्रदक्षिणा घातली व मनामध्यें खट्टू झालेली ती कैकेयी भरताच्या

उवाच प्राञ्जलिर्भूत्वा वाक्यं वचनकोविदः ।
यामिमां भगवन्दीनां शोकानशनकर्शिताम् २०
पितुर्हि महिषीं देवीं देवतामिव पश्यसि ।
एषा तं पुरुषव्याघ्रं सिंहविक्रान्तगामिनम् २१
कौसल्या सुषुवे रामं धातारमदितिर्यथा ।
अस्या वामभुजं श्लिष्टा या सा तिष्ठति दुर्मनाः २२
इयं सुमित्रा दुःखार्ता देवी राज्ञश्च मध्यमा ।
कर्णिकारस्य शाखेव शीर्णपुष्पा वनान्तरे २३
एतस्यास्तौ सुतौ देव्याः कुमारौ देववर्णिनौ ।
उभौ लक्ष्मणशत्रुघ्नौ वीरौ सत्यपराक्रमौ २४
यस्याः कृते नरव्याघ्रौ जीवनाशमितो गतौ ।
राजा पुत्रविहीनश्च स्वर्गं दशरथो गतः २५
क्रोधनामकृतप्रज्ञां दृप्तां सुभगमानिनीम् ।

---

जवळ जाऊन उभी राहिली. तेव्हां, "हे राघवा ! तुझ्या मातांसंबंधानें विशेष वृत्तांत जाणण्याची माझी इच्छा आहे." असें महर्षि भरद्वाज भरताला म्हणाले. ( १४-१९ )

त्यावर तो धर्मनिष्ठ व संभाषणनिपुण भरत हात जोडून त्यांना म्हणाला, "भगवन् ! शोक आणि उपवास यांच्या योगानें कृश व दीन झालेली ही देवतेप्रमाणें असलेली माझ्या पित्याची पट्टराणी आपण पहात आहां. त्या या कौसल्येनें सिंहाप्रमाणें पराक्रमदर्शक गतीनें शोभणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामाला– विष्णूला जन्म देणाऱ्या अदितीप्रमाणें– जन्म दिला आहे. तिच्या डाव्या बाजूला तिच्या शेजारींच जी ही खिन्न होऊन उभी राहिली आहे, ती ही सुमित्रा, राजाची मधली स्त्री होय. तीही दुःखाकुल झाली असल्यामुळें पुष्पें गळून जाऊन वनांत पडलेल्या कर्णिकार वृक्षाच्या शाखेप्रमाणें दिसत आहे. वीर, अमोघ पराक्रमी आणि देवासारखे ते उभयतां राजकुमार लक्ष्मण व शत्रुघ्न याच राजपत्नीचे पुत्र होत. जिच्याकरितां पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मणांना मरणासारखी विपत्ति भोगावी लागत आहे आणि जिच्याकरितां दशरथराजा पुत्रवियोग होऊन स्वर्गाला चालता झाला, ती

ऐश्वर्यकामां कैकेयीमनार्यामार्यरूपिणीम् २६
ममैतां मातरं विद्धि नृशंसां पापनिश्चयाम् ।
यतो मूलं हि पश्यामि व्यसनं महदात्मनः २७
इत्युक्त्वा नरशार्दूलो बाष्पगद्गदया गिरा ।
विनिःश्वस्य स ताम्राक्षः क्रुद्धो नाग इव श्वसन् २८
भरद्वाजो महर्षिस्तं ब्रुवन्तं भरतं तदा ।
प्रत्युवाच महाबुद्धिरिदं वचनमर्थवित् २९
न दोषेणावगन्तव्या कैकेयी भरत त्वया ।
रामप्रव्राजनं ह्येतत्सुखोदर्कं भविष्यति ३०
देवानां दानवानां च ऋषीणां भावितात्मनाम् ।
हितमेव भविष्यद्धि रामप्रव्राजनादिह ३१
अभिवाद्य तु संसिद्धः कृत्वा चैनं प्रदक्षिणम् ।
आमन्त्र्य भरतः सैन्यं युज्यतामिति चाब्रवीत् ३२
ततो वाजिरथान्युक्त्वा दिव्यान्हेमविभूषितान् ।

---

ही सन्तापी, अविचारी, गर्विष्ठ, स्वतःला भाग्यवती मानणारी, ऐश्वर्यलुब्ध, सज्जनासारखी दिसणारी परंतु दुर्जन, दुष्ट आणि पापबुद्धि माझी माता कैकेयी, असें आपण समजा. हिच्यामुळेंच स्वतःवर आलेलें संकट पाहण्याचा मला प्रसंग आला आहे." (१९-२७)

याप्रमाणें गळा दाटून आल्यामुळें अस्पष्ट उच्चार होत असलेल्या वाणीनें भरद्वाजांना सांगत असतां त्या पुरुषश्रेष्ठ भरताचे डोळे लाल झाले व तो क्रुद्ध होऊन सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला. तेव्हां तशा प्रकारें भाषण करणाऱ्या त्या भरताला महाबुद्धिमान् आणि रामानें वनवासांत जाण्याचा हेतु जाणणारे महर्षि भरद्वाज म्हणाले, " भरता ! तूं कैकेयीला याबद्दल दोष देऊं नको. या रामाच्या वनवासांत जाण्याचा परिणाम सुखावह होईल कारण; या रामाच्या वनवासांत जाण्यावरच देव, दानव आणि जितेंद्रिय ऋषि यांचें हित अवलंबून आहे."(२८-३१)

याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं सांगितल्यानंतर भरत त्यांना अभिवंदन करून जाण्यासाठीं तयार झाला आणि त्यांना प्रदक्षिणा करून व त्यांचा निरोप घेऊन

अध्यारोहत्प्रयाणार्थं बहून्बहुविधो जनः　३३
गजकन्या गजाश्चैव हेमकक्ष्याः पताकिनः ।
जीमूता इव घर्मान्ते सघोषाः संप्रतस्थिरे　३४
विविधान्यपि यानानि महान्ति च लघूनि च ।
प्रययुः सुमहार्हाणि पादैरपि पदातयः　३५
अथ यानप्रवेकैस्तु कौसल्याप्रमुखाः स्त्रियः ।
रामदर्शनकाङ्क्षिण्यः प्रययुर्मुदितास्तदा　३६
चन्द्रार्कतरुणाभासां नियुक्तां शिबिकां शुभाम् ।
आस्थाय प्रययौ श्रीमान्भरतः सपरिच्छदः　३७
सा प्रयाता महासेना गजवाजिसमाकुला ।
दक्षिणां दिशमावृत्य महामेघ इवोत्थितः　३८
वनानि च व्यतिक्रम्य जुष्टानि मृगपक्षिभिः ।
गङ्गायाः परवेलायां गिरिष्वथ नदीष्वपि　३९
सा संप्रहृष्टद्विपवाजियूथा वित्रासयन्ती मृगपक्षिसंघान् ।

---

'सैन्याची तयारी करा' म्हणून त्यानें आज्ञा केली. तेव्हां दिव्य आणि सोन्यानें मढविलेले असे रथ सज्ज करून त्याच्या बरोबर सर्व तऱ्हेचे लोक तेथून निघण्यासाठीं त्यांवर चढले. जरीच्या झुली व पताका धारण केलेल्या हत्तिणी व हत्ती हे वर्षाकालीं गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें गर्जना करीत करीत चालूं लागले. नानाप्रकारचे व मोठमोठे मूल्यवान् लहान–मोठे रथ चालूं लागले आणि सर्व पायदळहि मार्गास लागलें. रामदर्शनाची इच्छा करणाऱ्या कौसल्या आदिकरून स्त्रिया आनंदित होऊन उत्कृष्ट रथांत बसून जाऊं लागल्या आणि नुकताच उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणें शोभणारा व भोई वहात असलेल्या पालखींत बसून वैभवशाली भरत लवाजम्यासह चालला. ( ३२–३७ )

याप्रमाणें आकाशामध्यें उत्पन्न झालेल्या मोठ्या मेघाप्रमाणें दक्षिण दिशा व्यापून हत्तींनीं व घोड्यांनीं गजबजलेली ती प्रचंड सेनाही पाठोपाठ चालूं लागली. थोड्याच वेळांत गंगेच्या पश्चिम तीरावर असलेली, पर्वतावरील व नदीतीरांवरील वनें ओलांडून ती सेना पुढें गेली. सारांश, आनंदित हत्ती व

महद्वनं तत्प्रविगाहमाना रराज सेना भरतस्य तत्र ४०

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विनवतितमः सर्गः ॥९२॥ [३४५२]

त्रिनवतितमः सर्गः ।

तया महत्या यायिन्या ध्वजिन्या वनवासिनः ।
अर्दिता यूथपा मत्ताः सयूथाः संप्रदुद्रुवुः १
ऋक्षाः पृषतमुख्याश्च रुरवश्च समन्ततः ।
दृश्यन्ते वनवाटेषु गिरिष्वपि नदीषु च २
स संप्रतस्थे धर्मात्मा प्रीतो दशरथात्मजः ।
वृतो महत्या नादिन्या सेनया चतुरङ्गया ३
सागरौघनिभा सेना भरतस्य महात्मनः ।
महीं संछादयामास प्रावृषि द्यामिवाम्बुदः ४
तुरङ्गौघैरवतता वारणैश्च महाबलैः ।
अनालक्ष्याचिरं कालं तस्मिन्काले बभूव सा ५

---

घोडे यांच्या तांड्यांनीं युक्त व पशुपक्ष्यांच्या समुदायांना घाबरून सोड-णारी ती भरताची सेना त्या महावनामध्यें प्रवेश करतांना फारच शोभूं लागली. ( ३८-४० )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ब्याण्णवावा सर्ग संपला ॥ ९२ ॥

ती प्रचंड सेना जाऊं लागली असतां वनचर लोक आणि आपापल्या कळ-पांतील म्होरके हत्ती भीतीनें घाबरून जाऊन आपापल्या कळपासह इतस्ततः सैरावैरां पळूं लागले. पर्वतावर व नद्यांजवळ राहणारीं अस्वलें व ठिपकेवाले हरिण भिऊन गेलेले दिसूं लागले. याप्रमाणें मोठ्या चतुरंग सेनेनें परिवेष्टित झालेला तो धर्मनिष्ठ दशरथपुत्र भरत आनंदित होऊन व उल्हासानें मार्ग चालूं लागला. महात्म्या भरताच्या त्या समुद्रासारख्या सेनेनें वर्षाकालीं आकाश व्याप्त करणाऱ्या मेघाप्रमाणें तो सर्व प्रदेश व्यापून टाकला आणि पुष्कळसे घोडे व हत्ती यांच्या योगानें ती सेना थोडा वेळपर्यंत त्या वेळीं जवळजवळ दिसे-नाशी झाली. ( १-५ )

स गत्वा दूरमध्वानं संपरिश्रान्तवाहनः ।
उवाच वचनं श्रीमान्वसिष्ठं मन्त्रिणां वरम् ६
यादृशं लक्ष्यते रूपं यथा चैव मया श्रुतम् ।
व्यक्तं प्राप्ताः स तं देशं भरद्वाजो यमब्रवीत् ७
अयं गिरिश्चित्रकूटस्तथा मन्दाकिनी नदी ।
एतत्प्रकाशते दूरान्नीलमेघनिभं वनम् ८
गिरेः सानूनि रम्याणि चित्रकूटस्य संप्रति ।
वारणैरवमृद्यन्ते मामकैः पर्वतोपमैः ९
मुञ्चन्ति कुसुमान्येते नगाः पर्वतसानुषु ।
नीला इवातपापाये तोयं तोयधरा घनाः १०
किंनराचरितं देशं पश्य शत्रुघ्न पर्वते ।
हयैः समन्तादाकीर्णं मकरैरिव सागरम् ११
एते मृगगणा भान्ति शीघ्रवेगाः प्रचोदिताः ।
वायुप्रविद्धाः शरदि मेघजाला इवाम्बरे १२

तेव्हां, बराच दूर मार्ग चालून गेल्यावर व वाहनें थकून गेल्यामुळें तो वैभवशाली भरत मंत्रिश्रेष्ठ वसिष्ठांना म्हणाला, " भरद्वाज मुनींनीं प्रदेशाची जशी माहिती सांगितली आणि जशा प्रकारें आम्हीं ऐकलें आहे, तशाच प्रकारचा हा प्रदेश दिसत आहे. यावरून त्या प्रदेशावर आपण आलों, हें अगदीं स्पष्ट होत आहे. हा चित्रकूट पर्वत असून त्याचप्रमाणें ही मंदाकिनी नदी आहे आणि हें नीलमेघाप्रमाणें असलेलें वन दुरून दिसत आहे. आतां लवकरच माझे पर्वतासारखे असलेले हत्ती चित्रकूट पर्वताचीं रम्य शिखरें तुडवीत जाऊं लागतील. उन्हाळा संपल्यानंतर उदक धारण करणारे काळे-कभिन्न मेघ ज्याप्रमाणें उदकाची वृष्टि करतात, त्याचप्रमाणें हे वृक्ष पर्वतशिखरांवर फुलांची वृष्टि करीत आहेत. ( ६–१० )

"हे शत्रुघ्ना ! मगरांनीं व्याप्त झालेल्या समुद्राप्रमाणें अश्वांनीं सभोंवतीं गजबजून गेलेला व किन्नरांनीं आक्रमण केलेल्या या प्रदेशाकडे पहा. वायूनें हांकून लावलेले मेघसमूह ज्याप्रमाणें शरदृतूमध्यें आकाशांत शोभूं लागतात, त्याचप्रमाणें

*

कुर्वन्ति कुसुमापीडाञ्शिरःसु सुरभीनमी ।
मेघप्रकाशैः फलकैर्दाक्षिणात्या नरा यथा १३
निष्कूजमिव भूत्वेदं वनं घोरप्रदर्शनम् ।
अयोध्येव जनाकीर्णा संप्रति प्रतिभाति मे १४
खुरैरुदीरितो रेणुर्दिवं प्रच्छाद्य तिष्ठति ।
तं वहत्यनिलः शीघ्रं कुर्वन्निव मम प्रियम् १५
स्यन्दनांस्तुरगोपेतान्सूतमुख्यैरधिष्ठितान् ।
एतान्संपततः शीघ्रं पश्य शत्रुघ्न कानने १६
एतान्वित्रासितान्पश्य बर्हिणः प्रियदर्शनान् ।
एवमापततः शैलमधिवासं पतत्त्रिणाम् १७
अतिमात्रमयं देशो मनोज्ञः प्रतिभाति मे ।
तापसानां निवासोऽयं व्यक्तं स्वर्गपथोऽनघ १८
मृगा मृगीभिः सहिता बहवः पृषता वने ।
मनोज्ञरूपा लक्ष्यन्ते कुसुमैरिव चित्रिताः १९

सैनिकांनीं पळवून लाविलेले ते महावेगवान् पशूंचे कळप दिसत आहेत; मेघासारख्या ढालांनीं युक्त असलेले हे सैनिक दक्षिणेकडील लोकांप्रमाणें फुलांचे सुवासिक तुरे डोक्यांवर लावीत आहेत. आम्ही येण्यापूर्वी निःशब्द असलेलें आणि म्हणूनच दिसण्यांतही भयंकर असें हें वन आतां लोकांनीं भरलेल्या अयोध्येप्रमाणें गजबजलेलें दिसत आहे; घोड्यांच्या खुरांनीं उडालेल्या धुळीनें आकाश व्यापून टाकलें आहे आणि माझें प्रिय करण्याकरितांच कीं काय, वायु तिला लवकर वाहून नेत आहे. ( ११-१५ )

" शत्रुघ्ना ! घोडे जोडलेले व मुख्य मुख्य सारथी ज्यांवर बसले आहेत असे हे रथ वनांतून वेगानें चाललेले तूं पहा आणि याप्रमाणें दिसण्यांत सुंदर असे हे मोर घाबरून जाऊन पक्ष्यांचें निवासस्थान असलेल्या पर्वतावर उडून जात आहेत, ते पहा. हा प्रदेश मला फारच मनोहर दिसत आहे. हे निष्पाप शत्रुघ्ना ! हा स्वर्गाप्रमाणें भासणारा प्रदेश तापसांचें निवासस्थान असल्याचें स्पष्ट होत आहे. हरिणींसह असलेले हे हरिण शरिरावरील ठिपक्यांच्या योगानें नानाप्रकारच्या

साधु सैन्याः प्रतिष्ठन्तां विचिन्वन्तु च काननम् ।
यथा तौ पुरुषव्याघ्रौ दृश्येते रामलक्ष्मणौ　　२०
भरतस्य वचः श्रुत्वा पुरुषाः शस्त्रपाणयः ।
विविशुस्तद्वनं शूरा धूमाग्रं ददृशुस्ततः　　२१
ते समालोक्य धूमाग्रमूचुर्भरतमागताः ।
नामनुष्ये भवत्यग्निर्व्यक्तमत्रैव राघवौ　　२२
अथ नात्र नरव्याघ्रौ राजपुत्रौ परंतपौ ।
अन्ये रामोपमाः सन्ति व्यक्तमत्र तपस्विनः　　२३
तच्छ्रुत्वा भरतस्तेषां वचनं साधुसंमतम् ।
सैन्यानुवाच सर्वांस्तानमित्रबलमर्दनः　　२४
यत्ता भवन्तस्तिष्ठन्तु नेतो गन्तव्यमग्रतः ।
अहमेव गमिष्यामि सुमन्त्रो धृतिरेव च　　२५
एवमुक्तास्ततः सैन्यास्तत्र तस्थुः समन्ततः ।
भरतो यत्र धूमाग्रं तत्र दृष्टिं समादधत्　　२६

---

फुलांनीं शृंगारल्यासारखे वनामध्यें मनोहर दिसत आहेत. तरी आतां सैनिकांना खुशाल पुढें जाऊं द्या आणि ते पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण दृष्टीस पडतील, अशा रीतीनें त्यांना वन शोधूं द्या." ( १६-२० )

हें भरताचें भाषण ऐकल्यावर हातांमध्यें शस्त्र घेतलेल्या शूर पुरुषांनीं त्या वनामध्यें प्रवेश केला, तेव्हां त्यांना तेथें धूर दृष्टीस पडला. तेव्हां तो धूर पाहून ते भरतापाशीं आले आणि त्याला म्हणाले, "या निर्जन प्रदेशामध्यें अग्नि असण्याचा संभवच नाहीं. यावरून याच ठिकाणीं रघुवंशज राम-लक्ष्मण असल्याचें स्पष्ट होत आहे. अथवा ते पुरुषश्रेष्ठ शत्रुतापन राजकुमार जर येथें नसतील तर या ठिकाणीं रामासारखे इतर तपस्वी असतील, हें उघडच आहे." हें त्यांचें युक्तियुक्त भाषण ऐकून शत्रुसैन्याचें मर्दन करणारा भरत त्या सर्व सैनिकांना म्हणाला, "तुम्ही येथें सज्ज होऊन रहा; येथून पुढें जाऊं नका. सुमंत्र व धृति यांना बरोबर घेऊन मीच तिकडे जातों." ( २१-२५ )

याप्रमाणें भरतानें सांगितल्यावर ते सैनिक तेथेंच सभोंवतीं उभे राहिले

व्यवस्थिता या भरतेन सा चमूर्निरीक्षमाणापि च भूमिमग्रतः।
बभूव हृष्टा न चिरेण जानती प्रियस्य रामस्य समागमं तदा २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रिनवतितमः सर्गः॥९३॥

चतुर्नवतितमः सर्गः। [३४७९]

दीर्घकालोषितस्तस्मिन्गिरौ गिरिवरप्रियः।
वैदेह्याः प्रियमाकाङ्क्षन्स्वं च चित्तं विलोभयन् १
अथ दाशरथिश्चित्रं चित्रकूटमदर्शयत्।
भार्याममरसंकाशः शचीमिव पुरंदरः २
न राज्यभ्रंशनं भद्रे न सुहृद्भिर्विनाभवः।
मनो मे बाधते दृष्ट्वा रमणीयमिमं गिरिम् ३
पश्येममचलं भद्रे नानाद्विजगणायुतम्।
शिखरैः खमिवोद्विद्धैर्धातुमद्भिर्विभूषितम् ४
केचिद्रजतसंकाशाः केचित्क्षतजसंनिभाः।

---

आणि जिकडे तो धूर दिसत होता, तिकडे भरतानें दृष्टि वळविली. भरतानें उभी केलेली ती सेना आपल्या निवासाकरितां योग्य ठिकाण पाहूं लागली आणि प्रिय रामाशीं भरताची भेट झाल्याचें कळून आल्यामुळें तर तिला विशेषच आनंद झाला. ( २६-२७ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्र्याण्णवावा सर्ग संपला ॥९३॥

उत्कृष्ट पर्वतावर राहणें ज्याला आवडूं लागलें होतें आणि ज्याला त्या चित्रकूटपर्वतावर राहून बरेच दिवस झाले आहेत, असा देवासारखा असलेला दशरथपुत्र राम सीतेची व स्वतःची करमणूक करण्याच्या इच्छेनें तिला, इंद्रानें ज्याप्रमाणें इंद्राणीला दाखवावा त्याप्रमाणें, तो अद्भुत चित्रकूट पर्वत दाखवूं लागला. तो म्हणाला, " हा रमणीय पर्वत पाहून, हे कल्याणि ! राज्यभ्रंश आणि आप्तेष्टांचा वियोग यांच्या योगानें माझ्या मनाला मुळींदेखील दुःख होत नाहीं. हे भद्रे ! धातूंनीं युक्त असलेल्या गगनचुंबित शिखरांनीं विभूषित आणि नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं संपन्न असलेला हा पर्वत पहा. धातूंनीं विभूषित

पीतमाञ्जिष्टवर्णाश्च केचिन्मणिवरप्रभाः　　५
पुष्पार्ककेतकाभाश्च केचिज्ज्योतीरसप्रभाः ।
विराजन्तेऽचलेन्द्रस्य देशा धातुविभूषिताः　　६
नानामृगगणैर्द्वीपितरक्ष्वृक्षगणैर्वृतः ।
अदुष्टैर्भात्ययं शैलो बहुपक्षिसमाकुलः　　७
आम्रजम्ब्वसनैर्लोध्रैः प्रियालैः पनसर्धवैः ।

झालेले या श्रेष्ठ पर्वतावरील प्रदेश कांहीं रुप्यासारखे, कांहीं रक्तासारखे, कांहीं पिवळया रंगाचे व मांजिष्ठवर्णाचे, कांहीं उत्कृष्ट रत्नांच्या कांतीनें शोभणारे, कांहीं पुष्पराग, स्फटिक आणि केतक पुष्पें यांसारखे आणि कांहीं नक्षत्रें व पाऱ्याच्या‡ वर्णाचे दिसत आहेत. ( १–६ )

" नानाप्रकारचीं निरुपद्रवी * जनावरें वाघ, तरस व अस्वलें यांचे समुदाय यांनीं भरलेला आणि अनेक पक्ष्यांनीं गजबजून गेलेला हा पर्वत सुशोभित

‡ मुळामध्यें " रस " हा शब्द आहे व तो धातूंनीं विभूषित झालेले पर्वतावरील प्रदेश कसे दिसतात, हें वर्णन चाललें असतांना आलेला आहे. तेव्हां टीकाकारांच्या मताप्रमाणें याचा अर्थ पारदरस आहे; दुसरा होणें शक्य नाहीं. तेव्हां हजारों वर्षांपासून प्रसिद्ध असलेल्या अत्यंत प्राचीन रामायण ग्रंथांतील हें पारदाचें नांव, प्राचीन ग्रंथांत आढळत नाहीं, असें म्हणणाऱ्यांनीं लक्षांत ठेवावें.

* व्याघ्रादि श्वापदांना या ठिकाणीं " अदुष्टैः " म्हणजे हिंसादिदोषरहित असें जें विशेषण दिलें आहे तें योग्यच आहे. कारण ज्या प्रदेशामध्यें अहिंसासिद्धि प्राप्त झालेले तपस्वी असतात, त्या प्रदेशांतील प्राण्यांच्या ठिकाणीं हिंसादोष रहात नाहीं आणि परस्परांतील वैरभाव नाहींसा होतो, असें पातंजलि–योगशास्त्रामध्यें सांगितलें आहे. भगवद्भक्त तुकाराम महाराजांनींही आपल्या एका अभंगांत हें दर्शविलें आहे. कूर्मपुराणामध्यें " कर्मणा मनसा वाचा सर्वभूतेषु सर्वदा । अक्लेशजननं प्रोक्तं त्वहिंसा परमर्षिभिः ॥ " या श्लोकांत अहिंसेचें लक्षण सांगितलें असून त्याचा अर्थ– काया, वाचा आणि मन यांपैकीं कशानेंही कोणत्याच प्राण्याला कधींही पीडा न देणें, याला महर्षींनीं अहिंसा असें म्हटलें आहे– असा आहे.

अङ्कोलैर्भव्यतिनिशैर्बिल्वतिन्दुकवेणुभिः ८
काश्मर्यारिष्टवरणैर्मधूकैस्तिलकैरपि ।
बदर्यामलकैर्नीपैर्वेत्रधन्वनबीजकैः ९
पुष्पवद्भिः फलोपेतैश्छायावद्भिर्मनोरमैः ।
एवमादिभिराकीर्णः श्रियं पुष्यत्ययं गिरिः १०
शैलप्रस्थेषु रम्येषु पश्येमान्कामहर्षणान् ।
किंनरान्द्वन्द्वशो भद्रे रममाणान्मनस्विनः ११
शाखावसक्तान्खड्गांश्च प्रवराण्यम्बराणि च ।
पश्य विद्याधरस्त्रीणां क्रीडोद्देशान्मनोरमान् १२
जलप्रपातैरुद्भेदैर्निष्पन्दैश्च क्वचित्क्वचित् ।
स्रवद्भिर्भात्ययं शैलः स्रवन्मद इव द्विपः १३
गुहासमीरणो गन्धान्नानापुष्पभवान्बहून् ।
घ्राणतर्पणमभ्येत्य कं नरं न प्रहर्षयेत् १४
यदीह शरदोऽनेकास्त्वया सार्धमनिन्दिते ।
लक्ष्मणेन च वत्स्यामि न मां शोकः प्रधर्षति १५

दिसत आहे. आंबा, जांभळी, लोध्र, खिरणी, फणस, धव, अक्रोड, भव्य, तिवस, बेल, टेंबुर्णी, कळक, शिवणी, लिंबे, वायवरणा, मोहा, तिळवा, बोरी, आंवळी, कळंब, वेत, इंद्रयव व ईंडलिंबू इत्यादि प्रकारचे मनोहर फळवृक्ष, पुष्पवृक्ष व छायावृक्ष यांनीं व्याप्त झालेला हा पर्वत शोभून दिसत आहे. (७–१०)

"रम्य पर्वतशिखरांवर असलेले हे कामोद्दीपक प्रदेश व त्या प्रदेशावर जोड्यांनीं विहार करणारे विचारी किन्नर, हे कल्याणि ! तूं पहा. वृक्षशाखांत लोंबत असलेलीं विद्याधरांचीं खड्गें व त्यांच्या स्त्रियांचीं उत्कृष्ट वस्त्रें आणि त्यांचीं अतिशय मनोरम विहारस्थलें पहा. उच्च प्रदेशांवरून वहात येणारे धबधबे व भूमि फोडून वहात जाणारे झरे यांच्या योगानें हा पर्वत मदस्राव होत असलेल्या हत्तीप्रमाणें दिसत आहे. गुहेच्या दारांतून येणारा, नानाप्रकारच्या फुलांचे अनेक गंध वाहून नेणारा आणि घ्राणेंद्रिय तृप्त करणारा हा वायु जवळून जात असतां कोणत्या बरें पुरुषाला आनंदित करणार नाहीं ? हे निष्पाप स्त्रिये !

बहुपुष्पफले रम्ये नानाद्विजगणायुते ।
विचित्रशिखरे ह्यस्मिन्रतवानस्मि भामिनि　१६
अनेन वनवासेन मम प्राप्तं फलद्वयम् ।
पितुश्चानृण्यता धर्मे भरतस्य प्रियं तथा　१७
वैदेहि रमसे कच्चिच्चित्रकूटे मया सह ।
पश्यन्ती विविधान्भावान्मनोवाक्कायसंमतान्　१८
इदमेवामृतं प्राहू राज्ञि राजर्षयः परे ।
वनवासं भवार्थाय प्रेत्य मे प्रपितामहाः　१९
शिलाः शैलस्य शोभन्ते विशालाः शतशोऽभितः ।
बहुला बहुलैर्वर्णैर्नीलपीतसितारुणैः　२०
निशि भान्त्यचलेन्द्रस्य हुताशनशिखा इव ।
ओषध्यः स्वप्रभालक्ष्म्या भ्राजमानाः सहस्रशः　२१
केचित्क्षयनिभा देशाः केचिदुद्यानसंनिभाः ।

---

या ठिकाणीं तूं आणि लक्ष्मण यांसह जरी मी पुष्कळ वर्षे राहिलों तरी मला दुःख वाटणार नाहीं. ( ११–१५ )

" सीते ! विपुल पुष्पें व फलें, नानाप्रकारचे पक्षीगण आणि अद्भुत शिखरें यांनीं युक्त असलेल्या या पर्वतावर माझें मन अधिकच प्रफुल्लित होत आहे. या वनवासाच्या योगानें मला दोन फलें मिळालीं. सत्याच्या पालनरूपी धर्मासंबंधानें पित्याच्या ऋणांतून मुक्तता हें एक व भरताचा मनोरथ परिपूर्ण होणें हें दुसरें. हे वैदेहि ! काया, वाचा आणि मन यांना आनन्द देणारे असे अनेक प्रकारचे पदार्थ चित्रकूट पर्वतावर माझ्यासह पाहून कालक्रमणा करणें तुला सुखावह वाटत आहे ना ? हे राजपत्नि ! माझे पूर्वज जे प्राचीन राजर्षि त्यांनीं, वनांत राहणें हेंच मोक्षसाधन म्हटलें आहे. कारण वनामध्यें विधिपूर्वक राहणें हें देहत्यागानंतर हिरण्यगर्भस्थान प्राप्त होण्याचें साधन आहे, असें म्हणतात. निळा, पिवळा, पांढरा आणि तांबडा या वर्णांच्या योगानें पर्वताच्या असंख्य विशाल शिला शोभत आहेत आणि या श्रेष्ठ पर्वतावर झळकत असलेल्या हजारों औषधि रात्रीचे वेळीं आपल्या तेजानें अग्नीच्या ज्वालांप्रमाणें भासतात. (१६–२१)

केचिदेकशिला भान्ति पर्वतस्यास्य भामिनि २२
भित्त्वेव वसुधां भाति चित्रकूटः समुत्थितः।
चित्रकूटस्य कूटोऽयं दृश्यते सर्वतः शुभः २३
कुष्ठस्थगरपुंनागभूर्जपत्रोत्तरच्छदान्।
कामिनां स्वास्तरान्पश्य कुशेशयदलायुतान् २४
मृदिताश्चापविद्धाश्च दृश्यन्ते कमलस्रजः।
कामिभिर्वनिते पश्य फलानि विविधानि च २५
वस्वौकसारां नलिनीमतीत्यैवोत्तरान्कुरून्।
पर्वतश्चित्रकूटोऽसौ बहुमूलफलोदकः २६
इमं तु कालं वनिते विजह्रिवांस्त्वया च सीते सह लक्ष्मणेन।
रतिं प्रपत्स्ये कुलधर्मवर्धिनीं सतां पथि स्वैर्नियमैः परैः स्थितः २७

इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्नवतितमः सर्गः॥९४॥ [३५०६]

---

"हे प्रिये! या पर्वतावरील कांहीं प्रदेश घरासारखे दिसत असून, कांहीं बागांसारखे दिसत आहेत आणि कांहीं प्रदेश तर एकेकाच शिलेनें युक्त असूनहि पुष्कळ लोकांना राहतां येईल असे दिसत आहेत. हा चित्रकूट पर्वत पृथ्वीच्या पोटांतून बाहेर निघाल्यासारखा दिसत असून त्याचें हें शिखर सर्व बाजूंनीं उत्तम दिसत आहे. कुष्ठ, स्थगर, पुन्नाग आणि भूर्जपत्र या वृक्षांचीं पानें यांचीं आस्तरणें असलेल्या आणि कमलाच्या पाकळया ज्यावर पसरलेल्या आहेत अशा कामी लोकांच्या उत्कृष्ट शय्या तूं पहा. हे प्रिये! कमलपुष्पांच्या माला या ठिकाणीं चुरगळल्या जाऊन इकडे तिकडे उडवलेल्या दिसत आहेत आणि त्याचप्रमाणें नानाप्रकारचीं फळें विषयी जनांनीं उपभोग घेऊन टाकलेलीं दिसत आहेत. (२२–२५)

"कुबेरनगरी, इंद्रनगरी व उत्तर कुरुदेश यांनादेखील लाजवीत असल्यानें अतिशयच सुंदर असलेला हा चित्रकूट पर्वत विपुल मुळें, फळें व उदक यांनीं शोभत आहे. सीते! श्रेष्ठ अशा स्वकीय नियमांनीं सज्जनांच्या मार्गाचें अवलंब करणारा मी चौदा वर्षें पूर्ण होईपर्यंत तूं आणि लक्ष्मण यांसह जर येथें आनंदांत राहिलों, तर कुलधर्म वृद्धिंगत केल्याचें सौख्य मला लाभेल." (२६–२७)

पञ्चनवतितमः सर्गः ।

अथ शैलाद्विनिष्क्रम्य मैथिलीं कोसलेश्वरः ।
अदर्शयच्छुभजलां रम्यां मन्दाकिनीं नदीम् १
अब्रवीच्च वरारोहां चन्द्रचारुनिभाननाम् ।
विदेहराजस्य सुतां रामो राजीवलोचनः २
विचित्रपुलिनां रम्यां हंससारससेविताम् ।
कुसुमैरुपसंपन्नां पश्य मन्दाकिनीं नदीम् ३
नानाविधैस्तीररुहैर्वृतां पुष्पफलद्रुमैः ।
राजन्तीं राजराजस्य नलिनीमिव सर्वतः ४
मृगयूथनिपीतानि कलुषाम्भांसि सांप्रतम् ।
तीर्थानि रमणीयानि रतिं संजनयन्ति मे ५
जटाजिनधराः काले वल्कलोत्तरवाससः ।
ऋषयस्त्ववगाहन्ते नदीं मन्दाकिनीं प्रिये ६
आदित्यमुपतिष्ठन्ते नियमादूर्ध्वबाहवः ।

---

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडपैकीं चौऱ्याण्णवावा सर्ग संपला. ॥९४॥

त्यानंतर पर्वतावरून निघून तो कोशलाधिपति राम शुभ जलानें युक्त व रम्य अशी मंदाकिनी नदी सीतेला दाखवूं लागला आणि तो कमलाप्रमाणें नेत्र असलेला राम चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुख असलेल्या त्या सुंदर विदेहराजकन्येला म्हणाला. "ही रम्य मंदाकिनी नदी तूं पहा. हिच्यामध्यें हंस आणि सारस पक्ष्यांनीं आश्रय घेतलेला असून पुष्पांनीं व आश्चर्यकारक वाळवंटांनीं ही युक्त आहे. नानाप्रकारचे प्रफुल्लित व फलसंपन्न वृक्ष हिच्या तीरांवर भरपूर असल्यामुळें कुबेराच्या सौगंधिक सरोवराप्रमाणें ही दिसत आहे. मृगांचे कळप पाणी पिऊन गेल्यामुळें ज्यांतील उदक गढूळ झालें आहे, अशीं हीं रमणीय तीर्थें मला अननुभूत आनंद देत आहेत (१-५)

"हे प्रिये ! जटा व अजिनें धारण करून वल्कलें परिधान करणारे ऋषि वेळेवर मंदाकिनी नदीमध्यें स्नान करीत आहेत. हे विशालनयने ! निर्मल आचरणानें

एते परे विशालाक्षि मुनयः संशितव्रताः ७
मारुतोद्धूतशिखरैः प्रनृत्त इव पर्वतः।
पादपैः पुष्पपत्राणि सृजद्भिरभितो नदीम् ८
क्वचिन्मणिनिकाशोदां क्वचित्पुलिनशालिनीम्।
क्वचित्सिद्धजनाकीर्णां पश्य मन्दाकिनीं नदीम् ९
निर्धूतान्वायुना पश्य विततान्पुष्पसंचयान्।
पोप्लूयमानानपरान्पश्य त्वं तनुमध्यमे १०
पश्यैतद्वल्गुवचसो रथाङ्गाह्वयना द्विजाः।
अधिरोहन्ति कल्याणि निष्कूजन्तः शुभा गिरः ११
दर्शनं चित्रकूटस्य मन्दाकिन्याश्च शोभने।
अधिकं पुरवासाच्च मन्ये तव च दर्शनात् १२
विधूतकल्मषैः सिद्धैस्तपोदमशमान्वितैः।
नित्यविक्षोभितजलां विगाहस्व मया सह १३

युक्त असलेले हे दुसरे ऋषि हात वर करून सूर्याची उपासना करीत आहेत. वायूच्या योगानें ज्यांचे शेंडे हालत आहेत आणि म्हणूनच ज्यांवरून फुलें व पानें गळत आहेत, अशा नदीच्या दोहों तीरांवर असलेल्या वृक्षांच्या योगानें हा पर्वत जणूं नृत्य करण्याकरितांच प्रवृत्त झाल्यासारखा दिसत आहे. कोठें कोठें मोत्याप्रमाणें असलेल्या पाण्यानें, कोठें कोठें वाळवंटांनीं आणि कोठें कोठें इकडे तिकडे बसलेल्या सिद्ध जनांनीं युक्त असलेली ही मंदाकिनी नदी तूं पहा. हे कृशोदरी! वायूनें उडून आलेले आणि पाण्यावर तरंगत असलेले फुलांचे गुच्छ तूं पहा. ( ६–१० )

"हे कल्याणि! ते पहा, मनोहर शब्द करणारे आणि मंजुळ शब्द उच्चारीत असलेले हे चक्रवाक पक्षी वाळवंटावर बसत आहेत. हे कल्याणि! चित्रकूट पर्वत आणि मंदाकिनी नदी यांचें दर्शन अयोध्या नगरींतील वास्तव्यापेक्षांच नव्हे तर तुझ्या दर्शनापेक्षांही अधिक सुखावह आहे, असें मला वाटतें. पापक्षालन झालेल्या आणि तप, दम व शम यांनीं युक्त असलेल्या सिद्धांकडून जिचें उदक नेहमीं क्षुब्ध केलें जातें, त्या मंदाकिनी नदीमध्यें तूं माझ्याबरोबर स्नान कर.

सखीवच्च विगाहस्व सीते मन्दाकिनीं नदीम् ।
कमलान्यवमज्जन्ती पुष्कराणि च भामिनि १४
त्वं पौरजनवद्व्यालानयोध्यामिव पर्वतम् ।
मन्यस्व वनिते नित्यं सरयूवदिमां नदीम् १५
लक्ष्मणश्चैव धर्मात्मा मन्निदेशे व्यवस्थितः ।
त्वं चानुकूला वैदेहि प्रीतिं जनयती मम १६
उपस्पृशंस्त्रिषवणं मधुमूलफलाशनः ।
नायोध्यायै न राज्याय स्पृहये च त्वया सह १७
इमां हि रम्यां गजयूथलोडितां निपीततोयां गजसिंहवानरैः ।
सुपुष्पितां पुष्पभरैरलंकृतां न सोऽस्ति य स्यान्न गतक्लमः सुखी १८
इतीव रामो बहुसंगतं वचः प्रियासहायः सरितं प्रति ब्रुवन् ।
चचार रम्यं नयनाञ्जनप्रभं स चित्रकूटं रघुवंशवर्धनः १९
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चनवतितमः सर्गः॥९५॥[३५२५]

---

सीते! मंदाकिनी तुझी मैत्रीण आहे, असें समजून तांबडीं व पांढरीं कमलें बाजूला सारीत सारीत तूं या मंदाकिनी नदीमध्यें स्नान कर. हे स्त्रिये! येथील अजगर नागरिक लोकांप्रमाणें, चित्रकूट पर्वत अयोध्येप्रमाणें आणि ही मंदाकिनी नदी सरयूप्रमाणें आहे, असें समज. (११-१५)

"वैदेहि! धर्मात्मा लक्ष्मण माझ्या आज्ञेंत आहे; तूं मला अनुकूल असून मला आनंदवीत आहेस. त्रिकाल-स्नान करून स्वादिष्ट मुळें व फळें खाऊन तुझ्यासह येथें मी रहात असल्यानें अयोध्येची अथवा राज्याचीही मला आठवण होत नाहीं. हत्ती, सिंह आणि वानर हे जिच्यांतील पाणी पितात, हत्तींच्या कळपांनीं जिला घुसळून टाकलेली आहे आणि पुष्पराशींनीं व प्रफुल्लित वनप्रदेशांनीं जी युक्त आहे, अशा या रम्य मंदाकिनी नदीमध्यें स्नान करून सर्व श्रमांचा परिहार होऊनहि सुखी न झालेला असा कोणीही पुरुष नाहीं." याप्रमाणें प्रिय स्त्रीसह असलेला रघुवंशवर्धक राम मंदाकिनी नदीसंबंधानें अनेक प्रकारें उत्कृष्ट असें भाषण करीत करीत काजळाप्रमाणें काळ्याभोर व रम्य अशा चित्रकूट पर्वतावर संचार करूं लागला. (१६-१९)

षण्णवतितमः सर्गः ।

**रामस्तु नलिनीं रम्यां चित्रकूटं च पर्वतम् ।**
**उत्तरे तु गिरेः पादे चित्रकूटस्य राघवः । १**
**ददर्श कन्दरं रम्यं शिलाधातुसमन्वितम् ।**
**सुखप्रसेकैस्तरुभिः पुष्पभारावलम्बिभिः २**
**संवृतं च रहस्यं च मत्तद्विजगणायुतम् ।**
**तद् दृष्ट्वा सर्वभूतानां मनोदृष्टिहरं वनम् ३**
**उवाच सीतां काकुत्स्थो वनदर्शनविस्मितः ।**
**वैदेहि रमते चक्षुस्तवास्मिन्गिरिकंदरे ४**
**परिश्रमविघातार्थं साधु तावदिहास्यताम् ।**
**त्वदर्थमिह विन्यस्ता त्वियं श्लक्ष्णसमा शिला ५**
**यस्याः पार्श्वे तरुः पुष्पैः प्रविष्ट इव केसरैः ।**
**राघवेणैवमुक्ता सा सीता प्रकृतिदक्षिणा ६**

---

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचाण्णवावा सर्ग संपला ॥ ९५ ॥

चित्रकूटपर्वत आणि कुबेराच्या सौगंधिक सरोवराप्रमाणें असणारी रम्य मंदाकिनी नदी सीतेला दाखविल्यानंतर रघुवंशज रामानें चित्रकूटपर्वताच्या पायथ्याशीं असलेली एक गुहा पाहिली. ती गुहा मनोहर असून शिलांनीं व धातूंनीं युक्त होती आणि सुगंधित मकरंदाचा स्राव करणाऱ्या व पुष्पभारांनीं वांकलेल्या वृक्षांनीं ती व्याप्त झालेली होती आणि अगदीं एकांत प्रदेशामध्यें असून त्या ठिकाणीं पुष्कळच मत्त पक्षिगण होते. तेव्हां सर्व प्राण्यांच्या मनाला व दृष्टीला वेधून टाकणारा तो वनप्रदेश पाहून विस्मित झालेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सीतेला म्हणाला, “ वैदेहि ! हे गिरिकंदर पाहून तुझ्या डोळ्यांचें पारणें फिटतें काय ? ( १–४ )

“फिटत असेल तर श्रमपरिहार करण्याकरितां तूं खुशाल येथें बैस. गुळगुळीत आणि सपाट अशी ही शिला तुझ्याकरितांच येथें ठेविली आहे. हिच्या बाजूला

उवाच प्रणयस्निग्धमिदं श्लक्ष्णतरं वचः।
अवश्यकार्यं वचनं तव मे रघुनन्दन ७
बहुशो भ्रमितश्चाद्य तव चैवं मनोरथः।
एवमुक्त्वा वरारोहा शिलां तामुपसर्प ह ८
सह भर्त्रानवद्याङ्गी रन्तुकामा मनस्विनी।
तामेवं ब्रुवतीं सीतां रामो वचनमब्रवीत् ९
रम्यं पश्यसि भूतार्थं वनं पुष्पितपादपम्।
पश्य देवि गिरौ रम्ये रम्यपुष्पाङ्कितानिमान् १०
गजदन्तक्षतान्वृक्षान्पश्य निर्यासवर्षिणः।
झिल्लिकाविरुतैर्दीर्घं रुदतीव समन्ततः ११
पुत्रप्रियोऽसौ शकुनिः पुत्रपुत्रेति भाषते।
मधुरां करुणां वाचं पुरेव जननी मम १२
विहगो भृङ्गराजोऽयं शालस्कन्धसमाश्रितः।
संगीतमिव कुर्वाणः कोकिलेनावकूजति १३

---

परागयुक्त फुलांनीं बहरलेला एक वृक्ष आहे." याप्रमाणें रामानें म्हटलें असतां स्वभावतःच सरल असलेली ती सीता प्रेमामुळें स्निग्ध आणि अत्यंत मधुर अशा शब्दांनीं रामाला म्हणाली, "रघुनंदना! आपल्या वचनाला मला अवश्य मान दिला पाहिजे. ही इच्छा आपल्या अंतःकरणामध्यें आज वारंवार घोळत आहे." (५-८)

याप्रमाणें बोलत ती सुशीलवती व निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली सुंदरी सीता भर्त्यासह मनोरंजन करण्याकरितां त्या शिळेजवळ गेली आणि तेथें ती सीता रामाशीं भाषण करीत असतांनाच राम तिला म्हणाला, " असंख्य पुष्पित वृक्षांनीं युक्त असलेलें रमणीय वन तर तूं पहात आहेसच; परंतु देवि! या रम्य पर्वतावर मनोहर पुष्पांनीं युक्त, हत्तींच्या दातांनीं क्षतें पडलेले व डिंकाचा स्राव करीत असलेले हे वृक्ष तूं पहा. सभोंवार होत असलेल्या झिल्लीकांच्या मोठ्या आवाजानें हा पर्वत शोकानें रोदन करीत असल्यासारखा भासत आहे. पूर्वीं माझी माता ज्याप्रमाणें मधुर व करुण स्वरानें " पुत्रा, पुत्रा " असें म्हणत होती, त्याप्रमाणें हा पुत्रवत्सल पक्षी " पुत्रा ! पुत्रा ! " असें म्हणत

अयं वा बालकः शङ्के कोकिलानां विहंगमः।
सुखबद्धमसंबद्धं तथा ह्येष प्रभाषते १४
एषा कुसुमिता नूनं पुष्पभारानता लता।
दृश्यते मामिवात्यर्थं श्रमाद्देवि त्वमाश्रिता १५
एवमुक्ता प्रियस्याङ्के मैथिली प्रियभाषिणी।
भूतस्तरां स्वनिंद्याङ्गी समारोहत भामिनी १६
अङ्के तु परिवर्तन्ती सीता सुरसुतोपमा।
हर्षयामास रामस्य मनो मनासिजार्पितम् १७
स निघृष्याङ्गुलिं रामो धौते मनःशिलोच्चये।
चकार तिलकं तस्या ललाटे रुचिरं तदा १८
बालार्कसमवर्णेन तेजसा गिरिधातुना।
चकासे विनिविष्टेन ससंध्येव निशा सिता १९
केसरस्य च पुष्पाणि करेणामृद्य राघवः।

आहे. शालवृक्षाच्या बुंध्यावर बसलेला हा भृंगराज पक्षी कोकील पक्ष्यासह जणूं संगीतास सुरवात करण्यासाठीं शब्द करीत आहे मला वाटतें. हा पक्षी कोकिलांचा बालक असावा, कारण हा कांहीं सुसंबद्ध आणि कांहीं असंबद्ध असा ध्वनि त्यांच्याप्रमाणें करीत आहे आणि हे देवि! श्रम झाले असतां ज्याप्रमाणे तूं मला अति चिकटून रहातेस त्याप्रमाणें पुष्पभारानें लवलेली ही प्रफुल्लित लता खरोखर वृक्षाला लगटून राहिल्यासारखी दिसत आहे." (८–१५)

याप्रमाणें रामाने भाषण केलें असतां प्रिय भाषण करणारी व निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती सीता प्रिय भर्त्याच्या अगदीं जवळ बसली. देवकन्येप्रमाणें असलेली ती सीता रामाच्या अंकावर बसली असतांना रामाच्या मनांत कांहीं कामविकार निर्माण करून त्याला अननुभूत आनंद देऊं लागली. तेव्हां निर्मल आणि उंच अशा एका मनःशिलेवर आपलें बोट घासून सीतेच्या कपाळीं रामानें मनोहर तिलक लाविला, तेव्हां संधिकाळच्या अभ्रानें युक्त असलेली रात्रि जशी शोभूं लागते, तशी बालसूर्यासारख्या वर्णानें युक्त आणि तेजस्वी अशा त्या कपाळीं लाविलेल्या पर्वतधातूच्या तिलकानें सीता शोभूं

अलकं पूरयामास मैथिल्याः प्रीतमानसः　　२०
अभिरम्य तदा तस्यां शिलायां रघुनन्दनः।
अन्वीयमानो वैदेह्या देशमन्यं जगाम ह　　२१
विचरन्ती तदा सीता ददर्श हरियूथपम्।
वने बहुमृगाकीर्णे वित्रस्ता राममाश्लिषत्　　२२
रामस्तां परिरब्धाङ्गीं परिरभ्य महाभुजः।
सान्त्वयामास वामोरूमवभर्त्स्याथ वानरम्　　२३
मनःशिलायास्तिलकः सीतायाः सोऽथ वक्षसि।
समदृश्यत संक्रान्तो रामस्य विपुलौजसः　　२४
प्रजहास तदा सीता गते वानरपुंगवे।
दृष्ट्वा भर्तरि संक्रान्तमपाङ्गं समनःशिलम्　　२५
नातिदूरे त्वशोकानां प्रदीप्तमिव काननम्।
ददर्श पुष्पस्तबकैस्तर्जद्भिरिव वानरैः　　२६
वैदेही त्वब्रवीद्राममशोककुसुमार्थिनी।

---

लागली. तेव्हां नागचाफ्याचीं फुलें आपल्या हातांनीं तोडून रामानें प्रसन्न मनानें सीतेच्या बुचड्यांत खोंविलीं. (१९-२०)

आणि याप्रमाणें त्या शिळेवर क्रीडा करून वैदेहीला बरोबरच घेऊन तो राम दुसऱ्या प्रदेशाकडे निघून गेला. तेव्हां नानाप्रकारच्या मृगांनीं व्याप्त झालेल्या वनामध्यें संचार करतां करतां एक मोठा वानर सीतेच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर भयभीत झालेल्या सीतेनें रामाला कवटाळून धरिलें. अशा अवस्थेंतच आपणांला आलिंगन दिलेल्या सीतेला आजानुबाहु रामानेंही आलिंगन दिलें आणि वानराला भीति दाखवून त्या सुंदरीचें सांत्वन केलें. या धांदलीमध्यें सीतेच्या कपाळावर मनःशिला धातूचा जो तिलक रामानें लावलेला होता, तो महापराक्रमी रामाच्या वक्षःस्थलावर उमटलेला दिसूं लागला. तो वानर निघून गेल्यावर आपल्या पतीच्या छातीवर उमटलेला मनःशिलेचा तो तिलक पाहून सीतेला हसूं लोटलें. नंतर भय दाखवीत असलेले वानरच कीं काय, अशा पुष्पगुच्छांनीं जसें कांहीं पेटून गेलेलें एक अशोकवन जवळच तिच्या दृष्टीस पडलें.

वयं तदभिगच्छामो वनमिक्ष्वाकुनन्दन २७
तस्याः प्रिये स्थितो रामो देव्या दिव्यार्थरूपया।
सहितस्तदशोकानां विशोकः प्रययौ वनम् २८
तदशोकवनं रामः सभार्यो व्यचरत्तदा।
गिरिपुत्र्या पिनाकीव सह हैमवतं वनम् २९
तावन्योन्यमशोकस्य पुष्पैः पल्लवधारिभिः।
समलंचक्रतुरुभौ कामिनौ नीललोहितौ ३०
आबद्धवनमालौ तौ कृतापीडावतंसकौ।
भार्यापती तावचलं शोभयांचक्रतुर्भृशम् ३१
एवं स विविधान्देशान्दर्शयित्वा प्रियां प्रियः।
आजगामाश्रमपदं सुसंश्लिष्टमलंकृतम् ३२
प्रत्युज्जगाम तं भ्राता लक्ष्मणो गुरुवत्सलः।
दर्शयन्विविधं धर्मं सौमित्रिः सुकृतं तदा ३३
शुद्धबाणहतांस्तत्र मेध्यान्कृष्णमृगान्दश।

---

अशोक पुष्पें मिळण्याच्या उद्देशानें ती वैदेही " इक्ष्वाकुनंदना! आपण त्या वनामध्यें जाऊं " म्हणून रामाला म्हणाली. (२१-२७)

तेव्हां तिचें प्रिय करण्याविषयीं तत्पर असलेला राम मोठ्या हर्षानें दिव्य-रूप-संपत्तीनें युक्त असलेल्या सीतेसह त्या अशोकवनामध्यें गेला. पार्वतीसह हिमालय पर्वतावरील वनामध्यें विहार करणाऱ्या पिनाकपाणि शंकराप्रमाणें भार्येसह राम त्या वनामध्यें संचार करूं लागला. वनामध्यें विहार करूं लागल्यानंतर अनुक्रमें तांबूस व नील वर्णांनीं युक्त असलेल्या त्या दोघांनीं- सीता व राम यांनीं-पल्लवयुक्त फुलांनीं एकमेकाला भूषित केलें. वनमाला, तुरे आणि कर्ण-भूषणें धारण करून त्या जोडप्यानें त्या पर्वताला अतिशयच शोभा आणली. याप्रमाणें नानाप्रकारचे देश प्रियेला दाखवून तो प्रिय राम अतिशयच जवळ असलेल्या आणि शृंगारिलेल्या आश्रमस्थानाकडे गेला. (२८-३२)

तेव्हां सर्व प्रकारें धर्माचें आचरण करणारा सुमित्रापुत्र व गुरुवत्सल असा भाऊ लक्ष्मण त्याला सामोरा गेला. त्या वेळीं शुद्ध बाणानें मारलेले दहा पवित्र

राशीकृताञ्शुष्यमाणानन्यान्कांश्चन कांश्चन ३४
तद् दृष्ट्वा कर्म सौमित्रेर्भ्राता प्रीतोऽभवत्तदा ।
क्रियन्तां बलयश्चेति रामः सीतामथाब्रवीत् ३५
अग्रं प्रदाय भूतेभ्यः सीताऽथ वरवर्णिनी ।
तयोरुपदद्भ्रात्रोर्मधु मांसं च तद्भृशम् ३६
तयोस्तुष्टिमथोत्पाद्य वीरयोः कृतशौचयोः ।
विधिवज्जानकी पश्चाच्चक्रे सा प्राणधारणम् ३७
शिष्टं मांसं निकृष्टं यच्छोषणायावकल्पितम् ।
तद्रामवचनात्सीता काकेभ्यः पर्यरक्षत ३८
तां ददर्श तदा भर्ता काकेनायासितां दृढम् ।
यस्या हारान्तरचरः कामचारी विहंगमः ३९
काकेनारोप्यमानां तां सा मुमोह तदातुरम् ।
सा चुकोपानवद्याङ्गी भर्तृप्रणयदर्पिता ४०

काळवीट आणि रास घालून सुकत ठेवलेले आणखी कांहीं मृग रामाच्या दृष्टीस पडले. सुमित्रापुत्र लक्ष्मणाचें तें कार्य पाहून रामाला अत्यानंद झाला व " बलि होऊं द्या " असें तो सीतेला म्हणाला; प्रथम भूतांना त्यांतला भाग अर्पण केल्यावर त्या सुंदरी सीतेनें त्या उभयतां भावांना मद्य व मांस भरपूर वाढलें. (३३-३६)

शुचिर्भूत होऊन बसलेल्या त्या वीरांची तृप्ति झाल्यावर नंतर त्या जनककन्येनें प्राणपोषक अन्नाचें विधिपूर्वक सेवन केलें, आणि सुकवून ठेवण्याकरितां जें कांहीं थोडें मांस शिल्लक राहिलेलें होतें, त्याचें रामाच्या सांगण्यावरून सीता कावळ्यांपासून वगैरे संरक्षण करीत बसली असतां, एक कावळा सीतेला फारच त्रास देत आहे, असें रामानें पाहिलें. तो स्वेच्छाचारी कावळा तिच्या हाराभोंवतीं घिरट्या घालीत होता आणि अशा रीतीनें तिला तो त्रास देत आहे असें रामानें पाहिलें; त्या वेळीं भर्तृप्रेमाच्या जोरावर गर्विष्ठ झालेली आणि निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती सीता कावळ्याच्या त्रासानें अतिशय भयभीत होऊन घाबरून गेली. (३७-४०)

❀

इतश्चेतश्च तां काको वारयन्तीं पुनः पुनः।
पक्षतुण्डनखाग्रैश्च कोपयामास कोपनाम् ४१
तस्याः प्रस्फुरमाणोष्ठं भ्रुकुटीपुटसूचितम्।
मुखमालोक्य काकुत्स्थस्तं काकं प्रत्यषेधयत् ४२
स धृष्टमानो विहगो रामवाक्यमचिन्तयन्।
सीतामभिपपातैव ततश्चुक्रोध राघवः ४३
सोऽभिमन्त्र्य शरैषीकामैषीकास्त्रेण वीर्यवान्।
काकं तमभिसंधाय ससर्ज पुरुषर्षभः ४४
स तेनाभिद्रुतः काकस्त्रीँल्लोकान्पर्यगात्ततः।
देवैर्दत्तवरः पक्षी हारान्तरचरो लघुः ४५
यत्र यत्रागमत्काकस्तत्र तत्र ददर्श ह।
इषीकां भूतसंकाशां स रामं पुनरागमत् ४६
स मूर्ध्ना न्यपतत्काको राघवस्य महात्मनः।
सीतायास्तत्र पश्यन्त्या मानुषीमैरयद्गिरम् ४७

इकडून तिकडून त्या कावळ्याला हांकीत असलेल्या, त्या संतापलेल्या सीतेला त्यानें पंख, चोंच आणि नखें यांच्या योगानें भंडावून सोडलें. रागानें तिचे ओठ स्फुरण पावत आहेत, भुंवया क्रोधानें वक्र झाल्या आहेत, असें पाहून ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें त्या कावळ्याला हांकलण्याचा प्रयत्न केला. तथापि धीट असा तो कावळा रामाच्या भाषणाकडे लक्ष न देतां सीतेच्या अंगावर धावून गेला व हें पाहून मात्र राम अधिकच संतापला. नंतर त्या पुरुषश्रेष्ठ पराक्रमी रामानें बाणाच्या एका काडीला ऐषीकास्त्रानें अभिमंत्रण केलें आणि त्या कावळ्याकडे ती काडी सोडून दिली. तेव्हां त्या ऐषीकास्त्रानें पछाडलेला कावळा तीन्ही लोकांत सैरावैरा उडूं लागला. देवांनीं वर दिल्यामुळें सीतेच्या हाराभोंवतीं घिरट्या घालणारा तो क्षुद्र पक्षी जिकडे जिकडे जाऊं लागला, तिकडे तिकडे भुताप्रमाणें मागें लागलेली ती काडी त्याच्या दृष्टीस पडूं लागली असतां तो पुनः परत रामाकडे आला. सीतेच्या समक्ष रामाच्या पायावर डोकें ठेवून त्याला शरण आला आणि मनुष्यवाणीनें म्हणाला,

प्रसादं कुरु मे राम प्राणैः सामग्र्यमस्तु मे ।
अस्त्रस्यास्य प्रभावेण शरणं न लभे क्वचित् ४८
तं काकमब्रवीद्रामः पादयोः शिरसा गतम् ।
सानुक्रोशतया धीमानिदं वचनमर्थवत् ४९
मया रोषपरीतेन सीताप्रियहितार्थिना ।
अस्त्रमेतत्समाधाय त्वद्वधायाभिमन्त्रितम् ५०
यत्तु मे चरणौ मूर्ध्ना गतस्त्वं जीवितेप्सया ।
अत्रास्त्यवेक्षा त्वयि मे रक्ष्यो हि शरणागतः ५१
अमोघं क्रियतामस्त्रमेकमङ्गं परित्यज ।
किमङ्गं शातयतु ते शरैषीका ब्रवीहि मे ५२
एतावद्धि मया शक्यं तव कर्तुं प्रियं खग ।
एकाङ्गहीनं ह्यस्त्रेण जीवितं मरणाद्वरम् ५३
एवमुक्तस्तु रामेण संप्रधार्य स वायसः ।
अभ्यगच्छद्द्वयोरक्षणस्त्यागमेकस्य पण्डितः ५४
सोऽब्रवीद्राघवं काको नेत्रमेकं त्यजाम्यहम् ।

---

"रामा ! मजवर कृपा कर; माझे प्राण वांचव. या अस्त्राच्या प्रभावामुळें मला कोठेंही आश्रय मिळत नाहीं." (४१-४८)

याप्रमाणें कावळ्यानें सांगितल्यावर पायांवर मस्तक ठेवलेल्या कावळ्याशीं तो विचारी राम दयार्द्र अन्तःकरणानें भाषण करूं लागला- "सीतेचें प्रिय व हित करण्याच्या उद्देशानें रागावून मीं हें अस्त्र योजून तुझ्या वधाकरितां अभिमंत्रित केलें आहे; परंतु ज्याअर्थीं प्राणाची भीक मागून तूं माझ्या चरणांवर मस्तक ठेविलें आहेस त्याअर्थीं तुझ्याकडेही माझें लक्ष आहेच. कारण शरणागताचें रक्षण करणें मला भाग आहे. तर तूं आपल्या एका अवयवाची आशा सोडून देऊन माझ्या अस्त्राचें सार्थक कर; या बाणाच्या काडीनें तुझा कोणता अवयव तोडावा, तें मला सांग. पक्ष्या ! फार तर इतकेंच माझ्या हातून तुझें प्रिय होणें शक्य आहे आणि मरणापेक्षां एक अवयव कमी होऊन जिवंत राहणें बरें आहे." (४९-५३)

याप्रमाणें रामानें सांगितलें असतां मनामध्यें विचार करून त्या विचारी

एकनेत्रोऽपि जीवेऽहं त्वत्प्रसादान्नराधिप ५५
रामानुज्ञातमस्त्रं तत्काकस्य नयनेऽपतत् ।
वैदेही विस्मता तत्र काकस्य नयने हते ५६
निपत्य शिरसा काको जगामाशु यथेप्सितम् ।
लक्ष्मणानुचरो रामश्चकारानन्तरक्रियाः ५७*

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षण्णवतितमः सर्गः ॥९६॥ [३५८२]

सप्तनवतितमः सर्गः ।

तां तदा दर्शयित्वा तु मैथिलीं गिरिनिम्नगाम् ।
निषसाद गिरिप्रस्थे सीतां मांसेन छन्दयन् १
इदं मेध्यमिदं स्वादु निष्टप्तमिदमग्निना ।
एवमास्ते स धर्मात्मा सीतया सह राघवः २
तथा तत्रासतस्तस्य भरतस्योपयायिनः ।
सैन्यरेणुश्च शब्दश्च प्रादुरास्तां नभस्पृशौ ३

कावळ्यानें दोहोंपैकीं एका नेत्राचा त्याग करण्याचें ठरविलें, आणि नंतर तो कावळा रामाला म्हणाला, "मी एका नेत्राचा त्याग करतों. प्रजाधिपते ! तुझ्या प्रसादानें मी एका डोळयानेंहि जिवंत राहीन." असें त्यानें सांगितल्यानंतर रामानें अनुज्ञा दिलेलें तें ऐषीक अस्त्र कावळयाच्या नेत्रावर जाऊन पडलें आणि अशा रीतीनें त्या कावळयाचा नेत्र अस्त्रानें नाहींसा झालेला पाहून सीता आश्चर्यानें थक्क झाली. त्यानंतर रामाला प्रणाम करून तो कावळा आपल्या इच्छेला आलें तिकडे निघून गेला आणि रामानें लक्ष्मणास घेऊन आपलीं पुढलीं कामें करण्यास आरंभ केला. (५४–५७)*

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शाण्णवावा सर्ग संपला ॥ ९६ ॥

ती पर्वतावरील नदी दाखविल्यानंतर वेगवेगळें मांस दाखवून सीतेची करमणूक करीत तो राम पर्वताच्या शिखरावर बसला. 'हें मांस पवित्र आहे, हें स्वादिष्ट आहे आणि हें अग्नीवर भाजलेलें आहे' असें सांगत सांगत तो धर्मनिष्ठ राम सीतेसह तेथें बसला असतांना जवळ जवळ येऊं लागलेल्या भरताच्या सैन्यांतील

* हा सर्ग प्रक्षिप्त आहे असें कांहीं टीकाकार मानतात.

एतस्मिन्नन्तरे त्रस्ताः शब्देन महता ततः ।
आर्दिता यूथपा मत्ताः स्वयूथाद्दुद्रुवुर्दिशः ४
स तं सैन्यसमुद्भूतं शब्दं शुश्राव राघवः ।
तांश्च विप्रद्रुतान्सर्वान्यूथपानन्ववैक्षत ५
तांश्च विप्रद्रुतान्दृष्ट्वा तं च श्रुत्वा महास्वनम् ।
उवाच रामः सौमित्रिं लक्ष्मणं दीप्ततेजसम् ६
हन्त लक्ष्मण पश्येह सुमित्रा सुप्रजास्त्वया ।
भीमस्तनितगम्भीरं तुमुलः श्रूयते स्वनः ७
गजयूथानि वारण्ये महिषा वा महावने ।
वित्रासिता मृगाः सिंहैः सहसा प्रद्रुता दिशः ८
राजा वा राजपुत्रो वा मृगयामटते वने ।
अन्यद्वा श्वापदं किञ्चित्सौमित्रे ज्ञातुमर्हसि ९
सुदुश्चरो गिरिश्चायं पक्षिणामपि लक्ष्मण ।
सर्वमेतद्यथातत्त्वमभिज्ञातुमिहार्हसि १०

धूळ व सैन्याचा ध्वनि यांनीं आकाश व्यापण्यास सुरुवात केली व या वेळीं त्या मोठ्या शब्दानें घाबरून गेलेले आपापल्या कळपाचें रक्षण करणारे मत्त पशु आपला कळप सोडून चारी दिशांस सैरावैरा धावूं लागले. (१-४)

सैन्यापासून उत्पन्न झालेला तो शब्द ऐकून आपापल्या कळपांचें रक्षण करणारे ते सर्व पशु पळत असलेले रामानेंही पाहिले आणि त्या पळूं लागलेल्या पशूंना पाहून व तो मोठा शब्द ऐकून राम उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या सुमित्रा-पुत्र लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा ! तुझ्या योगानें सुमित्रा खरोखर सुपुत्रवती झाली आहे. इकडे पहा, भयंकर मेघगर्जनेप्रमाणें गंभीर ध्वनि ऐकूं येत आहे. हत्तीचे कळप, रेडे आणि हरिण एकाएकीं या महावनामध्यें चारी दिशांस पळत सुटले आहे. तेव्हां सिंहांनीं त्यांना घाबरवून सोडलें आहे किंवा एखादा राजा अथवा राजकुमार वनामध्यें मृगया करीत आहे अथवा दुसरेंच एखादें श्वापद तेथें आलें आहे, याचा शोध कर. लक्ष्मणा ! या पर्वतावर पक्ष्यांनाही आक्रमण करतां येणें अत्यंत कठीण आहे. तेव्हां हें सर्व काय आहे, तें सर्व कांहीं समजून घे." (५-१०)

स लक्ष्मणः संत्वरितः सालमारुह्य पुष्पितम् ।
प्रेक्षमाणो दिशः सर्वाः पूर्वां दिशमवैक्षत ११
उदङ्मुखः प्रेक्षमाणो ददर्श महतीं चमूम् ।
गजाश्वरथसंबाधां यत्तैर्युक्तां पदातिभिः १२
तामश्वरथसम्पूर्णां रथध्वजविभूषिताम् ।
शशंस सेनां रामाय वचनं चेदमब्रवीत् १३
अग्निं संशमयत्वार्यः सीता च भजतां गुहाम् ।
सज्जं कुरुष्व चापं च शरांश्च कवचं तथा १४
तं रामः पुरुषव्याघ्रो लक्ष्मणं प्रत्युवाच ह ।
अङ्गावेक्षस्व सौमित्रे कस्येमां मन्यसे चमूम् १५
एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् ।
दिधक्षन्निव तां सेनां रुषितः पावको यथा १६
संपन्नं राज्यमिच्छंस्तु व्यक्तं प्राप्याभिषेचनम् ।
आवां हन्तुं समभ्येति कैकेय्या भरतः सुतः १७

---

याप्रमाणें रामानें सांगितल्यावर लक्ष्मण घाईनेंच सर्व दिशा निरखून पाहण्याकरितां एका प्रफुल्लित सालवृक्षावर चढला आणि प्रथम त्यानें पूर्वदिशेकडे नजर टाकली व नंतर उत्तरेकडे तोंड करून पाहूं लागला असतां सज्ज झालेल्या पायदळानें युक्त, हत्ती, घोडे आणि रथ यांनीं गजबजलेली प्रचंड सेना त्याला दिसली. नंतर घोडे व रथ यांनीं संपन्न असलेली आणि रथ व ध्वज यांनीं भूषित असलेली ती सेना असल्याचें रामाला सांगून तो पुनः त्याला म्हणाला, "आपण अग्नि विझवून टाका; सीतेला गुहेंत जाऊन बसूं द्या आणि तुम्ही धनुष्य बाण सज्ज करून आणि कवच घालून तयार रहा." यावर पुरुषश्रेष्ठ राम त्या लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा ! हें सैन्य कोणाचें असावें, असें तुला वाटत आहे, हें तर सांग." (११–१५)

याप्रमाणें रामानें आज्ञा केली असतां, त्या सैन्याला भस्मसात् करण्यास प्रवृत्त झालेला अग्नीच कीं काय, अशा रीतीनें संतापलेला लक्ष्मण रामाला म्हणाला, "राज्याभिषेक झाल्यानंतर राज्य निष्कंटक करून घेण्याच्या इच्छेनें

एष वै सुमहाञ्छ्रीमान्विटपी संप्रकाशते ।
विराजत्युज्ज्वलस्कन्धः कोविदारध्वजो रथे　　१८
भजन्त्येते यथाकाममश्वानारुह्य शीघ्रगान् ।
एते भ्राजन्ति संहृष्टा गजानारुह्य सादिनः　　१९
गृहीतधनुषावावां गिरिं वीर श्रयावहे ।
अथवेहैव तिष्ठावः संनद्धावुद्यतायुधौ　　२०
अपि नौ वशमागच्छेत्कोविदारध्वजो रणे ।
अपि द्रक्ष्यामि भरतं यत्कृते व्यसनं महत्　　२१
त्वया राघव संप्राप्तं सीतया च मया तथा ।
यन्निमित्तं भवान्राज्याच्च्युतो राघव शाश्वतात्　　२२
संप्राप्तोऽयमरिर्वीर भरतो वध्य एव हि ।
भरतस्य वधे दोषं नाहं पश्यामि राघव　　२३
पूर्वापकारिणं हत्वा न ह्यधर्मेण युज्यते ।
पूर्वापकारी‡ भरतस्त्यागे धर्मश्च राघव ।

---

कैकेयीचा पुत्र आपणांला मारण्याकरितां इकडे येत आहे, यांत संशय नाहीं. कारण उज्ज्वल स्कंधांनीं युक्त असा हा जो फारच मोठा भव्य वृक्ष दिसत आहे, त्याच्या शेजारीं रथावर कोविदारध्वज झळकत आहे. हे स्वार वेगवान् घोड्यांवर आरूढ होऊन स्वेच्छेनें इकडे येत आहेत आणि आनंदित होऊन हत्तींवर आरूढ झालेले हे हत्तीवरील सैनिक झळकत आहेत; तर हे वीरा ! आपण धनुष्य घेऊन पर्वताचा आश्रय करूं अथवा आयुधें सज्ज करून येथेंच तयारीनें उभे राहूं. (१९–२०)

"राघवा ! कोविदारध्वज रणामध्यें आपल्या हातीं लागेल का ? ज्याच्याकरितां मी व सीता यांसह आपणावर हें मोठें संकट कोसळलें आहे, तो भरत माझ्या दृष्टीस पडेल तर फार चांगलें ! राघवा ! त्याच्याकरितां आपण कायमचें राज्याला मुकला आहांत. हे वीरा ! भरत शत्रु येथें आला आहे आणि याचा वध करणें

---

‡ (१) भरतस्त्यक्तधर्मश्च राघव (कुंभकोणप्रत व मद्रास लॉजर्नल प्रेस प्रत)
(२) पूर्वापकारिणां त्यागे नह्यधर्मो विधीयते । (गोविंदराजः)

एतस्मिन्निहते कृत्स्नामनुशाधि वसुंधराम् २४
अद्य पुत्रं हतं संख्ये कैकेयी राज्यकामुका ।
मया पश्येत्सुदुःखार्ता हस्तिभिन्नमिव द्रुमम् २५
कैकेयीं च वधिष्यामि सानुबन्धां सबान्धवाम् ।
कलुषेणाद्य महता मेदिनी परिमुच्यताम् २६
अद्येमं संयतं क्रोधमसत्कारं च मानद ।
मोक्ष्यामि शत्रुसैन्येषु कक्षेष्विव हुताशनम् २७
अद्यैव चित्रकूटस्य काननं निशितैः शरैः ।
छिन्दञ्छत्रुशरीराणि करिष्ये शोणितोक्षितम् २८
शरैर्निर्भिन्नहृदयान्कुञ्जरांस्तुरगांस्तथा ।
श्वापदाः परिकर्षन्तु नरांश्च निहतान्मया २९
शराणां धनुषश्चाहमनृणोऽस्मिन्महावने ।
ससैन्यं भरतं हत्वा भविष्यामि न संशयः ३०

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षण्णवतितमः सर्गः ॥९७॥ [३६१२]

---

अवश्यच आहे. राघवा ! भरताचा वध करण्यांत मला दोष दिसत नाहीं. प्रथम जो अपकार करील त्याचा वध केल्यानें अधर्म होत नाहीं आणि भरत प्रथम अपकार करणारा आहे. तेव्हां राघवा ! त्याचा वध करण्यांत धर्मच होणार आहे. याचा वध करून, नंतर तूं संपूर्ण पृथ्वीच्या राज्याचा उपभोग घे. राज्याचा अभिलाष धरणारी ही कैकेयी हत्तीनें मोडून पाडलेल्या वृक्षाप्रमाणें रणामध्यें माझ्याकडून आपला पुत्र ठार मारला गेलेला पाहून अत्यंत दुःखित होऊन जाईल. (२१–२५)

"अनुयायी आणि बांधव यांसह मी कैकेयीला ठार करीन. आज या मोठ्या पापापासून ही पृथ्वी एकदां मुक्त होऊं द्या. हे मानी राघवा ! आजपर्यंत आवरून धरलेला हा क्रोध आणि अपमान, ज्याप्रमाणें गवताच्या गंजींत विस्तव टाकून द्यावा त्याप्रमाणें मी या शत्रुसैन्यावर, आज सोडून देतों. तीक्ष्ण बाणांनीं शत्रूंच्या शरिरांचे तुकडे करीत करीत मी आज चित्रकूट पर्वताच्या वनामध्यें रक्ताचा सडा घालतों. बाणाच्या योगानें हृदय फोडून मी मारून टाकलेले हत्ती, घोडे आणि मनुष्यें यांना आज श्वापदें फराफरां ओढून नेवोत. या महावनामध्यें सर्व

अष्टनवतितमः सर्गः ।

सुसंरब्धं तु भरतं लक्ष्मणं क्रोधमूर्च्छितम् ।
रामस्तु परिसान्त्व्याथ वचनं चेदमब्रवीत् १
किमत्र धनुषा कार्यमसिना वा सचर्मणा ।
महाबले महोत्साहे भरते स्वयमागते २
पितुः सत्यं प्रतिश्रुत्य हत्वा भरतमाहवे ।
किं करिष्यामि राज्येन सापवादेन लक्ष्मण ३
यद् द्रव्यं बान्धवानां वा मित्राणां वा क्षये भवेत् ।
नाहं तत्प्रतिगृह्णीयां भक्ष्यान्विषकृतानिव ४
धर्ममर्थं च कामं च पृथिवीं चापि लक्ष्मण ।
इच्छामि भवतामर्थे एतत्प्रतिशृणोमि ते ५
भ्रातॄणां संग्रहार्थं च सुखार्थं चापि लक्ष्मण ।
राज्यमप्यहमिच्छामि सत्येनायुधमालभे ६

---

सैन्यासह भरताचा वध करून मी निःसंशय बाणांच्या व धनुष्याच्या ऋणांतून मुक्त होईन." (२६-३०)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्त्याणववावा सर्ग संपला ॥ ९७ ॥

याप्रमाणें भरतावर अतिशय रागावलेल्या आणि युद्ध करण्याकरितां फारच उतावीळ झालेल्या लक्ष्मणाचें सांत्वन करून राम म्हणाला, "महाबलाढ्य भरत मोठ्या उत्साहानें स्वतः इकडे आला असतां, आपणांला धनुष्यें, ढाली अथवा तरवारी घेऊन काय करावयाचें आहे ? लक्ष्मणा ! पित्याची प्रतिज्ञा परिपालन करीन, अशी शपथ घेऊन मी जर युद्धामध्यें भरताचा वध केला, तर मोठा लोकापवाद येईल व अशा परिस्थितींत राज्य तरी घेऊन काय करूं ? बांधवांचा अथवा मित्रांचा नाश होऊन जें द्रव्य मिळणार असेल, त्याचा मी विषमिश्रित अन्नाप्रमाणें स्वीकार करणार नाहीं. लक्ष्मणा ! धर्म, अर्थ, काम आणि पृथ्वी या सर्वांची तुमच्याकरितांच मी इच्छा करीत आहें, हें तुला सांगून ठेवतों. (१-५)

"लक्ष्मणा ! भावांचें उत्तम रीतीनें परिपालन करण्याकरितां व त्यांच्या सुखा-

नेयं मम मही सौम्य दुर्लभा सागराम्बरा
नहीच्छेयमधर्मेण शक्रत्वमपि लक्ष्मण ७
यद्विना भरतं त्वां च शत्रुघ्नं वापि मानद ।
भवेन्मम सुखं किञ्चिद्भस्म तत्कुरुतां शिखी ८
मन्येऽहमागतोऽयोध्यां भरतो भ्रातृवत्सलः
मम प्राणैः प्रियतरः कुलधर्ममनुस्मरन् ९
श्रुत्वा प्रव्राजितं मां हि जटावल्कलधारिणम् ।
जानक्या सहितं वीर त्वया च पुरुषोत्तम १०
स्नेहेनाक्रान्तहृदयः शोकेनाकुलितेन्द्रियः ।
द्रष्टुमभ्यागतो ह्येष भरतो नान्यथाऽऽगतः ११
अम्बां च केकयीं रुष्य भरतश्चाप्रियं वदन् ।
प्रासाद्य पितरं श्रीमान्राज्यं मे दातुमागतः १२
प्राप्तकालं यथैषोऽस्मान्भरतो द्रष्टुमर्हति ।
अस्मासु मनसाप्येष नाहितं किञ्चिदाचरेत् १३

करितां व त्यांच्याकरितां मी राज्याची चाड बाळगीत आहें, हें मी हातांतील आयुधाची शपथ घेऊन तुला सांगतों. हे शांत लक्ष्मणा ! सागररूपी वस्त्र नेसलेली ही पृथ्वी प्राप्त करून घेणें मला कठीण नाहीं; परंतु लक्ष्मणा ! अधर्मानें प्राप्त होणाऱ्या देवांच्या आधिपत्याचीही मला किंमत वाटत नाहीं. भरताचा, शत्रुघ्नाचा अथवा हे मानी लक्ष्मणा ! तुझा वियोग होऊन जें कांहीं सुख मला होणार असेल, त्याची राखरांगोळी झाली तरी मला पर्वा नाहीं! मला वाटतें मला प्राणां-पेक्षांही अधिक प्रिय असा भ्रातृवत्सल भरत अयोध्येमध्यें आला आणि राज्य ज्येष्ठ भावाचें' या कुलधर्माला स्मरून व हे पुरुषश्रेष्ठा वीरा लक्ष्मणा ! जटा व वल्कलें धारण करून जानकी व तूं यांसह मी वनांत गेल्याचें ऐकून प्रेमानें हृदय भरून येऊन आणि शोकानें चित्त व्याकुळ होऊन भरत आपली भेट घेण्याकरितां येथें आला आहे; दुसऱ्या हेतूनें आलेला नाहीं. (६–११)

"कैकेयी मातेवर रागावून, कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना करून व पित्याला प्रसन्न करून घेऊन वैभवशाली भरत मला राज्य देण्याकरितां येथें आला आहे. या

विप्रियं कृतपूर्वं ते भरतेन कदा नु किम् ।
ईदृशं वा भयं तेऽद्य भरतं यद्विशङ्कसे १४
नहि ते निष्ठुरं वाच्यो भरतो नाप्रियं वचः ।
अहं ह्यप्रियमुक्तः स्यां भरतस्याप्रिये कृते १५
कथं नु पुत्राः पितरं हन्युः कस्यांचिदापदि ।
भ्राता वा भ्रातरं हन्यात्सौमित्रे प्राणमात्मनः १६
यदि राज्यस्य हेतोस्त्वमिमां वाचं प्रभाषसे ।
वक्ष्यामि भरतं दृष्ट्वा राज्यमस्मै प्रदीयताम् १७
उच्यमानो हि भरतो मया लक्ष्मण तद्वचः ।
राज्यमस्मै प्रयच्छेति बाढमित्येव मंस्यते १८
तथोक्तो धर्मशीलेन भ्रात्रा तस्य हिते रतः ।
लक्ष्मणः प्रविवेशेव स्वानि गात्राणि लज्जया १९
तद्वाक्यं लक्ष्मणः श्रुत्वा व्रीडितः प्रत्युवाच ह ।
त्वां मन्ये द्रष्टुमायातः पिता दशरथः स्वयम् २०

भरताची व आपली वेळेवर भेट होणें अगत्याचें आहे. आपलें हा मनानेंसुद्धां कांहींएक वाईट करणार नाहीं. अरे ! भरतानें पूर्वीं कधीं तरी तुझें अप्रिय केलें आहे काय ? मग अशा प्रकारची भीति निष्कारण बाळगून भरताविषयीं शंका घेण्याचें आज तुला कारण काय ? तूं भरताशीं निष्ठुर अथवा अप्रिय भाषण करूं नकोस; कारण भरताशीं जर तूं तशा प्रकारें भाषण केलेंस तर तें माझ्याशींच केल्यासारखें होईल. लक्ष्मणा! कोणतीही जरी विपत्ति येऊन कोसळली, तरी पुत्र बापाचा वध कसा करतील ? अथवा भाऊ तरी जिवलग अशा आपल्या भावाला ठार कसा करील ? जर राज्याकरितां तूं ही भाषा बोलत असशील, तर भरत दृष्टीस पडतांक्षणींच मी " या लक्ष्मणाला राज्य देऊन टाक. " असें त्याला सांगेन. लक्ष्मणा ! " याला राज्य दे " असें मी भरताला बोलूं लागलों असतां तो "ठीक आहे" असेंच म्हणेल व माझ्या भाषणाला संमति देईल."(१२-१८)

याप्रमाणें धर्मशील भावानें सांगितलें असतां त्याच्या हिताविषयीं तत्पर असलेला लक्ष्मण लज्जेनें जसा कांहीं आपल्या अवयवांमध्येंच शिरूं लागला,

व्रीडितं लक्ष्मणं दृष्ट्वा राघवः प्रत्युवाच ह ।
एष मन्ये महाबाहुरिहास्मान्द्रष्टुमागतः २१
अथवा नौ ध्रुवं मन्ये मन्यमानः सुखोचितौ ।
वनवासमनुध्याय गृहाय प्रतिनेष्यति २२
इमां चाप्येष वैदेहीमत्यन्तसुखसेविनीम् ।
पिता मे राघवः श्रीमान्वनादादाय यास्यति २३
एतौ तौ संप्रकाशेते गोत्रवन्तौ मनोरमौ ।
वायुवेगसमौ वीरौ जवनौ तुरगोत्तमौ २४
स एष सुमहाकायः कम्पते वाहिनीमुखे ।
नागः शत्रुंजयो नाम वृद्धस्तातस्य धीमतः २५
न तु पश्यामि तच्छत्रं पाण्डुरं लोकविश्रुतम् ।
पितुर्दिव्यं महाभाग संशयो भवतीह मे २६
वृक्षाग्रादवरोह त्वं कुरु लक्ष्मण मद्वचः ।

---

तो लाजेनें अगदीं चूर झाला. तें रामाचें भाषण ऐकून " कदाचित् पिता दशरथ स्वतःच तुला भेटण्याकरितां येत आहे असें वाटतें " म्हणून ओशाळलेला लक्ष्मण रामाला म्हणाला असतां तशा त्या लक्ष्मणाकडे पाहून राम म्हणाला, " मला वाटतें हा आजानुबाहु दशरथच आपणांला भेटण्याकरितां येथें येत आहे. सुखांत वाढलेल्या आम्हांला वनवास कष्टदायक होणार आहे, असा विचार करून हा राजा आपणांला निःसंशय घरीं परत नेईल, असें मला वाटतें. अत्यंत सुखाचा उपभोग घेणाऱ्या या वैदेहीलाही माझा वैभवशाली पिता रघुवंशज दशरथ वनांतून परत घरीं घेऊन जाईल. (१९-२३)

" ते पहा वेगामध्यें वायूची बरोबरी करणारे असे ते वेगवान्, मनोहर, शूर, कुलीन व उत्कृष्ट घोडे शोभत आहेत. आपल्या ज्ञानी पित्याचा तोच हा शत्रुंजय नांवाचा अतिशय धिप्पाड म्हातारा हत्ती सैन्यापुढें चालत आहे; परंतु हे भाग्यवान् लक्ष्मणा ! पित्याचें तें जगद्विख्यात, दिव्य व पांढरें शुभ्र छत्र माझ्या दृष्टीस पडत नाहीं; यामुळें पिताच आला आहे किंवा नाहीं, याबद्दल मला संशय वाटत आहे. लक्ष्मणा ! माझें ऐक; तूं या शालवृक्षावरून खालीं उत्तर."

इतीव रामो धर्मात्मा सौमित्रिं तमुवाच ह	२७
अवतीर्य तु सालाग्रात्तस्मात्स समितिंजयः ।
लक्ष्मणः प्राञ्जलिर्भूत्वा तस्थौ रामस्य पार्श्वतः	२८
भरतेनाथ संदिष्टा संमर्दो न भवेदिति ।
समन्तात्तस्य शैलस्य सेना वासमकल्पयत्	२९
अध्यर्धमिक्ष्वाकुचमूर्योजनं पर्वतस्य ह ।
पार्श्वे न्यविशदावृत्य गजवाजिनराकुला	३०
सा चित्रकूटे भरतेन सेना धर्मं पुरस्कृत्य विधूय दर्पम् ।
प्रसादनार्थं रघुनन्दनस्य विरोचते नीतिमता प्रणीता	३१

इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे अष्टनवतितमः सर्गः ॥९८॥ [३६४३]

नवनवतितमः सर्गः ।

निवेश्य सेनां तु विभुः पद्भ्यां पादवतां वरः ।
अभिगन्तुं स काकुत्स्थमियेष गुरुवर्तकम्	१
निविष्टमात्रे सैन्ये तु यथोद्देशं विनीतवत् ।
भरतो भ्रातरं वाक्यं शत्रुघ्नमिदमब्रवीत्	२

---

याप्रमाणें धर्मनिष्ठ रामानें लक्ष्मणाला सांगितलें असतां तो शत्रूंना जिंकणारा लक्ष्मण त्या सालवृक्षावरून खालीं उतरला आणि हात जोडून रामाजवळ उभा राहिला. इकडे गर्दी होऊन होऊं नये म्हणून भरतानें आज्ञा केलेल्या त्या सेनेनें पर्वताच्या जवळच सभोंवतीं तळ दिला. हत्ती, घोडे आणि पायदळ यांनीं भरलेल्या त्या इक्ष्वाकु राजाच्या सेनेनें पर्वताच्या बाजूचा दीड योजन प्रदेश व्यापला; धर्माकडे लक्ष देणाऱ्या व गर्व सोडून देऊन नीतिमत्तेनें वागणाऱ्या भरतानें रघुनंदन रामाला प्रसन्न करण्याकरितां नेलेली ती सेना चित्रकूटपर्वताच्या आसपास शोभूं लागली. (२४–३१)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्ठ्याण्णवावा सर्ग संपला ॥९८॥

चालण्यांत तरबेज असणाऱ्या त्या प्रभु भरतानें सेना तेथें ठेवून गुरुशुश्रूषे-विषयीं तत्पर असलेल्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे पायानेंच जाण्याचें मना-

क्षिप्रं वनमिदं सौम्य नरसंघैः समन्ततः ।
लुब्धैश्च सहितैरेभिस्त्वमन्वेषितुमर्हसि ३
गुहो ज्ञातिसहस्रेण शरचापासिपाणिना ।
समन्वेषतु काकुत्स्थावस्मिन्परिवृतः स्वयम् । ४
अमात्यैः सह पौरैश्च गुरुभिश्च द्विजातिभिः ।
सह सर्वं चरिष्यामि पद्भ्यां परिवृतः स्वयम् ५
यावन्न रामं द्रक्ष्यामि लक्ष्मणं वा महाबलम् ।
वैदेहीं वा महाभागां न मे शान्तिर्भविष्यति ६
यावन्न चन्द्रसंकाशं तद् द्रक्ष्यामि शुभाननम् ।
भ्रातुः पद्मविशालाक्षं न मे शान्तिर्भविष्यति ७
सिद्धार्थः खलु सौमित्रिर्यश्चन्द्रविमलोपमम् ।
मुखं पश्यति रामस्य राजीवाक्षं महाद्युति ८
यावन्न चरणौ भ्रातुः पार्थिवव्यञ्जनान्वितौ ।
शिरसा प्रग्रहीष्यामि न मे शान्तिर्भविष्यति ९

मध्यें आणलें; नंतर मनाप्रमाणें सेनेची व्यवस्था लागतांक्षणीं तो भरत भावाला-शत्रुघ्नाला-विनयपूर्वक म्हणाला, " हे शांत शत्रुघ्ना ! लोकांच्या टोळ्या आणि हे गुहाचे सेवक निषाद यांना बरोबर घेऊन तूं वनांत लवकर शोध कर. बाण, धनुष्य व खड्ग घेतलेल्या आपल्या जातभाईच्या हजार लोकांसह असलेल्या गुहानें स्वतः या वनामध्यें ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांना शोधून काढावें. अमात्य, नगरवासी जन आणि द्विज यांसह असलेल्या श्रेष्ठ लोकांसह मी स्वतः या सर्व वनामध्यें पायांनीं फिरेन. (१–५)

"जोंपर्यंत राम, महाबलाढ्य लक्ष्मण अथवा महाभाग्यवती वैदेही दृष्टीस पडणार नाहीं, तोंपर्यंत मला स्वस्थता वाटणार नाहीं. जोंपर्यंत चंद्राप्रमाणें आल्हादकारक आणि कमलपत्रासारख्या विशाल नयनांनीं युक्त असें भावाचें शुभ मुख माझ्या दृष्टीस पडणार नाहीं, तोंपर्यंत माझा जीव खालीं पडणार नाहीं. खरोखर सुमित्रापुत्र लक्ष्मण कृतकृत्य आहे. कारण चंद्राप्रमाणें निर्मल आणि कमलासारख्या विशाल नयनांनीं युक्त असें रामाचें महातेजस्वी मुख त्याच्या दृष्टीस पडतें.

यावन्न राज्ये राज्यार्हः पितृपैतामहे स्थितः ।
अभिषिक्तो जलक्लिन्नो न मे शान्तिर्भविष्यति　　१०
कृतकृत्या महाभागा वैदेही जनकात्मजा ।
भर्तारं सागरान्तायाः पृथिव्या यानुगच्छति　　११
सुशुभश्चित्रकूटोऽसौ गिरिराजसमो गिरिः ।
यस्मिन्वसति काकुत्स्थः कुबेर इव नन्दने　　१२
कृतकार्यमिदं दुर्गवनं व्यालनिषेवितम् ।
यदध्यास्ते महाराजो रामः शस्त्रभृतां वरः　　१३
एवमुक्त्वा महाबाहुर्भरतः पुरुषर्षभः ।
पद्भ्यामेव महातेजाः प्रविवेश महद्वनम्　　१४
स तानि द्रुमजालानि जातानि गिरिसानुषु ।
पुष्पिताग्राणि मध्येन जगाम वदतां वरः　　१५
स गिरेश्चित्रकूटस्य सालमारुह्य सत्वरम् ।

---

राजचिन्हांनीं युक्त अशा आपल्या भावाच्या चरणांवर मस्तक ठेवीपर्यंत माझ्या मनाला शान्ति लाभणार नाहीं; इतकेंच नव्हे, परंतु जोंपर्यंत राज्याचा उपभोग घेण्याला योग्य असलेला राम वाडवडिलांपासून चालत आलेल्या राज्यावर बसून राज्याभिषेक झाल्यामुळें उदकानें भिजला नाहीं, तोंपर्यंत माझें मन स्थिर होणार नाहीं. (६-१०)

समुद्रमर्यादित पृथ्वीवर भर्त्याच्या मागोमाग जाणारी महाभाग्यवती जनककन्या वैदेही कृतकृत्य होय. नंदनवनामध्यें वास्तव्य करणाऱ्या कुबेराप्रमाणें असणारा ककुत्स्थकुलोत्पन्न राम ज्याच्यावर वास्तव्य करीत आहे, तो हा हिमालयाची बरोबरी करणारा पर्वतराज चित्रकूटपर्वत फारच पवित्र झाला, यांत शंका नाहीं व शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला महाराज राम जेथें रहात आहे, तें हें गहन वन सर्पांनीं सेवित असूनहि कृतकृत्य झालें आहे." याप्रमाणें शत्रुघ्नाला सांगून तो महापराक्रमी व महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ भरत पायांनींच त्या महावनामध्यें शिरला. वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो भरत पर्वतशिखरावर उत्पन्न झालेल्या व प्रफुल्लित फांद्यांनीं संपन्न अशा वृक्षपंक्तींमधून चालला. (११-१५)

रामाश्रमगतस्याग्नेर्ददर्श ध्वजमुच्छ्रितम् १६
तं दृष्ट्वा भरतः श्रीमान्मुमोद सहबांधवः ।
अत्र राम इति ज्ञात्वा गतः पारमिवाम्भसः १७
स चित्रकूटे तु गिरौ निशम्य रामाश्रमं पुण्यजनोपपन्नम् ।
गुहेन सार्धं त्वरितो जगाम पुनर्निवेश्यैव चमूं महात्मा १८

इत्यार्षे श्रीमद्रा०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे नवनवतितमः सर्गः ॥९९॥ [३६६१]

शततमः सर्गः ।

निविष्टायां तु सेनायामुत्सुको भरतस्ततः ।
जगाम भ्रातरं द्रष्टुं शत्रुघ्नमनुदर्शयन् १
ऋषिं वसिष्ठं संदिश्य मातॄर्मे शीघ्रमानय ।
इति त्वरितमग्रे स जगाम गुरुवत्सलः २
सुमन्त्रस्त्वपि शत्रुघ्नमदूरादन्वपद्यत ।
रामदर्शनजस्तर्षो भरतस्येव तस्य च ३

जेव्हां तो चित्रकूटपर्वतावरील सालवृक्षावर शोधासाठीं चढला. तेव्हां रामाच्या आश्रमांत असलेल्या अग्नीचा उंच गेलेला धूर त्या भरताच्या दृष्टीस पडला. तो धूर पाहिल्याबरोबर या ठिकाणीं राम आहे असें जाणून समुद्राच्या पार तरून गेल्याप्रमाणें वैभवशाली भरताला व त्याच्या बांधवांना आनंद झाला। चित्रकूट पर्वतावर तपस्वी लोकांसह रामाचा आश्रम आहे, असें ऐकल्यावर तो महात्मा भरत शोधण्याकरितां पाठविलेलें सैन्यही तेथेंच ठेवून गुहासह घाईनेंच तिकडे निघाला. (१५-१८)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं नव्याण्णवावा सर्ग संपला. ॥९९॥

सेनेचा तळ पडल्यानंतर भावाची भेट घेण्याकरितां उत्सुक झालेला भरत, राम जवळ आल्याबद्दलचीं चिन्हें शत्रुघ्नाला दाखवीत दाखवीत तेथून पुढें चालला. आणि "माझ्या मातांना लवकर घेऊन या." असें वसिष्ठ ऋषींना सांगून तो गुरुवत्सल भरत घाईनें पुढें जावयास निघाला. तेव्हां सुमंत्रानेंही जवळच येऊन शत्रुघ्नाला गांठलें. कारण रामाच्या दर्शनासंबंधानें भरताप्रमाणेंच त्यालाही उत्कंठा

गच्छन्नेवाथ भरतस्तापसालयसंस्थिताम् ।
भ्रातुः पर्णकुटीं श्रीमानुटजं च ददर्श ह ४
शालायास्त्वग्रतस्तस्या ददर्श भरतस्तदा ।
काष्ठानि चावभग्नानि पुष्पाण्यपचितानि च ५
स लक्ष्मणस्य रामस्य ददर्शाश्रममेयुषः ।
कृतं वृक्षेष्वभिज्ञानं कुशचीरैः क्वचित्क्वचित् ६
ददर्श भवने तस्मिन्महतः संचयान्कृतान् ।
मृगाणां महिषाणां च करीषैः शीतकारणात् ७
गच्छन्नेव महाबाहुर्द्युतिमान्भरतस्तदा ।
शत्रुघ्नं चाब्रवीद्धृष्टस्तानमात्यांश्च सर्वशः ८
मन्ये प्राप्ताः स्म तं देशं भरद्वाजो यमब्रवीत् ।
नातिदूरे हि मन्येऽहं नदीं मन्दाकिनीमितः ९
उच्चैर्बद्धानि चीराणि लक्ष्मणेन भवेदयम् ।
अभिज्ञानकृतः पन्था विकाले गन्तुमिच्छता १०

लागली होती. असो. जातां जातां तपस्वी लोकांच्या निवासस्थानांमध्येंच असलेली आपल्या भावाची पर्णकुटिका आणि एक झोंपडी वैभवशाली भरतानें पाहिली. पर्णकुटिकेच्या पुढें मोडलेलीं लांकडें आणि पूजेकरितां सांठवून ठेविलेलीं फुलें भरताला दिसलीं. (१–५)

नंतर राम आणि लक्ष्मण यांच्या आश्रमाजवळ पोंचल्यावर मार्गाचें ज्ञान होण्यासाठीं दर्भ आणि वल्कलें यांच्या योगानें वृक्षावर कोठें कोठें चिन्ह केलेलें त्या भरतानें पाहिलें. त्या घरामध्यें थंडीकरितां हरिण व रेडे यांच्या रानशेण्याचे मोठमोठे संचय करून ठेवलेले त्यानें पाहिले. तें पाहून आनंदित झालेला तो महापराक्रमी तेजस्वी भरत जातां जातां शत्रुघ्नाला व त्या सर्व अमात्यांना म्हणाला, "भरद्वाज मुनींनीं जो प्रदेश आपणांला सांगितला, त्या प्रदेशावर आपण आलों आहोंत, असें मला वाटतें. आतां येथून मंदाकिनी नदी फार दूर असेलसें वाटत नाहीं. ज्याअर्थीं वल्कलें उंच बांधलेलीं दिसत आहेत, त्याअर्थीं वेळीं अवेळीं पाणी वगैरे आणण्याचा प्रसंग पडल्यास आपणांला जातां यावें, या उद्देशानें

इतश्चोदात्तदन्तानां कुञ्जराणां तरस्विनाम् ।
शैलपार्श्वे परिक्रान्तमन्योन्यमभिगर्जताम् ११
यमेवाधातुमिच्छन्ति तापसाः सततं वने ।
तस्यासौ दृश्यते धूमः संकुलः कृष्णवर्त्मनः १२
अत्राहं पुरुषव्याघ्रं गुरुसत्कारकारिणम् ।
आर्यं द्रक्ष्यामि संहृष्टं महर्षिमिव राघवम् १३
अथ गत्वा मुहूर्तं तु चित्रकूटं स राघवः ।
मन्दाकिनीमनु प्राप्तस्तं जनं चेदमब्रवीत् १४
जगत्यां पुरुषव्याघ्र आस्ते वीरासने रतः ।
जनेन्द्रो निर्जनं प्राप्य धिङ्मे जन्म सजीवितम् १५
मत्कृते व्यसनं प्राप्तो लोकनाथो महाद्युतिः ।
सर्वान्कामान्परित्यज्य वने वसति राघवः १६

---

लक्ष्मणानें खुणा करून ठेविलेला हा मार्ग आश्रमालाच जात असला पाहिजे. या बाजूला एकमेकाला उद्देशून गर्जना करणारे मोठमोठे सुळे असलेले महाबलाढ्य हत्ती पर्वताच्या बाजूला संचार करीत असतात. तेव्हां चुकून तिकडे जाण्याचा प्रसंग न यावा, यासाठीं मार्ग लक्ष्यांत रहाण्याकरितां या खुणा करून ठेविल्या असल्या पाहिजेत. (६–११)

" सकाळ–संध्याकाळ होम करण्यासाठीं तपस्वी लोक ज्याला राखून ठेवण्याची इच्छा करतात, त्या अग्नीचा हा अस्ताव्यस्त पसरलेला धूर वनामध्यें दिसत आहे व याच ठिकाणीं वडिलांचा आज्ञापालनरूपी सत्कार करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ सज्जन रामाला महर्षीप्रमाणें आनंदित वृत्तीमध्यें असल्याचें मी पाहीन. " असें बोलून थोडा वेळपर्यंत चित्रकूटपर्वतावर चालून गेल्यानंतर मंदाकिनी नदीजवळ आलेला तो रघुवंशज भरत आपल्याजवळ असलेल्या त्या लोकांना म्हणाला, "पुरुषश्रेष्ठ राम पृथ्वीवरील लोकांचा अधिपति असूनही आज निर्जन वनामध्यें येऊन व योगी लोकांना योग्य असें वीरासन घालून तपश्चर्या करण्याविषयीं ज्याअर्थीं तत्पर होऊन राहिला आहे, त्या अर्थीं धिक्कार असो माझ्या या जन्माला व जिविताला! माझ्याकरितां हा लोकाधिपति महातेजस्वी राम संकटात सांपडला

इति लोकसमाकृष्टः पादेष्वद्य प्रसादयन् ।
रामं तस्य पतिष्यामि सीताया लक्ष्मणस्य च १७
एवं स विलपंस्तस्मिन्वने दशरथात्मजः ।
ददर्श महतीं पुण्यां पर्णशालां मनोरमाम् १८
सालतालाश्वकर्णानां पर्णैर्बहुभिरावृताम् ।
विशालां मृदुविस्तीर्णां कुशैर्वेदिमिवाध्वरे १९
शक्रायुधनिकाशैश्च कार्मुकैर्भारसाधनैः ।
रुक्मपृष्ठैर्महासारैः शोभितां शत्रुबाधकैः । २०
अर्करश्मिप्रतीकाशैर्घोरैस्तूणगतैः शरैः ।
शोभितां दीप्तवदनैः सर्पैर्भोगवतीमिव २१
महारजतवासोभ्यामसिभ्यां च विराजिताम् ।
रुक्मबिन्दुविचित्राभ्यां चर्मभ्यां चापि शोभिताम् २२
गोधाङ्गुलित्रैरासक्तैश्चित्रकाञ्चनभूषितैः ।

असून सर्व भोग्य वस्तूंचा त्याग करून वनामध्यें रहात आहे. यासाठीं लोकनिंदेस पात्र झालेला मी रामाला प्रसन्न करून घेण्याकरितां आज त्याच्या, सीतेच्या व लक्ष्मणाच्या चरणांवर मस्तक ठेवीन.” (११-१७)

याप्रमाणें तो दशरथपुत्र भरत दुःखोद्गार काढीत जाऊं लागला असतां एक मोठी, मनोहर व पवित्र पर्णकुटिका त्याच्या दृष्टीस पडली. ती विशाल, सुंदर व विस्तीर्ण पर्णकुटिका दर्भांनीं आच्छादलेल्या यज्ञांतील वेदीप्रमाणें साल, ताल आणि अश्वकर्ण या वृक्षांच्या असंख्य पानांनीं आच्छादलेली होती. इंद्रधनुष्यासारख्या मोठें कार्य करण्यासाठीं उपयुक्त, फारच बळकट, सुवर्णभूषित पृष्ठभागांनीं युक्त आणि शत्रूचा धुव्वा उडविणाऱ्या धनुष्यांनीं तिला शोभा आलेली होती. (१८-२०)

उज्ज्वल टोकें असलेल्या व सूर्यकिरणासारख्या तेजस्वी असलेल्या व भात्यांत व्यवस्थित भरलेल्या भयंकर बाणांनीं तीं सर्पांच्या योगानें शोभणाऱ्या नागलोकाप्रमाणें शोभत होती. सोन्याच्या म्यानांतून असलेल्या तरवारीनें ती विशेषच सुशोभित झाली असून सुवर्णबिंदूच्या योगानें चित्रविचित्र दिसणाऱ्या ढालांनीं तिला शोभा आलेली होती व हरिणांना ज्याप्रमाणें सिंहाच्या

अरिसंघैरनाधृष्यां मृगैः सिंहगुहामिव २३
प्रागुदक्प्रवणां वेदिं विशालां दीप्तपावकाम् ।
ददर्श भरतस्तत्र पुण्यां रामनिवेशने २४
निरीक्ष्य स मुहूर्तं तु ददर्श भरतो गुरुम् ।
उटजे राममासीनं जटामण्डलधारिणम् २५
कृष्णाजिनधरं तं तु चीरवल्कलवाससम् ।
ददर्श राममासीनमभितः पावकोपमम् २६
सिंहस्कन्धं महाबाहुं पुण्डरीकनिभेक्षणम् ।
पृथिव्याः सागरान्ताया भर्तारं धर्मचारिणम् २७
उपविष्टं महाबाहुं ब्रह्माणमिव शाश्वतम् ।
स्थण्डिले दर्भसंस्तीर्णे सीतया लक्ष्मणेन च २८
तं दृष्ट्वा भरतः श्रीमान्दुःखमोहपरिप्लुतः ।
अभ्यधावत धर्मात्मा भरतः केकयीसुतः २९
दृष्ट्वैव विललापार्तो बाष्पसंदिग्धया गिरा ।

गुहेमध्यें जाणें अशक्य असतें, त्याचप्रमाणें सुवर्णभूषित आणि वृक्षाला लटकलेल्या बाहुत्राणांनीं व अंगुलित्राणांनीं युक्त असलेल्या त्या पर्णकुटिकेवर शत्रुसमूहांनाही चाल करून जातां येणें अशक्य होतें. तेथें गेल्यावर ज्यावर अग्नि प्रदीप्त झाला आहे असें एक पूर्वेकडे व उत्तरेकडे उतरतें असलेलें पवित्र व विशाल स्थंडिल रामाच्या निवासस्थानामध्यें त्या ठिकाणीं भरतानें पाहिलें. आणि क्षणभर तिकडेच दृष्टि दिल्यावर झोंपडीमध्यें जटामंडल धारण करून बसलेला त्याचा ज्येष्ठ बंधु राम भरताच्या दृष्टीस पडला. (२१-२५)

त्या अग्नीसारख्या तेजस्वी रामानें कृष्णाजिन धारण करून साली व वल्कलें परिधान केलेलीं असल्याचें भरताला दिसून आलें आणि सिंहासारखे खांदे असलेल्या, आजानुबाहु व कमलासारख्या नेत्रांनीं सुंदर दिसणाऱ्या समुद्रमर्यादित पृथ्वीचा अधिपति, धर्मनिष्ठ, महापराक्रमी आणि दर्भ पसरलेल्या स्थंडिलावर सीता व लक्ष्मण यांसह अनादि ब्रह्मदेवाप्रमाणें बसलेल्या त्या रामाला पाहतांक्षणीं त्या वैभवशाली भरताला दुःखाचें व मोहाचें भरतें आलें आणि तो धर्मनिष्ठ

अशक्नुवन्वारयितुं धैर्याद्वचनमब्रुवन् ३०
यः संसदि प्रकृतिभिर्भवेद्युक्त उपासितुम् ।
वन्यैर्मृगैरुपासीनः सोऽयमास्ते ममाग्रजः ३१
वासोभिर्बहुसाहस्रैर्यो महात्मा पुरोचितः ।
मृगाजिने सोऽयमिह प्रवस्ते धर्ममाचरन् ३२
अधारयद्यो विविधाश्चित्राः सुमनसः सदा ।
सोऽयं जटाभारमिमं सहते राघवः कथम् ३३
यस्य यज्ञैर्यथादिष्टैर्युक्तो धर्मस्य संचयः ।
शरीरक्लेशसंभूतं स धर्मं परिमार्गते ३४
चन्दनेन महार्हेण यस्याङ्गमुपसेवितम् ।
मलेन तस्याङ्गमिदं कथमार्यस्य सेव्यते ३५
मन्निमित्तमिदं दुःखं प्राप्तो रामः सुखोचितः ।
धिग्जीवितं नृशंसस्य मम लोकविगर्हितम् ३६

कैकेयीपुत्र भरत त्याच्याकडे धावला. राम दृष्टीस पडतांच भरत दुःखाकुल होऊन विलाप करूं लागला आणि तें दुःख आवरून धरण्यास असमर्थ होऊन व अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळतच धैर्यानें तो म्हणाला- (२६-३०)

"राजसभेमध्यें मंत्र्यांच्या सहवासांत बसण्यास योग्य असलेला हा माझा मोठा भाऊ आज वनांतील पशूंच्या सहवासांत येथें बसला आहे. पूर्वीं हजारों रुपये किंमतीचीं वस्त्रें जो महात्मा आपल्या शरिरावर घालून शोभत असे तो आज सत्यरूपी धर्माचें परिपालन करण्याकरितां कृष्णाजिनें परिधान करीत आहे ! अरे, नेहमीं पूर्वीं नानाप्रकारच्या सुंदर सुंदर फुलांच्या माळा जो धारण करीत असे, तो हा राघव आज जटा बांधून कसा बरें दिवस कंठीत आहे ! शास्त्रविहित आणि ऋत्विजांच्याच क्लेशांनीं साध्य अशा यज्ञांनीं ज्याचा धर्मसंचय होणें योग्य आहे तो हा स्वतःच्या शारीरिक क्लेशांपासून मिळणाऱ्या धर्माच्या मागें लागला आहे. मोठ्या मूल्यवान् चंदनानें ज्याच्या शरिराचा उपचार पूर्वीं होत असे, त्या सज्जनाच्या शरिरावर आज किती बरें मळ बसलेला आहे ! सुखाचा उपभोग घेत आलेल्या रामाला माझ्याकरितां हें दुःख प्राप्त

इत्येवं विलपन्दीनः प्रस्विन्नमुखपङ्कजः ।
पादावप्राप्य रामस्य पपात भरतो रुदन् ३७
दुःखाभितप्तो भरतो राजपुत्रो महाबलः ।
उक्त्वार्येति सकृद्दीनं पुनर्नोवाच किंचन ३८
बाष्पैः पिहितकण्ठश्च प्रेक्ष्य रामं यशस्विनम् ।
आर्येत्येवाभिसंक्रुश्य व्याहर्तुं नाशकत्ततः ३९
शत्रुघ्नश्चापि रामस्य ववन्दे चरणौ रुदन् ।
तावुभौ च समालिङ्ग्य रामोऽप्यश्रूण्यवर्तयत् ४०
ततः सुमन्त्रेण गुहेन चैव समीयतू राजसुतावरण्ये ।
दिवाकरश्चैव निशाकरश्च यथाम्बरे शुक्रबृहस्पतिभ्याम् ४१
तान्पार्थिवान्वारणयूथपार्हान्समागतांस्तत्र महत्यरण्ये ।
वनौकसस्तेऽभिसमीक्ष्य सर्वे त्वश्रूण्यमुञ्चन्प्रविहाय हर्षम् ४२

इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे शततमः सर्गः॥१००॥ [२७०३]

---

झालें आहे. त्याअर्थी लोकनिंदेस पात्र झालेल्या दुष्ट अशा माझ्या जीविताला धिक्कार असो!" ( ३१-३६)

याप्रमाणें अश्रूंनीं मुखकमल डबडबून जाऊन विलाप करीत असलेला दीन भरत रडत रडत रामाच्या पायांपर्यंतही जाऊन न पोंचतां मध्येंच पडला. दुःखानें व्याकूळ झालेला तो महाबलाढ्य राजकुमार भरत "श्रेष्ठा !" असें एकदांच दीन स्वरानें म्हणून स्वस्थ राहिला व पुढें त्याच्या तोंडांतून कांहींच शब्द निघेनासा झाला. अश्रूंनीं कंठ दाटून आलेल्या भरतानें त्या श्रेष्ठ रामाकडे पाहून " आर्य " इतकेंच म्हणून टाहो फोडल्यावर पुढें त्याला बोलणेंच अशक्य झालें. कांहीं वेळानें उठून भरतानें वंदन केल्यावर शत्रुघ्नानेंही रडत रडत रामाच्या चरणांना वंदन केलें आणि त्या उभयतांना कवटाळून धरल्यावर रामही अश्रू ढाळूं लागला. त्यानंतर आकाशामध्यें गुरुशुक्राचा समागम होणाऱ्या चंद्राप्रमाणें अरण्यामध्यें त्या राजकुमार रामलक्ष्मणांची सुमंत्र व गुह यांच्याशीं भेट झाली. तेव्हां कळपांतील मुख्य मुख्य हत्तींवर बसण्यास योग्य असलेले ते राजकुमार महावनामध्यें एकत्र झाल्याचें पाहून वनांमध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या सर्व

एकाधिकशततमः सर्गः ।

जटिलं चीरवसनं प्राञ्जलिं पतितं भुवि ।
ददर्श रामो दुर्दर्शं युगान्ते भास्करं यथा १
कथंचिदभिविज्ञाय विवर्णवदनं कृशम् ।
भ्रातरं भरतं रामः परिजग्राह पाणिना २
आघ्राय रामस्तं मूर्ध्नि परिष्वज्य च राघवम् ।
अङ्के भरतमारोप्य पर्यपृच्छत सादरम् ३
क नु तेऽभूत्पिता तात यदरण्यं त्वमागतः ।
न हि त्वं जीवतस्तस्य वनमागन्तुमर्हसि ४
चिरस्य बत पश्यामि दूराद्भरतमागतम् ।
दुष्प्रतीकमरण्येऽस्मिन्किं तात वनमागतः ५
कच्चिन्नु धरते तात राजा यत्त्वमिहागतः ।
कच्चिन्न दीनः सहसा राजा लोकान्तरं गतः ६

लोकांचा हर्ष मावळला व ते अश्रु ढाळूं लागले. (३७-४२)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शंभरावा सर्ग संपला ॥ १०० ॥

युगान्तसमयीं भूमीवर कोसळून पडणाऱ्या सूर्याप्रमाणें जटा धारण करून वल्कलें परिधान केलेला व दुःखाकुल झाल्यामुळें मोठ्या कष्टानें ओळखूं येणारा भरत हात जोडून भूमीवर पडलेला आहे असें रामानें पाहिलें. त्याच्या मुखावरील कांति नाहींशी होऊन कृश झालेल्या त्या आपल्या भावाला-भरताला-मोठ्या कष्टानें ओळखल्यावर रामानें त्याचा हात धरला. त्याचें मस्तकीं अवघ्राण करून, त्याला कवटाळून धरलें आणि त्याला मांडीवर बसवून तो आदरपूर्वक त्या भरताला म्हणाला, “ भरता ! तूं वनामध्यें कां बरें आलास ? तुझा पिता कोठें गेला आहे ! तो जिवंत असतांना वनांत येणें तुला योग्य नाहीं. खरोखरच मोठ्या कष्टानें ओळखूं येणाऱ्या तुला व फार लांबचा प्रवास करून आलेला हा भरत आज या अरण्यामध्यें मी पुष्कळ दिवसांनीं पहात आहे. भरता ! तुला वनांत येण्याचें कारण काय ? (१–५)

कच्चित्सौम्य न ते राज्यं भ्रष्टं बालस्य शाश्वतम् ।
कच्चिच्छुश्रूषसे तात पितुः सत्यपराक्रम ७
कच्चिद्दशरथो राजा कुशली सत्यसंगरः ।
राजसूयाश्वमेधानामाहर्ता धर्मनिश्चितः ८
स कच्चिद्ब्राह्मणो विद्वान्धर्मनित्यो महाद्युतिः ।
इक्ष्वाकूणामुपाध्यायो यथावत्तात पूज्यते ९
तात कच्चिच्च कौसल्या सुमित्रा च प्रजावती ।
सुखिनी कच्चिदार्या च देवी नन्दति कैकयी १०
कच्चिद्विनयसंपन्नः कुलपुत्रो बहुश्रुतः ।
अनसूयुरनुद्रष्टा सत्कृतस्ते पुरोहितः ११
कच्चिदग्निषु ते युक्तो विधिज्ञो मतिमानृजुः ।
हुतं च होष्यमाणं च काले वेदयते सदा १२
कच्चिद्देवान्पितॄन्भृत्यान्गुरून्पितृसमानपि ।

"भरता ! राजा सुखरूप आहे ना ? अरे ! ज्याअर्थी तूं येथें आला आहेस त्याअर्थी तो दुःखी झालेला राजा एकाएकीं परलोकीं तर गेला नाहीं ना ? हे शांत भरता ! तूं लहान आहेस. तुझें राज्य नष्ट होण्याचा तर प्रसंग आला नाहीं ना ? हे अमोघपराक्रमी भरता ! तूं पित्याची शुश्रूषा व्यवस्थित रीतीनें करीत असतोस ना ? राजसूय आणि अश्वमेध याग करणारा व धर्माविषयीं दृढ निष्ठा बाळगणारा सत्यप्रतिज्ञ दशरथ राजा कुशल आहे ना ? भरता ! नेहमीं धर्मानें वागणाऱ्या त्या इक्ष्वाकुवंशजांच्या महातेजस्वी विद्वान् ब्राह्मण उपाध्यायाची पूर्वीप्रमाणेंच यथायोग्य मानमान्यता रहात असते ना ? भरता ! कौसल्या, पुत्रवती सुमित्रा आणि त्याचप्रमाणें सुखांत असलेली राजपत्नी भार्या कैकेयी आनंदांत आहेत ना ? (६–१०)

"विनयसंपन्न, कुलीन, बहुश्रुत, मत्सररहित आणि राजकुलाचें हित पाहणाऱ्या अशा पुरोहित वसिष्ठपुत्राचा तूं सत्कार करीत असतोस ना ? अग्नींना हविर्द्रव्यें वगैरे देण्यासाठीं तूं, बुद्धिमान्, सरल व सर्व होमविधि जाणणारा ऋत्विज नेमला आहेस ना ? आणि वेळेवर होम झाल्याचें व होम होत असल्याचें तो तुला नेहमीं

वृद्धांश्च तात वैद्यांश्च ब्राह्मणांश्चाभिमन्यसे १३
इष्वस्त्रवरसंपन्नमर्थशास्त्रविशारदम् ।
सुधन्वानमुपाध्यायं कच्चित्त्वं तात मन्यसे १४
कच्चिदात्मसमाः शूराः श्रुतवन्तो जितेन्द्रियाः ।
कुलीनाश्चेङ्गितज्ञाश्च कृतास्ते तात मन्त्रिणः १५
मन्त्रो विजयमूलं हि राज्ञां भवति राघव ।
सुसंवृतो मन्त्रिधुरैरमात्यैः शास्त्रकोविदैः १६
कच्चिन्निद्रावशं नैषि कच्चित्कालेऽवबुध्यसे ।
कच्चिच्चापररात्रेषु चिन्तयस्यर्थनैपुणम् १७
कच्चिन्मन्त्रयसे नैकः कच्चिन्न बहुभिः सह ।
कच्चित्ते मन्त्रितो मन्त्रो राष्ट्रं न परिधावति १८
कच्चिदर्थं विनिश्चित्य लघुमूलं महोदयम् ।
क्षिप्रमारभसे कर्म न दीर्घयसि राघव १९

---

कळवीत असतो ना ? भरता ! देव, पितर, सेवक, वडिलासारखे गुरु, वृद्ध आणि विद्वान् ब्राह्मण यांचा तूं मान ठेवीत असतोस ना ? उत्कृष्ट बाण व अस्त्रें सोडण्यामध्यें निपुण व राजनीतीमध्यें पंडित अशा सुन्धवा नांवाच्या धनुर्वेदाचार्याचा तूं मान राखीत असतोस ना ? भरता ! तूं आपले मंत्री, तुझ्यासारखेच शूर, बहुश्रुत, जितेंद्रिय, कुलीन आणि धोरणी व समयज्ञ असे नेमले आहेस नां ? (११-१५)

"राघवा ! मसलत हें राजांच्या विजयाचें मूळ आहे. तेव्हां श्रेष्ठ मंत्री आणि नीतिशास्त्रज्ञ अमात्य यांसह तुझ्या सल्लामसलती अगदीं गुप्तपणें चालत असतात ना ? तूं वेळीं अवेळीं निद्रेच्या आधीन होत नाहींस ना ? वेळेवर जागा असतोस ना ? आणि अर्थप्राप्तीच्या उपायाविषयीं तुझें पहांटेच्या वेळीं चिंतन चालूं असतें ना ? तूं कधीं मंत्रिमंडळाचा विचार न घेतां, आपल्या मनाप्रमाणें एकटाच नसतोस ना ? अथवा एकाच वेळीं पुष्कळांना बरोबर घेऊन कधीं मसलत करीत बसत नाहींस ना ? आणि त्याचप्रमाणें तूं ठरविलेली एखादी मसलत अंमलांत येण्यापूर्वींच फुटून राष्ट्रामध्यें पसरत नाही ना ? अल्प प्रयत्नानें साध्य आणि मोठें

कच्चिन्नु सुकृतान्येव कृतरूपाणि वा पुनः।
विदुस्ते सर्वकार्याणि न कर्तव्यानि पार्थिवाः २०
कच्चिन्न तर्कैर्युक्त्या वा ये चाप्यपरिकीर्तिताः।
त्वया वा तव वामात्यैर्बुध्यते तात मन्त्रितम् २१
कच्चित्सहस्रैर्मूर्खाणामेकमिच्छसि पण्डितम्।
पण्डितो ह्यर्थकृच्छ्रेषु कुर्यान्निःश्रेयसं महत् २२
सहस्राण्यपि मूर्खाणां यद्युपास्ते महीपतिः।
अथवाप्ययुतान्येव नास्ति तेषु सहायता २३
एकोऽप्यमात्यो मेधावी शूरो दक्षो विचक्षणः।
राजानं राजपुत्रं वा प्रापयेन्महतीं श्रियम् २४
कच्चिन्मुख्या महत्स्वेव मध्यमेषु च मध्यमाः।
जघन्याश्च जघन्येषु भृत्यास्ते तात योजिताः २५

---

फायदेशीर अशी एखादी गोष्ट करण्याचा निश्चय झाल्यावर, हे राघवा ! विलंब न करतां तूं लवकर ती करण्याला आरंभ करीत असतोस ना ? मांडलिक राजा तुझीं कृत्यें अंमलांत आल्यावर अथवा अंमलांत आल्यासारखीं झाल्यावरच समजत असून पुढें होणारीं तुझीं कृत्यें त्यांना अगोदरच समजत नाहींत ना? (१६–२०)

"तुझ्या मसलती तूं अथवा तुझ्या अमात्यांनीं जरी बाहेर फोडल्या नाहींत तरी युक्तीनें अथवा अनुमानांनीं त्या इतरांना समजून येत नाहींत ना ? आणि त्याचप्रमाणें भरता ! इतरानीं केलेली मसलत तुला अथवा तुझ्या अमात्यांना, समजत असते ना ? हजारों मूर्ख मंत्र्यांचे ऐवजीं विद्वान् व विचारवान् असा एकच मंत्री आपल्या संग्रहीं ठेवण्याची खबरदारी बाळगतोस ना ? कारण विद्वान् व विचारवान् असा एकच मंत्री राजकार्यांत निर्माण होणाऱ्या संकटांतून सुरक्षितपणें पार पडण्याचा निश्चयात्मक असा उपाय सुचवून, राष्ट्राचें अतिशय मोठें कल्याण घडवून आणतो. हजारोंच नव्हे, परंतु * लाखों मूर्ख लोक

---

* मूळ शब्द " अयुतानि " असा आहे व अयुत शब्दाचा अर्थ दहा-हजार असा आहे; परंतु, दहा हजारों असें म्हणण्यांचा परिपाठ नसल्यामुळें " अयुतानि " याचें भाषांतर भाषेंत जुळण्याकरितां "लाखों" असें केलें आहे.

अमात्यानुपधातीतान्पितृपैतामहाञ्शुचीन् ।
श्रेष्ठाञ्छ्रेष्ठेषु कच्चित्त्वं नियोजयसि कर्मसु २६
कच्चिन्नोग्रेण दण्डेन भृशमुद्वेजिताः प्रजाः ।
राष्ट्रे तवावजानन्ति मन्त्रिणः कैकयीसुत २७
कच्चित्त्वां नावजानन्ति याजकाः पतितं यथा ।
उग्रप्रतिग्रहीतारं कामयानमिव स्त्रियः २८
उपायकुशलं वैद्यं भृत्यं संदूषणे रतम् ।
शूरमैश्वर्यकामं च यो न हन्ति स हन्यते २९
कच्चिद्धृष्टश्च शूरश्च धृतिमान्मतिमाञ्छुचिः ।
कुलीनश्चानुरक्तश्च दक्षः सेनापतिः कृतः ३०

जरी राजानें आपल्या जवळ बाळगले असले तरी त्यांची राजाला कांहींही मदत होत नाहीं. याच्या उलट बुद्धिमान्, शूर, दक्ष व नीतिशास्त्रपारंगत असा एकच अमात्य जवळ असला तरी तो राजाला अथवा राजपुत्राला मोठें वैभव मिळवून देईल. भरता ! मोठ्या कार्यांकडे मुख्य, मध्यम कृत्याकडे मध्यम आणि क्षुल्लक कामाकडे हलक्या सेवकांची तूं योजना केली आहेस ना? (२१-२५)

"वाडवडिलांपासून चालत आलेल्या, आचरणानें शुद्ध आणि कोणत्याही प्रकारचें पाप न करणाऱ्या श्रेष्ठ अमात्यांचा तूं मोठमोठ्या कामांकडेच योजना करीत असतोस ना ? हे कैकेयीपुत्रा भरता ! क्षुल्लक * अपराधाला कडक शिक्षा केल्यामुळें खवळलेले प्रजाजन व मंत्रि राष्ट्रामध्यें तुझा अपमान करीत नाहींत ना ? याजक ज्याप्रमाणें पतिताचा अपमान करतात किंवा बलात्कारासारखें भयंकर कृत्य करून स्त्रीवर जुलूम करणाऱ्या कामी पुरुषाचा स्त्रिया जसा अपमान करतात, त्याप्रमाणें प्रजा तुझा अपमान करीत नाहींत ना ? सामादि उपायांची

* हुरड्याच्या चोरीला फांशीची शिक्षा अशासारखे प्रकार जरी सध्यां अनेक प्रसंगीं या देशांत दृष्टोत्पत्तीस येऊन ते प्रजेच्या क्षोभाला साधन होऊन बसतात, तरी विनाकारण कडक शिक्षा देऊन प्रजा क्षुब्ध करणें हें एक राजाला अपाय होण्याचें कारण म्हणून अति प्राचीन कालापासूनच या देशातील राजे मानीत आले असल्याचें दिसतें.

बलवन्तश्च कच्चित्ते मुख्या युद्धविशारदाः ।
दृष्टापदाना विक्रान्तास्त्वया सत्कृत्य मानिताः ३१
कच्चिद्बलस्य भक्तं च वेतनं च यथोचितम् ।
संप्राप्तकालं दातव्यं ददासि न विलम्बसे ३२
कालातिक्रमणे ह्येव भक्तवेतनयोर्भृताः ।
भर्तुरप्यतिकुप्यन्ति सोऽनर्थः सुमहान्कृतः ३३
कच्चित्सर्वेऽनुरक्तास्त्वां कुलपुत्राः प्रधानतः ।
कच्चित्प्राणांस्तवार्थेषु संत्यजन्ति समाहिताः ३४
कच्चिज्जानपदो विद्वान्दक्षिणः प्रतिभानवान् ।
यथोक्तवादी दूतस्ते कृतो भरत पण्डितः ३५
कच्चिदष्टादशान्येषु स्वपक्षे दश पञ्च च ।

योजना करण्याविषयीं चतुर, राजनीतिशास्त्र जाणणारा, विश्वासू सेवकांशीं राजाचें वांकडें आणण्याविषयीं तत्पर, शूर आणि राज्याभिलाषी सेवकाचा जो वध करीत नाहीं, त्याचाच वध होतो. आत्मविश्वासी, प्रसंगावधानी शूर, धैर्यवान् बुद्धिमान्, आचरणानें पवित्र, कुलीन, राजनिष्ठ आणि चतुर व सर्वकाल सावधान असा सेनापति तूं नेमला आहेस ना ? (२६-३०)

"तुझ्या सेनेंतील मुख्य मुख्य अधिकारी लोक जे पराक्रमाविषयीं कसोटीला उतरलेले असून बलाढ्य, युद्धाविषयीं निपुण आणि पराक्रमी आहेत, त्यांचा यथायोग्य सत्कार करून तूं त्यांची मानमान्यता राखीत असतोस ना ? नित्य नियमानें देण्यास योग्य असा सैन्याचा भत्ता आणि पगार तूं विलंब न करतां वेळच्या वेळीं देत असतोस ना ? कारण, भत्त्याची व पगाराची वेळ टळून गेली म्हणजे हातावर पोट भरणारे सेवक लोक धन्यावर फारच रागवतात आणि त्यामुळें मोठाच अनर्थ ओढवतो. तुझ्या कुलांतील लोक आणि प्रधान हे सर्व तुझ्यावर अनुरक्त व तुझ्या हिताविषयीं तत्पर असून तुझ्या कार्याकरितां प्राण देण्यास तयार असतात ना ? भरता ! स्वदेशांतलाच नागरिक विद्वान्, सरळ, समयसूचक, सांगितलेला निरोप अगदीं अक्षरशः जसाच्या तसाच सांगणारा आणि चतुर असा दूत तूं नेमला आहेस ना ? (३१-३५)

त्रिभिस्त्रिभिरविज्ञातैर्वेत्सि तीर्थानि चारणैः ३६
कच्चिद्व्यपास्तानहितान्प्रतियातांश्च सर्वदा ।
दुर्बलाननवज्ञाय वर्तसे रिपुसूदन ३७
कच्चिन्न लोकायतिकान्ब्राह्मणांस्तात सेवसे ।
अनर्थकुशला ह्येते बालाः पण्डितमानिनः ३८
धर्मशास्त्रेषु मुख्येषु विद्यमानेषु दुर्बुधाः
बुद्धिमान्वीक्षिकीं प्राप्य निरर्थं प्रवदन्ति ते ३९
वीरैरध्युषितां पूर्वमस्माकं तात पूर्वकैः ।
सत्यनामां दृढद्वारां हस्त्यश्वरथसंकुलाम् ४०
ब्राह्मणैः क्षत्रियैर्वैश्यैः स्वकर्मनिरतैः सदा ।

"मंत्री, पुरोहित, युवराजा, सेनापति, द्वारपाल, अंतःपुराध्यक्ष, तुरुंगावरील अधिकारी, खजिनदार, राजाची आज्ञा कळविणारा, न्यायाधीश, धर्माध्यक्ष, पंच, सैन्याचा पगार वाटणारा, काम झाल्यावर पगार घेणारा, नगररक्षक, राष्ट्रसीमारक्षक, दुष्टांना दंड करणारा अधिकारी आणि जल, पर्वत, वन व स्थल येथील किल्ले राखणारा अशा शत्रुपक्षाकडील अठरा प्रकारच्या अधिकाऱ्यांच्या आणि मंत्री, पुरोहित व युवराज हे पहिले तीन वजा करून बाकी राहिलेल्या आपणांकडील पंधरा अधिकाऱ्यांपैकीं प्रत्येकामागें परस्परांना माहीत नसलेले असे तीन तीन हेर ठेवून तूं शोध आणवीत असतोस ना ? हे शत्रूंचा संहार करणाऱ्या भरता ! राज्याला अपाय करणारे लोक घालवून दिल्यावर पुनः ते परत आले असतां ते दुर्बल आहेत असें समजून तूं कधींही त्यांची उपेक्षा करीत नसतोस ना? भरता ! शुष्क तर्कवितर्क लढवून, प्रत्यक्ष प्रमाणाचेंच अवलंबन करून चालणारे नास्तिक मतानुयायी ब्राह्मण तूं जवळ ठेवीत नाहीस ना ? कारण हे स्वतःला पंडित समजणारे मूर्ख अनर्थ उत्पन्न करण्याविषयीं मात्र कुशल असतात आणि मुख्य प्रमाणभूत अशीं धर्मशास्त्रें हातीं असतांना शुष्क तर्कशास्त्रामुळें सुचणाऱ्या बुद्धीचें अवलंबन करून ते दुष्ट लोक निरर्थक बडबड करीत असतात. भरता ! वीरांनीं जिच्यामध्यें वास्तव्य केलें आहे, आमच्या पूर्वजांनीं जिचें नांव खरें करून दाखविलें आहे, मजबूत दारांनीं जी युक्त आहे, हत्ती, घोडे आणि रथ यांनीं जी भरलेली आहे, (३६-४०)

जितेन्द्रियैर्महोत्साहैर्वृतामार्यैः सहस्रशः ४१
प्रासादैर्विविधाकारैर्वृतां वैद्यजनाकुलाम् ।
कच्चित्समुदितां स्फीतामयोध्यां परिरक्षसे ४२
कच्चिच्चैत्यशतैर्जुष्टः सुनिविष्टजनाकुलः ।
देवस्थानैः प्रपाभिश्च तटाकैश्चोपशोभितः ४३
प्रहृष्टनरनारीकः समाजोत्सवशोभितः ।
सुकृष्टसीमापशुमान्हिंसाभिरभिवर्जितः ४४
अदेवमातृको रम्यः श्वापदैः परिवर्जितः ।
परित्यक्तो भयैः सर्वैः खनिभिश्चोपशोभितः ४५
विवर्जितो नरैः पापैर्मम पूर्वैः सुरक्षितः ।
कच्चिज्जनपदः स्फीतः सुखं वसति राघव ४६
कच्चित्ते दयिताः सर्वे कृषिगोरक्ष्यजीविनः ।
वार्तायां सांप्रतं तात लोकोऽयं सुखमेधते ४७

"जितेंद्रिय, मोठे उत्साही, सभ्य व स्वकर्मानुसार आचरण करण्यविषयीं तत्पर अशा हजारों ब्राह्मणांनीं, क्षत्रियांनीं व वैश्यांनीं जी गजबजलेली आहे, अनेक आकारांच्या प्रासादांनीं जी व्याप्त झालेली आहे आणि विद्वान् लोकांचा निवास जिच्यांत आहे अशा अभ्युदयावस्थेंत असलेल्या समृद्ध अयोध्येचें तूं रक्षण करीत आहेस ना ? उत्तर ऋतूमध्यें यज्ञ वगैरे केलेल्या शेंकडों प्रदेशांनीं व्याप्त, फारच व्यवस्थित रीतीनें राहिलेल्या लोकांची अत्यंत दाट वसती असलेला, देवस्थनें, पाणपोया आणि तळीं यांनीं सुशोभित, आनंदित स्त्रीपुरूषांनीं युक्त, अनेक समाजांमधून चालत असलेल्या उत्सवांनीं सुशोभित, सीमेपर्यंत नांगरलेल्या शेतांनीं व पशूंनीं युक्त, हिंसारहित नद्यांच्या उदकावर पिकें उत्पन्न करणारा, रम्य, श्वापदांनीं रहित, सर्व प्रकारच्या भीतींनीं रहित, सुवर्णादिकांच्या खाणींनीं संपन्न, पापी लोकांनीं धाकामुळें वर्ज्य केलेला आणि माझ्या पूर्वजांनीं सुरक्षित ठेविलेला असा आपला देश समृद्ध असून, हे रघुवंशजा भरता ! सुखानें नांदत आहे ना ? (४१–४६)

"कृषिकर्म, पशुपालन इत्यादिकांवर उपजीविका करणारे वैश्य लोक तुला प्रिय

तेषां गुप्तिपरीहारैः कच्चित्ते भरणं कृतम् ।
रक्ष्या हि राज्ञा धर्मेण सर्वे विषयवासिनः　　४८
कच्चित्स्त्रियः सान्त्वयसे कच्चित्तास्ते सुरक्षिताः ।
कच्चिन्न श्रद्दधास्यासां कच्चिद्गुह्यं न भाषसे　　४९
कच्चिन्नागवनं गुप्तं कच्चित्ते सन्ति धेनुकाः ।
कच्चिन्न गणिकाश्वानां कुञ्जराणां च तृप्यसि　　५०
कच्चिद्दर्शयसे नित्यं मानुषाणां विभूषितम् ।
उत्थायोत्थाय पूर्वाह्णे राजपुत्र महापथे　　५१
कच्चिन्न सर्वे कर्मान्ताः प्रत्यक्षास्तेऽविशङ्कया ।
सर्वे वा पुनरुत्सृष्टा मध्यमे वात्र कारणम्　　५२
कच्चिद् दुर्गाणि सर्वाणि धनधान्यायुधोदकैः ।
यन्त्रैश्च प्रतिपूर्णानि तथा शिल्पिधनुर्धरैः　　५३

---

आहेत ना? भरता! हल्लीं या लोकांना आपल्या धंद्यामध्यें सुख होत आहे ना? इष्ट गोष्टीची प्राप्ति आणि अनिष्ट गोष्टींचा परिहार यांच्यायोगानें तूं त्या लोकांचें पोषण करीत आहेस ना? अरे! राजानें देशांत राहणाऱ्या सर्व लोकांचें धर्मानें परिपालन केलें पाहिजे. स्त्रियांचें तूं प्रेमानें परिपालन करीत असतोस ना? त्यांना तूं सुरक्षित ठेविलें आहेस ना? त्यांच्यावर सर्वप्रकारें विश्वास ठेवीत नाहींस ना? आणि गुप्त गोष्टी त्यांना सांगत नाहींस ना? हत्तीच्या वनाचा बंदोबस्त तूं नीट ठेविला आहेस ना? हत्ती धरण्यासाठीं शिकवून तयार केलेल्या हत्तिणी तुझ्यापाशीं आहेत ना? हत्तिणी, हत्ती व घोडे यांचा होईल तितका संग्रह करण्याविषयीं तूं नेहमीं तत्पर असतोस ना? (४७-५०)

"राजपुत्रा! दररोज दिवसाच्या पहिल्या प्रहरांत वस्त्रालंकार धारण करून सभेमध्यें आणि राजमार्गावर प्रजाजनांच्या दृष्टीस पडत असतोस ना? तुझे सर्व सेवक लोक, तुझा मुळींच धाक न बाळगतां, एकसारखे तुझ्यासमोरून तर वावरत नाहींत ना? किंवा त्यांनीं सर्वदा तुझी दृष्टीदेखील टाळींत रहावें, इतक्या धाकांत तर तूं त्यांस ठेवीत नाहींस ना? या सेवक लोकांना अगदीं योग्य मर्यादेंत बेताबातानें वागविणें हेंच कार्य सिद्धीच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे.

आयस्ते विपुलः कच्चित्कच्चिदल्पतरो व्ययः ।
अपात्रेषु न ते कच्चित्कोशो गच्छति राघव ५४
देवतार्थे च पित्रर्थे ब्राह्मणाभ्यागतेषु च ।
योधेषु मित्रवर्गेषु कच्चिद्गच्छति ते व्ययः ५५
कच्चिदार्योऽपि शुद्धात्मा क्षारितश्चापकर्मणा ।
अदृष्टः शास्त्रकुशलैर्न लोभाद्बध्यते शुचिः ५६
गृहीतश्चैव पृष्टश्च काले दृष्टः सकारणः ।
कच्चिन्न मुच्यते चोरो धनलोभान्नरर्षभ ५७
व्यसने कच्चिदाढ्यस्य दुर्बलस्य च राघव ।
अर्थं विरागाः पश्यन्ति तवामात्या बहुश्रुताः ५८
यानि मिथ्याभिशस्तानां पतन्त्यश्रूणि राघव ।
तानि पुत्रपशून्घ्नन्ति प्रीत्यर्थमनुशासतः ५९

---

तुझे सर्व किल्ले, धनधान्य, आयुधें, उदक, यंत्रें, कारागीर आणि धनुर्धर यांनीं संपन्न आहेत ना ? हे रघुवंशजश्रेष्ठ भरता ! तुझें उत्पन्न मोठें असून खर्च कमी आहे ना ? आणि अयोग्य ठिकाणीं तुझा पैसा खर्च होत नाहीं ना ? देवता, पितर, ब्राह्मण, अतिथि, योद्धे आणि मित्रवर्ग यांकडेच तुझा खर्च होत असतो ना ? (५१-५५)

" शुद्ध मनाच्या एखाद्या सभ्य गृहस्थावर दुष्कृत्याचा आरोप आला असतां शास्त्रनिपुण लोकांकडून त्याचा निर्णय न होतां तो निरपराधी असूनदेखील लोभामुळें त्याला दंड तर होत नाहीं ना ? हे पुरुषश्रेष्ठा भरता ! एखादा चोर चोरी करीत असतांना पाहिला व मुद्देमालासह पकडला गेला असतां आणि त्याच्या जबानीवरूनही त्यानें चोरी केल्याचें जर सिद्ध झालें, तर धनलोभामुळें त्याच्यापासून कांहीं लांच घेऊन त्याला सोडून दिलें जात नाहीं ना ? हे रघुवंशज भरता ! श्रीमंत व गरीब या दोघांमध्यें परस्पर कांहीं वाद उपस्थित झाला असतां, तुझे विद्वान् अमात्य निर्लोभी राहून निःपक्षपातीपणानें त्या वादाचा निकाल लावीत असतात ना ? हे राघवा ! खोटा दोषारोप केलेल्या प्रजांच्या नेत्रांतून जे अश्रु पडतात, ते राज्याचा उपभोग घेऊन मिळणाऱ्या

कच्चिद्वृद्धांश्च बालांश्च वैद्यान्मुख्यांश्च राघव ।
दानेन मनसा वाचा त्रिभिरेतैर्बुभूषसे ६०
कच्चिद्गुरूंश्च वृद्धांश्च तापसान्देवतातिथीन् ।
चैत्यांश्च सर्वान्सिद्धार्थान्ब्राह्मणांश्च नमस्यसि ६१
कच्चिदर्थेन वा धर्ममर्थं धर्मेण वा पुनः ।
उभौ वा प्रीतिलोभेन कामेन न विबाधसे ६२
कच्चिदर्थं च कामं च धर्मं च जयतां वर ।
विभज्य काले कालज्ञ सर्वान्वरद सेवसे ६३
कच्चित्ते ब्राह्मणः शर्म सर्वशास्त्रार्थकोविदः ।
आशंसते महाप्राज्ञ पौरजानपदैः सह ६४
नास्तिक्यमनृतं क्रोधं प्रमादं दीर्घसूत्रताम् ।
अदर्शनं ज्ञानवतामालस्यं पञ्चवृत्तिताम् ६५
एकचिन्तनमर्थानामनर्थज्ञैश्च मन्त्रणम् ।

---

सुखाकडेच दृष्टि देऊन राज्य करणाऱ्या राजाच्या पुत्रांचा व पशूंचा नाश करतात. हे रघुवंशजा ! वृद्ध, बालक व मुख्यमुख्य असे विद्वान् लोक यांना इष्ट वस्तूचें दान, प्रेमळ अन्तःकरण आणि मधुर वाणी या तीन साधनांनीं आपलेसे करून घेत असतोस ना ? (५६-६०)

"गुरु, वृद्ध, तपस्वी, देवता, अतिथि, देवतांचें निवासस्थान असलेले चवाऱ्यावरील मोठेमोठे वृक्ष आणि जन्म सार्थकीं लाविलेले ब्राह्मण या सर्वांना तूं वंदन करीत असतोस ना ? अर्थानें धर्माला, धर्मानें अर्थाला किंवा त्या उभयतांनाही विषयलोभरूपी कामानें कधीं बाध आणीत नाहींस ना ? हें इष्टवस्तु देणाऱ्या, विजयी श्रेष्ठ समयज्ञ भरता ! धर्म, अर्थ, आणि काम या सर्वांचें तूं वेळा नेमून, योग्य कालीं सेवन करीत असतोस ना ? हे महाज्ञानवान् भरता ! सर्व शास्त्रांमध्यें निष्णात असलेले ब्राह्मण राजधानींतील व देशांतील इतर लोकांसह तुझ्या सुखाची इच्छा करीत असतात ना ? नास्तिकपणा, असत्य भाषण, क्रोध, हयगय, चेंगटपणा, ज्ञानी लोकांची भेट न घेणें, आळस, इंद्रिय धीनत्व, एकट्यानेंच राज्यकारणाचा विचार करणें, विपरीत समजूत असलेल्या लोकांच्या

निश्चितानामनारम्भं मन्त्रस्यापरिरक्षणम् ६६
मङ्गलाद्यप्रयोगं च प्रत्युत्थानं च सर्वतः ।
कच्चित्त्वं वर्जयस्येतान्राजदोषांश्चतुर्दश ६७
दशपञ्चचतुर्वर्गान्सप्तवर्गं च तत्त्वतः ।
अष्टवर्गं त्रिवर्गं च विद्यास्तिस्रश्च राघव ६८
इन्द्रियाणां जयं बुद्ध्या षाड्गुण्यं दैवमानुषम् ।
कृत्यं विंशतिवर्गं च तथा प्रकृतिमण्डलम् ६९

सहाय्यानें मसलत करणें, कर्तव्य म्हणून ठरलेल्या गोष्टी करण्यास आरंभ न करणें, गुप्त मसलतीचें रक्षण न करणें, उठल्याबरोबर प्रातःकालीं प्रथम मंगलावह कृत्याचें अनुष्ठान न करणें आणि चोहोंकडील शत्रूंच्या विरुद्ध, विचार न करितां, उतावळेपणा करून युद्धांची घोषणा करणें या चौदा राजदोषांपासून तूं अलिप्त रहात असतोस ना ? (६१-६७)

"हे राघवा ! मृगया, द्यूत, दिवसा निद्रा, निंदा, स्त्रीसेवा, मद, नृत्य, गीत, वाद्य आणि निष्कारण पर्यटन या दहा; उदकावरील, पर्वतावरील, वृक्षावरील, उखर प्रदेशावरील आणि माळ जमिनीवरील असे पांच प्रकारचे किल्ले या पांच; साम, दान, भेद आणि दंड या चार; स्वामी, अमात्य, राष्ट्र, किल्ले, खजिना, सैन्य आणि मित्र या सात; दुष्टपणा, साहस, द्रोह, ईर्षा, मत्सर, अर्थदूषण, कठोर वाणी आणि कडक शिक्षा या आठ व उत्साहशक्ति, प्रभुशक्ति आणि मंत्रशक्ति या तीन गोष्टींचें संपूर्ण ज्ञान करून घेऊन आणि तीन वेद, व्यापार व नीतिशास्त्र या तीन विद्या तूं तत्त्वतः समजून घेऊनच अनुमोदन देत असतोस ना ? विचारपूर्वक इंद्रियदमनाचा उपाय म्हणजे योगाभ्यास, हेर, अमात्य इत्यादिकांना यथायोग्य काम सांगणें, शत्रूंचा नाश वगैरे करण्याविषयीं उत्साह दाखविणें, तर्क करण्यांत प्राविण्य असणें, झालेल्या गोष्टीची विस्मृति न पडणें, पुढें घडणारी गोष्ट अनुमानानें जाणणें आणि नीतिशास्त्रांत निपुण असणें हे सहा गुण; अग्नि, जल, व्याधि, दुर्भिक्ष, मारक रोग हीं दैविक संकटें, अधिकारी, चोर, शत्रु, राजाच्या मर्जीतील लोक आणि राजाचा लोभ हीं लौकिक संकटें; पगार न मिळालेला लोभी मनुष्य, अपमान झालेला मानी पुरुष, एकाएकीं रागास आणलेला रागीट गृहस्थ

यात्रादण्डविधानं च द्वियोनी संधिविग्रहौ ।
कच्चिदेतान्महाप्राज्ञ यथावदनुमन्यसे ७०
मन्त्रिभिस्त्वं यथोद्दिष्टं चतुर्भिस्त्रिभिरेव वा ।
कच्चित्समस्तैर्व्यस्तैश्च मन्त्रं मन्त्रयसे बुध ७१
कच्चित्ते सफला वेदाः कच्चित्ते सफलाः क्रियाः ।
कच्चित्ते सफला दाराः कच्चित्ते सफलं श्रुतम् ७२
कच्चिदेषैव ते बुद्धिर्यथोक्ता मम राघव ।
आयुष्या च यशस्या च धर्मकामार्थसंहिता ७३

---

आणि भिवविलेला भित्रा इसम असे चार प्रकारचे शत्रुपक्षाकडील लोक फितूर करणें हें राजकृत्य; बाल, वृद्ध, दीर्घरोगी, जातीबाहेर टाकलेला भित्रा, दुसऱ्यांना भय दाखविणारा लोभी, लोकांना फसविणारा, विरक्त, अत्यंत विषयासक्त, अनेक गोष्टीकडे लक्ष लावून मसलत करणारा, देवब्राह्मणांची निंदा करणारा, दुर्दैवी, दैववादी, दुष्काळांत सांपडलेला, महाव्यसनी, स्वदेशांत न राहणारा, अनेक शत्रु असलेला, कालानें ग्रासलेला आणि सत्यधर्माविषयीं तत्पर असलेला असे वीस प्रकारचे लोक, मंत्रिमंडल, स्वारी, सैन्यरचना आणि द्विधाभाव व समाश्रय आणि यान व आसन या दोहोंदोहोंना कारण असलेले संधि आणि विग्रह यांचा प्रयोग करण्यास हे महाबुद्धिमान् भरता! तूं योग्य रीतीनें अनुमोदन देत असतोस ना? (६८-७०)

"हे ज्ञानी भरता! नीतिशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें चार मंत्र्यांबरोबर, तीन मंत्र्यांबरोबर, सर्व मंत्र्यांबरोबर अथवा एकएकाबरोबर तूं मसलत करीत असतोस ना? कारण, दुसऱ्याच्या देखत एखादा आपल्या मनांतील उद्देश सांगत नाहीं. याकरितां, एकच मसलत एकेकट्याचा, अनेकांचा आणि सर्वांचा विचार घेऊन करावी लागते. योग्य कर्माचरणानें वेद सफल होऊन तुझीं सर्व कर्में सफल झालीं आहेत ना? धर्माला अनुसरून विषयोपभोग व संतान यांच्या योगानें तुझ्या स्त्रीच्या जन्माचें साफल्य झालें आहे ना? आणि विनयानें तुझी विद्या फलद्रूप झाली आहे ना? हे रघुवंशज भरता! आयुर्वर्धक, यशस्कारक, आणि धर्म, अर्थ व काम यांना अनुसरून असलेली ही जी तुला दिसणारी माझी

यां वृत्तिं वर्तते तातो यां च नः प्रपितामहः ।
तां वृत्तिं वर्तसे कच्चिद्या च सत्पथगा शुभा ७४
कच्चित्स्वादुकृतं भोज्यमेको नाश्नासि राघव ।
कच्चिदाशंसमानेभ्यो मित्रेभ्यः संप्रयच्छसि ७५
राजा तु धर्मेण हि पालयित्वा महीपतिर्दण्डधरः प्रजानाम् ।
अवाप्य कृत्स्नां वसुधां यथावदितश्च्युतः स्वर्गमुपैति विद्वान् ७६
इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकोत्तरशततमः सर्गः ॥१०१॥

द्व्युत्तरशततमः सर्गः । [३७७९]

तं तु रामः समाज्ञाय भ्रातरं गुरुवत्सलम् ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा प्रष्टुं समुपचक्रमे १
किमेतदिच्छेयमहं श्रोतुं प्रव्याहृतं त्वया ।
यस्मात्त्वमागतो देशमिमं चीरजटाजिनी २
यन्निमित्तमिमं देशं कृष्णाजिनजटाधरः ।

---

बुद्धि आहे, तशीच तुझी आहे ना ? पित्याचें जसें वर्तन आहे, आपल्या पूर्वजांचें जसें वर्तन होतें आणि सन्मार्गाला अनुसरून जें शुभ वर्तन असावें लागतें, तसेंच तुझें वर्तन आहे ना? हे रघुवंशज भरता ! तयार केलेलें मिष्टान्न एकटाच न खातां त्याची इच्छा करणाऱ्या आपल्या इष्टमित्रांसह तूं त्याचा उपभोग घेतोस ना ? सारांश दंड धारण करून प्रजाजनांना मर्यादित ठेवणारा ज्ञानी क्षत्रिय राजा संपूर्ण पृथ्वी आपलीशी करून घेऊन व धर्मानें तिचें परिपालन करून या लोकाचा त्याग केल्यानंतर स्वर्गाला जातो." (७१-७६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंएकावा सर्ग संपला ॥ १०१ ॥

"तो आपला भाऊ भरत याच्या ठिकाणीं वडिलांविषयींचें व स्वतः आपल्याविषयींचें प्रेम वसत आहे असें जाणून राम आपला भाऊ लक्ष्मण यासह त्याला विचारूं लागला. "हें काय ? तूं या प्रदेशाला वल्कलें, जटा आणि अजिन धारण करून आला आहेस याचा अर्थ काय, हें तुझ्या तोंडांतून माझी ऐकण्याची इच्छा आहे. तूं राज्याचा त्याग करून व कृष्णाजिन आणि जटा धारण करून

हित्वा राज्यं प्रविष्टस्त्वं तत्सर्वं वक्तुमर्हसि ३
इत्युक्तः केकयीपुत्रः काकुत्स्थेन महात्मना ।
प्रगृह्य बलवद्भूयः प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ४
आर्यं तातः परित्यज्य कृत्वा कर्म सुदुष्करम् ।
गतः स्वर्गं महाबाहुः पुत्रशोकाभिपीडितः ५
स्त्रिया नियुक्तः कैकेय्या मम मात्रा परंतप ।
चकार सा महत्पापमिदमात्मयशोहरम् ६
सा राज्यफलमप्राप्य विधवा शोककर्शिता ।
पतिष्यति महाघोरे नरके जननी मम ७
तस्य मे दासभूतस्य प्रसादं कर्तुमर्हसि ।
अभिषिञ्चस्व चाद्यैव राज्येन मघवानिव ८
इमाः प्रकृतयः सर्वा विधवा मातरश्च याः ।
त्वत्सकाशमनुप्राप्ताः प्रसादं कर्तुमर्हसि ९
तथानुपूर्व्या युक्तश्च युक्तं चात्मनि मानद ।
राज्यं प्राप्नुहि धर्मेण सकामान्सुहृदः कुरु १०

---

कशाकरितां इकडे आला आहेस, तें सर्व सांग." याप्रमाणें महात्म्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें कैकेयीपुत्र भरताला विचारलें असतां मोठ्या आयासानें दुःख आंवरून धरून व हात जोडून तो त्याला म्हणाला, "आर्या ! माझी माता कैकेयी हिनें प्रेरणा केल्यामुळें अत्यंत कठीण असें कार्य करून पुत्रशोकाकुल झालेला तो महापराक्रमी राजा स्वर्गाला गेला आणि त्या माझ्या मातेनें आपल्या कीर्तीला बट्टा लावणारें हें मोठें पाप केलें. (१-६)

"आतां, शोकानें कृश झालेल्या माझ्या त्या विधवा मातेला मला राज्यप्राप्ति न झालेली दिसेलच व उलट ती महाभयंकर नरकामध्यें जाऊन पडेल. तेव्हां तुझा दास असलेल्या मजवर तूं कृपा कर आणि आजच्याआजच इंद्राप्रमाणें स्वतःला राज्याभिषेक करून घे. हे सर्व प्रजाजन आणि या विधवा माता तुझ्याजवळ आलेल्या आहेत. यासाठीं तूं कृपा कर आणि परंपरागत चालत आलेल्या पद्धतीनें ज्याअर्थीं तूंच राजा होण्यास योग्य आहेस आणि ज्याअर्थीं तुलाच राज्याभिषेक होणें इष्ट आहे, त्या अर्थीं तूं धर्मानें राज्याचा स्वीकार करून आप्ते-

भवत्वविधवा भूमिः समग्रा पतिना त्वया ।
शशिना विमलेनेव शारदी रजनी यथा ११
एभिश्च सचिवैः सार्धं शिरसा याचितो मया ।
भ्रातुः शिष्यस्य दासस्य प्रसादं कर्तुमर्हसि १२
तदिदं शाश्वतं पित्र्यं सर्वं सचिवमण्डलम् ।
पूजितं पुरुषव्याघ्र नातिक्रमितुमर्हसि १३
एवमुक्त्वा महाबाहुः सबाष्पः कैकयीसुतः ।
रामस्य शिरसा पादौ जग्राह भरतः पुनः १४
तं मत्तमिव मातङ्गं निःश्वसन्तं पुनः पुनः ।
भ्रातरं भरतं रामः परिष्वज्येदमब्रवीत् १५
कुलीनः सत्वसंपन्नस्तेजस्वी चरितव्रतः ।
राज्यहेतोः कथं पापमाचरेन्मद्विधो जनः १६
न दोषं त्वयि पश्यामि सूक्ष्ममप्यरिसूदन ।
न चापि जननीं बाल्यात्त्वं विगर्हितुमर्हसि १७
कामकारो महाप्राज्ञ गुरूणां सर्वदानघ ।

---

ह्यांचा मनोरथ परिपूर्ण कर. शरदृतूंतील रात्र ज्याप्रमाणें निर्मल चंद्राच्या योगानें सनाथ होते, त्याप्रमाणें ही संपूर्ण पृथ्वी तुझ्यासारखा पति मिळवून सनाथ होवो. या सचिवांसह तुझ्या पायांवर मस्तक ठेवून मी तुझी प्रार्थना करीत आहें. यासाठी या तुझ्या भावावर, शिष्यावर आणि दासावर कृपा कर. हे पुरुषश्रेष्ठा ! परंपरागत चालत आलेल्या आणि पूर्वजांनीं मान दिलेल्या या मंत्रिमंडळाचें न ऐकणें तुला योग्य नाहीं. " (७–१३)

याप्रमाणें प्रार्थना करून डोळ्यांमध्यें अश्रु आणलेल्या त्या महापराक्रमी कैकेयी-पुत्र भरतानें पुनः रामाच्या चरणांवर मस्तक ठेविलें. तेव्हां मत्त हत्तीप्रमाणें वारंवार सुस्कारे टाकीत असलेल्या त्या आपल्या भावाला भरताला–आलिंगन देऊन राम म्हणाला, " कुलीन, सत्वस्थ, तेजस्वी आणि व्रत ग्रहण करणारा माझ्यासारखा पुरुष राज्याकरितां पाप कसें करील ? हे शत्रुनाशक भरता ! झालेल्या गोष्टीबद्दल तुझ्या ठिकाणीं मला कांहीं यत्किंचितहि दोष दिसत नाहीं,

उपपन्नेषु दारेषु पुत्रेषु च विधीयते १८
वयमस्य यथा लोके संख्याताः सौम्य साधुभिः।
भार्याः पुत्राश्च शिष्याश्च त्वमपि ज्ञातुमर्हसि १९
वने वा चीरवसनं सौम्य कृष्णाजिनाम्बरम्।
राज्ये वाऽपि महाराजो मां वासयितुमीश्वरः २०
यावत्पितरि धर्मज्ञ गौरवं लोकसत्कृते।
तावद्धर्मकृतां श्रेष्ठ जनन्यामपि गौरवम् २१
एताभ्यां धर्मशीलाभ्यां वनं गच्छेति राघव।
मातापितृभ्यामुक्तोऽहं कथमन्यत्समाचरे २२
त्वया राज्यमयोध्यायां प्राप्तव्यं लोकसत्कृतम्।
वस्तव्यं दण्डकारण्ये मया वल्कलवाससा २३
एवमुक्त्वा महाराजो विभागं लोकसंनिधौ।

---

आणि वेडेपणामुळें आपल्या मातेची निंदा करणें तुला योग्यहि नाहीं. हे निरपराधी व महाज्ञानी भरता! आज्ञा धारण करण्यास योग्य असलेल्या स्त्रियांना आणि पुत्रांना इच्छेस येईल त्याप्रमाणें आज्ञा करण्याचा वडिलांना नेहमींच अधिकार आहे. पित्यानें अथवा गुरूनें इच्छेस येईल ती आज्ञा करण्यास योग्य अशीं माणसें म्हणजे भार्या, पुत्र आणि शिष्य हीं होत; असें सज्जनांनीं या जगतामध्यें घोषित केलेलें आहे व त्याचप्रमाणें, हे सौम्या! आपणां सर्वांचें या स्वर्गस्थ झालेल्या दशरथराजाशीं नातें आहे, हें तूंही समजून ठेव. सारांश, हे सौम्या! वल्कलें आणि कृष्णाजिनें परिधान करवून मला अरण्यांत पाठविण्याला अथवा राजावर बसविण्याला महाराज दशरथ मुखत्यार आहे. (१४-२०)

"हे धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ व धर्मज्ञ भरता! जगांत मान्यता मिळविलेल्या पित्याप्रमाणें मातेचीही मानमान्यता ठेविली पाहिजे. तेव्हां या उभयतां धर्मशील मातापितरांनीं "वनांत जा" म्हणून मला आज्ञा केली असतां, हे रघुवंशज भरता! मी दुसरी-तिसरी गोष्ट कशी बरें करीन? अयोध्येमध्यें जनसंमत असलेलें राज्य तुला प्राप्त करून घेतलें पाहिजे आणि वल्कलें परिधान करून मला दंडकारण्यामध्येंच वास्तव्य केलें पाहिजे, अशी विभागणी सर्व लोकांसमक्ष

व्यादिश्य च महाराजो दिवं दशरथो गतः २४
स च प्रमाणं धर्मात्मा राजा लोकगुरुस्तव ।
पित्रा दत्तं यथाभागमुपभोक्तुं त्वमर्हसि २५
यदब्रवीन्मां नरलोकसत्कृतः पिता महात्मा विबुधाधिपोपमः ।
तदेव मन्ये परमात्मनो हितं न सर्वलोकेश्वरभावमव्ययम् २६
इत्यार्षे श्री०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्व्युत्तरशततमः सर्गः ॥१०२॥ [३८०५]

त्र्युत्तरशततमः सर्गः ।

रामस्य वचनं श्रुत्वा भरतः प्रत्युवाच ह ।
किं मे धर्माद्विहीनस्य राजधर्मः करिष्यति १
शाश्वतोऽयं सदा धर्मः स्थितोऽस्मासु नरर्षभ ।
ज्येष्ठे पुत्रे स्थिते राजा न कनीयान्भवेन्नृपः २
स समृद्धां मया सार्धमयोध्यां गच्छ राघव ।
अभिषेचय चात्मानं कुलस्यास्य भवाय नः ३
राजानं मानुषं प्राहुर्देवत्वे संमतो मम ।

---

सांगून आणि याप्रमाणें वागा अशी आज्ञा करून महाराज दशरथ स्वर्गाला गेला आहे. आणि तोच सर्व जगताचा स्वामी धर्मनिष्ठ राजा तुलाहि प्रमाण आहे. यासाठीं पित्यानें तुझ्या वांट्यास दिलेल्या राज्याचा तूं उपभोग घे. सर्व मनुष्यलोकांना सन्मान्य अशा महात्म्या व इंद्रासारख्या पित्यानें जें मला सांगितलें आहे, त्यातच माझें सर्वोत्कृष्ट हित आहे असें मला वाटतें. त्याच्या उलट अक्षय स्वर्गलोकाचें आधिपत्यदेखील मला हितकारक वाटत नाहीं." (२१-२६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंदोनावा सर्ग संपला ॥ १०२ ॥

हें रामाचें भाषण ऐकून भरत म्हणाला, " तूं विचारलेल्या राजधर्माचा मला खूप उपदेश केलास, पण धर्महीन अशा मला मी राज्याधिकारी नसल्यामुळें उपयोग काय होणार आहे ? हे पुरुषश्रेष्ठा ! ज्येष्ठ पुत्र हयात असतांना कनिष्ठ राजपुत्र राजा होऊं शकत नाहीं, हा धर्म आपणांमध्यें नेहमीं परंपरागत चालत आलेला आहे. तर हे राघवा ! माझ्यासह तूं समृद्ध अयोध्येमध्यें चल आणि या आपल्या कुलाच्या

यस्य धर्मार्थसहितं वृत्तमाहुरमानुषम् ४
केकयस्थे च मयि तु त्वयि चारण्यमाश्रिते ।
धीमान्स्वर्गं गतो राजा यायजूकः सतां मतः ५
निष्क्रान्तमात्रे भवति सहसीते सलक्ष्मणे ।
दुःखशोकाभिभूतस्तु राजा त्रिदिवमभ्यगात् ६
उत्तिष्ठ पुरुषव्याघ्र क्रियतामुदकं पितुः ।
अहं चायं च शत्रुघ्नः पूर्वमेव कृतोदकौ ७
प्रियेण किल दत्तं हि पितृलोकेषु राघव ।
अक्षयं भवतीत्याहुर्भवांश्चैव पितुः प्रियः ८
त्वामेव शोचंस्तव दर्शनेऽप्सुस्त्वय्येव सक्तामनिवर्त्य बुद्धिम् ।
त्वया विहीनस्तव शोकरुग्णस्त्वां संस्मरन्नेव गतः पिता ते ९

इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्र्युत्तरशततमः सर्गः॥१०३॥ [३८१४]

---

अभ्युदयासाठीं स्वतःला राज्याभिषेक करून घे. सर्व लोक जरी राजाला मनुष्य म्हणत असतात, तरी धर्म आणि अर्थ यांना अनुसरून असलेलें आणि मनुष्याचें ठिकाणीं न संभवणारें असें ज्याचें वर्तन असल्याबद्दल लोक सांगतात, त्या राजाला मी देवच समजत आहें. मी केकय देशांमध्यें असतांनाच आणि तूं वनाचा मार्ग धरल्यानंतर सज्जनांना मान्य आणि यज्ञशील असा ज्ञानी दशरथराजा स्वर्गाला गेला. (१–५)

"सीता आणि लक्ष्मण यांसह आपण नगरांतून बाहेर पडल्याबरोबर दुःख आणि शोक यांनीं ग्रस्त झालेला राजा स्वर्गाला गेला. हे पुरुषश्रेष्ठा! ऊठ, पित्याची उदकक्रिया कर; मी आणि या शत्रुघ्नानें पूर्वींच क्रिया केलेली आहे. हे राघवा! प्रिय पुत्रानें दिलेली कोणतीहि वस्तु पितृलोकामध्यें त्या प्राण्याला अक्षय पोंचत असते, असें म्हणतात आणि तूंच तर पित्याला सर्वांत अधिक प्रिय होतास. तुझ्याकडेच लागलेलें मन परत न फिरवितां तुझा वियोग झाल्यामुळें शोकानें जर्जर झालेला तुझा पिता तुझ्याचकरितां शोक करीत करीत आणि तुझेंच नांव घोकीत स्वर्गाला गेला." (६–९)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंतीनावा सर्ग संपला ॥१०३॥

चतुरुत्तरशततमः सर्गः ।

तां श्रुत्वा करुणां वाचं पितुर्मरणसंहिताम् ।
राघवो भरतेनोक्तां बभूव गतचेतनः १
तं तु वज्रमिवोत्सृष्टमाहवे दानवारिणा ।
वाग्वज्रं भरतेनोक्तममनोज्ञं परंतपः २
प्रगृह्य रामो बाहू वै पुष्पिताङ्ग इव द्रुमः ।
वने परशुना कृत्तस्तथा भुवि पपात ह ३
तथा हि पतितं रामं जगत्यां जगतीपतिम् ।
कूलघातपरिश्रान्तं प्रसुप्तमिव कुञ्जरम् ४
भ्रातरस्ते महेष्वासं सर्वतः शोककर्शितम् ।
रुदन्तः सह वैदेह्या सिषिचुः सलिलेन वै ५
स तु संज्ञां पुनर्लब्ध्वा नेत्राभ्यामश्रुमुत्सृजन् ।
उपाक्रामत काकुत्स्थः कृपणं बहु भाषितुम् ६
स रामः स्वर्गतं श्रुत्वा पितरं पृथिवीपतिम् ।
उवाच भरतं वाक्यं धर्मात्मा धर्मसंहितम् ७
किं करिष्याम्ययोध्यायां ताते दिष्टां गतिं गते ।

---

पित्याच्या मरणासंबधानें भरतानें केलेलें तें दुःखदायक भाषण ऐकल्यावर रामाचें भान उडालें. संग्रामामध्यें इंद्रानें सोडलेल्या वज्राप्रमाणें प्रखर असें भरतानें तोंडांतून काढलेलें तें मनाला अत्यंत अप्रिय लागणारें वाक्य कानांवर आदळतां क्षणींच शत्रुतापन रामानें हात वर केले आणि कुऱ्हाडीनें तोडलेल्या वनांतील प्रफुल्लित वृक्षाप्रमाणें तो जमिनीवर कोसळला. तेव्हां नदीचें तीर पाडून टाकल्यामुळें थकून जाऊन झोंपीं गेलेल्या हत्तीप्रमाणें तो महाधनुर्धारी पृथ्वीपति राम शोकानें जर्जर होऊन जमिनीवर पडला असतां सीतेसह रडूं लागलेले ते तिघेही भाऊ त्याच्यावर पाणी शिंपडूं लागले. शुद्धीवर आल्यावर आल्यावर नेत्रांतून अश्रु ढाळीत ढाळीत त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें दीन स्वरानें पुष्कळच विलाप करण्याला आरंभ केला. (१-६)

आपला पृथ्वीपति पिता स्वर्गस्थ झाल्याचें ऐकून तो धर्मात्मा राम भरताशीं

कस्तां राजवराद्धीनामयोध्यां पालयिष्यति ८
किं नु तस्य मया कार्यं दुर्जातेन महात्मनः ।
यो मृतो मम शोकेन स मया न च संस्कृतः ९
अहो भरत सिद्धार्थौ येन राजा त्वयानघ ।
शत्रुघ्नेन च सर्वेषु प्रेतकृत्येषु सत्कृतः १०
निष्प्रधानामनेकाग्रां नरेन्द्रेण विना कृताम् ।
निवृत्तवनवासोऽपि नायोध्यां गन्तुमुत्सहे ११
समाप्तवनवासं मामयोध्यायां परंतप ।
कोऽनुशासिष्यति पुनस्ताते लोकान्तरे गते १२
पुरा प्रेक्ष्य सुवृत्तं मां पिता यान्याह सान्त्वयन् ।
वाक्यानि तानि श्रोष्यामि कुतः कर्णसुखान्यहम् १३
एवमुक्त्वाथ भरतं भार्यामभ्येत्य राघवः ।
उवाच शोकसंतप्तः पूर्णचन्द्रनिभाननाम् १४

---

धर्माला अनुसरून भाषण करूं लागला– "दैवानें उपस्थित केलेली गति पित्याला प्राप्त झाली असतां मी अयोध्येंत येऊन काय करूं ? त्या नृपश्रेष्ठाचा वियोग झालेल्या त्या अयोध्येचें परिपालन कोण बरें करूं शकेल ? जो माझ्या शोकानें मरण पावला आणि ज्याचा संस्कार माझ्या हातून झाला नाहीं, अशा त्या महात्म्याला त्याच्या पोटीं व्यर्थ जन्मास आलेल्या माझा काय बरें उपयोग ? हे निष्पाप भरता ! तूं व शत्रुघ्न दोघे कृतकृत्य आहांत. कारण, तुझ्या हातून व शत्रुघ्नाच्या हातून त्याचीं सर्व उत्तरकार्यें यथासांग झालीं आहेत. आतां माझा वनवास जरी संपला तरी राजाचा वियोग झाल्यामुळें व मुख्य रक्षण करणारा नष्ट झाल्यामुळें प्रजाजन व्याकुल झालेल्या अयोध्येमध्यें परत जाण्याची माझी इच्छा नाहीं. हे शत्रुतापन भरता ! पिता परलोकीं गेला असतां वनवास संपवून मी अयोध्येमध्यें गेल्यावर माझ्या हिताहितासंबंधांत अधिकारवाणीनें मला उपदेश कोण बरें करील ? मी सद्वर्तनी आहें असें पाहून पूर्वी पिता सांत्वनपूर्वक जीं भाषणें माझ्याशीं करीत असे, तीं कर्णमधुर भाषणें मला आतां कोठून बरें ऐकावयाला सांपडतील !" (७-१३)

सीते मृतस्ते श्वशुरः पितृहीनोऽसि लक्ष्मण ।
भरतो दुःखमाचष्टे स्वर्गतिं पृथिवीपतेः १५
ततो बहुगुणं तेषां बाष्पं नेत्रेष्वजायत ।
तथा ब्रुवति काकुत्स्थे कुमाराणां यशस्विनाम् १६
ततस्ते भ्रातरः सर्वे भृशमाश्वास्य दुःखितम् ।
अब्रुवञ्जगतीभर्तुः क्रियतामुदकं पितुः १७
सा सीता स्वर्गतं श्रुत्वा श्वशुरं तं महानृपम् ।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां न शशाकेक्षितुं प्रियम् १८
सान्त्वयित्वा तु तां रामो रुदतीं जनकात्मजाम् ।
उवाच लक्ष्मणं तत्र दुःखितो दुःखितं वचः १९
आनयेङ्गुदिपिण्याकं चीरमाहर चोत्तरम् ।
जलक्रियार्थं तातस्य गमिष्यामि महात्मनः २०
सीता पुरस्ताद्व्रजतु त्वमेनामभितो व्रज ।
अहं पश्चाद्गमिष्यामि गतिर्ह्येषा सुदारुणा २१

---

याप्रमाणें भरताशीं बोलून आणि पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या आपल्या स्त्रीजवळ जाऊन शोकानें व्याकुल झालेला रघुवंशज राम तिला म्हणाला, "सीते ! तुझा सासरा मरण पावला. लक्ष्मणा ! तूं पोरका झालास. अरे ! पृथ्वीपति राजाच्या मृत्यूची दुःखमय बातमी भरत सांगत आहे." याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम विलाप करूं लागला असतां त्या यशस्वी राजकुमारांच्या नेत्रांतून दुःखाश्रूंचे पूर लोटले. नंतर ते सर्व तिघेही भाऊ दुःखाकुल झालेल्या रामाचें वारंवार सांत्वन करून "पित्याची उदकक्रिया कर." असें त्याला म्हणाले. सीता तर तो आपला महाराज श्वशुर स्वर्गस्थ झाल्याचें ऐकतांच दुःखाश्रूंनीं डोळे भरून आल्यामुळें आपल्या पतीकडे पाहण्यासही समर्थ झाली नाहीं. तेव्हां त्या रडत असलेल्या जनककन्येचें सांत्वन करून तो दुःखी झालेला राम मोठ्या कष्टानें लक्ष्मणाला म्हणाला, "वाटलेल्या इंगुदी फळांचा गोळा आणि एक उत्तम नवें वल्कल तूं घेऊन ये; मी महात्म्या पित्याची उदकक्रिया करण्याकरितां जातों. सीतेला पुढें होऊं दे; तूं तिच्या मागून चाल आणि मी तुमच्याही

ततो नित्यानुगस्तेषां विदितात्मा महामतिः ।
मृदुर्दान्तश्च कान्तश्च रामे च दृढभक्तिमान् २२
सुमन्त्रस्तैर्नृपसुतैः सार्धमाश्वास्य राघवम् ।
अवतारयदालम्ब्य नदीं मन्दाकिनीं शिवाम् २३
ते सुतीर्थां ततः कृच्छ्रादुपगम्य यशस्विनः ।
नदीं मन्दाकिनीं रम्यां सदा पुष्पितकाननाम् २४
शीघ्रस्रोतसमासाद्य तीर्थं शिवमकर्दमम् ।
सिषिचुस्तूदकं राज्ञे तत एतद्भवत्विति २५
प्रगृह्य तु महीपालो जलापूरितमञ्जलिम् ।
दिशं याम्यामभिमुखो रुदन्वचनमब्रवीत् २६
एतत्ते राजशार्दूल विमलं तोयमक्षयम् ।
पितृलोकगतस्याद्य मद्दत्तमुपतिष्ठतु २७
ततो मन्दाकिनीतीरं प्रत्युत्तीर्य स राघवः ।

मागून येईन. कारण, शोकाच्या वेळीं अशाच क्रमानें ('... वै कनिष्ठप्रथमा इतरे तु स्त्रियोऽग्रतः' या वचनाला अनुसरून ) गेलें पाहिजे." (१४-२१)

इक्ष्वाकूंच्या घराण्याचा वाडवडिलांपासून असलेला अत्यंत विश्वासू म्हणून प्रसिद्ध असा जुना सेवक, अत्यन्त नम्र (विनयशील), जितेंद्रिय, तेजस्वी व रामाचे ठिकाणीं अत्यन्त दृढ भक्ति असलेला जो सुमंत्र, त्यानें भरतादि राजकुमारांसह रामाचें सांत्वन करून, रामाच्या हातास धरून अगदीं संभाळून, मोठ्या काळजीपूर्वक त्यास मंदाकिनी नदीमध्यें उतरविलें. त्यानंतर जिला चांगला उतार आहे व जिच्या तीरांवर नेहमीं प्रफुल्लित वृक्षांचीं वनें आहेत, अशा त्या रमणीय मंदाकिनी नदीजवळ ते यशस्वी मोठ्या कष्टानें आले आणि चिखल वगैरे नसलेल्या शीघ्र प्रवाहानें युक्त व पवित्र अशा प्रवाहावर येऊन त्यांनीं "हें तुला समर्पण असो !" म्हणून राजाला उदक दिलें. (२२-२५)

राजा रामचंद्र पाण्याची ओंजळ भरून घेऊन आणि दक्षिणेकडे तोंड करून रडत रडत म्हणाला, 'हे नृपश्रेष्ठा ! हें मी दिलेलें निर्मल उदक पितृलोकीं गेलेल्या तुला अक्षय प्राप्त होवो." त्यानंतर मंदाकिनीच्या तीरावर येऊन त्या तेजस्वी

पितुश्चकार तेजस्वी निर्वापं भ्रातृभिः सह २८
ऐङ्गुदं बदरैर्मिश्रं पिण्याकं दर्भसंस्तरे ।
न्यस्य रामः सुदुःखार्तो रुदन्वचनमब्रवीत् २९
इदं भुङ्क्ष्व महाराज प्रीतो यदशना वयम् ।
यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ३०
ततस्तेनैव मार्गेण प्रत्युत्तीर्य सरित्तटात् ।
आरुरोह नरव्याघ्रो रम्यसानुं महीधरम् ३१
ततः पर्णकुटीद्वारमासाद्य जगतीपतिः ।
परिजग्राह पाणिभ्यामुभौ भरतलक्ष्मणौ ३२
तेषां तु रुदतां शब्दात्प्रतिशब्दोऽभवद्गिरौ ।
भ्रातृणां सह वैदेह्या सिंहानां नर्दतामिव ३३
महाबलानां रुदतां कुर्वतामुदकं पितुः
विज्ञाय तुमुलं शब्दं त्रस्ता भरतसैनिकाः ३४
अब्रुवंश्चापि रामेण भरतः संगतो ध्रुवम् ।
तेषामेव महाञ्शब्दः शोचतां पितरं मृतम् ३५

रामानें भावांसह पित्याला उद्देशून पात्रांतून पिंडदान केलें. बोरें मिसळलेला इंगुदी फळांचा गोळा दर्भांवर ठेवून अत्यंत दुःखाकुल झालेला राम रडत रडत म्हणाला, "महाराज! जें अन्न भक्षण करून आम्ही निर्वाह करितों, त्याचा तुम्ही स्वीकार करा. कारण जें अन्न पुरुष खात असेल तेंच अन्न त्यानें आपल्या देवतांना द्यावें असें शास्त्र आहे." (२६-३०)

त्यानंतर त्याच मार्गानें नदीतीरावरून वर आल्यावर पुरुषश्रेष्ठ राम रमणीय शिखरांनीं युक्त असलेल्या त्या चित्रकूट पर्वतावर चढला. पर्णकुटिकेच्या दरवाजा-पाशीं आल्यावर त्या पृथ्वीपति रामानें उभयतां भरत-लक्ष्मणांना दोहीं हातांनीं धरलें. तेव्हां गर्जना करणाऱ्या सिंहाप्रमाणें सीतेसह ते भाऊ रडून शोक करूं लागले असतां त्यांच्या ध्वनीचा प्रतिध्वनि पर्वतावर होऊं लागला. पित्याला उदक देऊन ते महाबलाढ्य भाऊ शोक करूं लागले असतां तो मोठा ध्वनि ऐकून भरताचे सैनिक घाबरून गेले आणि म्हणाले, "रामाशीं भरताची निःसंशय

अथ वाहान्परित्यज्य तं सर्वेऽभिमुखाः स्वनम् ।
अप्येकमनसो जग्मुर्यथास्थानं प्रधाविताः　　३६
हयैरन्ये गजैरन्ये रथैरन्ये स्वलंकृतैः ।
सुकुमारास्तथैवान्ये पद्भिरेव नरा ययुः　　३७
अचिरप्रोषितं रामं चिरविप्रोषितं यथा ।
द्रष्टुकामो जनः सर्वो जगाम सहसाश्रमम्　　३८
भ्रातॄणां त्वरितास्ते तु द्रष्टुकामाः समागमम् ।
ययुर्बहुविधैर्यानैः खुरनेमिसमाकुलैः　　३९
सा भूमिर्बहुभिर्यानै रथनेमिसमाहता ।
मुमोच तुमुलं शब्दं द्यौरिवाभ्रसमागमे　　४०
तेन वित्रासिता नागाः करेणुपरिवारिताः ।
आवासयन्तो गन्धेन जग्मुरन्यद्वनं ततः　　४१

भेट झाली असली पाहिजे. कारण, मृत पित्याबद्दल शोक करणाऱ्या त्यांचाच हा मोठा शब्द आहे." (३१-३५)

त्यानंतर वाहनें सोडून देऊन त्या सर्वही सैनिकांनीं जिकडून तो ध्वनि येत होता, तिकडे तोंडें केलीं आणि एकचित्तानें ते वाट सांपडेल तिकडे धांवत सुटले. कांहीं लोक घोड्यांवर चढले, कांहीं हत्तींवर बसून गेले, अत्यंत सुकुमार असलेले कांहीं लोक उत्तम रीतीनें विभूषित केलेल्या रथामध्यें बसून निघाले, आणि कांहीं लोक तर पायांनींच चालूं लागले. रामाला जाऊन जरी फार दिवस झाले नव्हते, तरी त्याला पुष्कळच काल लोटल्यासारखें वाटून सर्वही लोक त्याला पाहण्याकरितां एकदम आश्रमाकडे निघाले. खुर व धावा यांनीं युक्त असलेल्या, घोडे व रथ इत्यादि अनेक प्रकारच्या यानांवर आरूढ होऊन ते लोक भावाभावांची ती भेट पाहण्याकरितां घाईनेंच चालते झाले. (३६-३९)

तेव्हां मेघांचा एकमेकाशीं समागम झाला असतां ज्याप्रमाणें आकाशामध्यें भयंकर गडगडाट होऊं लागतो, त्याप्रमाणें अनेक यानांनीं व रथांच्या धावांनीं आघात केलेल्या पृथ्वींतून मोठा ध्वनि होऊं लागला असतां हत्तिणींनीं घेरलेले त्या वनांतील हत्ती त्या ध्वनींनीं घाबरले आणि आपल्या मदगंधानें दिशा सुवासिक

वराहमृगसिंहाश्च महिषाः सृमरास्तथा ।
व्याघ्रगोकर्णगवया वित्रेसुः पृषतैः सह ४२
रथाङ्गहंसानत्यूहाः प्लवाः कारण्डवाः परे ।
तथा पुंस्कोकिलाः क्रौञ्चा विसंज्ञा भेजिरे दिशः ४३
तेन शब्देन वित्रस्तैराकाशं पक्षिभिर्वृतम् ।
मनुष्यैरावृता भूमिरुभयं प्रबभौ तदा ४४
ततस्तं पुरुषव्याघ्रं यशस्विनमकल्मषम् ।
आसीनं स्थण्डिले रामं ददर्श सहसा जनः ४५
विगर्हमाणः कैकेयीं मन्थरासहितामपि ।
अभिगम्य जनो रामं बाष्पपूर्णमुखोऽभवत् ४६
तान्नरान्बाष्पपूर्णाक्षान्समीक्ष्याथ सुदुःखितान् ।
पर्यष्वजत धर्मज्ञः पितृवन्मातृवच्च सः ४७
स तत्र कांश्चित्परिषस्वजे नरान्नराश्च केचित्तु तमभ्यवादयन् ।
चकार सर्वान्सवयस्यबान्धवान्यथार्हमासाद्य तदा नृपात्मजः ४८
ततः स तेषां रुदतां महात्मनां भुवं च खं चानुविनादयन्स्वनः ।

---

करीत करीत ते तेथून दुसऱ्या वनामध्यें निघून गेले. वराह, मृग, सिंह, महिष, सृमर, वाघ, गोकर्ण, गवे आणि ठिपकेदार हरिण हेही भीतीनें सैरावैरा पळूं लागले. चक्रवाक, हंस, पाणकोंबडे, बगळे, कारंडव, कोकिल आणि क्रौंच हे पक्षी भान नाहींसें होऊन दशदिशा भटकूं लागले. त्या शब्दाच्या योगानें त्रस्त झालेल्या पक्ष्यांनीं व्याप्त झालेलें आकाश आणि मनुष्यांनीं व्याप्त झालेली भूमि हीं दोन्हीं व्यापून गेलीं. (४०-४४)

त्यानंतर यशस्वी व निष्पाप असा तो ओट्यावर बसलेला पुरुषश्रेष्ठ राम त्या लोकांच्या एकाएकीं दृष्टीस पडला असतां मंथरेसह कैकेयीची निंदा करीत असतांहि रामाजवळ आल्याबरोबर लोकांचें नेत्र अश्रूंनीं भरून आले. अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या त्या अत्यंत दुःखी लोकांना पाहून तो धर्मज्ञ राम मातापितरांप्रमाणें त्यांना कवटाळूं लागला. त्या ठिकाणीं कांहीं लोकांना तो कडकडून भेटला. कांहीं लोकांनीं त्याला अभिवंदन केलें आणि त्या राजकुमार रामानें योग्यतेप्रमाणें भेटी घेऊन या सर्वांना आपल्या मित्राप्रमाणें आणि बांधवाप्रमाणें लेखिलें, त्या वेळीं शोक करूं

गुहा गिरीणां च दिशश्च संततं मृदङ्गघोषप्रतिमो विशुश्रुवे ४९

इत्यार्षे श्रीमद्रा०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुरुत्तरशततमः सर्गः ॥१०४॥

पञ्चोत्तरशततमः सर्गः । [३८६३]

वसिष्ठः पुरतः कृत्वा दारान्दशरथस्य च ।
अभिचक्राम तं देशं रामदर्शनतर्षितः १
राजपत्न्यश्च गच्छन्त्यो मन्दं मन्दाकिनीं प्रति ।
ददृशुस्तत्र तत्तीर्थं रामलक्ष्मणसेवितम् २
कौसल्या बाष्पपूर्णेन मुखेन परिशुष्यता ।
सुमित्रामब्रवीद्दीना याश्चान्या राजयोषितः ३
इदं तेषामनाथानां क्लिष्टमक्लिष्टकर्मणाम् ।
वने प्राक्कलनं तीर्थं ये ते निर्विषयीकृताः ४
इतः सुमित्रे पुत्रस्ते सदा जलमतन्द्रितः ।
स्वयं हरति सौमित्रिर्मम पुत्रस्य कारणात् ५
जघन्यमपि ते पुत्रः कृतवान्न तु गर्हितः ।
भ्रातुर्यदर्थरहितं सर्वं तद्गर्हितं गुणैः ६

---

लागलेल्या त्या महात्म्यांचा ध्वनि पृथ्वी, आकाश आणि पर्वतावरील गुहांच्या सर्व बाजू एकसारख्या भरून सोडीत मृदंगध्वनीप्रमाणें ऐकूं येऊं लागला. (४५-४९)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंचारावा सर्ग संपला. ॥१०४॥

दशरथाच्या स्त्रियांना पुढें घालून रामदर्शनाकरितां उत्सुक झालेले वसिष्ठमुनि त्या प्रदेशाकडे निघाले. हळूंहळूं जात असतां वाटेंत त्या राण्यांनीं मंदाकिनीच्या तीरावर राम आणि लक्ष्मण हे जेथें येऊन गेले होते, तो उतार पाहिला. तेव्हां अश्रुपूर्ण आणि सुकून गेलेल्या मुखानें युक्त असलेली कौसल्या, दीन सुमित्रेला आणि इतर राजस्त्रियांना म्हणाली, " ज्यांना राज्यांतून हांकून दिलें, त्या सरलस्वभावी बिचाऱ्यांचा हा वनांतील जल वगैरे नेण्याचा अडचणीचा मार्ग होय असें मला वाटतें. सुमित्रे, सर्वकाल सावधान असलेला तुझा पुत्र लक्ष्मण माझ्या पुत्राकरितां येथून स्वतः उदक घेऊन जात असला पाहिजे. हें हलकें काम जरी तुझा पुत्र करीत आहे,

*

अद्यायमपि ते पुत्रः क्लेशानामतथोचितः ।
नीचानर्थसमाचारं सज्जं कर्म प्रमुञ्चतु ७
दक्षिणाग्रेषु दर्भेषु सा ददर्श महीतले ।
पितुरिङ्गुदिपिण्याकं न्यस्तमायतलोचना ८
तं भूमौ पितुरार्तेन न्यस्तं रामेण वीक्ष्य सा ।
उवाच देवी कौसल्या सर्वा दशरथस्त्रियः ९
इदमिक्ष्वाकुनाथस्य राघवस्य महात्मनः ।
राघवेण पितुर्दत्तं पश्यतैतद्यथाविधि १०
तस्य देवसमानस्य पार्थिवस्य महात्मनः ।
नैतदौपयिकं मन्ये भुक्तभोगस्य भोजनम् ११
चतुरन्तां महीं भुक्त्वा महेन्द्रसदृशो भुवि ।
कथमिङ्गुदिपिण्याकं स भुंक्ते वसुधाधिपः १२
अतो दुःखतरं लोके न किंचित्प्रतिभाति मे ।
यत्र रामः पितुर्दद्यादिङ्गुदीक्षोदमृद्धिमान् १३

---

तरी तो निंदेस पात्र झाला नाहीं. कारण ज्येष्ठत्व-धार्मिकत्वादि गुणांनीं संपन्न अशा भावाला ज्याच्यापासून उपयोग होत नाहीं, तेंच सर्व निंदास्पद आहे. आज भरताच्या प्रार्थनेवरून, राम परत अयोध्येला जाऊन आपल्या राज्याचा स्वीकार करो व असलीं कामें करण्याचे कष्ट सहन करण्यास अयोग्य असलेल्या या तुझ्या पुत्राच्या ( लक्ष्मणाच्या ) हातचीं हीं हलकीं कामें सुटोत. " (१-७)

नंतर पित्याला उद्देशून रामानें भूमीवर दक्षिणेकडे टोंकें करून दर्भ आंथरून त्यावर ठेविलेला इंगुदी फलांच्या पिठाचा पिंड दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या कौसल्येनें पाहिला. दुःखाकुल रामानें पित्याला उद्देशून भूमीवर ठेविलेला तो पिंड पाहून ती राजपत्नी कौसल्या दशरथाच्या इतर सर्व स्त्रियांना म्हणाली, "रामानें आपल्या इक्ष्वाकुकुलाधिपति महात्म्या रघुवंशज पित्याला यथाविधि दिलेला हा पिंड पहा. ज्यानें राज्यभोग भोगिले त्या देवतुल्य महात्म्या राजाला हें भोजन मला मुळींच योग्य दिसत नाहीं. चारी समुद्रांनीं मर्यादित असलेल्या पृथ्वीचा ज्या इंद्रासारख्या राजानें उपभोग घेतला, तो भूतलावर ठेविलेला इंगुदी फलांचा

रामेणेङ्गुदिपिण्याकं पितुर्दत्तं समीक्ष्य मे ।
कथं दुःखेन हृदयं न स्फोटति सहस्रधा १४
श्रुतिस्तु खल्वियं सत्या लौकिकी प्रतिभाति मे ।
यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः १५
एवमार्तां सपत्न्यस्ता जग्मुराश्वास्यतां तदा ।
ददृशुश्चाश्रमे रामं स्वर्गच्युतमिवामरम् १६
तं भोगैः संपरित्यक्तं रामं संप्रेक्ष्य मातरः ।
आर्ता मुमुचुरश्रूणि सस्वरं शोककर्शिताः १७
तासां रामः समुत्थाय जग्राह चरणाम्बुजान् ।
मातॄणां मनुजव्याघ्रः सर्वासां सत्यसंगरः १८
ताः पाणिभिः सुखस्पर्शैर्मृद्वङ्गुलितलैः शुभैः ।
प्रममार्जू रजः पृष्ठाद्रामस्यायतलोचनाः १९
सौमित्रिरपि ता सर्वा मातॄः संप्रेक्ष्य दुःखितः ।

---

पिंड कसा बरें खाऊं शकेल ? वैभवसंपन्न रामालाही ज्याअर्थीं पित्याला उद्देशून इंगुदीचें पीठ देण्याचा प्रसंग आला, त्याअर्थीं यापेक्षां या जगतांमध्यें मला कोणतीही गोष्ट अधिक दुःखदायक वाटत नाहीं. अहो, रामानें पित्याला उद्देशून दिलेला हा इंगुदीच्या पिठाचा पिंड पाहून दुःखानें माझ्या हृदयाचे हजारों तुकडे कसे बरें होत नाहींत ! जें अन्न पुरुष भक्षण करतो, तेंच अन्न त्याच्या देवतांना भक्षण करावें लागतें, ही लोकांतील म्हणच खरोखर मला आतां खरी वाटूं लागली आहे. (८–१५)"

याप्रमाणें दुःखाकुल झालेल्या त्या कौसल्येचें तिच्या त्या सवतींनीं सांत्वन केल्यावर त्या रामाच्या आश्रमाकडे गेल्या. तेव्हां स्वर्गांतून खालीं उतरलेल्या देवाप्रमाणें राम आश्रमामध्यें त्यांच्या दृष्टीस पडला. भोगांवर पाणी सोडलेल्या त्या रामाला पाहून शोकानें कृश झालेल्या त्या दुःखाकुल माता शोकानें अश्रु ढाळूं लागल्या. तेव्हां पुरुषश्रेष्ठ सत्यप्रतिज्ञ रामानें आसनावरून उठून त्या सर्व मातांचे पाय धरले असतां विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या मातांनीं सुखावह स्पर्श असलेल्या बोटांनीं युक्त असलेले आपले उत्तम हात रामाच्या पाठीवरून फिरवून तिच्यावर बसलेला मळ पुसून टाकिला. त्यानंतर त्या सर्व मातांना पाहून

अभ्यवादयदासक्तं शनै रामादनन्तरम् २०
यथा रामे तथा तस्मिन्सर्वा ववृतिरे स्त्रियः ।
वृत्तिं दशरथाज्जाते लक्ष्मणे शुभलक्षणे २१
सीतापि चरणांस्तासामुपसंगृह्य दुःखिता ।
श्वश्रूणामश्रुपूर्णाक्षी संबभूवाग्रतः स्थिता २२
तां परिष्वज्य दुःखार्ता माता दुहितरं यथा ।
वनवासकृतां दीनां कौसल्या वाक्यमब्रवीत् २३
वैदेहराजन्यसुता स्नुषा दशरथस्य च ।
रामपत्नी कथं दुःखं संप्राप्ता विजने वने २४
पद्ममातपसंतप्तं परिक्लिष्टमिवोत्पलम् ।
काञ्चनं रजसा ध्वस्तं क्लिष्टं चन्द्रमिवाम्बुदैः २५
मुखं ते प्रेक्ष्य मां शोको दहत्यग्निरिवाश्रयम् ।
भृशं मनसि वैदेहि व्यसनारणिसंभवः २६
ब्रुवन्त्यामेवमार्तायां जनन्यां भरताग्रजः ।

---

दुःखाकुल झालेल्या लक्ष्मणानेंही रामाच्या मागून हळूं हळूं प्रेमानें त्यांना अभिवंदन केलें. (१६–२०)

त्या सर्व स्त्रियांनीं दशरथापासून उत्पन्न झालेल्या त्या सुलक्षणी लक्ष्मणाला रामाप्रमाणेंच मानिलें. नंतर दुःखाकुल झालेल्या सीतेनेंही त्या सासवांचे पाय धरले आणि अश्रूंनीं नेत्र भरून येऊन ती सीता त्यांच्यासमोर मर्यादेनें उभी राहिली. तेव्हां कन्येला कवटाळून धरणाऱ्या मातेप्रमाणें त्या दीन व वनवासी सीतेला कवटाळून धरून दुःखाकुल झालेली कौसल्या म्हणाली, “ विदेहदेशाधिपति जनक राजाच्या कन्येला, दशरथाच्या स्नुषेला आणि रामाच्या पत्नीला निर्जन वनामधील दुःख भोगण्याचा प्रसंग कसा बरें आला? विदेहराजकन्ये! सूर्याच्या तापानें तापलेल्या पांढऱ्या कमलाप्रमाणें, चुरगळून गेलेल्या तांबूस कमलाप्रमाणें, धुळीनें भरलेल्या सोन्याप्रमाणें, अथवा मेघांनीं व्यापलेल्या चंद्राप्रमाणें, असलेलें तुझें मुख पाहून दुःखरूपी अरणींतून उत्पन्न झालेला शोक, घर जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें माझ्या अंतःकरणाचा अतिशय दाह करीत आहे. ” (२१–२६)

पादावासाद्य जग्राह वसिष्ठस्य च राघवः २७
पुरोहितस्याग्निसमस्य तस्य वै बृहस्पतेरिन्द्र इवामराधिपः ।
प्रगृह्य पादौ सुसमृद्धतेजसः सहैव तेनोपविवेश राघवः २८
ततो जघन्यं सहितैः स्वमन्त्रिभिः पुरप्रधानैश्च तथैव सैनिकैः ।
जनेन धर्मज्ञतमेन धर्मवानुपोपविष्टो भरतस्तदाग्रजम् २९
उपोपविष्टस्तु तदातिवीर्यवांस्तपस्विवेषेण समीक्ष्य राघवम् ।
श्रिया ज्वलन्तं भरतः कृताञ्जलिर्यथा महेन्द्रः प्रयतः प्रजापतिम् ३०
किमेष वाक्यं भरतोऽद्य राघवं प्रणम्य सत्कृत्य च साधु वक्ष्यति।
इतीव तस्यार्यजनस्य तत्त्वतो बभूव कौतूहलमुत्तमं तदा ३१
स राघवः सत्यधृतिश्च लक्ष्मणो महानुभावो भरतश्च धार्मिकः ।
वृताः सुहृद्भिश्च विरेजिरेऽध्वरे यथा सदस्यैः सहितास्त्रयोऽग्नयः ३२
इत्यार्षे श्री०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चोत्तरशततमः सर्गः॥१०४॥[ ३८९५]

याप्रमाणें दुःखाकुल होऊन कौसल्या माता विलाप करीत असतांना भरताग्रज रामानें जवळ येऊन वसिष्ठांचे पाय धरले. देवराज इंद्र ज्याप्रमाणें बृहस्पतीचे पाय धरतो, त्याप्रमाणें अत्यंत विपुल तेजानें युक्त असलेल्या त्या अग्निसारख्या पुरोहित वासिष्ठांचे पाय धरून रघुवंशज राम त्यांच्याबरोबरच खालीं बसला आणि त्यानंतर आपले मंत्रि, नगरांतील मुख्य मुख्य लोक, सैनिक आणि अत्यंत धर्मनिष्ठ लोक यांसह भरत त्या ज्येष्ठ भावाच्यामागें जवळच बसला. कांतीनें झळकत असलेल्या रामाकडे पाहून, शुचिर्भूत इंद्र ज्याप्रमाणें ब्रम्हदेवापाशीं बसतो, त्याप्रमाणें अत्यंत वीर्यवान् भरत हात जोडून रामाजवळ बसला असतां "हा भरत नमस्कार करून मोठ्या आदरानें रामाशीं आतां काय बोलणार आहे?" अशा-प्रकारची तेथें एकवटलेल्या सभ्य लोकांना खरोखर अगदीं मोठीच चिंता लागून राहिली. असो. सदस्यांसह असलेले तीन अग्नि ज्याप्रमाणें यज्ञांमध्यें शोभू लागतात, त्याप्रमाणें आप्तेष्टांनीं वेढलेले ते तिघे म्हणजे सत्यनिष्ठ राम, महापराक्रमी लक्ष्मण आणि धर्मनिष्ठ भरत शोभूं लागले. (२७-३२)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकीप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें पांचवा सर्ग संपला ॥१०५॥

षडुत्तरशततमः सर्गः ।

ततः पुरुषसिंहानां वृतानां तैः सुहृद्गणैः ।
शोचतामेव रजनी दुःखेन व्यत्यवर्तत १
रजन्यां सुप्रभातायां भ्रातरस्ते सुहृद्वृताः ।
मन्दाकिन्यां हुतं जप्यं कृत्वा राममुपागमन् २
तूष्णीं ते समुपासीना न कश्चित्किञ्चिदब्रवीत् ।
भरतस्तु सुहृन्मध्ये रामं वचनमब्रवीत् ३
सान्त्विता मामिका माता दत्तं राज्यमिदं मम ।
तद्ददामि तवैवाहं भुङ्क्ष्व राज्यमकण्टकम् ४
महतेवाम्बुवेगेन भिन्नः सेतुर्जलागमे ।
दुरावरं त्वदन्येन राज्यखण्डमिदं महत् ५
गतिं खर इवाश्वस्य तार्क्ष्यस्येव पतत्त्रिणः ।
अनुगन्तुं न शक्तिर्मे गतिं तव महीपते ६
सुजीवं नित्यशस्तस्य यः परैरुपजीव्यते ।
राम तेन तु दुर्जीवं यः परानुपजीवति ७

त्यानंतर त्या आप्तेष्टांसह बसलेले ते पुरुषश्रेष्ठ दुःखानें शोक करीत असतांच रात्र निघून गेली. चांगली पहाट झाल्यावर आप्तेष्टांसह ते भाऊ मंदाकिनी नदीच्या तीरावर होमहवन व जपजाप्य आटोपून रामाकडे गेले आणि तेथें स्वस्थ बसले. कोणीही कांहीं बोलला नाहीं. तेव्हां त्या सर्व आप्तेष्टांच्या समक्षच भरत रामाला म्हणाला, "राजानें माझ्या मातेचें सांत्वन करून मला हें राज्य दिलें आहे, तें आतां मी तुला देतों आणि तूंच या निष्कंटक राज्याचा उपभोग घे. वर्षाकाळीं मोठ्या जलवेगानें फुटून गेलेला बांध जसा आवरणें अशक्य आहे, तसें हें भरतखंड नांवाचें प्रचंड राज्य तुझ्यावांचून इतराला आवरतां येणें अशक्य आहे. हे राजा! ज्याप्रमाणें घोड्याची गति अंगीं बाणवून घेण्यास गाढव असमर्थ आहे अथवा ज्याप्रमाणें गरुडाची गति स्वीकारण्यास इतर पक्ष्याचें सामर्थ्य नाहीं, त्याचप्रमाणें तुझ्या राज्यपालनशक्तीचें अवलंबन करण्यास मी समर्थ नाहीं. (१-६)

यथा तु रोपितो वृक्षः पुरुषेण विवर्धितः ।
ह्रस्वकेन दुरारोहो रूढस्कन्धो महाद्रुमः ८
स यदा पुष्पितो भूत्वा फलानि न विदर्शयेत् ।
सतां नानुभवेत्प्रीतिं यस्य हेतोः प्ररोपितः ९
एषोपमा महाबाहो तदर्थं वेत्तुमर्हसि ।
यत्र त्वमस्मान्वृषभो भर्ता भृत्यान्न शाधि हि १०
श्रेणयस्त्वां महाराज पश्यन्त्वग्र्याश्च सर्वशः
प्रतपन्तमिवादित्यं राज्यस्थितमरिंदमम् ११
तथा नु याने काकुत्स्थ मत्ता नर्दन्तु कुञ्जराः ।
अन्तःपुरगता नार्यो नन्दन्तु सुसमाहिताः १२
तस्य साध्वनुमन्यन्त नागरा विविधा जनाः ।
भरतस्य वचः श्रुत्वा रामं प्रत्यनुयाचतः १३

"रामा ! ज्याच्यावर दुसऱ्यांची उपजीविका चालते त्याचेंच जीवन चांगलें आहे; परंतु जो उपजीविकेकरितां दुसऱ्यावर अवलंबून असतो, त्याचें जीवन दुःखमय आहे, त्याअर्थीं तूंच राज्य करणें योग्य आहे. एखाद्या पुरुषानें लाविलेला व वाढविलेला वृक्ष शाखा फुटून ठेंगण्या पुरुषाला सहज चढतां न येईल अशा रीतीनें मोठा होऊन आणि फुलांनीं युक्त होऊनही जेव्हां फळें दाखविणार नाहीं आणि असें झालें असतां ज्या फळाच्या हेतूनें तो वृक्ष लावला त्या फलप्राप्तीचा आनंद ज्याप्रमाणें त्या लावणाऱ्यास अनुभवावयास मिळत नाहीं, त्याचप्रमाणें तुझ्या संबंधांत गोष्ट झाली आहे; कारण ज्याअर्थीं तूं श्रेष्ठ व परिपालन करण्यास समर्थ असूनही आम्हां सेवकांचें परिपालन करीत नाहींस, त्याअर्थीं हीच उपमा तुला योग्य आहे, आणि हे महापराक्रमी रामा ! राजा दशरथाचे प्रयत्न व्यर्थ गेले, हा त्या उपमेचा अर्थही तुला माहीत आहे. हे राजा ! अनेक जातींच्या लोकांचे मुख्य मुख्य असे सर्व समुदाय शत्रुदमन करणारा तूं राज्यावर बसून सूर्याप्रमाणें प्रकाशत आहेस असें पाहोत व त्याचप्रमाणें, हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामा ! स्वारी निघाली असतां मत्त हत्ती गर्जना करोत आणि अंतःपुरांतील स्त्रिया अत्यंत समाधानयुक्त अंतःकरणानें तुझें अभिनंदन करोत." (७-१२)

तमेवं दुःखितं प्रेक्ष्य विलपन्तं यशस्विनम् ।
रामः कृतात्मा भरतं समाश्वासयदात्मवान् १४
नात्मनः कामकारो हि पुरुषोऽयमनीश्वरः ।
इतश्चेतरतश्चैनं कृतान्तः परिकर्षति १५
सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ।
संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम् १६
यथा फलानां पक्वानां नान्यत्र पतनाद्भयम् ।
एवं नरस्य जातस्य नान्यत्र मरणाद्भयम् १७
यथागारं दृढस्थूणं जीर्णं भूत्वोपसीदति ।
तथावसीदन्ति नरा जरामृत्युवशंगताः १८
अत्येति रजनी या तु सा न प्रतिनिवर्तते ।
यात्येव यमुना पूर्णं समुद्रमुदकार्णवम् १९

---

याप्रमाणें भरत रामाची प्रार्थना करूं लागला असतां तें त्याचें भाषण ऐकल्यावर " वाहवा, वाहवा ! " म्हणून नानाप्रकारच्या नागरिक लोकांनीं त्या भाषणाची प्रशंसा केली. परंतु याप्रकारें यशस्वी भरत दुःखाकुल होऊन उद्गार काढीत आहे असें पाहून धैर्यवान् व जितेंद्रिय राम भरताचें सांत्वन करूं लागला. तो म्हणाला, " जीवाला स्वेच्छेनें कांहींएक करण्याचें सामर्थ्य नाहीं. कारण हा पुरुष परतंत्र आहे. यामुळें याला अंतर्यामी काल इकडून तिकडे कर्मानुसार ओढून नेत असतो. तर माझ्या वनवासाला कैकेयी किंवा राजा यांपैकीं कोणीही कारण नसून अदृष्टच मुख्य कारण आहे. नाश हाच सर्व संग्रहांचा परिणाम आहे, पतन हाच सर्व उन्नतींचा शेवट आहे, वियोग हाच सर्व संयोगाचा अंत आहे आणि मरण हीच जीविताची शेवटची मर्यादा आहे. तेव्हां राजाच्या मृत्यूबद्दल अथवा राज्यापासून भ्रष्ट होऊन मी वनामध्यें आल्याबद्दल शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. (१३–१६)

" ज्याप्रमाणें पिकलेल्या फळांना पडण्यावांचून दुसरें भय नाहीं, त्याचप्रमाणें जन्मास आलेल्या पुरुषांना मरणांवाचून दुसरें भय नाहीं. ज्याप्रमाणें दृढ खांबांनीं युक्त असलेलेंही घर जीर्ण झालें म्हणजे कोसळून पडतें, त्याचप्रमाणें लोक जरा आणि मृत्यु यांच्या तावडींत सांपडून नष्ट होतात. ज्याप्रमाणें पाण्यानें भरलेल्या

अहोरात्राणि गच्छन्ति सर्वेषां प्राणिनामिह ।
आयूंषि क्षपयन्त्याशु ग्रीष्मे जलमिवांशवः २०
आत्मानमनुशोच त्वं किमन्यमनुशोचसि ।
आयुस्तु हीयते यस्य स्थितस्याथ गतस्य च २१
सहैव मृत्युर्व्रजति सह मृत्युर्निषीदति ।
गत्वा सुदीर्घमध्वानं सह मृत्युर्निवर्तते २२
गात्रेषु वलयः प्राप्ताः श्वेताश्चैव शिरोरुहाः ।
जरया पुरुषो जीर्णः किं हि कृत्वा प्रभावयेत् २३
नन्दन्त्युदित आदित्ये नन्दन्त्यस्तमितेऽहनि ।
आत्मनो नाववुध्यन्ते मनुष्या जीवितक्षयम् २४
हृष्यन्त्यृतुमुखं दृष्ट्वा नवं नवमिवागतम् ।

समुद्राला मिळणारी यमुना तेथून कधींही परत फिरत नाहीं, त्याप्रमाणें गेलेली रात्र फिरून परत येत नाहीं. ग्रीष्मऋतूमध्यें ज्याप्रमाणें सूर्यकिरणें उदक शोषून टाकतात, त्याचप्रमाणें जाणारे दिवस व रात्री या जगांतील सर्व प्राण्यांच्या आयुष्यांचा वेगानें क्षय करीत असतात. (१७-२०)

"तर तूं आपल्या स्वतःविषयीं शोक कर; दुसऱ्याकरितां तूं कां शोक करीत आहेस ? राहणाऱ्याचें किंवा चालणाऱ्याचें आयुष्य कमी होतच असतें. तेव्हां अनिवार मृत्यु जवळ जवळ येत चालला; आतां माझी अवस्था काय होईल म्हणून स्वतःबद्दलच शोक करीत बसणें तुला योग्य आहे. अरे, प्राणी जाऊं लागला तरी मृत्यु त्याच्याबरोबर जातोच; तो बसला तरी मृत्यु त्याच्याबरोबर बसतोच आणि दूर मार्ग चालून प्राणी परत फिरूं लागला तरीही मृत्यु त्याच्या बरोबर चालत जाऊन त्याच्याबरोबरच परत फिरतो. सारांश, मृत्यु प्राण्याच्या पाठीशीं एकसारखा लागलाच आहे. अरे, अंगावर सुरकुत्या पडतात, केस पांढरे होऊन जातात आणि जरेनें पुरुष जीर्ण होऊन जातो. तेव्हां असा कोणता उपाय आहे कीं ज्यानें हें सर्व टाळण्याला प्राणी समर्थ होईल ? लोक सूर्योदय झाला म्हणजे जसे आनंदित होतात, तसेच दिवस मावळला तरीही आनंदित होतात; परंतु, आपल्या जीविताचा क्षय होत आहे, हें त्यांना समजत नाहीं.

ऋतूनां परिवर्तेन प्राणिनां प्राणसंक्षयः २५
यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे ।
समेत्य तु व्यपेयातां कालमासाद्य कंचन २६
एवं भार्याश्च पुत्राश्च ज्ञातयश्च वसूनि च ।
समेत्य व्यवधावन्ति ध्रुवो ह्येषां विनाभवः २७
नात्र कश्चिद्यथाभावं प्राणी समतिवर्तते ।
तेन तस्मिन्न सामर्थ्यं प्रेतस्यास्त्यनुशोचतः २८
यथा हि सार्थं गच्छन्तं ब्रूयात्कश्चित्पथि स्थितः ।
अहमप्यागमिष्यामि पृष्ठतो भवतामिति २९
एवं पूर्वैर्गतो मार्गः पितृपैतामहैर्ध्रुवः ।
तमापन्नः कथं शोचेद्यस्य नास्ति व्यतिक्रमः ३०

फिरून फिरून ऋतूला आरंभ झालेला पाहून व तो ऋतु पूर्वी कधीं न आलेला असा नवानवाच येत आहे असें वाटून प्राण्यांना हर्ष होतो; परंतु, ऋतूंच्या फेऱ्यानें प्राण्यांचा नाश होत असतो, हें त्यांना समजत नाहीं. (२१–२५)

" ज्याप्रमाणें महासागरामध्यें एका लांकडाचा दुसऱ्या लांकडाशीं समागम होतो आणि त्यानंतर कांहीं वेळानें त्यांचा वियोग होतो, त्याचप्रमाणें भार्यापुत्र, ज्ञाती व संपत्ति यांचा समागम होत असून कालांतरानें ते एकमेकांपासून दूर होऊं लागतात. कारण यांचा वियोग हा ठरलेलाच आहे. या संसारामध्यें कोणत्याही प्राण्याला जन्ममरणरूपी स्वभावाचें अतिक्रमण करतां येत नाहीं व याच कारणासाठीं मेलेल्या माणसाकरितां शोक करीत असलेल्या कोणत्याही माणसाचें ठिकाणीं स्वतःचें मरण नाहींसें करण्याचें सामर्थ्य नाहीं. ज्याप्रमाणें एखादा प्रवासी लोकांचा समुदाय मार्गानें जाऊं लागला असतां " तुमच्या मागून मीही येतों " असें मार्गामध्यें असलेला दुसरा कोणी प्रवासी त्या समुदायाला म्हणतो आणि त्याच्या मागोमाग जातो, त्याचप्रमाणें पूर्वीचे वाडवडील ज्या न टळणाऱ्या मार्गानें गेले आणि ज्या मार्गाचें उल्लंघन करतां येत नाहीं, त्याच मार्गाला स्वतः लागलेल्या पुरुषानें वाडवडिलांविषयीं कां बरें शोक करावा ? ( २६–३० )

वयसः पतमानस्य स्रोतसो वानिवर्तिनः ।
आत्मा सुखे नियोक्तव्यः सुखभाजः प्रजाः स्मृताः ३१
धर्मात्मा सुशुभैः कृत्स्नैः क्रतुभिश्चाप्तदक्षिणैः ।
न स शोच्यः पिता तात स्वर्गतः सत्कृतः सताम् ३२
स जीर्णमानुषं देहं परित्यज्य पिता हि नः ।
दैवीमृद्धिमनुप्राप्तो ब्रह्मलोकविहारिणीम् ३३
तं तु नैवंविधः कश्चित्प्राज्ञः शोचितुमर्हति ।
त्वद्विधो मद्विधश्चापि श्रुतवान्बुद्धिमत्तरः ३४
एते बहुविधाः शोका विलापरुदिते तदा ।
वर्जनीया हि धीरेण सर्वावस्थासु धीमता ३५
स स्वस्थो भव मा शोको यात्वा चावस तां पुरीम् ।
तथा पित्रा नियुक्तोऽसि वशिना वदतां वर ३६
यत्राहमपि तेनैव नियुक्तः पुण्यकर्मणा ।

---

" नद्यांच्या जलप्रवाहाप्रमाणें परत न फिरणाऱ्या आयुष्याचा सारखा नाशच होत असतो, हें लक्षांत घेऊन आपला आत्मा सुखसाधनरूपी धर्माकडे लावावा हें बरें. कारण मनुष्याला जन्म जो मिळतो, तो सुखाच्या साधनभूत धर्माच्या प्राप्तीसाठींच मिळतो, असें म्हणतात. भरता ! सज्जनांना पूज्य असा आपला धर्मात्मा पिता उत्कृष्ट यज्ञ करून आणि त्यांत मोठमोठ्या दक्षिणा देऊन स्वर्गलोकीं गेला आहे. तर त्याच्याकरतां शोक करणें योग्य नव्हे; कारण जीर्ण झालेल्या या मनुष्यदेहाचा त्याग करून जिच्यायोगानें ब्रह्मलोकमाध्यें विहार करतां येतो अशी दैवी संपत्ति आपल्या पित्याला मिळाली आहे. तेव्हां अशा-प्रकारें तुझ्यासारख्या अथवा माझ्यासारख्या कोणाही समंजस, आत्मविद्येचें अध्ययन केलेल्या आणि बुद्धिमान् अशा पुरुषानें त्याच्याकरतां शोक करणें योग्य नाहीं. कशीही अवस्था प्राप्त झाली तरी विचारी धीर पुरुषानें हे नानाप्रकारचे शोक, विलाप आणि रोदन यांपासून अलिप्तच राहिलें पाहिजे. (३१-३५)

" तूं स्वस्थ हो; शोक करूं नको आणि येथून निघून त्या अयोध्यानगरीमध्यें रहा. कारण हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ भरता ! सत्यनिष्ठ पित्यानें तुला त्याप्रमाणें

तत्रैवाहं करिष्यामि पितुरार्यस्य शासनम् ३७
न मया शासनं तस्य त्यक्तुं न्याय्यमरिंदम।
स त्वयापि सदा मान्यः स वै बन्धुः स नः पिता ३८
तद्वचः पितुरेवाहं संमतं धर्मचारिणाम्।
कर्मणा पालयिष्यामि वनवासेन राघव ३९
धार्मिकेणानृशंसेन नरेण गुरुवर्तिना।
भवितव्यं नरव्याघ्र परलोकं जिगीषता ४०
आत्मानमनुतिष्ठ त्वं स्वभावेन नरर्षभ।
निशाम्य तु शुभं वृत्तं पितुर्दशरथस्य नः ४१
इत्येवमुक्त्वा वचनं महात्मा पितुर्निदेशप्रतिपालनार्थम्।
यवीयसं भ्रातरमर्थवच्च प्रभुर्मुहूर्ताद्विरराम रामः ४२

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षडुत्तरशततमः सर्गः ॥१०६॥ [३९३७]

---

आज्ञा केली आहे. त्याच पुण्यवान् पित्यानें जिकडे माझी योजना केली आहे त्याच कृत्यामध्यें प्रवृत्त होऊन मी आपल्या सज्जन पित्याची आज्ञा शेवटास नेईन. हे शत्रूंचें दमन करणाऱ्या भरता ! त्याची आज्ञा मी झुगारून देणें न्याय्य नाहीं आणि तुलाहि पण ती झुगारून देणें न्याय्य होणार नाहीं; कारण तो आपणांला सर्वदा पूज्य आहे आणि तोच आपला बांधव व पिता आहे. हे रघुवंशज भरता ! धर्मनिष्ठांना मान्य अशी त्या पित्याची आज्ञा वनवास पत्करूनच मी परिपालन करीन. हे पुरुषश्रेष्ठ भरता ! परलोकप्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें धार्मिक, सज्जन व सद्वर्तनी असलें पाहिजे. आपल्या पित्याला-दशरथाला-मरण चांगलें आलें आहे. म्हणजे त्याला उत्तम गति मिळाली आहे, हें लक्षांत आणून, हे पुरुषश्रेष्ठ भरता ! तूं सुस्वभावी आहेस. तूं आपल्या हिताचा विचार कर. ” याप्रमाणें पित्याची आज्ञा परिपालन करण्याकरितां कनिष्ठ भावाशीं बराच वेळपर्यंत अर्थ-परिपूर्ण भाषण करून तो महात्मा समर्थ राम स्वस्थ बसला. (३६–४२)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंसहावा सर्ग संपला ॥ १०६ ॥

सप्तोत्तरशततमः सर्गः ।

एवमुक्त्वा तु विरते रामे वचनमर्थवत् ।
ततो मन्दाकिनीतीरे रामं प्रकृतिवत्सलम् १
उवाच भरतश्चित्रं धार्मिको धार्मिकं वचः ।
को हि स्यादीदृशो लोके यादृशस्त्वमरिंदम २
न त्वां प्रव्यथयेद्दुःखं प्रीतिर्वा न प्रहर्षयेत् ।
संमतश्चापि वृद्धानां तांश्च पृच्छसि संशयान् ३
यथा मृतस्तथा जीवन्यथासति तथा सति ।
यस्यैष बुद्धिलाभः स्यात्परितप्येत केन सः ४
परावरज्ञो यश्च स्याद्यथा त्वं मनुजाधिप ।
स एव व्यसनं प्राप्य न विषीदितुमर्हति ५
अमरोपमसत्त्वस्त्वं महात्मा सत्यसंगरः ।
सर्वज्ञः सर्वदर्शी च बुद्धिमांश्चासि राघव ६
न त्वामेवंगुणैर्युक्तं प्रभवाभवकोविदम् ।

अशा रीतीनें अर्थपरिपूर्ण भाषण करून राम स्वस्थ बसला असतां मंदाकिनीच्या तीरावर प्रकृतिवत्सल रामाला उद्देशून धर्मनिष्ठ भरत धर्मग्राह्य व विस्मयजनक भाषण करूं लागला–"हे शत्रुदमना! तुझ्यासारखा या जगतामध्यें कोण बरें असेल? वृद्धांनादेखील धर्मविषयामध्यें तूं सम्मान्य असतांनाही लोकमर्यादेला अनुसरून त्या वृद्धांना तूं संशय आला असता धर्म विचारीत असतोस. तेव्हां याप्रमाणें तूं सर्वज्ञ व मनोरथ परिपूर्ण झालेला असल्यामुळें दुःखदायक गोष्ट घडली असतां तुला दुःख होत नाहीं अथवा आनंदकारक प्रकार घडला असतां तुला हर्षही होत नाहीं. देहाच्या जीवनावस्थेंत आणि मरणावस्थेंत जीव हा सारखाच असून बरा अथवा वाईट कसाही प्रसंग आला तरी त्यांत भेद होत नाहीं, अशी बुद्धि ज्याची होईल, त्याला कोणत्या बरें कारणांनीं दुःख होणार आहे? हे राजा! तुझ्याप्रमाणें जो आत्मतत्त्व जाणणारा असेल, त्याच्यावर अशाप्रकारचें संकट येऊन कोसळलें तरी त्याला खेद होणार नाहीं. (१-५)

"राघवा! तूं महात्मा, सत्यप्रतिज्ञ, सर्वज्ञ, सर्वांकडे दृष्टि देणारा, बुद्धिमान्

अविषह्यतमं दुःखमासादयितुमर्हति ७
प्रोषिते मयि यत्पापं मात्रा मत्कारणात्कृतम् ।
क्षुद्रया तदनिष्टं मे प्रसीदतु भवान्मम ८
धर्मबन्धेन बद्धोऽस्मि तेनेमां नेह मातरम् ।
हन्मि तीव्रेण दण्डेन दण्डार्हां पापकारिणीम् ९
कथं दशरथाज्जातः शुभाभिजनकर्मणः ।
जानन्धर्ममधर्मं च कुर्यां कर्म जुगुप्सितम् १०
गुरुः क्रियावान्वृद्धश्च राजा प्रेतः पितेति च ।
तातं न परिगर्हेऽहं दैवतं चेति संसदि ११
को हि धर्मार्थयोर्हीनमीदृशं कर्म किल्बिषम् ।
स्त्रियः प्रियचिकीर्षुः सन्कुर्याद्धर्मज्ञ धर्मवित् १२
अन्तकाले हि भूतानि मुह्यन्तीति पुरा श्रुतिः ।
राज्ञैवं कुर्वता लोके प्रत्यक्षा सा श्रुतिः कृता १३

---

आणि देवांप्रमाणें सत्वगुणी आहेस. तेव्हां अशा गुणांनीं युक्त आणि उत्पत्ति विनाश जाणणाऱ्या तुला अत्यंत दुःसह दुःखही घाबरून टाकण्यास समर्थ होणार नाहीं. मी परदेशामध्यें गेलों असतांना माझ्याकरितां माझ्या क्षुद्र मातेनें जें पातक केलें, तें मला मुळींच पसंत नाहीं. यासाठीं आपण माझ्यावर कृपा करा आणि राज्याचा स्वीकार करा. मी धर्मरूपी बंधनानें बांधला गेलों आहें आणि म्हणून शिक्षेला पात्र असलेल्या अशा या पापकर्म करणाऱ्या मातेचा कडक शिक्षा म्हणून मी या ठिकाणीं वध करीत नाहीं. कारण महाकुलीन आणि सत्कर्मी अशा दशरथापासून मी उत्पन्न झालों असून धर्म व अधर्म जाणत असतां निंद्य कर्म कसें करूं ? (९–१०)

"पिता दशरथराजा वृद्ध, मोठमोठे यज्ञ केलेला आणि श्रेष्ठ असून आतां मरण पावला आहे. त्याला देव समजून मी सभेमध्यें त्याला दोष देत नाहीं. हे धर्मवेत्त्या रामा ! कोण धर्मात्मा पुरुष स्त्रीचें प्रिय करण्याकरितां अशा प्रकारचें धर्मार्थशून्य पापकर्म करील ? अंतःकाळीं प्राण्यांना मोह होतो असें आम्ही पहिल्यापासून केवळ ऐकत होतों; परंतु ती गोष्ट असें कृत्य करणाऱ्या राजानें जगतामध्यें

साध्वर्थमभिसंधाय क्रोधान्मोहाच्च साहसात् ।
तातस्य यदतिक्रान्तं प्रत्याहरतु तद्भवान् १४
पितुर्हि समतिक्रान्तं पुत्रो यः साधु मन्यते ।
तदपत्यं मतं लोके विपरीतमतोऽन्यथा १५
तदपत्यं भवानस्तु मा भवान्दुष्कृतं पितुः ।
अति यत्तत्कृतं कर्म लोके धीरविगर्हितम् १६
कैकेयीं मां च तातं च सुहृदो बान्धवांश्च नः ।
पौरजानपदान्सर्वांस्त्रातु सर्वमिदं भवान् १७
क्व चारण्यं क्व च क्षात्रं क्व जटाः क्व च पालनम् ।
ईदृशं व्याहतं कर्म न भवान्कर्तुमर्हति १८
एष हि प्रथमो धर्मः क्षत्रियस्याभिषेचनम् ।
येन शक्यं महाप्राज्ञ प्रजानां परिपालनम् १९

लोकांच्या प्रत्यक्ष अनुभवाला आणून दिली. क्रोधामुळें, मोहामुळें आणि साहसामुळें पित्याच्या हातून जें होऊन गेलें, तें चांगला योग्यायोग्य विचार करून आपण सुधारावें. पित्याच्या हातून कांहीं बरें वाईट झालें असलें तरी जो पुत्र तें सुधारून घेतो, तोच अपत्य म्हणून लोकांत मान्य ठरतो; याविरुद्ध असलेला पुत्र लोकांत मान्यता मिळवीत नाहीं. कारण पतनाला हेतुभूत अशी गोष्ट पित्याच्या हातून घडली असतां जो ती आपल्या आचरणानें सुधारीत नाहीं, त्याला अपत्य ही यथार्थ संज्ञा शोभतच नाहीं. (११–१५)

"तर आपण असेंच अपत्य होण्याचा यत्न करावा. पित्याच्या दुष्कृत्याला आपण संमति देऊं नका. कारण धर्माचें अतिक्रमण करून जें कर्म दशरथानें केलें आहे तें जगतांतील विद्वान् लोकांनीं निंद्य मानिलें आहे. कैकेयी, मी, पिता, सुहृद्, आमचे बांधव आणि अयोध्यानगरींतील व देशांतील सर्व लोक यांना तारण्याकरितां आपण माझें हें सर्व मागणें मान्य करा. अरण्यवास कोणीकडे व क्षत्रधर्म कोणीकडे आणि त्याचप्रमाणें जटा धारण करणें कोणीकडे व प्रजापालन कोणीकडे ! सारांश, अशाप्रकारचें हें घोटाळ्याचें कृत्य आपण करूं नका. राज्याभिषेक करून घेणें हाच क्षत्रियांचा मुख्य धर्म आहे आणि हे ज्ञानी रामा ! त्याच्याच योगानें

कश्च प्रत्यक्षमुत्सृज्य संशयस्थमलक्षणम् ।
आयतिस्थं चरेद्धर्मं क्षत्रबन्धुरनिश्चितम् २०
अथ क्लेशजमेव त्वं धर्मं चरितुमिच्छसि ।
धर्मेण चतुरो वर्णान्पालयन्क्लेशमाप्नुहि २१
चतुर्णामाश्रमाणां हि गार्हस्थ्यं श्रेष्ठमुत्तमम् ।
आहुर्धर्मज्ञ धर्मज्ञास्तं कथं त्यक्तुमिच्छसि २२
श्रुतेन बालः स्थानेन जन्मना भवतो ह्यहम् ।
स कथं पालयिष्यामि भूमिं भवति तिष्ठति २३
हीनबुद्धिगुणो बालो हीनस्थानेन चाप्यहम् ।
भवता च विना भूतो न वर्तयितुमुत्सहे २४
इदं निखिलमव्यग्र्यं राज्यं पित्र्यमकण्टकम् ।
अनुशाधि स्वधर्मेण धर्मज्ञः सह बान्धवैः २५
इहैव त्वाभिषिञ्चन्तु सर्वाः प्रकृतयः सह ।
ऋत्विजः सवसिष्ठाश्च मन्त्रविन्मन्त्रकोविदाः २६

प्रजेचें परिपालन होणें शक्य आहे. तेव्हां प्रत्यक्ष सुखाचें साधन असलेल्या प्रजापालनरूपी धर्माचा त्याग करून संशयित, विलक्षण अनावश्यक आणि उत्तर वयालाच योग्य अशा धर्माचें आचरण कोणता बरें कुलवान् क्षत्रिय करील ? (१६-२०)

"आतां कष्टसाध्य धर्माचेंच आचरण करण्याची जर तुझी इच्छा असेल तर धर्मानें चार वर्णांचें परिपालन करितांना तुला काय कमी क्लेश होतील ? धर्मवेत्ते लोक चारी आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम श्रेष्ठ म्हणतात. तर हे धर्मज्ञा ! तूं त्या आश्रमाचा त्याग करण्याचें कसें मनामध्यें आणीत आहेस ? विद्येनें, नात्यानें आणि वयानेंही मी आपल्यापेक्षां लहान आहें. तेव्हां आपण असतांना मी पृथ्वीचें पालन कसें करूं ? बुद्धीनें हीन आणि नात्यानेंही हीन असलेल्या मला आपणावांचून जिवंत राहतां येणें शक्य नाहीं. मग राज्य चालविण्याची गोष्ट कशाला पाहिजे ? तेव्हां परंपरेनें चालत आलेलें हें संपूर्ण, श्रेष्ठ व निष्कंटक राज्य बांधवांसह स्वधर्मानें धर्मज्ञ म्हणविणारा तूं परिपालन कर. (२१-२५)

"हे मंत्रवेत्त्या ! सर्व अमात्य आणि मंत्रांमध्यें प्रवीण असलेले वसिष्ठासह

अभिषिक्तस्त्वमस्माभिरयोध्यां पालने व्रज ।
विजित्य तरसा लोकान्मरुद्भिरिव वासवः २७
ऋणानि त्रीण्यपाकुर्वन्दुर्हृदः साधु निर्दहन् ।
सुहृदस्तर्पयन्कामैस्त्वमेवात्रानुशाधि माम् २८
अद्यार्य मुदिताः सन्तु सुहृदस्तेऽभिषेचने ।
अद्य भीताः पलायन्तु दुष्प्रदास्ते दिशो दश २९
आक्रोशं मम मातुश्च प्रमृज्य पुरुषर्षभ ।
अद्य तत्रभवन्तं च पितरं रक्ष किल्बिषात् ३०
शिरसा त्वाभियाचेऽहं कुरुष्व करुणां मयि ।
बान्धवेषु च सर्वेषु भूतेष्विव महेश्वरः ३१
अथवा पृष्ठतः कृत्वा वनमेव भवानितः ।
गमिष्यति गमिष्यामि भवता सार्धमप्यहम् ३२
तथाभिरामो भरतेन ताम्यता प्रसाद्यमानः शिरसा महीपतिः ।

ऋत्विज एकत्र जमून येथेंच तुला राज्याभिषेक करीत आणि राज्याभिषेक झाल्यावर मरुद्गणांसह ज्याप्रमाणें इंद्र जातो, त्याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानें शत्रुपक्षीय लोकांना जिंकून तूं प्रजेचें परिपालन करण्याकरितां आमच्याबरोबर अयोध्येमध्यें चल व तिन्ही ऋणांची फेड करीत, दुष्टांचा चांगला नाश करीत आणि सुहृदांना इष्ट वस्तु देऊन संतुष्ट करीत तूंच अयोध्येमध्यें राहून मला आज्ञा करीत जा. हे आर्य ! आज तुला राज्याभिषेक झाल्यावर तुझ्या आप्तेष्टांना आनंद होईल आणि तुला दुःख देणारे भयभीत होऊन रानोमाळ पळत सुटतील, हे पुरुषश्रेठा ! माझ्या मातेवर असलेला अत्यंत निंद्य असा हा लोकापवाद निरस्तारून तूं आज त्या पूज्य पित्याचें नरकापासून रक्षण कर. (२६-३०)

"मी तुझ्या पायावर मस्तक ठेवून तुझी प्रार्थना करीत आहें. यासाठीं भूतमात्रावर कृपा करणाऱ्या महेश्वराप्रमाणें तूं माझ्यावर आणि सर्व बांधवांवर कृपा कर. अथवा माझ्या प्रार्थनेकडे दुर्लक्ष करून आपण जर यावर वनामध्येंच रहाणार असाल तर मीहीं आपणाबरोबर वनामध्यें येईन." याप्रमाणें खेदोद्गार काढीत पायांवर मस्तक ठेवून भरत पृथ्वीपति रामाची प्रार्थना करूं

न चैव चक्रे गमनाय सत्त्ववान्मतिं पितुस्तद्वचने प्रतिष्ठितः ३३
तदद्भुतं स्थैर्यमवेक्ष्य राघवे समं जनो हर्षमवाप दुःखितः ।
न यात्ययोध्यामिति दुःखितोऽभवत्स्थिरप्रतिज्ञत्वमवेक्ष्य हर्षितः ३४
तमृत्विजो नैगमयूथवल्लभास्तथा विसंज्ञाश्रुकलाश्च मातरः ।
तथा ब्रुवाणं भरतं प्रतुष्टुवुः प्रणम्य रामं च ययाचिरे सह ३५

इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तोत्तरशततमः सर्गः ॥१०७॥

अष्टोत्तरशततमः सर्गः । [२९७२]

पुनरेवं ब्रुवाणं तं भरतं लक्ष्मणाग्रजः ।
प्रत्युवाच ततः श्रीमाञ्ज्ञातिमध्ये सुसत्कृतः १
उपपन्नमिदं वाक्यं यस्त्वमेवमभाषथाः ।
जातः पुत्रो दशरथात्कैकेय्यां राजसत्तमात् २
पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।

---

लागला असतांही पित्याच्या त्याच शब्दासाठीं हट्ट धरलेल्या ' वनांत राहण्याच्याच निश्चय करून बसलेल्या ' सत्वशील रामानें अयोध्येला परत जाण्याचें मनांत आणलें नाहीं तेव्हां रामाच्या ठिकाणीं असलेलें तें अद्भुत स्थैर्य पाहून पूर्वीं तेथें आलेल्या दुःखी लोकांना दुःखांतहि हर्ष झाला. राम अयोध्येला येत नाहीं म्हणून त्यांना दुःख झालें आणि त्याची दृढ प्रतिज्ञा पाहून त्यांना आनंदहि झाला असो. ऋत्विज, नागरिक लोकांच्या समुदायांतील मुख्य आणि भान नाहींसें झालेल्या व अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या माता, या सर्वांनीं तशाप्रकारें बोलत असलेल्या त्या भरताची प्रशंसा केली आणि सर्वांनीं मिळून त्या ऋत्विज आदि लोकांनीं अयोध्येला येण्याविषयीं रामाची हातांपायां पडून विनवणी केली. (३१-३५)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंसातवा सर्ग संपला. ॥१०७॥

अशाप्रकारें पुनः भाषण करणाऱ्या त्या भरताला आप्तेष्टांसमक्ष अत्यंत मान्य असा वैभवशाली राम म्हणाला, " याप्रमाणें बोलणें तुला योग्यच आहे. कारण राजश्रेष्ठ दशरथापासून कैकयीला झालेला तूं पुत्र आहेस. हे भरता !

मातामहे समाश्रौषीद्राज्यशुल्कमनुत्तमम् ३
देवासुरे च संग्रामे जनन्यै तव पार्थिवः।
संप्रहृष्टो ददौ राजा वरमाराधितः प्रभुः ४
ततः सा संप्रतिश्राव्य तव माता यशस्विनी।
अयाचत नरश्रेष्ठं द्वौ वरौ वरवर्णिनी ५
तव राज्यं नरव्याघ्र मम प्रव्राजनं तथा।
तच्च राजा तथा तस्यै नियुक्तः प्रददौ वरम् ६
तेन पित्राहमप्यत्र नियुक्तः पुरुषर्षभ।
चतुर्दश वने वासं वर्षाणि वरदानिकम् ७
सोऽहं वनमिदं प्राप्तो निर्जनं लक्ष्मणान्वितः।
सीतया चाप्रतिद्वन्द्वः सत्यवादे स्थितः पितुः ८
भवानपि तथेत्येव पितरं सत्यवादिनम्।
कर्तुमर्हसि राजेन्द्र क्षिप्रमेवाभिषिञ्चनात् ९

---

पूर्वी आपल्या वडिलांनीं जेव्हां तुझ्या मातेशीं विवाह केला तेव्हां तुझ्या आजापाशीं "हिला जो पुत्र होईल, त्याला मी राज्य देईन." अशी त्यांनीं प्रतिज्ञा केलेली आहे. कन्येबद्दल राजरूपी उत्तम द्रव्य आपल्या पित्यानें तुला देण्याची प्रतिज्ञा तुझ्या आजापाशीं करून तुझ्या मातेचें पाणिग्रहण केलें होतें. शिवाय, देवदैत्यांच्या संग्रामामध्यें तुझ्या मातेनें त्या राजाची सेवा केली होती म्हणून त्यानें संतुष्ट होऊन तुझ्या मातेला दोन वर दिले होते. तेव्हां दोन वर पूर्ण करण्याची प्रतिज्ञा त्या वेळीं त्याच्याकडून करवून घेऊन स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेल्या तुझ्या यशस्विनी मातेनें, हे पुरुषश्रेष्ठ भरता! तुला राज्य आणि मला वनवास असे दोन वर त्या पुरुषश्रेष्ठ दशरथराजापाशीं मागून घेतले आणि त्याप्रमाणें वचनबद्ध झालेल्या त्या राजानें तिला तसा वर दिला, आणि हे पुरुषश्रेष्ठ भरता! वर दिल्यामुळें चौदा वर्षें वनामध्यें राहण्याविषयीं वडिलांनीं मला आज्ञा केली. (१-७)

"तेव्हां पित्याचें सत्यवचन परिपालन करण्याविषयीं तत्पर व स्पर्धाभावानें विरहित असलेला मी सीता आणि लक्ष्मण यांसह निर्जन वनामध्यें आलों आहे. तुलाही पित्याची राज्य करण्याविषयीं तशी आज्ञाच झालेली आहे. तेव्हां, हे

ऋणान्मोचय राजानं मत्कृते भरत प्रभुम् ।
पितरं त्राहि धर्मज्ञ मातरं चाभिनन्दय १०
श्रूयते धीमता तात श्रुतिर्गीता यशस्विना
गयेन यजमानेन गयेष्वेव पितॄन्प्रति ११
पुन्नाम्नो नरकाद्यस्मात्पितरं त्रायते सुतः ।
तस्मात्पुत्र इति प्रोक्तः पितॄन्यः पाति सर्वतः १२
एष्टव्या बहवः पुत्रा गुणवन्तो बहुश्रुताः ।
तेषां वै समवेतानामपि कश्चिद्गयां व्रजेत् १३
एवं राजर्षयः सर्वे प्रतीता रघुनन्दन ।
तस्मात्त्राहि नरश्रेष्ठ पितरं नरकात्प्रभो १४
अयोध्यां गच्छ भरत प्रकृतीरुपरञ्जय ।
शत्रुघ्नसहितो वीर सह सर्वैर्द्विजातिभिः १५
प्रवेक्ष्ये दण्डकारण्यमहमप्यविलम्बयन् ।
आभ्यां तु सहितो वीर वैदेह्या लक्ष्मणेन च १६
त्वं राजा भरत भव स्वयं नराणां वन्यानामहमपि राजराण्मृगाणाम्

राजेंद्रा भरता ! स्वतः लवकर राज्याभिषेक करून घेऊन तूं आपल्या पित्याची प्रतिज्ञा शेवटास ने. भरता ! माझ्याकरितां त्या श्रेष्ठ राजाला तूं ऋणातून मुक्त कर आणि हे धर्मवेत्त्या ! पित्याला सद्गति देऊन मातेचें अभिनंदन कर. भरता ! गयाप्रदेशामध्यें यशस्वी व ज्ञानी गय यज्ञ करीत असतांना पितरांना उद्देशून त्यानें एक वचन उच्चारिलेलें प्रसिद्ध आहे. " पुन्नामक नरकापासून मुलगा ज्याअर्थीं पित्याचें रक्षण करतो, त्याअर्थीं त्याला पुत्र असें म्हणतात. गुणी आणि ज्ञानी असे पुष्कळ पुत्र होण्याची इच्छा बाळगावी; म्हणजे सर्वांपैकीं एखादा तरी गयेला जाईल. " अशा अर्थाची ती श्रुति आहे. रघुनंदना ! याप्रमाणें सर्व राजर्षींचा यावर विश्वास आहे. तर हे प्रभो ! पुरुषश्रेष्ठा भरता ! तूं नरकापासून पित्याचें रक्षण कर. (८–१४)

"हे वीर भरता ! सर्व विद्वानांसह शत्रुघ्नाला बरोबर घेऊन तूं अयोध्येला जा आणि प्रजाजनांना आनंद दे. हे वीरा ! सीता आणि लक्ष्मण यांसह मी आतां वेळ

गच्छ त्वं पुरवरमद्य संप्रहृष्टः संहृष्टस्त्वहमपि दण्डकान्प्रवेक्ष्ये १७
छायां ते दिनकरभाः प्रबाधमानं वर्षत्रं भरत करोतु मूर्ध्नि शीताम् ।
एतेषामहमपि काननद्रुमाणां छायां तामतिशयनीं शनैः श्रयिष्ये १८
शत्रुघ्नस्त्वतुलमतिस्तु ते सहायः सौमित्रिर्मम विदितः प्रधानमित्रम्
चत्वारस्तनयवरा वयं नरेन्द्रं सत्यस्थं भरत चराम मा विषीद १९
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे अष्टोत्तरशततमः सर्गः ॥१०८॥

नवोत्तरशततमः सर्गः ।  [३९९१]

आश्वासयन्तं भरतं जाबालिर्ब्राह्मणोत्तमः ।
उवाच रामं धर्मज्ञं धर्मापेतमिदं वचः  १
साधु राघव मा भूत्ते बुद्धिरेवं निरर्थिका ।
प्राकृतस्य नरस्येव ह्यार्यबुद्धेस्तपस्विनः  २
कः कस्य पुरुषो बन्धुः किमाप्यं कस्य केनचित् ।
एको हि जायते जन्तुरेक एव विनश्यति  ३

---

न लावतां दंडकारण्यामध्यें जातों. भरता ! तूं मनुष्याचा राजा हो आणि मीही वनांतील पशूंचा राजाधिराज होईन. तूं आज आनंदानें श्रेष्ठ नगरीमध्यें जा आणि मीही आनंदित होऊनच दंडकारण्यामध्यें प्रवेश करतों. भरता ! सूर्यकिरण निवारण करणारें छत्र, तुझ्या मस्तकावर थंडगार छाया करो आणि मीसुद्धां त्या छायेलाही मागें टाकणाऱ्या या वनवृक्षांच्या छायेचा हळूहळू आश्रय करितों. महा-बुद्धिमान् शत्रुघ्न जसा तुझा मित्र राहील, तसाच सुमित्रापुत्र लक्ष्मण माझा मुख्य मित्र होईल, हें प्रसिद्धच आहे. भरता ! आपण चौघे पुत्र राजाला सत्यप्रतिज्ञ करूं; तूं खेद करूं नको " (१५—१९)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंआठवा सर्ग संपला. ॥१०८॥

त्यानंतर भरताचें सांत्वन करीत असलेल्या धर्मज्ञ रामाबरोबर द्विजश्रेष्ठ जाबालि अशा अधार्मिक रीतीनें भाषण करूं लागला कीं, "राघवा उत्कृष्ट बुद्धि-शाली आणि तपस्वी अशा तुला सामान्य माणसाप्रमाणेंही निरर्थक बुद्धि शोभत नाहीं. अरे! कोण कोणाचा बंधु? आणि एकाचा दुसऱ्याशीं संबंध होऊन कोणाला

तस्मान्माता पिता चेति राम सज्जेत यो नरः ।
उन्मत्त इव स ज्ञेयो नास्ति कश्चिद्धि कस्यचित् ४
यथा ग्रामान्तरं गच्छन्नरः कश्चिद्बहिर्वसेत् ।
उत्सृज्य च तमावासं प्रतिष्ठेतापरेऽहनि ५
एवमेव मनुष्याणां पिता माता गृहं वसु ।
आवासमात्रं काकुत्स्थ सज्जन्ते नात्र सज्जनाः ६
पित्र्यं राज्यं समुत्सृज्य स नार्हसि नरोत्तम ।
आस्थातुं कापथं दुःखं विषमं बहुकण्टकम् ७
समृद्धायामयोध्यायामात्मानमभिषेचय ।
एकवेणीधरा हि त्वा नगरी संप्रतीक्षते ८
राजभोगाननुभवन्महार्हान्पार्थिवात्मज ।
विहर त्वमयोध्यायां यथा शक्रस्त्रिविष्टपे ९
न ते कश्चिद्दशरथस्त्वं च तस्य न कश्चन ।
अन्यो राजा त्वमन्यस्तु तस्मात्कुरु यदुच्यते १०

---

काय मिळणार आहे? अरे! प्राणी हा एकटाच जन्मास येतो आणि एकटाच नष्ट होतो. तर रामा! ही माता आणि हा पिता अशा समजुतीनें जो पुरुष आसक्त होऊन राहतो, तो उन्मत्त आहे असें समजावें; कारण, कोणी कोणाचा नाहीं. ज्याप्रमाणें परगांवीं जाण्यासाठीं निघलेला कोणी तरी पुरुष कोठें तरी मुक्कामाला रहातो आणि तें निवासस्थान सोडून दुसऱ्या दिवशीं पुढें चालता होतो, त्याप्रमाणें हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामा! पिता, माता, घर व द्रव्य हीं मनुष्यांना प्रवासी लोकांच्या निवासस्थानासारखीं आहेत आणि म्हणून यांचे ठिकाणीं सज्जन आसक्ति ठेवीत नाहींत. (१–६)

"तर हे पुरुषोत्तमा! परंपरागत राज्याचा त्याग करून दुःखदायक, गहन आणि असंख्य कंटकांनीं भरलेला वनमार्ग स्वीकारणें तुला योग्य नाहीं. समृद्ध अयोध्येमध्यें तूं स्वतःला राज्याभिषेक करून घे. विरहातुर स्त्रीप्रमाणें ती अयोध्यानगरी तुझी वाट पहात आहे. तर हे राजपुत्रा! स्वर्गामध्यें विहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें मोठमोठ्या राजभोगांचा अनुभव घेत तूं अयोध्येमध्यें आनंदानें कालक्रमण कर.

बीजमात्रं पिता जन्तोः शुक्रं शोणितमेव च ।
संयुक्तमृतुमन्मात्रा पुरुषस्येह जन्म तत् ११
गतः स नृपतिस्तत्र गन्तव्यं यत्र तेन वै ।
प्रवृत्तिरेषा भूतानां त्वं तु मिथ्या विहन्यसे १२
अर्थे धर्मपरा ये ते तांस्ताञ्शोचामि नेतरान् ।
ते हि दुःखमिह प्राप्य विनाशं प्रेत्य लेभिरे १३
अष्टकापितृदैवत्यमित्ययं प्रसृतो जनः ।
अन्नस्योपद्रवं पश्य मृतो हि किमशिष्यति १४
यदि भुक्तमिहान्येन देहमन्यस्य गच्छति ।
दद्यात्प्रवसतां श्राद्धं न तत्पथ्यशनं भवेत् १५
दानसंवनना ह्येते ग्रन्था मेधाविभिः कृताः ।

दशरथ तुझा कोणी नव्हे व तूंहि त्याचा कोणी नव्हेस. तो वेगळा. आणि तूं वेगळा. यासाठीं मी सांगतों तसें कर. (७-१०)

"पिता हें प्राण्याचें केवल निमित्तकारण आहे. ऋतुमती मातेनें गर्भामध्यें धारण केलेलें आणि एकमेकांत मिश्र झालेलें शुक्र व शोणितच इहलोकीं पुरुषाच्या जन्माचें साधन होय. राजाला जिकडे जावयाचें होतें, तिकडे तो गेला आणि अशा रीतीनें जाणें हें प्राण्यांच्या स्वभावाला धरूनच आहे. परंतु तूं मात्र विनाकारण राज्यरूपी पुरुषार्थाला मुकत आहेस. प्रत्यक्ष अर्थ वढून आला असतां त्याचा त्याग करून ज्यांनीं ज्यांनीं धर्माचा अवलंब केला, त्या त्या पुरुषांबद्दल मला फार वाईट वाटतें; इतरांबद्दल तितकेंसें वाटत नाहीं. कारण अर्थाचा त्याग करून धर्माच्या मागें लागलेले ते लोक इहलोकीं दुःख भोगून शेवटीं नाशच पावले आहेत. अष्टकाआदि करून श्राद्धें करण्याकडे या लोकांची प्रवृत्ति झालेली आहे; परंतु हे लोक अशा रीतीनें अन्नाचा केवल नाश करीत आहेत; हें तूंच विचार करून पहा. कारण मेल्यानंतर कोणाला काय खातां येईल ? इहलोकीं एकानें भोजन केलेलें जर दुसऱ्याच्या देहामध्यें जात असेल तर प्रवासाला निघालेल्या लोकांकरितां घरीं श्राद्ध करून लोकांना जेवायाला घालावें म्हणजे झालें; प्रवाशाबरोबर शिधोरी वगैरे देण्याचें कारणच नाहीं. ( ११-१५ )

**यजस्व देहि दीक्षस्व तपस्तप्यस्व संत्यज १६**
**स नास्ति परमित्येतत्कुरु बुद्धिं महामते।**
**प्रत्यक्षं यत्तदातिष्ठ परोक्षं पृष्ठतः कुरु १७**
**सतां बुद्धिं पुरस्कृत्य सर्वलोकनिदर्शिनीम्।**
**राज्यं स त्वं निगृह्णीष्व भरतेन प्रसादितः १८**

इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे नवोत्तरशततमः सर्गः ॥१०९॥

दशोत्तरशततमः सर्गः। [४००९]

**जाबालेस्तु वचः श्रुत्वा रामः सत्यपराक्रमः।**
**उवाच परया सूक्त्या बुद्ध्या विप्रतिपन्नया १**
**भवान्मे प्रियकामार्थं वचनं यदिहोक्तवान्।**
**अकार्यं कार्यसंकाशमपथ्यं पथ्यसंनिभम् २**
**निर्मर्यादस्तु पुरुषः पापाचारसमन्वितः।**

---

"व्यापार वगैरे करून उपजीविका करण्यांत कांहीं कष्ट करावे लागतात असें समजून गरिबांना फसविण्याकरितां धूर्त बुद्धिमान् लोकांनीं दानाकडे लोकांना वळविणारे असें हे "यज्ञयाग करा, दान द्या, दीक्षा घ्या, तपश्चर्या करा, द्रव्याचा त्याग करा" वगैरे प्रकारच्या विधींनीं भरलेले ग्रंथ करून ठेविले आहेत. तेव्हां हे महाबुद्धिमाना! परलोकसाधन असा धर्म म्हणून कांहीं नाहीं, हें तूं पक्कें समज. जें जें प्रत्यक्ष असेल तेंच करीत जा आणि त्याखेरीज इतराकडे दुर्लक्ष करीत जा. सर्व लोकांना मान्य असलेल्या प्रत्यक्ष प्रमाणवादी सज्जनांच्या विचारालाच मान देऊन भरतानें प्रार्थना केल्याप्रमाणें तूं राज्याचा स्वीकार कर." (१६-१८)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंनववा सर्ग संपला ॥ १०९ ॥

जाबालीचें भाषण ऐकल्यावर जाबालीनें प्रतिपादन केलेल्या नास्तिकवादाच्या योगानें न चळणाऱ्या बुद्धीनें युक्त असलेला अमोघपराक्रमी राम शास्त्रादिकांचें अवलंबन करून बोलूं लागला- "प्रीतीला कारण असलेला विषयोपभोग मला मिळावा, यासाठीं आपण जे येथें भाषण केलें तें जरी करण्याला योग्य असें भासणारें आहे, तरी वस्तुतः करण्याला अयोग्यच होय आणि दिसण्यांत जरी तें

मानं न लभते सत्सु भिन्नचारित्रदर्शनः ३
कुलीनमकुलीनं वा वीरं पुरुषमानिनम्।
चारित्रमेव व्याख्याति शुचिं वा यदि वाशुचिम् ४
अनार्यस्त्वार्यसंस्थानः शौचाद्धीनस्तथा शुचिः।
लक्षण्यवदलक्षण्यो दुःशीलः शीलवानिव ५
अधर्मं धर्मवेषेण यद्यहं लोकसंकरम्।
अभिपत्स्ये शुभं हित्वा क्रियां विधिविवर्जिताम् ६
कश्चेतयानः पुरुषः कार्याकार्यविचक्षणः।
बहु मन्येत मां लोके दुर्वृत्तं लोकदूषणम् ७
कस्य यास्याम्यहं वृत्तं केन वा स्वर्गमाप्नुयाम्।
अनया वर्तमानोऽहं वृत्त्या हीनप्रतिज्ञया ८
कामवृत्तोऽन्वयं लोकः कृत्स्नः समुपवर्तते।

सुखकारक दिसलें तरी त्याचा परिणाम दुःखकारकच होणार आहे. कारण शास्त्रविरुद्ध आचरण प्रतिपादन करणाऱ्या चार्वाकादिकांच्या ग्रंथांवर विश्वास ठेवून वैदिक धर्माची मर्यादा उल्लंघन करणारा जो पुरुष पापाचरण करूं लागतो, त्याला सज्जनांमध्यें मान मिळत नाहीं. पुरुष चांगल्या कुलांतला आहे किंवा वाईट कुलांतला आहे; वीर आहे किंवा भ्याड आहे आणि पवित्र आहे किंवा अपवित्र आहे हें सर्व त्याच्या वर्तनावरून समजून येतें. वस्तुतः दुष्ट असून सज्जनासारखा भासणाऱ्या, अपवित्र असूनही शुचिर्भूत दिसणाऱ्या, अवलक्षणी असूनही लोकांना लक्षणसंपन्न वाटणाऱ्या आणि दुःशील असूनही सुशीलाप्रमाणें भासणाऱ्या पुरुषाप्रमाणें धर्माच्या मिषानें मी जर लोकसंकर करणाऱ्या अधर्माचें अवलंबन करीन आणि चांगल्या कर्माचा त्याग करून विधिविरुद्ध कर्म जर मी करूं लागेन तर सदसद्विचार करणारा कोण बरें ज्ञानी पुरुष, स्वतःच्या अधर्माचरणानें लोकांनाही अधर्ममार्गाला लावणाऱ्या मला दुराचाऱ्याला बहुमान देईल? (१-७)

"अशा या तुम्हीं सांगितलेल्या वृत्तीनें मी वागूं लागलों असतां यांत सत्यपालनरूपी प्रतिज्ञेचा भंग होणार आहे आणि मग कोणत्या साधनानें मी स्वर्गाला जाऊं बरें? माझ्या पूर्वजांपैकीं कोणी असें वर्तन केलें आहे कीं त्यांच्या या अशा

यद्वृत्ताः सन्ति राजानस्तद्वृत्ताः सन्ति हि प्रजाः ९
सत्यमेवानृशंसं च राजवृत्तं सनातनम् ।
तस्मात्सत्यात्मकं राज्यं सत्ये लोकः प्रतिष्ठितः १०
ऋषयश्चैव देवाश्च सत्यमेव हि मेनिरे ।
सत्यवादी हि लोकेऽस्मिन्परं गच्छति चाक्षयम् ११
उद्विजन्ते यथा सर्पान्नरादनृतवादिनः ।
धर्मः सत्यपरो लोके मूलं सर्वस्य चोच्यते १२
सत्यमेवेश्वरो लोके सत्ये धर्मः सदाश्रितः ।
सत्यमूलानि सर्वाणि सत्यान्नास्ति परं पदम् १३
दत्तमिष्टं हुतं चैव तप्तानि च तपांसि च ।
वेदाः सत्यप्रतिष्ठानास्तस्मात्सत्यपरो भवेत् १४
एकः पालयते लोकमेकः पालयते कुलम् ।

---

वर्तनाचें मी अनुकरण करावें ? शिवाय, तुमच्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलों असतां मी स्वेच्छाचारी होईन आणि मला पाहून हें सगळें जग स्वेच्छाचारी होईल. कारण जसें राजांचें आचरण असतें तसेंच त्यांच्या प्रजाजनांचें आचरण होणार. सत्यवचन आणि भूतदया हाच राजांचा सनातन आचार होय आणि ज्याअर्थी राजाचें वर्तन सत्यरूप आहे, त्याअर्थी राजांचें राज्यही सत्यावरच अवलंबून आहे; इतकेंच नव्हे, परंतु सर्व जगही सत्याच्याच आधारावर टिकून राहिलें आहे. (८–१०)

''ऋषि आणि देव यांनीं सत्यालाच मान दिला असून सत्यवादी पुरुषालाच इहलोकीं अक्षय आणि श्रेष्ठ अशा ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. लोक ज्याप्रमाणें सर्पाची भीति बाळगतात, त्याप्रमाणें खोटें बोलणाऱ्या लोकांनांही भीत असतात. सत्य ज्यामध्यें प्रधान आहे, तोच धर्म सर्वांचें मूळ होय, जगामध्यें ईश्वर सत्य याच नांवानें प्रसिद्ध आहे, धर्म नेहमीं सत्याचेंच अवलंबन करून राहिलेला आहे, सर्व गोष्टी सत्यमूलकच आहेत आणि सत्यापेक्षां दुसरें कोणतेंही स्थान श्रेष्ठ नाहीं. दिलेलें दान, केलेलें हवन आणि आचरिलेलीं तपें हीं सर्व सत्यावरच आधारलेलीं असून वेद हे सत्याच्याच आधारावर आहेत. यासाठीं पुरुषानें सत्यनिष्ठ असावें.

मज्जत्येको हि निरय एकः स्वर्गे महीयते　　१५
सोऽहं पितुर्निदेशं तु किमर्थं नानुपालये ।
सत्यप्रतिश्रवः सत्यं सत्येन समयीकृतम्　　१६
नैव लोभान्न मोहाद्वा न चाज्ञानात्तमोऽन्वितः ।
सेतुं सत्यस्य भेत्स्यामि गुरोः सत्यप्रतिश्रवः　　१७
असत्यसंधस्य सतश्चलस्यास्थिरचेतसः ।
नैव देवा न पितरः प्रतीच्छन्तीति नः श्रुतम्　　१८
प्रत्यगात्ममिमं धर्मं सत्यं पश्याम्यहं ध्रुवम् ।
भारः सत्पुरुषैश्चीर्णस्तदर्थमभिनन्द्यते　　१९
क्षात्रं धर्ममहं त्यक्ष्ये ह्यधर्मं धर्मसंहितम् ।
क्षुद्रैर्नृशंसैर्लुब्धैश्च सेवितं पापकर्मभिः　　२०

एक राज्याचें परिपालन करीत असतो, एक कुलाचें रक्षण करीत असतो, एक दुःखाचा अनुभव घेत असतो आणि एक सुखाचा उपभोग घेत असतो.×(११-१५)

"तेव्हां माझ्या सत्यप्रतिज्ञ व सदाचारसंपन्न पित्यानें सत्यपरिपालन करण्याकरितां मला जी आज्ञा केली, ती त्याची आज्ञा मी कां म्हणून पाळूं नये ? पित्यासमक्ष सत्यपरिपालन करण्याची प्रतिज्ञा केली असतांना मी लोभानें, विस्मृतीनें अथवा अज्ञानानें मोहित होऊन सत्याच्या मर्यादेचें अतिक्रमण केव्हांही करणार नाहीं. असत्यवचनी आणि चंचल बुद्धीच्या पुरुषानें दिलेलें हव्य व कव्य देव आणि पितर घेत नाहींत असें आम्हीं ऐकिलें आहे. जीवांसाठा प्रवृत्त झालेला हा सत्यपालनरूपी धर्म सर्व धर्मांमध्यें मी मुख्य समजत आहें व या सत्यपालनरूपी भाराचा स्वीकार चांगल्या चांगल्या लोकांनीं केला असल्यामुळें मीही त्याचा आदरच करीत आहें. क्षुद्र, दुष्ट, लोभी आणि पापकर्मी पुरुषांनीं सेविलेला हा वस्तुतः अधर्म असून धर्मासारखा भासणाऱ्या या पित्याच्या आज्ञेला न जुमानतां व राज्याचा स्वीकार करून मिळविलेल्या क्षात्रधर्माचा मी त्याग करतों. (१६-२०)

× म्हणजे प्रत्येक प्राणी आपआपल्या सुकृत किंवा दुष्कृतानुसार पुण्याचें किंवा दुष्कृताचें फल भोगीत असतो म्हणून मनुष्यानें सत्याला सोडूं नये. असा रामाच्या म्हणण्याचा आशय.

कायेन कुरुते पापं मनसा संप्रधार्य तत्।
अनृतं जिह्वया चाह त्रिविधं कर्म पातकम् २१
भूमिः कीर्तिर्यशो लक्ष्मीः पुरुषं प्रार्थयन्ति हि।
सत्यं समनुवर्तन्ते सत्यमेव भजेत्ततः २२
श्रेष्ठं ह्यनार्यमेव स्याद्यद्भवानवधार्य माम्।
आह युक्तिकरैर्वाक्यैरिदं भद्रं कुरुष्व ह २३
कथं ह्यहं प्रतिज्ञाय वनवासमिमं गुरोः।
भरतस्य करिष्यामि वचो हित्वा गुरोर्वचः २४
स्थिरा मया प्रतिज्ञाता प्रतिज्ञा गुरुसंनिधौ।
प्रहृष्टमानसा देवी कैकेयी चाभवत्तदा २५
वनवासं वसन्नेव शुचिर्नियतभोजनः।
मूलपुष्पफलैः पुण्यैः पितॄन्देवांश्च तर्पयन् २६
संतुष्टपञ्चवर्गोऽहं लोकयात्रां प्रवाहये।
अकुहः श्रद्दधानः सन्कार्याकार्यविचक्षणः २७

"मनामध्यें प्रथम विचार करून आणि जिव्हेनें उच्चार करून नंतर पुरुष शरिरानें पाप करीत असतो. तेव्हां क्रियारूपी पाप त्रिविध पापांचें उत्पादक आहे. भूमि, कीर्ति, यश व लक्ष्मी हीं सत्यनिष्ठ पुरुषांची अपेक्षा करीत असतात व शिष्ट लोकही सत्यालाच अनुसरून वागत असतात. यासाठीं पुरुषानें सत्याचेंच अवलंबन करावें. राज्य करणें हेंच कल्याणकारक आहे म्हणून तूं राज्यच कर असें जें आपण केवळ शुष्क तर्कमूलक वाक्यांनीं अत्यंत विचारपूर्वक व श्रेष्ठ आहे असें आपल्याशीं ठरवून जें भाषण केलेंत तें अन्यायच आहे. पित्यापाशीं मी वनांत जाण्याची प्रतिज्ञा केली असून त्या त्याच्या वचनाची पर्वा न करतां भरताच्या सांगण्याप्रमाणें मला कसें वागतां येईल ? पित्यापाशीं मी निश्चयपूर्वक प्रतिज्ञा केलेली असून देवी कैकेयीच्याही मनाला त्या वेळीं आनंद झालेला आहे. (२१–२५)

"यासाठीं पवित्र मुळें, फुलें आणि फळें यांनीं देवपितरांचें संतर्पण करीत करीत मी नियमित आहार करून व पवित्र राहून वनामध्येंच राहीन. इंद्रियें ताब्यांत ठेवून व सदसद्विचार करून निष्कपटपणानें श्रद्धापूर्वक स्वतःच्या आचरणानें मी

कर्मभूमिमिमां प्राप्य कर्तव्यं कर्म यच्छुभम्।
अग्निर्वायुश्च सोमश्च कर्मणां फलभागिनः २८
शतं क्रतूनामाहृत्य देवराट् त्रिदिवं गतः।
तपांस्युग्राणि चास्थाय दिवं प्राप्ता महर्षयः २९
अमृष्यमाणः पुनरुग्रतेजा निशम्य तन्नास्तिकवाक्यहेतुम्।
अथाब्रवीत्तं नृपतेस्तनूजो विगर्हमाणो वचनानि तस्य ३०
सत्यं च धर्मं च पराक्रमं च भूतानुकम्पां प्रियवादितां च।
द्विजातिदेवातिथिपूजनं च पन्थानमाहुस्त्रिदिवस्य सन्तः ३१
तेनैवमाज्ञाय यथावदर्थमेकोदयं संप्रतिपद्य विप्राः।
धर्मं चरन्तः सकलं यथावत्काङ्क्षन्ति लोकागममप्रमत्ताः ३२
निन्दाम्यहं कर्म कृतं पितुस्तद्यस्त्वामगृह्णाद्विषमस्थबुद्धिम्।
बुद्ध्यानयैवंविधया चरन्तं सुनास्तिकं धर्मपथादपेतम् ३३
यथा हि चोरः स तथा हि बुद्धस्तथागतं नास्तिकमत्र विद्धि।

पित्याचें वचन पाळण्याचा प्रयत्न यथाशक्ति चालू ठेवीन. या कर्मभूमीमध्यें आल्यावर जें चांगलें कर्म असेल तेंच करावें. अग्नि, वायु आणि चंद्र हे चांगल्या कर्माच्याच योगानें आपआपल्या योग्यतेला पोंचलेले आहेत. इंद्र शंभर यज्ञ करून स्वर्गाला गेला आणि महर्षींनाही उग्र तपश्चर्या करून स्वर्गप्राप्ति झाली."(२६-२९)

नास्तिकासारखें भाषण करणाऱ्या जाबालीचें तें भाषण ऐकून तें सहन न झाल्यामुळें तो उग्र तेजस्वी राजकुमार रामानें त्याच्या भाषणाचें पुनः खंडन सुरू केलें- "सत्य, धर्म, पराक्रम, भूतदया, गोड वाणी आणि ब्राह्मण, देव व अतिथि यांचें पूजन यांना ज्या अर्थी संतांनीं स्वर्गसाधन म्हटलें आहे व ज्याअर्थी त्या संतांच्या वचनावरूनच याप्रमाणें मुख्य फलदायी धर्म कोणता तो योग्य रीतीनें जाणून घेऊन व त्याचा निर्णय करून लक्षपूर्वक त्या धर्माचें यथाविधि पूर्णपणें आचरण करणारे ज्ञानी उत्तम लोक प्राप्त होण्याची इच्छा करतात, त्याअर्थी अत्यंत नास्तिक, धर्ममार्गविरुद्ध, वेदविरुद्ध असलेल्या बुद्धीनें युक्त आणि अशाप्रकारचें मत स्वीकारून लोकनाशाकरितां पृथ्वीवर हिंडणाऱ्या आपणाला याजक म्हणून माझ्या पित्यानें स्वीकारलें हें मी आपल्या

तस्माद्धि यः शक्यतमः प्रजानां स नास्तिकेनाभिमुखो बुधः स्यात् ३४
त्वत्तो जनाः पूर्वतरे द्विजाश्च शुभानि कर्माणि बहूनि चक्रुः ।
छित्त्वा सदेमं च परं च लोकं तस्माद्द्विजाः स्वस्ति कृतं हुतं च ३५
धर्मे रताः सत्पुरुषैः समेतास्तेजस्विनो दानगुणप्रधानाः ।
अहिंसका वीतमलाश्च लोके भवन्ति पूज्या मुनयः प्रधानाः ३६
इति ब्रुवन्तं वचनं सदोषं रामं महात्मानमदीनसत्त्वम् ।
उवाच पथ्यं पुनरास्तिकं च सत्यं वचः सानुनयं च विप्रः ३७
न नास्तिकानां वचनं ब्रवीम्यहं न नास्तिकोऽहं न च नास्ति किंचन
समीक्ष्य कालं पुनरास्तिकोऽभवं भवेय काले पुनरेव नास्तिकः ३८
स चापि कालोऽयमुपागतः शनैर्यथा मया नास्तिकवागुदीरिता ।

---

पित्याचें कृत्य अगदीं अयोग्य समजतों. ज्याप्रमाणें चोर त्याचप्रमाणें बौद्ध मतानुयायी समजावा आणि तथागत नांवाचा नास्तिक हाही तसाच समजावा. यासाठीं लोकांमध्यें जी कांहीं अतिशय कडक शिक्षा शक्य असेल ती नास्तिकांना द्यावी आणि शिक्षा देण्याचा अधिकार नसेल तर समंजस पुरुषानें नास्तिकापासून लांब व्हावें. (३०-३४)

"आपणांपेक्षां श्रेष्ठ असलेल्या लोकांनीं आणि ब्राह्मणांनीं ऐहिक व पारलौकिक फलाची अपेक्षा न धरतां हा वेदोक्त धर्म आहे असें समजूनच पुष्कळ शुभ कृत्यें केलीं आहेत, यासाठीं वेद प्रमाण मानूनच जे ज्ञानी अहिंसा, सत्य, तप, दान, परोपकार आणि यज्ञ करीत असतात आणि त्याचप्रमाणें जे धर्मनिष्ठ पुष्कळ दानधर्म करणारे, हिंसाशून्य, निर्मल आणि सत्पुरुषांशीं समागम करणारे असतात तेच श्रेष्ठ तेजस्वी मुनि लोकांमध्यें मान्य होतात." याप्रमाणें तो महात्मा उदार राम जाबालीची निर्भत्सना करूं लागला असतां तो जाबालि पुनः उत्कृष्ट अर्थानें युक्त, आस्तिकाला साजेलसें आणि सत्य भाषण त्याच्याशीं करूं लागला, तो म्हणाला "मी नास्तिकांची भाषा बोलणारा नाहीं, मी नास्तिकही नाहीं आणि परलोक वगैरे कांहीं नाहीं असें माझें मतही नाहीं. प्रसंग पाहून मी पुनः आस्तिक बनलों आहे आणि प्रसंग आल्यास फिरूनही नास्तिक होईन. तशीही वेळ आली होती, म्हणून मी तुला वनवासांतून परत फिरविण्याच्या

निवर्तनार्थं तव राम कारणात्प्रसादनार्थं च मयैतदीरितम् ३९

इत्यार्षे श्रीमद्रा०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे दशोत्तरशततमः सर्गः ॥११०॥

एकादशोत्तरशततमः सर्गः ।    [४०४८]

क्रुद्धमाज्ञाय रामं तु वसिष्ठः प्रत्युवाच ह ।
जाबालिरपि जानीते लोकस्यास्य गतागतिम् १
निवर्तयितुकामस्तु त्वामेतद्वाक्यमब्रवीत् ।
इमां लोकसमुत्पत्तिं लोकनाथ निबोध मे २
सर्वं सलिलमेवासीत्पृथिवी तत्र निर्मिता ।
ततः समभवद्ब्रह्मा स्वयंभूर्दैवतैः सह ३
स वराहस्ततो भूत्वा प्रोज्जहार वसुंधराम् ।
असृजच्च जगत्सर्वं सह पुत्रैः कृतात्मभिः ४
आकाशप्रभवो ब्रह्मा शाश्वतो नित्य अव्ययः ।
तस्मान्मरीचिः संजज्ञे मरीचेः कश्यपः सुतः ५

हेतूनें नास्तिकासारखें भाषण केलें आणि आतां तुला प्रसन्न करून घेण्याकरितां मीं हें असें भाषण करीत आहें." ( ३५-३९ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंदहावा सर्ग संपला. ॥११०॥

राम रागावलेला आहे हें पाहून वसिष्ठ त्याला म्हणाले, " हे लोक परलोकीं जाऊन पुनः येथें येत असतात, हें जाबालीलाहि माहीत आहे; परंतु, वनांतून तुला परत फिरविण्याच्या उद्देशानें त्यानें असें भाषण केलें. आतां हे राजा ! जगदुत्पत्तीविषयीं मी कांहीं सांगतों, तें ऐक. पूर्वी नुसतें पाणीच पाणी होतें आणि त्या पाण्यामध्यें पृथ्वी निर्माण केली. त्यानंतर ब्रह्मदेव इतर देवांसह उत्पन्न झाला. नंतर त्यानें विराट्स्वरूप ब्रह्मदेवाच्या विष्णुरूप अंशानें वराहरूप धारण करून पृथ्वीचा उद्धार केला आणि त्यानेंच विराट्पुरुषाच्या रजोगुणप्रधान अंशानें दक्षप्रभृति जितेंद्रिय पुत्रांसह सर्व जग उत्पन्न केलें. ईश्वरापासून शाश्वत, नित्य आणि अव्यय असा ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्या ब्रह्मदेवापासून मरीचि आणि मरीचीपासून कश्यप उत्पन्न झाला. ( १-५ )

विवस्वान्कश्यपाज्जज्ञे मनुर्वैवस्वतः स्वयम् ।
स तु प्रजापतिः पूर्वमिक्ष्वाकुस्तु मनोः सुतः ६
यस्येयं प्रथमं दत्ता समृद्धा मनुना मही ।
तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धि पूर्वकम् ७
इक्ष्वाकोस्तु सुतः श्रीमान्कुक्षिरित्येव विश्रुतः ।
कुक्षेरथात्मजो वीर विकुक्षिरुदपद्यत ८
विकुक्षेस्तु महातेजा बाणः पुत्रः प्रतापवान् ।
बाणस्य च महाबाहुरनरण्यो महातपाः ९
नानावृष्टिर्बभूवास्मिन्न दुर्भिक्षः सतां वरे ।
अनरण्ये महाराजे तस्करो वापि कश्चन १०
अनरण्यान्महाराज पृथू राजा बभूव ह ।
तस्मात्पृथोर्महातेजास्त्रिशङ्कुरुदपद्यत ११
स सत्यवचनाद्वीरः सशरीरो दिवं गतः ।
त्रिशङ्कोरभवत्सूनुर्धुन्धुमारो महायशाः १२
धुन्धुमारान्महातेजा युवनाश्वो व्यजायत ।

"कश्यपापासून विवस्वान् झाला. स्वतः मनु हाच विवस्वानाचा पुत्र असून तोच पहिला प्रजापति होय. इक्ष्वाकु हा मनूचा पुत्र होय. ज्याला मनूनें अगदीं प्रथमच ही समृद्ध पृथ्वी दिली तो इक्ष्वाकु अयोध्येतील पहिला राजा असें तूं समज. इक्ष्वाकूला कुक्षि म्हणून प्रसिद्ध असलेला एक शोभिवंत पुत्र होता आणि हे वीरा ! कुक्षीपासून विकुक्षि उत्पन्न झाला. प्रतापी व महातेजस्वी बाण हा विकुक्षीचा पुत्र असून महापराक्रमी व महातपस्वी अनरण्य हा बाणाचा पुत्र होय. हा सज्जनश्रेष्ठ राजा अनरण्य राज्य करीत असतांना अनावृष्टि, दुर्भिक्ष आणि चोर यांचा मुळींच उपद्रव नव्हता. ( ६–१० )

"हे राजा ! अनरण्यापासून पृथुराजा झाला व त्या पृथूपासून महातेजस्वी त्रिशंकु उत्पन्न झाला. तो वीर त्रिशंकु स्वतःच्या सत्य-पालनामुळें आणि विश्वामित्र मुनींच्या सत्यप्रतिज्ञेमुळें सशरीर स्वर्गाला गेला. महायशस्वी धुंधुमार हा त्रिशंकूचा पुत्र, धुंधुमारापासून महातेजस्वी युवनाश्व उत्पन्न झाला आणि

युवनाश्वसुतः श्रीमान्मांधाता समपद्यत १३
मांधातुस्तु महातेजाः सुसंधिरुदपद्यत ।
सुसंधेरपि पुत्रौ द्वौ ध्रुवसंधिः प्रसेनजित् १४
यशस्वी ध्रुवसंधेस्तु भरतो रिपुसूदनः ।
भरतात्तु महाबाहोरसितो नाम जायत १५
यस्यैते प्रतिराजान उदपद्यन्त शत्रवः ।
हैहयास्तालजङ्घाश्च शूराश्च शशाबिन्दवः १६
तांस्तु सर्वान्प्रतिव्यूह्य युद्धे राजा प्रवासितः ।
स च शैलवरे रम्ये बभूवाभिरतो मुनिः १७
द्वे चास्य भार्ये गर्भिण्यौ बभूवतुरिति श्रुतिः ।
तत्र चैका महाभागा भार्गवं देववर्चसम् १८
ववन्दे पद्मपत्राक्षी काङ्क्षिणी पुत्रमुत्तमम् ।
एका गर्भविनाशाय सपत्न्यै गरलं ददौ १९
भार्गवश्च्यवनो नाम हिमवन्तमुपाश्रितः ।

---

युवनाश्वाला वैभवशाली मांधाता नांवाचा मुलगा झाला. मांधात्यापासून महातेजस्वी सुसंधि आणि सुसंधीला ध्रुवसंधि व प्रसेनाजित् असे दोन पुत्र उत्पन्न झाले. ध्रुवसंधीपासून शत्रुनाशक यशस्वी भरत व महापराक्रमी भरताला असित या नांवाचा मुलगा झाला. (११–१५)

"त्या असिताचे हैहय, तालजंघ, शूर आणि शशबिंदु या नांवाचे शत्रु होते. त्यानें त्या सर्वांशीं युद्ध सुरू केलें, पण त्यांत त्याचा पराजय झाला व त्यांनीं त्याला हांकून दिल्यावर तो राजर्षि रम्य अशा हिमालय पर्वतावर जाऊन तेथेंच मरण पावला. त्यावेळीं त्याच्या दोन स्त्रिया गर्भिणी होत्या, अशी प्रसिद्धि आहे. त्यांपैकीं कमलपत्रासारख्या नेत्रांनीं युक्त असलेल्या एका महाभाग्यवती स्त्रीनें आपल्याला उत्कृष्ट पुत्र व्हावा हा उद्देश मनांत धरून देवासारख्या तेजस्वी च्यवन भार्गव मुनींना वंदन करून आपल्या गर्भस्थ पुत्राचें रक्षण व्हावें म्हणून प्रार्थना केली; आणि दुसरीनें गर्भाचा नाश करण्याकरितां त्या सवतीला विष दिलें. त्या समयीं हिमालय पर्वताचा आश्रय करून रहात असलेल्या त्या च्यवन भार्गव

तमृषिं साभ्युपागम्य कालिंदी त्वभ्यवादयत् २०
स तामभ्यवदत्प्रीतो वरेप्सुं पुत्रजन्मनि ।
पुत्रस्ते भविता देवि महात्मा लोकविश्रुतः २१
धार्मिकश्च सुभीमश्च वंशकर्ताऽरिसूदनः ।
श्रुत्वा प्रदक्षिणं कृत्वा मुनिं तमनुमान्य च २२
पद्मपत्रसमानाक्षं पद्मगर्भसमप्रभम् ।
ततः सा गृहमागम्य पत्नी पुत्रमजायत २३
सपत्न्या तु गरस्तस्यै दत्तो गर्भजिघांसया ।
गरेण सह तेनैव तस्मात्स सगरोऽभवत् २४
स राजा सगरो नाम यः समुद्रमखानयत् ।
दृष्ट्वा पर्वणि वेगेन त्रासमान इमाः प्रजाः २५
असमञ्जस्तु पुत्रोऽभूत्सगरस्येति नः श्रुतम् ।
जीवन्नेव स पित्रा तु निरस्तः पापकर्मकृत् २६

---

नामक ऋषींच्या जवळ जाऊन त्या कालिंदी नांवाच्या स्त्रीनें त्यांना नमस्कार केला. ( १६–२० )

"तेव्हां पुत्र व्हावा असा वर मिळण्याची वरप्राप्तीची इच्छा करणाऱ्या त्या कालिंदीला ते ऋषि प्रसन्न होऊन म्हणाले, " हे राजभार्ये ! तुला महात्मा, जगद्विख्यात, धार्मिक, दुष्टांना व दुर्जनांना फारच भयंकर, वंश चालविणारा आणि शत्रुनाशक असा पुत्र होईल." हें मुनींचें भाषण ऐकून ती कालिंदी त्या मुनींना प्रदक्षिणा करून व त्यांची अनुमति घेऊन तेथून निघाली. घरीं आल्यावर त्या राजपत्नीला कमलपत्रासारख्या नेत्रांनीं आणि कमलाच्या गाभ्या-सारख्या कांतीनें युक्त असलेला मुलगा झाला. सवतीनें गर्भाचा नाश करण्या-करितां तिला गर म्हणजे विष दिलें होतें. यामुळें तो पुत्र गरासह उत्पन्न झाला आणि म्हणून स-गर असें त्याचें नांव पडलें. त्या सगर राजानें पर्वकाळीं यज्ञ-दीक्षा घेतली असतां आपल्या ६००० पुत्रांकडून समुद्राजवळची जागा खणवून काढली, तेव्हां त्या खणण्याच्या वेगामुळें या सर्व प्रजा त्रासून गेल्या. (२१–२५)

"सगराला असमंज म्हणून एक पुत्र होता. तो दुष्कृत्यें करणारा असल्यामुळें

अंशुमानपि पुत्रोऽभूदसमञ्जस्य वीर्यवान्।
दिलीपोंऽशुमतः पुत्रो दिलीपस्य भगीरथः २७
भगीरथात्ककुत्स्थश्च काकुत्स्था येन तु स्मृताः।
काकुत्स्थस्य तु पुत्रोऽभूद्रघुर्येन तु राघवाः २८
रघोस्तु पुत्रस्तेजस्वी प्रवृद्धः पुरुषादकः।
कल्माषपादः सौदास इत्येवं प्रथितो भुवि २९
कल्माषपादपुत्रोऽभूच्छङ्खणस्त्विति विश्रुतः।
यस्तु तद्वीर्यमासाद्य सहसैन्यो व्यनीनशत् ३०
शङ्खणस्य तु पुत्रोऽभूच्छूरः श्रीमान्सुदर्शनः।
सुदर्शनस्याग्निवर्ण अग्निवर्णस्य शीघ्रगः ३१
शीघ्रगस्य मरुः पुत्रो मरोः पुत्रः प्रशुश्रुवः।
प्रशुश्रुवस्य पुत्रोऽभूदम्बरीषो महामतिः ३२
अम्बरीषस्य पुत्रोऽभून्नहुषः सत्यविक्रमः।
नहुषस्य च नाभागः पुत्रः परमधार्मिकः ३३

---

पित्यानें त्याला आजन्म ( तो मरेपर्यन्त ) वनवासाची शिक्षा देऊन हांकून दिलें होतें, तें आपल्या ऐकण्यांत आहेच. त्या असमंजालाही अंशुमान् म्हणून एक पराक्रमी पुत्र झाला. दिलीप हा अंशुमानाचा पुत्र असून भगीरथ दिलीपाचा पुत्र होय. भगीरथापासून ककुत्स्थ झाला व त्याच्यामुळें त्याच्या वंशजांना काकुत्स्थ ही संज्ञा मिळाली. त्या काकुत्स्थाला रघु नांवाचा पुत्र झाला व त्याच्यायोगानें त्याच्यापुढील वंशजांना राघव म्हणण्यांत आलें. रघूला जो तेजस्वी पुत्र झाला, तो प्रवृद्ध, पुरुषादक, कल्माषपाद आणि सौदास या चार नांवांनीं पृथ्वीवर प्रसिद्ध आहे. शंखण म्हणून प्रख्यात असा एक कल्माषपादाचा पुत्र होता. तो त्या आपल्या पित्याच्याच तावडींत सांपडून सैन्यासह नाश पावला. ( २६-३० )

"श्रीमान् आणि शूर असा सुदर्शन हा शंखणाचा पुत्र होय. त्या सुदर्शनाला अग्निवर्ण नांवाचाहि एक पुत्र होता आणि अग्निवर्णाचा शीघ्रग म्हणून पुत्र होता. शीघ्रगाला मरु, मरुला प्रशुश्रुव आणि प्रशुश्रुवाला महामति अंबरीष पुत्र

अजश्च सुव्रतश्चैव नाभागस्य सुतावुभौ ।
अजस्य चैव धर्मात्मा राजा दशरथः सुतः ३४
तस्य ज्येष्ठोऽसि दायादो राम इत्यभिविश्रुतः ।
तद्गृहाण स्वकं राज्यमवेक्षस्व जगन्नृप ३५
इक्ष्वाकूणां हि सर्वेषां राजा भवति पूर्वजः ।
पूर्वजे नावरः पुत्रो ज्येष्ठो राजाभिषिच्यते ३६
स राघवाणां कुलधर्ममात्मनः सनातनं नाद्य विहन्तुमर्हसि ।
प्रभूतरत्नामनुशाधि मेदिनीं प्रभूतराष्ट्रां पितृवन्महायशाः ३७

इत्यार्षे श्री० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकादशोत्तरशततमः सर्गः ॥१११॥

द्वादशोत्तरशततमः सर्गः । [४०८५]

वसिष्ठः स तदा राममुक्त्वा राजपुरोहितः ।
अब्रवीद्धर्मसंयुक्तं पुनरेवापरं वचः १
पुरुषस्येह जातस्य भवन्ति गुरवः सदा ।
आचार्यश्चैव काकुत्स्थ पिता माता च राघव २

---

झाला. अंबरीषाला अमोघपराक्रमी नहुष आणि नहुषाला नाभाग म्हणून अत्यंत धार्मिक पुत्र झाला. अज आणि सुव्रत हे उभयतां नाभागाचे पुत्र असून धर्मात्मा दशरथराजा हा अजाचा पुत्र होय व त्याच दशरथराजाचा तूं राम म्हणून प्रसिद्ध असा पुत्र आहेस. तर हे राजा ! आपल्या राज्याचा स्वीकार करून जगताचें परिपालन कर. सर्व इक्ष्वाकुवंशजांमध्यें ज्येष्ठ पुत्रच राजा होत आलेला आहे. ज्येष्ठ पुत्र जिवंत असतांना कनिष्ठ पुत्राला राज्याभिषेक होत नाहीं. तर हे महाकीर्तिमान् रामा ! आपल्या रघुवंशजांचा सनातन कुलधर्म आज नाहींसा न करतां रत्नांनीं व राष्ट्रांनीं संपन्न असलेल्या पृथ्वीचें तूं परिपालन कर. (३१–३७)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंअकरावा सर्ग संपला. ॥ १११ ॥

याप्रमाणें रामाशीं भाषण करून ते राजगुरु वसिष्ठ पुनः धर्मास धरूनच त्याला बोलूं लागले, “ हे ककुत्स्थकुलोत्पन्न राघवा ! उत्पन्न झालेल्या मनुष्याला

पिता ह्येनं जनयति पुरुषं पुरुषर्षभ ।
प्रज्ञां ददाति चाचार्यस्तस्मात्स गुरुरुच्यते ३
स तेऽहं पितुराचार्यस्तव चैव परंतप ।
मम त्वं वचनं कुर्वन्नातिवर्तेः सतां गतिम् ४
इमा हि ते परिषदो ज्ञातयश्च नृपास्तथा ।
एषु तात चरन्धर्मं नातिवर्तेः सतां गतिम् ५
वृद्धाया धर्मशीलाया मातुर्नार्हस्यवर्तितुम् ।
अस्या हि वचनं कुर्वन्नातिवर्तेः सतां गतिम् ६
भरतस्य वचः कुर्वन्याचमानस्य राघव ।
आत्मानं नातिवर्तेस्त्वं सत्यधर्मपराक्रम ७
एवं मधुरमुक्तः स गुरुणा राघवः स्वयम् ।
प्रत्युवाच समासीनं वसिष्ठं पुरुषर्षभः ८
यन्मातापितरौ वृत्तं तनये कुरुतः सदा ।

गुरु, आचार्य, पिता आणि माता पूज्य असतात. हे पुरुषश्रेष्ठा ! पुरुषाला जन्म पिता देतो; परंतु वेदविषयक बुद्धि आचार्य देतो; म्हणून त्याला गुरु असें म्हणतात. हे शत्रुतापना ! मी तुझाच नव्हे, परंतु तुझ्या पित्याचाही आचार्य आहें. यासाठीं, तूं माझ्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलास तर सज्जनांच्या मार्गाचें अतिक्रमण तुझ्याकडून होणार नाहीं. हे तुझे आप्तेष्ट, इतर लोक, बांधव आणि मांडलिक राजे आहेत. यांचें रक्षण करून धर्मानें तूं वागूं लागलास तर रामा ! सज्जनांच्या मार्गाचें तूं अतिक्रमण करीत आहेस, असें कधींच होणार नाहीं. वृद्ध आणि धर्मशील मातेचा अनादर करणें तर तुला योग्यच नाहीं आणि हिच्या म्हणण्याप्रमाणें वागूं लागलास तर सन्मार्गाचें उल्लंघन केल्यासारखें मुळींच होणार नाहीं. हे अमोघपराक्रमी सत्यधर्मनिष्ठ राघवा ! प्रत्यक्ष भरतच जर राज्य करण्याविषयीं तुला प्रार्थना करीत आहे, तर स्वतःचें वचन परत फिरविल्याचा दोष तुझ्याकडे येणार नाहीं." (१-७)

याप्रमाणें गुरूंनीं स्वतः मधुर शब्दांनीं त्या राघवाला सांगितलें असतां तो पुरुषश्रेष्ठ आपल्या जवळच बसलेल्या वसिष्ठांना म्हणाला, " आईबाप मुलावर जो

न सुप्रतिकरं तत्तु मात्रा पित्रा च यत्कृतम् ९
यथाशक्तिप्रदानेन स्वापनोच्छादनेन च ।
नित्यं च प्रियवादेन तथा संवर्धनेन च १०
स हि राजा दशरथः पिता जनयिता मम ।
अज्ञापयन्मां यत्तस्य न तन्मिथ्या भविष्यति ११
एवमुक्तेन रामेण भरतः प्रत्यनन्तरम् ।
उवाच विपुलोरस्कः सूतं परमदुर्मनाः १२
इह तु स्थण्डिले शीघ्रं कुशानास्तर सारथे ।
आर्यं प्रत्युपवेक्ष्यामि यावन्मे संप्रसीदति १३
निराहारो निरालोको धनहीनो यथा द्विजः ।
शये पुरस्ताच्छालायां यावन्मां प्रतियास्यति १४
स तु राममवेक्षन्तं सुमन्त्रं प्रेक्ष्य दुर्मनाः ।
कुशोत्तरमुपस्थाप्य भूमावेवास्थितः स्वयम् १५

उपकार नेहमीं करीत असतात. त्याचा प्रत्युपकार करतां येणें अगदीं अशक्य आहे. हवें तें देणें, निजविणें, अंगाला लावणें, गोड गोड बोलणें, खेळविणें इत्यादि गोष्टींच्या योगानें मातापितरांचे झालेले उपकार पुत्राच्या हातून फिटणें अशक्य आहे. त्या माझ्या जनक पित्या दशरथ राजानें जी मला आज्ञा केली आहे, ती कधींच असत्य होणार नाहीं." (८-११)

याप्रमाणें रामानें सांगितलें असतां भव्य वक्षस्थलानें युक्त असलेला भरत अत्यंत खिन्न होऊन जवळच असलेल्या सारथ्याला म्हणाला, "हे सारथ्या ! या ओट्यावर अगदीं दाराजवळच दर्भ पसर म्हणजे हे आर्या ! राम मजवर प्रसन्न होईपर्यंत त्याच्यासाठीं मी येथें दारांतच पडून राहतों. कांहींएक न खातां आणि दुसरीकडे न पाहतां एखादा द्रव्यहीन ब्राह्मण जसें आपलें द्रव्य परत मिळविण्याकरितां कुळाच्या दारांत धरणें घेऊन बसतो, तसा मीया पूर्ण शाले-पुढेंच माझ्या म्हणण्याला होकार देऊन राम माझ्या बरोबर अयोध्येला परत निघेपर्यंत पडून राहीन." याप्रमाणें भरतानें सांगितलें असतांही सुमंत्र रामाच्याच तोंडाकडे पहात आहे असें पाहून खिन्न झालेला भरत भूमीवर स्वतःच दर्भासन

तमुवाच महातेजा रामो राजर्षिसत्तमः ।
किं मां भरत कुर्वाणं तात प्रत्युपवेक्ष्यसे १६
ब्राह्मणो ह्येकपार्श्वेन नरान्रोद्धुमिहार्हति ।
न तु मूर्धाभिषिक्तानां विधिः प्रत्युपवेशने १७
उत्तिष्ठ नरशार्दूल हित्वैतद्दारुणं व्रतम् ।
पुरवर्यामितः क्षिप्रमयोध्यां याहि राघव १८
आसीनस्त्वेव भरतः पौरजानपदं जनम् ।
उवाच सर्वतः प्रेक्ष्य किमार्यं नानुशासथ १९
ते तदोचुर्महात्मानं पौरजानपदा जनाः ।
काकुत्स्थमभिजानीमः सम्यग्वदति राघवः २०
एषोऽपि हि महाभागः पितुर्वचसि तिष्ठति ।
अत एव न शक्ताः स्म व्यावर्तयितुमञ्जसा २१
तेषामाज्ञाय वचनं रामो वचनमब्रवीत् ।
एवं निबोध वचनं सुहृदां धर्मचक्षुषाम् २२

पसरून बसला. (१२-१५)

तेव्हां राजर्षिश्रेष्ठ व महातेजस्वी राम त्याला म्हणाला, " भरता ! मी काय तुझा अपराध केला आहे म्हणून तूं येथें धरणें धरून पडण्याचें मनांत आणलें आहेस ? एकाच कुशीवर राहून धरणें धरून पडण्यानें या ठिकाणीं लोकांना अडथळा करण्याचा अधिकार ब्राह्मणाला आहे; परंतु क्षत्रियांना हा धरणें धरून बसण्याचा प्रकार शास्त्रसंमत नाहीं. यासाठीं हे पुरुषश्रेष्ठा ! हें भयंकर व्रत सोडून देऊन येथून ऊठ आणि राघवा ! येथून लवकर अयोध्या नगरीमध्ये जा " असें राम म्हणाला, तेव्हां तो भरत तेथें बसूनच अयोध्या नगरींतील व देशांतील सर्व लोकांकडे पाहून " अरे ! श्रेष्ठ रामाला तुम्ही कां कांहींच कसें सांगत नाहीं ? " असें म्हणाला. तेव्हां ते अयोध्यानगरींतील व इतर ठिकाणचे लोक त्या महात्म्या भरताला म्हणाले, " हे काकुत्स्था ! रामाला तूं चांगलें सांगत आहेस हें आम्ही समजून आहोंत; परंतु हा महाभाग्यवान् राम पित्याची आज्ञाच धरून बसला असल्यामुळें त्याचें मन सहज फिरवितां येणें आम्हांस शक्य नाहीं." (१६-२१)

एतच्चैवोभयं श्रुत्वा सम्यक्संपश्य राघव ।
उत्तिष्ठ त्वं महाबाहो मां च स्पृश तथोदकम् २३
अथोत्थाय जलं स्पृष्ट्वा भरतो वाक्यमब्रवीत् ।
शृण्वन्तु मे परिषदो मन्त्रिणः शृणुयुस्तथा २४
न याचे पितरं राज्यं नानुशासामि मातरम् ।
एवं परमधर्मज्ञं नानुजानामि राघवम् २५
यदि त्ववश्यं वस्तव्यं कर्तव्यं च पितुर्वचः ।
अहमेव निवत्स्यामि चतुर्दश वने समाः २६
धर्मात्मा तस्य सत्येन भ्रातुर्वाक्येन विस्मितः ।
उवाच रामः संप्रेक्ष्य पौरजानपदं जनम् २७
विक्रीतमाहितं क्रीतं यत्पित्रा जीवता मम ।
न तल्लोपयितुं शक्यं मया वा भरतेन वा २८
उपाधिर्न मया कार्यो वनवासे जुगुप्सितः ।

---

हें त्यांचें भाषण ऐकून राम भरताला म्हणाला, " धर्मावर पूर्ण लक्ष ठेवणाऱ्या या लोकांचें हें बोलणें ऐक आणि तूं केलेलें व मी केलेलें दोहोंकडेही लक्ष दे आणि चांगला विचार कर. हे महापराक्रमी भरता ! ऊठ आणि हें भलतेंच कृत्य केल्याचा दोष नाहींसा होण्यासाठीं मला स्पर्श करून आचमन कर." याप्रमाणें रामानें सांगितल्यावर भरत आचमन करून म्हणाला, " सभ्यांनीं व मंत्र्यांनीं माझें म्हणणें ऐकावें. मी राज्याकरितां पित्याची प्रार्थना केली नाहीं, असा वर माग म्हणून मातेला सांगितलेंहि नाहीं आणि याप्रमाणें या श्रेष्ठ धर्मशील रामालाही मी वनांत जाण्याची परवानगी दिली नाहीं. तथापि पित्याची आज्ञा केवल आवश्यक कर्तव्य म्हणून पालन करावयाची, एवढ्याकरितांच जर वनामध्यें वास्तव्य करावयाचें असेल, तर मीच चौदा वर्षें वनांमध्यें घालवीन." (२२-२६)

हें आपल्या भावाचें-भरताचें-भाषण ऐकून रामाला फारच आश्चर्य वाटलें व तो नगरांतील व देशांतील लोकांना म्हणाला, "माझा पिता जिवंत असतांना त्यानें जें कांहीं कोणाला विकलें असेल, त्यानें जी कांहीं कोणापाशीं ठेव ठेविली असेल अथवा जें कांहीं किंमत देऊन विकत घेतलें असेल तें भरताला अथवा मला

युक्तमुक्तं च कैकेय्या पित्रा मे सुकृतं कृतम् २९
जानामि भरतं क्षान्तं गुरुसत्कारकारिणम् ।
सर्वमेवात्र कल्याणं सत्यसंधे महात्मनि ३०
अनेन धर्मशीलेन वनात्प्रत्यागतः पुनः ।
भ्रात्रा सह भविष्यामि पृथिव्याः पतिरुत्तमः ३१
वृतो राजा हि कैकेय्या मया तद्वचनं कृतम् ।
अनृतान्मोचयानेन पितरं तं महीपतिम् ३२

इत्यार्षे श्री०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्वादशोत्तरशततमः सर्गः ॥११२॥

त्रयोदशोत्तरशततमः सर्गः । [४११७]

तमप्रतिमतेजोभ्यां भ्रातृभ्यां रोमहर्षणम् ।
विस्मिताः संगमं प्रेक्ष्य समुपेता महर्षयः १
अन्तर्हिता मुनिगणाः स्थिताश्च परमर्षयः ।
तौ भ्रातरौ महाभागौ काकुत्स्थौ प्रशशंसिरे २

---

नाहींसें करतां येणार नाहीं. तेव्हां वनवासासंबंधानें स्वतः समर्थ असतां एखाद्या अशक्ताप्रमाणें मला प्रतिनिधि नेमतां येणार नाहीं. कैकेयीनेंही जें सांगितलें तें योग्यच सांगितलें आहे आणि पित्यानेंही जें केलें तें कल्याणकारकच केलें आहे. भरत हा क्षमाशील आणि वडिलांचा सत्कार करणारा आहे, हें मला माहीत आहे; इतकेंच नव्हे, परंतु महात्म्या सत्यवचनी भरताजवळ राज्य चालविण्यास आवश्यक असे सर्व कांहीं चांगले गुण आहेत हें मला ठाऊक आहे. मी वनांतून परत आलों म्हणजे या धर्मशील भावासह पृथ्वीचा मुख्य अधिपति होईन. कैकेयीनें राजापाशीं वर मागितला आणि मीं तें वचन मान्य केलें, तेव्हां या माझ्या सांगण्याप्रमाणें वागून तूं त्या राजाला—आपल्या पित्याला अनृतापासून मुक्त कर. " (२७-३२)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंबारावा सर्ग संपला. ॥११२॥

त्या अप्रतिम तेजस्वी भावांचा अंगावर रोमांच उठविणारा तो समागम पाहून तेथें जमलेले महर्षि आश्चर्यचकित झाले आणि गुप्तपणें तेथें आलेले ते

सदार्यौ राजपुत्रौ द्वौ धर्मज्ञौ धर्मविक्रमौ।
श्रुत्वा वयं हि संभाषामुभयोः स्पृहयामहे ३
ततस्त्वृषिगणाः क्षिप्रं दशग्रीववधैषिणः।
भरतं राजशार्दूलमित्यूचुः संगता वचः ४
कुले जात महाप्राज्ञ महावृत्त महायशः।
ग्राह्यं रामस्य वाक्यं ते पितरं यद्यवेक्षसे ५
सदानृणमिमं रामं वयमिच्छामहे पितुः।
अनृणत्वाच्च कैकेय्याः स्वर्गं दशरथो गतः ६
एतावदुक्त्वा वचनं गन्धर्वाः समहर्षयः।
राजर्षयश्चैव तथा सर्वे स्वां स्वां गतिं गताः ७
ह्लादितस्तेन वाक्येन शुशुभे शुभदर्शनः।
रामः संहृष्टवदनस्तानृषीनभ्यपूजयत् ८
त्रस्तगात्रस्तु भरतः स वाचा सज्जमानया।
कृताञ्जलिरिदं वाक्यं राघवं पुनरब्रवीत् ९

---

महर्षि व मुनिगण त्या महाभाग्यवान् ककुत्स्थकुलोत्पन्न राम व भरत या दोघां भावांची प्रशंसा करूं लागले. ते म्हणाले, "हे दोन्ही राजपुत्र नेहमीं धर्ममार्गानें वागणारे असून सभ्य व धर्मज्ञ आहेत आणि या उभयतांचें संभाषण ऐकून आम्ही यांच्यावर प्रसन्न झालों आहों." त्यानंतर रावणवधाची इच्छा धरणारे ऋषिगण एकत्र मिळून नृपश्रेष्ठ भरताला घाईनेंच म्हणाले, "हे कुलीन, महाज्ञानवान्, सदाचरणसंपन्न, महाकीर्तिमान् भरता! पित्याच्या सुखाची जर तुला अपेक्षा असेल, तर रामाच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें तूं ठरव. रामानें कधींही पित्याच्या ऋणांत राहूं नये अशी आमची इच्छा आहे आणि दशरथही राम वनवासांत आल्यानें कैकेयीच्या ऋणांतून मुक्त झाल्यामुळें, स्वर्गाला गेला आहे." इतकें बोलून गंधर्व, महर्षि व राजर्षि हे सर्व आपापल्या मार्गानें चालते झाले. (१-७)

तेव्हां त्यांच्या त्या सांगण्यानें अगोदरच शुभमुद्रेनें युक्त असलेल्या रामाच्या मुखावर आणखी तेज आलें आणि आनंदित मुद्रेनें त्यानें त्या ऋषींचें अभिनंदन केलें. तेव्हां भरताचे हातपाय अगदीं मोडून गेल्यासारखे झाले आणि अडखळत

राम धर्ममिमं प्रेक्ष्य कुलधर्मानुसंततम् ।
कर्तुमर्हसि काकुत्स्थ मम मातुश्च याचनाम् १०
रक्षितुं सुमहद्राज्यमहमेकस्तु नोत्सहे ।
पौरजानपदांश्चापि रक्तान्रञ्जयितुं तदा ११
ज्ञातयश्चापि योधाश्च मित्राणि सुहृदश्च नः ।
त्वामेव हि प्रतीक्षन्ते पर्जन्यमिव कर्षकाः १२
इदं राज्यं महाप्राज्ञ स्थापय प्रतिपद्य हि ।
शक्तिमान्स हि काकुत्स्थ लोकस्य परिपालने १३
एवमुक्त्वापतद्भ्रातुः पादयोर्भरतस्तदा ।
भृशं संप्रार्थयामास राघवेति प्रियं वदन् १४
तमङ्के भ्रातरं कृत्वा रामो वचनमब्रवीत् ।
श्यामं नलिनपत्राक्षं मत्तहंसस्वरः स्वयम् १५
आगता त्वामियं बुद्धिः स्वजा वैनयिकी च या ।
भृशमुत्सहसे तात रक्षितुं पृथिवीमपि १६

---

अडखळत पुनः तो रामाला म्हणाला, "हे काकुत्स्था! कुलधर्म म्हणून नेहमीं चालत आलेल्या या धर्माकडे दृष्टि देऊन माझ्या व माझ्या मातेच्या विनंतीला तूं मान दे. हें प्रचंड राज्य रक्षण करण्यासाठीं आणि तुझ्यावर प्रेम करणाऱ्या प्रजाजनांचें रंजन करण्यासाठीं मजजवळ धैर्य नाहीं. शिवाय शेतकरी ज्याप्रमाणें पावसाची वाट पहात असतात, त्याचप्रमाणें आपले बांधव, योद्धे, मित्र तुझ्या वाटेकडेच डोळे लावून बसले आहेत. यासाठीं हे महाज्ञानसंपन्न काकुत्स्था ! तूं राज्याचा स्वीकार कर आणि तें चालविण्यासाठीं कोणातरी योग्य मंत्र्याची योजना करून त्याच्या स्वाधीन कर म्हणजे तो लोकांचें परिपालन करण्यास समर्थ होईल." (८–१३)

याप्रमाणें भाषण केल्यावर भरतानें आपल्या भावाच्या चरणांवर लोटांगण घेतलें आणि रामाची अति प्रिय शब्दानें त्यानें वारंवार प्रार्थना केली. तेव्हां मत्त हंसाप्रमाणें स्वर असलेला तो राम त्या श्यामवर्ण कमलनयन भावाला स्वतःच्या मांडीवर घेऊन म्हणाला, " भरता! ही जी विनयामुळें चौदा वर्षें-

अमात्यैश्च सुहृद्भिश्च बुद्धिमद्भिश्च मन्त्रिभिः ।
सर्वकार्याणि संमन्त्र्य महान्त्यपि हि कारय १७
लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् ।
अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः १८
कामाद्वा तात लोभाद्वा मात्रा तुभ्यमिदं कृतम् ।
न तन्मनसि कर्तव्यं वर्तितव्यं च मातृवत् १९
एवं ब्रुवाणं भरतः कौसल्यासुतमब्रवीत् ।
तेजसादित्यसंकाशं प्रतिपच्चन्द्रदर्शनम् २०
अधिरोहार्य पादाभ्यां पादुके हेमभूषिते ।
एते हि सर्वलोकस्य योगक्षेमं विधास्यतः २१
सोऽधिरुह्य नरव्याघ्रः पादुके व्यवमुच्य च ।
प्रायच्छत्सुमहातेजा भरताय महात्मने २२
स्वपादुके संप्रणम्य रामं वचनमब्रवीत् ।

पर्यंत दुःसह वनवास करण्याविषयीं स्वाभाविक बुद्धि तुझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली तिचा विचार केला असतां तूं पृथ्वीचेंही रक्षण करण्यास अत्यंत समर्थ असल्याचें सिद्ध होत आहे. यासाठीं, अमात्य, मित्र आणि बुद्धिमान् मंत्री यांच्या मसलतीनें तूं मोठमोठींही सर्व कार्यें करीत जा. फार काय तर एखादे वेळीं कांति चंद्राला सोडून जाईल, हिमालयपर्वतावरीलही बर्फ नाहींसें होईल व समुद्रही मर्यादेचें उल्लंघन करील, परंतु मी आपल्या पित्याच्या प्रतिज्ञेचा त्याग करणार नाहीं. भरता ! प्रेमामुळें असो अथवा राज्याच्या अभिलाषामुळें असो तुझ्या मातेनें जें हें केलें आहे तें मनांत न ठेवतां तूं मातेप्रमाणेंच तिच्याशीं आपलें वर्तन ठेवीत जा." (१४-१९)

सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें प्रिय मुद्रेनें युक्त असलेला कौसल्यापुत्र राम बोलूं लागला असतां भरत त्याला म्हणाला, "आर्या, या सुवर्णभूषित पादुकांवर तूं आपले पाय ठेव म्हणजे या पादुकाच सर्व जगताचा योगक्षेम चालवितील." असें भरतानें सांगितल्यावर अत्यंत महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ रामानें पादुका पायांत घातल्या व पायांतून काढून त्या पादुका महात्म्या भरताला दिल्या.

चतुर्दश हि वर्षाणि जटाचीरधरो ह्यहम् २३
फलमूलाशनो वीर भवेयं रघुनन्दन।
तवागमनमाकाङ्क्षन्वसन्वै नगराद्बहिः २४
तव पादुकयोर्न्यस्य राज्यतन्त्रं परंतप।
चतुर्दशे हि संपूर्णे वर्षेऽहनि रघूत्तम २५
न द्रक्ष्यामि यदि त्वां तु प्रवेक्ष्यामि हुताशनम्।
तथेति च प्रतिज्ञाय तं परिष्वज्य सादरम् २६
शत्रुघ्नं च परिष्वज्य वचनं चेदमब्रवीत्।
मातरं रक्ष कैकेयीं मा रोषं कुरु तां प्रति २७
मया च सीतया चैव शप्तोऽसि रघुनन्दन।
इत्युक्त्वाश्रुपरीताक्षो भ्रातरं विससर्ज ह २८
स पादुके ते भरतः स्वलंकृते महोज्ज्वले संपरिगृह्य धर्मवित्।
प्रदक्षिणं चैव चकार राघवं चकार चैवोत्तमनागमूर्धनि २९
अथानुपूर्व्या प्रतिपूज्य तं जनं गुरूंश्च मन्त्रीन्प्रकृतीस्तथानुजौ।

---

नंतर आपल्याला दिलेल्या त्या पादुकांना प्रणाम करून भरत रामाला म्हणाला, " वीरा रघुनंदना! जटा व वल्कलें धारण करून आणि फलमूलें भक्षण करून तुझ्या आगमनाची वाट पहातच मी नगराच्या बाहेर चौदा वर्षपर्यंत राहीन आणि हे शत्रुतापना! सर्व राज्यकारभाराची भिस्त तुझ्या पादुकांवर ठेवून मी राहीन; परंतु हे रघुवंशजश्रेष्ठा! चौदावें वर्ष ज्या दिवशीं संपूर्ण होईल त्या दिवशीं जर तुझें दर्शन झालें नाहीं तर मी अग्नीमध्यें प्रवेश करीन." यावर " ठीक आहे " असें त्याला कबूल करून आणि मोठ्या आदरानें त्याला व शत्रुघ्नाला कडकडून भेटून राम त्याला म्हणाला, " कैकेयी मातेचें रक्षण कर; तिच्यावर रागावूं नकोस, हे रघुनंदना! तुला माझी व सीतेची शपथ आहे." असें म्हणून अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या रामानें आपल्या भावाला-भरताला निरोप दिला. (२०-२८)

तेव्हां अत्यंत उज्ज्वल आणि उत्तमप्रकारें भूषित असलेल्या त्या पादुका घेऊन त्या धर्मशील भरतानें रामाला प्रदक्षिणा केली आणि त्या पादुका सर्व लोकांच्या दृष्टीस

व्यसर्जयद्राघववंशवर्धनः स्थितः स्वधर्मे हिमवानिवाचलः ३०
तं मातरो बाष्पगृहीतकण्ठ्यो दुःखेन नामन्त्रयितुं हि शेकुः ।
स चैव मातॄरभिवाद्य सर्वा रुदन्कुटीं स्वां प्रविवेश रामः ३१

इत्यार्षे श्रीमद्रा०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोदशोत्तरशततमः सर्गः॥ ११३॥

चतुर्दशोत्तरशततमः सर्गः । [४१४८]

ततः शिरसि कृत्वा तु पादुके भरतस्तदा ।
आरुरोह रथं हृष्टः शत्रुघ्नसहितस्तदा १
वसिष्ठो वामदेवश्च जाबालिश्च दृढव्रतः ।
अग्रतः प्रययुः सर्वे मन्त्रिणो मन्त्रपूजिताः २
मन्दाकिनीं नदीं रम्यां प्राङ्मुखास्ते ययुस्तदा ।
प्रदक्षिणं च कुर्वाणाश्चित्रकूटं महागिरिम् ३
पश्यन्धातुसहस्राणि रम्याणि विविधानि च ।
प्रययौ तस्य पार्श्वेन ससैन्यो भरतस्तदा ४

---

पडाव्या म्हणून त्या शत्रुंजय नामक श्रेष्ठ हत्तीच्या गंडस्थळावर ठेविल्या. त्यानंतर ते लोक, गुरु, मंत्री, प्रजाजन आणि कनिष्ठ भाऊ भरत-शत्रुघ्न यांचा रीतीप्रमाणें अनुक्रमानें संमान करून स्वधर्माचे ठिकाणीं हिमालयपर्वताप्रमाणें अचल असलेल्या रघुवंशवर्धक रामानें त्यांना निरोप दिला. दुःखामुळें अश्रूंनीं कंठ दाटून आल्या-कारणानें मातांना धड निरोपहि घेतां येईना. तेव्हां सर्व मातांना नमस्कार करून तो शोकाकुल राम आपल्या पर्णकुटिकेमध्यें गेला. (२९-३१)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंतेरावा सर्ग संपला. ॥११३॥

त्यानंतर रामानें दिलेल्या त्या पादुका त्या गजाच्या मस्तकावरून काढून मोठ्या आदरानें आपल्या मस्तकावर घेऊन, भरत मोठ्या आनंदानें शत्रुघ्नासहवर्तमान रथावर चढला आणि वसिष्ठ, वामदेव, जाबालि, दृढव्रत आणि मसलती देण्यांत तरबेज असलेले सर्व मंत्री त्याच्या पुढें निघाले. चित्रकूट महापर्वताला उजवें घालून ते वसिष्ठ आदि सर्व पूर्वेकडे तोंड करून रमणीय मंदाकिनी नदीकडे गेले. नानाप्रकारचे हजारों रमणीय धातूंचे संचय पहात पहात भरत सैन्यासह त्या

अदूराच्चित्रकूटस्य ददर्श भरतस्तदा।
आश्रमं यत्र स मुनिर्भरद्वाजः कृतालयः ५
स तमाश्रममागम्य भरद्वाजस्य वीर्यवान्।
अवतीर्य रथात्पादौ ववन्दे कुलनन्दनः ६
ततो हृष्टो भरद्वाजो भरतं वाक्यमब्रवीत्।
अपि कृत्यं कृतं तात रामेण च समागतम् ७
एवमुक्तः स तु ततो भरद्वाजेन धीमता।
प्रत्युवाच भरद्वाजं भरतो धर्मवत्सलः ८
स याच्यमानो गुरुणा मया च दृढविक्रमः।
राघवः परमप्रीतो वसिष्ठं वाक्यमब्रवीत् ९
पितुः प्रतिज्ञां तामेव पालयिष्यामि तत्त्वतः।
चतुर्दश हि वर्षाणि या प्रतिज्ञा पितुर्मम १०
एवमुक्तो महाप्राज्ञो वसिष्ठः प्रत्युवाच ह।
वाक्यज्ञो वाक्यकुशलं राघवं वचनं महत् ११
एते प्रयच्छ संहृष्टः पादुके हेमभूषिते।

---

पर्वताच्या उत्तर बाजूनें चालला. नंतर चित्रकूट पर्वताच्या जवळच भरतानें भरद्वाजमुनि रहात असलेला तो आश्रम पाहिला. (१–५)

भरद्वाजमुनींच्या त्या आश्रमाजवळ आल्यानंतर कुलनंदन वीर्यवान् भरत रथांतून उतरला आणि त्यानें त्या मुनींच्या चरणांना वंदन केलें. त्यानंतर "भरता! आपलें कर्तव्य केलेंस का? रामाची भेट झाली का?" असें भरद्वाजमुनींनी आनंदित मनानें भरताला विचारलें. याप्रमाणें बुद्धिमान् भरद्वाजमुनींनी विचारिलें असतां तो धर्मवत्सल भरत त्यांना म्हणाला, "मी व गुरु, त्या अमोघ पराक्रमी रामाची प्रार्थना करूं लागलों असतां तो राघव अत्यंत प्रसन्न होऊन वसिष्ठांना म्हणाला, 'चौदा वर्षें वनवास करावयाचा ही जी माझ्या पित्याची प्रतिज्ञा तिचेंच मी खरें खरें परिपालन करणार.' (६–१०)

याप्रमाणें रामानें सांगितलें असतां महाज्ञानी आणि संभाषण करण्यामध्यें निपुण असलेले वसिष्ठ वक्त्या रामाला गंभीर शब्दानें म्हणाले, "आनंदित

अयोध्यायां महाप्राज्ञ योगक्षेमकरो भव १२
एवमुक्तो वसिष्ठेन राघवः प्राङ्मुखः स्थितः।
पादुके हेमविकृते मम राज्याय ते ददौ १३
निवृत्तोऽहमनुज्ञातो रामेण सुमहात्मना।
अयोध्यामेव गच्छामि गृहीत्वा पादुके शुभे १४
एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं भरतस्य महात्मनः।
भरद्वाजः शुभतरं मुनिर्वाक्यमुदाहरत् १५
नैतच्चित्रं नरव्याघ्रे शीलवृत्तविदां वरे।
यदार्यं त्वयि तिष्ठेत्तु निम्नोत्सृष्टमिवोदकम् १६
अनृणः स महाबाहुः पिता दशरथस्तव।
यस्य त्वमीदृशः पुत्रो धर्मात्मा धर्मवत्सलः १७
तमृषिं तु महाप्राज्ञमुक्तवाक्यं कृताञ्जलिः।
आमन्त्रयितुमारेभे चरणावुपगृह्य च १८
ततः प्रदक्षिणं कृत्वा भरद्वाजं पुनः पुनः।

होऊन तूं या सुवर्णभूषित पादुका दे आणि हे महाज्ञानवान् रामा! या पादुकांच्या द्वारा अयोध्येमध्यें राहून तूं लोकांचा योगक्षेम चालव." याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां रामानें पूर्वेकडे तोंड केलें आणि सुवर्णाचें नक्षीकाम केलेल्या त्या पादुका राज्य चालविण्याकरितां त्यानें मला दिल्या व मीही त्या महात्म्या रामाची अनुज्ञा घेऊन तेथून परतलों. आतां त्या शुभ पादुका घेऊन मी अयोध्येकडे जाणार." हें महात्म्या भरताचें उत्कृष्ट भाषण ऐकून भरद्वाजमुनि त्याच्यापेक्षांही उत्कृष्ट असें भरताशीं बोलूं लागले. ते म्हणाले, "टाकलेलें पाणी सखल प्रदेशांत येऊन स्तब्ध रहातें हें जसें आश्चर्य नव्हे, तसेंच शील व सद्वर्तन जाणणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा तुझ्यासारख्या पुरुषश्रेष्ठाच्या ठिकाणीं सदाचरण असणें हेंही कांहीं आश्चर्य नव्हे. ज्याचा तूं अशा प्रकारचा धर्मात्मा व धर्मवत्सल पुत्र आहेस, तो तुझा महापराक्रमी पिता दशरथ पितरांच्या ऋणांतून मुक्त झाला आहे." (११–१७)

याप्रमाणें भाषण करून ते भरद्वाजऋषि बसले असतां त्यांना नमस्कार करून

भरतस्तु ययौ श्रीमानयोध्यां सह मन्त्रिभिः १९
यानैश्च शकटैश्चैव हयैर्नागैश्च सा चमूः ।
पुनर्निवृत्ता विस्तीर्णा भरतस्यानुयायिनी २०
ततस्ते यमुनां दिव्यां नदीं तीर्त्वोर्मिमालिनीम् ।
ददृशुस्तां पुनः सर्वे गङ्गां शिवजलां नदीम् २१
तां रम्यजलसंपूर्णां संतीर्य सहबान्धवः ।
शृङ्गवेरपुरं रम्यं प्रविवेश ससैनिकः ।
शृङ्गवेरपुराद्भूय अयोध्यां संददर्श ह २२
अयोध्यां तु तदा दृष्ट्वा पित्रा भ्रात्रा विवर्जिताम् ।
भरतो दुःखसंतप्तः सारथिं चेदमब्रवीत् २३
सारथे पश्य विध्वस्ता अयोध्या न प्रकाशते ।
निराकारा निरानन्दा दीना प्रतिहतस्वना २४

इत्यार्षे श्री०वा०आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्दशोत्तरशततमः सर्गः११४[४१७२]

आणि हात जोडून भरतानें त्यांची परवानगी घेतली व नंतर पुनःपुनः भरद्वाजांना नमस्कार करून तो श्रीमान् भरत मंत्र्यांसह अयोध्येकडे निघाला असतां रथ, गाडे, घोडे आणि हत्ती यांसह भरताच्या बरोबर जाणारी ती विस्तीर्ण सेनाही पुनः अयोध्येकडे जाण्यासाठीं निघाली. त्यानंतर वर लाटा उसळत असलेली दिव्य यमुना नदी तरून गेल्यावर पवित्र उदकानें युक्त असलेली गंगा नदीही त्या सर्वांनीं पुनः पाहिली. मनोहर पाण्यानें भरलेली ती गंगा उतरून बांधव आणि सैनिक यांसह तो भरत रमणीय अशा शृंगवेरपुरामध्यें आला आणि तेथून निघून त्यानें पुनः अयोध्यानगरी पाहिली; परंतु पिता दशरथ आणि भाऊ राम यांनीं रहित असलेली ती अयोध्या पाहून भरताला शोकाचें भरतें आलें आणि तो सारथ्याला म्हणाला, " हे सारथ्या ! पहा, उध्वस्त झालेली ही अयोध्यानगरी शोभत नाहीं. ही दीन अयोध्यानगरी अलंकाररहित व आनंदहीन झाली असून हिच्यांतील गडबडही अगदीं नाहींशी झाली आहे. (१८-२४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंचौदावा सर्ग संपला. ॥११४॥

*

पञ्चदशोत्तरशततमः सर्गः ।

स्निग्धगम्भीरघोषेण स्यन्दनेनोपयान्प्रभुः ।
अयोध्यां भरतः क्षिप्रं प्रविवेश महायशाः १
बिडालोलूकचरितामालीननरवारणाम् ।
तिमिराभ्याहतां कालीमप्रकाशां निशामिव २
राहुशत्रोः प्रियां पत्नीं श्रिया प्रज्वलितप्रभाम् ।
ग्रहेणाभ्युदितेनैकां रोहिणीमिव पीडिताम् ३
अल्पोष्णक्षुब्धसलिलां घर्मतप्तविहंगमाम् ।
लीनमीनझषग्राहां कृशां गिरिनदीमिव ४
विधूमामिव हेमाभां शिखामग्नेः समुत्थिताम् ।
हविरभ्युक्षितां पश्चाच्छिखां विप्रलयं गताम् ५
विध्वस्तकवचां रुग्णगजवाजिरथध्वजाम् ।
हतप्रवीरामापन्नां चमूमिव महाहवे ६

स्निग्ध व गंभीर घोषानें युक्त असलेल्या रथांत आरूढ होऊन जाणाऱ्या महायशस्वी भरतानें लवकरच अयोध्येमध्यें प्रवेश केला. त्या अयोध्येमध्यें मांजरें व घुबडें संचार करीत होतीं, लोकांच्या घरांचीं दारें लागलेलीं होतीं आणि प्रकाशरहित झाली असल्यामुळें ती नगरी अंधकारानें व्याप्त झालेली कालरात्रच कीं काय अशी भासत होती. दिव्य ऐश्वर्यानें संपन्न असल्यामुळें उज्ज्वल तेजानें युक्त असलेली चंद्राची प्रिय पत्नी रोहिणी ज्याप्रमाणें राहूनें भर्त्याला पीडिलें असतां अनाथ दिसते, त्याप्रमाणें रामरहित झालेली ती अयोध्या अनाथ दिसत होती. अगदीं थोडें, गरम व गढूळ असें पाणी असून सूर्याच्या तापानें संतप्त झालेले पक्षी आणि चिखलामध्यें दडून बसलेले मत्स्य, झष व मकर यांनीं युक्त असलेल्या व प्रवाह लहान झालेल्या ओढ्याप्रमाणें ती दिसत होती. धूर नसल्यानें सोन्याप्रमाणें दिसणाऱ्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें पूर्वी राम असतांना भासत असलेली अयोध्या राम अरण्यांत गेल्यानंतर वर दूध शिंपडल्यामुळें नष्ट होऊं पाहणाऱ्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें तेजोहीन दिसत होती. (१–५)

जिच्यांतील कवचांचा विध्वंस झालेला आहे, जिच्यांतील हत्ती व घोडे जखमी

सफेनां सस्वनां भूत्वा सागरस्य समुत्थिताम् ।
प्रशान्तमारुतोद्भूतां जलोर्मिमिव निःस्वनाम् ७
त्यक्तां यज्ञायुधैः सर्वैरभिरूपैश्च याजकैः ।
सुत्याकाले सुनिर्वृत्ते वेदिं गतरवामिव ८
गोष्ठमध्ये स्थितामार्तामचरन्तीं नवं तृणम् ।
गोवृषेण परित्यक्तां गवां पत्नीमिवोत्सुकाम् ९
प्रभाकराद्यैः सुस्निग्धैः प्रज्वलद्भिरिवोत्तमैः ।
वियुक्तां मणिभिर्जात्यैर्नवां मुक्तावलीमिव १०
सहसाचरितां स्थानान्महीं पुण्यक्षयाद्गताम् ।
संहृतद्युतिविस्तारां तारामिव दिवश्च्युताम् ११
पुष्पनद्धां वसंतान्ते मत्तभ्रमरशालिनीम् ।
द्रुतदावाग्निविप्लुष्टां क्लान्तां वनलतामिव १२

---

होऊन रथ व ध्वज मोडून गेले आहेत आणि जिच्यांतील मोठमोठ्या वीरांचा वध झाला आहे, अशा महासंग्रामामध्यें विपन्नावस्थेला पोंचलेल्या सेनेप्रमाणें ती अयोध्या भासत होती. समुद्रांतून निघालेली पाण्याची लाट ज्याप्रमाणें प्रचंड वाऱ्यानें उसळल्यामुळें फेसाळ व ध्वनियुक्त होऊन नंतर शांत झालेल्या वायूनें तरंगाकार होऊं लागली असतां ध्वनिरहित होऊन जाते, त्याप्रमाणें ती अयोध्या शब्दरहित झालेली होती. यज्ञ–समाप्ति झाल्यावर सर्व यज्ञपात्रें आणि याजक यांनी विरहित असलेली यज्ञभूमि जशी ध्वनिशून्य होते, तशी ती अयोध्या ध्वनि-शून्य झालेली होती. तरुण बैलांची पत्नीभूत अशी उत्सुक होऊन माजास आलेली गाय बैलानें सोडून दिली असतां कोमल गवतही न खातां जशी गोठ्यामध्यें पीडित होऊन राहिलेली असते, तशी ती अयोध्या, रामाकरितां आर्त व उत्सुक झालेली होती. अतिशय पाणीदार आणि उज्ज्वल अशा पद्मरागप्रभृति जातीचीं उत्कृष्ट रत्नें गळून पडलेल्या मोत्यांच्या नव्या माळेप्रमाणें ती अयोध्या शोभा-रहित दिसत होती. (६–१०)

पुण्यक्षय झाल्यामुळें फांकणारें तेज नाहींसें होऊन एकाएकीं स्वस्थानापासून चलित व स्वर्गापासून भ्रष्ट होऊन पृथ्वीवर पडलेल्या ताऱ्याप्रमाणें ती अयोध्या

संमूढनिगमां सर्वां संक्षिप्तविपणापणाम् ।
प्रच्छन्नशशिनक्षत्रां द्यामिवाम्बुधरैर्युताम् १३
क्षीणपानोत्तमैर्भग्नैः शरावैरभिसंवृताम् ।
हतशौण्डामिव ध्वस्तां पानभूमिमसंस्कृताम् १४
वृक्णभूमितलां निम्नां वृक्णपात्रैः समावृताम् ।
उपयुक्तोदकां भग्नां प्रपां निपतितामिव १५
विपुलां विततां चैव युक्तपाशां तरस्विनाम् ।
भूमौ बाणैर्विनिकृत्तां पतितां ज्यामिवायुधात् १६
सहसा युद्धशौण्डेन हयारोहेण वाहिताम् ।
निहतां प्रतिसैन्येन वडवामिव पातिताम् १७
भरतस्तु रथस्थः सञ्श्रीमान्दशरथात्मजः ।
वाहयन्तं रथश्रेष्ठं सारथिं वाक्यमब्रवीत् १८

---

निस्तेज दिसत होती. फुलांनीं भरलेली आणि म्हणूनच मत्त भ्रमरांनीं युक्त असलेली वनलता वसंत ऋतूच्या शेवटीं प्रचंड दावाग्नीनें होरपळल्यामुळें जशी कोमेजलेली दिसते, तशी ती अयोध्या दिसत होती. आकाश मेघांनीं व्याप्त झालें असतां चंद्र व नक्षत्रें दिसेनाशीं होऊन ज्याप्रमाणें मार्गांतील रहदारी नाहींशी होते आणि बाजारांतील दुकानें बंद होतात त्याप्रमाणें राम वनवासांत गेल्यामुळें सर्व अयोध्येंतील मार्ग मोकळे पडून दुकानें बंद झालेलीं होतीं. मद्यपान करणाऱ्यांचा नाश होऊन मद्यरहित व भंगलेल्या मदिरेच्या पेल्यांनीं व्यापलेल्या, उध्वस्त झालेल्या व शोभारहित पानभूमीप्रमाणें ती अयोध्या दिसत होती. जिच्यांतील भूमीला भेगा पडलेल्या आहेत, भंगलेल्या पात्रांनीं जी व्याप्त झालेली आहे, जिच्यांतील पाणी संपून गेलें आहे आणि जी मोडून पडली आहे, अशा सखल प्रदेशावर असलेल्या पाणपोईप्रमाणें ती अयोध्या दिसत होती. (११-१५)

चांगली विशाल व ताणून चढविलेली असतां बलाढ्य योद्ध्यांच्या बाणांनीं तुटून गेल्यामुळें धनुष्यापासून भूमीवर पडलेल्या दोरीप्रमाणें ती अयोध्या भासत होती. युद्धनिपुण स्वारानें बलात्कारानें पिटाळून लावलेल्या व शत्रुसैन्यानें मारून पाडलेल्या घोडीप्रमाणें ती अयोध्या दिसत होती. अयोध्येंत प्रवेश केल्यानंतर

किं नु खल्वद्य गम्भीरो मूर्च्छितो न निशाम्यते ।
यथापुरमयोध्यायां गीतवादित्रनिःस्वनः १९
वारुणीमदगन्धश्च माल्यगन्धश्च मूर्च्छितः ।
चन्दनागुरुगन्धश्च न प्रवाति समन्ततः २०
यानप्रवरघोषश्च सुस्निग्धहयनिःस्वनः ।
प्रमत्तगजनादश्च महांश्च रथनिःस्वनः २१
नेदानीं श्रूयते पुर्यामस्यां रामे विवासिते ।
चन्दनागुरुगन्धांश्च महार्हांश्च वनस्रजः २२
गते रामे हि तरुणाः संतप्ता नोपभुञ्जते ।
बहिर्यात्रां न गच्छन्ति चित्रमाल्यधरा नराः २३
नोत्सवाः संप्रवर्तन्ते रामशोकार्दिते पुरे ।
सा हि नूनं मम भ्रात्रा पुरस्यास्य द्युतिर्गता २४
नहि राजत्ययोध्येयं सासारेवार्जुनी क्षपा ।
कदा नु खलु मे भ्राता महोत्सव इवागतः २५

रथामध्यें बसलेला श्रीमान् दशरथपुत्र भरत तो श्रेष्ठ रथ हांकणाऱ्या सारथ्याला म्हणाला, "पूर्वींप्रमाणें गायनाचा व वाद्यांचा लयबद्ध गंभीर ध्वनि अयोध्येमध्यें आज कां बरें ऐकूं येत नाहीं? सुरेचा मादक गंध, फुलांचा सुवास आणि चंदन व अगरु यांचा गंध यांनीं युक्त असलेला प्रबल वायु आज चहूंकडे वहात नाहीं. (१९-२०)

"उत्कृष्ट वाहनांचा घोष, उत्तम पाणीदार घोड्यांचा शब्द, मत्त हत्तींची गर्जना आणि रथांचा मोठा ध्वनि राम वनवासांत गेल्यामुळें आज या नगरीमध्यें ऐकूं येत नाहीं. मोठमोठ्या मूल्यवान् वनमाला आणि चंदन व अगुरु यांचे गंध यांचा उपभोग, मदनबाधा झालेले तरुण पुरुष राम वनांत गेल्यामुळें घेत नाहींत. चित्रविचित्र पुष्पमाला घालून लोक फिरावयास बाहेर पडत नाहींत आणि रामासंबंधीं शोकानें व्याप्त झालेल्या या नगरामध्यें उत्सव सुरू नाहींत. खरो-खर या नगराची ती पूर्वीची शोभा माझ्या भावाबरोबरच निघून गेली आहे आणि त्यामुळेंच ही अयोध्या पाऊस पडत असलेल्या शुक्लपक्षांतील रात्रीप्रमाणें

जनयिष्यत्ययोध्यायां हर्षं ग्रीष्म इवाम्बुदः ।
तरुणैश्चारुवेषैश्च नरैरुन्नतगामिभिः २६
संपतद्भिरयोध्यायां नाभिभान्ति महापथाः ।
इति ब्रुवन्सारथिना दुःखितो भरतस्तदा २७
अयोध्यां संप्रविश्यैव विवेश वसतिं पितुः ।
तेन हीनां नरेन्द्रेण सिंहहीनां गुहामिव २८
तदा तदन्तःपुरमुज्झितप्रभं सुरैरिवोत्कृष्टमभास्करं दिनम् ।
निरीक्ष्य सर्वत्र विभक्तमात्मवान्मुमोच बाष्पं भरतः सुदुःखितः२९
इत्यार्षे श्रीम० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चदशोत्तरशततमः सर्गः ॥११५॥

षोडशोत्तरशततमः सर्गः । [४२०१]

ततो निक्षिप्य मातॄस्ता अयोध्यायां दृढव्रतः ।
भरतः शोकसंतप्तो गुरूनिदमथाब्रवीत् १
नन्दिग्रामं गमिष्यामि सर्वानामन्त्रयेऽत्र वः ।
तत्र दुःखमिदं सर्वं सहिष्ये राघवं विना २

---

शोभनाशी झाली आहे. महोत्सवाप्रमाणें आणि ग्रीष्म ऋतूंतील मेघाप्रमाणें माझा भाऊ केव्हां बरें येऊन अयोध्येमध्यें आनंदीआनंद निर्माण करील ? मनोहर वेष धारण करून व छाती पुढें काढून लगबगीनें जात असलेल्या तरुण पुरुषांच्या योगानें अयोध्येंतील राजमार्ग शोभत नाहींत." अशा रीतीनें तो दुःखी भरत सारथ्याशीं बोलत असतांना अयोध्येंत शिरतांक्षणीं सिंहरहित झालेल्या गुहेप्रमाणें भासणाऱ्या त्या दशरथराजानें विरहित अशा पित्याच्या निवास-स्थानामध्यें गेला आणि देवांनीं सोडून दिलेल्या स्वर्गाप्रमाणें व सूर्यरहित दिनसम झालेलें तें अंतःपुर सर्व ठिकाणीं संस्काररहित असलेलें पाहून तो भरत मनोनिग्रही असूनही अत्यंत दुःखित होऊन अश्रु ढाळूं लागला. (२१-२९)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंपंधरावा सर्ग संपला. ॥ ११५ ॥

त्यानंतर स्वीकारलेलें व्रत नेटानें चालविणारा तो भरत अयोध्येमध्यें त्या मातांना आणून ठेविल्यावर शोकाकुल होऊन गुरूंना म्हणाला, " मी येथें तुम्हां

गतश्चाहो दिवं राजा वनस्थः स गुरुर्मम ।
रामं प्रतीक्षे राज्याय स हि राजा महायशाः ३
एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं भरतस्य महात्मनः ।
अब्रुवन्मन्त्रिणः सर्वे वसिष्ठश्च पुरोहितः ४
सुभृशं श्लाघनीयं च यदुक्तं भरत त्वया ।
वचनं भ्रातृवात्सल्यादनुरूपं तवैव तत् ५
नित्यं ते बन्धुलुब्धस्य तिष्ठतो भ्रातृसौहृदे ।
मार्गमार्यं प्रपन्नस्य नानुमन्येत कः पुमान् ६
मन्त्रिणां वचनं श्रुत्वा यथाभिलषितं प्रियम् ।
अब्रवीत्सारथिं वाक्यं रथो मे युज्यतामिति ७
प्रहृष्टवदनः सर्वा मातृः समभिभाष्य च ।
आरुरोह रथं श्रीमाञ्शत्रुघ्नेन समन्वितः ८
आरुह्य तु रथं क्षिप्रं शत्रुघ्नभरतावुभौ ।
ययतुः परमप्रीतौ वृतौ मन्त्रिपुरोहितैः ९

---

सर्वांचा निरोप घेऊन नंदिग्रामाला जातों. तेथें मी हें सर्व रामवियोग–दुःख सहन करीत बसेन. अहो ! राजा तर स्वर्गाला गेला आणि वडिलाप्रमाणें असलेला तो माझा भाऊ रामहि वनांत राहूं लागला; मी तर राज्याकरितां रामाकडेच डोळे लावून बसणार. कारण, तोच महायशस्वी राजा आहे. " हें महात्म्या भरताचें उत्तम भाषण ऐकल्यावर सर्व मंत्री आणि पुरोहित वसिष्ठ त्याला म्हणाले, " भरता ! तूं जें हें भाषण केलेंस तें खरोखरच प्रशंसनीय आहे आणि बंधुप्रेमामुळें हें तुला योग्यच आहे. असें भ्रातृप्रेम मनाशीं बाळगून व सन्मार्गाचा आश्रय करून बंधुजनांचें परिपालन करण्याविषयीं तत्पर असलेल्या तुझ्या भाषणाला कोणता बरें पुरुष अनुमोदन देणार नाहीं ? " (१–६)

इच्छेप्रमाणें प्रिय असणारें हें मंत्र्यांचें भाषण ऐकून " माझ्या रथाला घोडे जोड " म्हणून भरत सारथ्याला म्हणाला आणि आनंदित मुद्रेनें सर्व मातांचा निरोप घेतल्यावर तो श्रीमान् भरत शत्रुघ्नासह रथांत बसला व याप्रमाणें मंत्री आणि पुरोहित यांनीं घेरलेले व अत्यंत आनंदित झालेले ते उभयतां भरत-शत्रुघ्न

अग्रतो गुरवः सर्वे वसिष्ठप्रमुखा द्विजाः ।
प्रययुः प्राङ्मुखाः सर्वे नन्दिग्रामो यतो भवेत् १०
बलं च तदनाहूतं गजाश्वरथसंकुलम् ।
प्रययौ भरते याते सर्वे च पुरवासिनः ११
रथस्थः स तु धर्मात्मा भरतो भ्रातृवत्सलः ।
नन्दिग्रामं ययौ तूर्णं शिरस्याधाय पादुके १२
भरतस्तु ततः क्षिप्रं नन्दिग्रामं प्रविश्य सः ।
अवतीर्य रथात्तूर्णं गुरूनिदमभाषत १३
एतद्राज्यं मम भ्रात्रा दत्तं संन्यासमुत्तमम् ।
योगक्षेमवहे चेमे पादुके हेमभूषिते १४
भरतः शिरसा कृत्वा संन्यासं पादुके ततः ।
अब्रवीद् दुःखसंतप्तः सर्वं प्रकृतिमण्डलम् १५
छत्रं धारयत क्षिप्रमार्यपादाविमौ मतौ ।
आभ्यां राज्ये स्थितो धर्मः पादुकाभ्यां गुरोर्मम १६

---

रथावर आरूढ होऊन वेगानें निघाले. वसिष्ठ आदिकरून सर्व गुरु आणि इतर सर्व द्विज पूर्वेकडे तोंड करून भरताच्या पुढें नंदिग्राम जिकडे होतें, तिकडे चालले. तेव्हां भरताच्या आज्ञेची वाट न पाहतां हत्ती, घोडे आणि रथ यांनीं गजबजलेलें सैन्य भरत चालूं लागला असतां त्याच्याबरोबर निघालें आणि सर्व नगरवासी लोकही त्याच्या मागोमाग चालले. (७-११)

रथामध्यें बसलेला तो धर्मात्मा भ्रातृवत्सल भरत रामाच्या पादुका मस्तकावर धारण करून लवकरच नंदिग्रामाजवळ येऊन पोंचला. नंदिग्रामामध्यें प्रवेश केल्यावर रथांतून लवकर खालीं उतरून तो गुरूंना म्हणाला, "हें राज्य एक उत्कृष्ट ठेव म्हणून भावानें माझ्या स्वाधीन केलें आहे व या सुवर्णभूषित पादुकाच याचा योगक्षेम चालविण्यास समर्थ आहेत." असें बोलून त्या पादुकारूपी ठेवीला त्यानें प्रणाम केला आणि पुनः दुःखी झालेला तो भरत सर्व मंत्र्यांना म्हणाला, " या पादुकांवर लवकर छत्र धारण करा; या पादुकांना मी श्रेष्ठ रामाच्या ठिकाणींच समजत आहें. राज्यासंबंधीं माझ्या ज्येष्ठ भावाचा जो धर्मव्यवहार तो सर्व

भ्रात्रा तु मयि संन्यासो निक्षिप्तः सौहृदादयम् ।
तमिमं पालयिष्यामि राघवागमनं प्रति १७
क्षिप्रं संयोजयित्वा तु राघवस्य पुनः स्वयम् ।
चरणौ तौ तु रामस्य द्रक्ष्यामि सह पादुकौ १८
ततो निक्षिप्तभारोऽहं राघवेण समागतः ।
निवेद्य गुरवे राज्यं भजिष्ये गुरुवर्तिताम् १९
राघवाय च संन्यासं दत्त्वेमे वरपादुके ।
राज्यं चेदमयोध्यां च धूतपापो भवाम्यहम् २०
स वल्कलजटाधारी मुनिवेषधरः प्रभुः ।
नन्दिग्रामेऽवसद्वीरः ससैन्यो भरतस्तदा २१
सवालव्यजनं छत्रं धारयामास स स्वयम् ।
भरतः शासनं सर्वं पादुकाभ्यां निवेदयन् २२
ततस्तु भरतः श्रीमानभिषिच्यार्यपादुके ।
तदधीनस्तदा राज्यं कारयामास सर्वदा २३

---

या पादुकांच्याच ठिकाणीं समाविष्ट आहे म्हणजे या पादुकाच राज्यव्यवहार पाहतील. यासाठीं तुम्ही यांच्यावर याच्यावर छत्र धरा. भावानें प्रेमामुळें ही राज्यरूप ठेव माझ्यापाशीं ठेविली आहे. तेव्हां राम परत येईपर्यंत मी तिचें परिपालन करीन. राम आल्याबरोबर मी पुनः स्वतः या पादुका त्याच्या पायांपाशीं नेऊन ठेवीन आणि पादुकांसह रामाच्या त्या पायांचें दर्शन घेईन. रामाची भेट झाल्यावर व माझी जबाबदारी संपली म्हणजे मी त्या श्रेष्ठ रामाच्या स्वाधीन राज्य करून त्याची वडिलांप्रमाणें त्याची सेवा करीन व या श्रेष्ठ पादुका आणि राज्यरूपी ही उत्कृष्ट ठेव रामाला अयोध्येमध्यें परत दिल्यावर मी निश्चिंत होईन." (१२-२०)

याप्रमाणें गुरूंना सांगितल्यावर वल्कलें, जटा आणि मुनिवेष धारण केलेला तो प्रभु विचारी भरत सैन्यासह नंदिग्रामामध्यें राहिला आणि केलेला सर्व कारभार त्या पादुकांना सांगण्याचा क्रम ठेवून तो भरत स्वतः चामर व छत्र त्या पादुकांवर धरूं लागला. नंदिग्रामाला गेल्यानंतर श्रेष्ठ रामाच्या पादुकांना

तदा हि यत्कार्यमुपैति किञ्चिदुपायनं चोपहृतं महार्हम् ।
स पादुकाभ्यां प्रथमं निवेद्य चकार पश्चाद्भरतो यथावत् २४

इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षोडशोत्तरशततमः सर्गः ॥११६॥

सप्तदशोत्तरशततमः सर्गः । [४२२५]

प्रतियाते तु भरते वसन्रामस्तदा वने ।
लक्षयामास सोद्वेगमथौत्सुक्यं तपस्विनाम् १
ये तत्र चित्रकूटस्य पुरस्तात्तापसाश्रमे ।
राममाश्रित्य निरतास्तानलक्षयदुत्सुकान् २
नयनैर्भ्रुकुटीभिश्च रामं निर्दिश्य शङ्किताः ।
अन्योन्यमुपजल्पन्तः शनैश्चक्रुर्मिथः कथाः ३
तेषामौत्सुक्यमालक्ष्य रामस्त्वात्मनि शङ्कित ।
कृताञ्जलिरुवाचेदमृषिं कुलपतिं ततः ४

---

अभिषेक करून आणि नेहमीं त्यांच्या आधीन होऊन तो श्रीमान् भरत राज्य करूं लागला. कांहीं राज्यविषयक कार्य उपस्थित झालें असतां पादुकांना सांगून किंवा कोणी कांहीं मोठा नजराणा आणून दिला असतां तो भरत प्रथम पादुकांजवळ ठेऊन नंतर त्या राज्यकार्याची वगैरे यथायोग्य रीतीनें व्यवस्था लावीत असे. (२१–२४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंसोळावा सर्ग संपला. ॥११६॥

भरत परत गेल्यावर राम वनामध्येंच राहूं लागला असतां तपस्वी लोक भयभीत होऊन दुसरीकडे जाण्याकरितां उत्सुक झाले आहेत, असें त्याच्या लक्षांत आलें. म्हणजे पूर्वीं चित्रकूट पर्वतावरील त्या आश्रमांमध्यें जे तपस्वी रामाजवळ आनंदानें रहात होते, तेच जाण्याकरितां उत्सुक झाले आहेत असें रामाच्या लक्षांत आलें. कारण डोळे व भुंवया उडवून रामाकडे, शंकित दृष्टीनें पाहणारे ते तपस्वी एकमेकांशीं कुजबुजत कुजबुजत आपापसांत हळूंहळूं बोलत असत. तेव्हां त्यांची उत्सुकता पाहून रामाला स्वतःविषयीं शंका आली आणि हात जोडून तो त्या आश्रमांतील श्रेष्ठ ऋषींना म्हणाला— (१–४)

न कच्चिद्भगवन्किञ्चित्पूर्ववृत्तमिदं मयि ।
दृश्यते विकृतं येन विक्रियन्ते तपस्विनः ५
प्रमादाच्चरितं किञ्चित्कच्चिन्नावरजस्य मे ।
लक्ष्मणस्यर्षिभिर्दृष्टं नानुरूपं महात्मनः ६
कच्चिच्छुश्रूषमाणा वः शुश्रूषणपरा मयि ।
प्रमदाभ्युचितां वृत्तिं सीता युक्तां न वर्तते ७
अथर्षिर्जरया वृद्धस्तपसा च जरां गतः ।
वेपमान इवोवाच रामं भूतदयापरम् ८
कुतः कल्याणसत्त्वायाः कल्याणाभिरतेः सदा ।
चलनं तात वैदेह्यास्तपस्विषु विशेषतः ९
त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रतिवर्तते ।
रक्षोभ्यस्तेन संविग्नाः कथयन्ति मिथः कथाः १०
रावणावरजः कश्चित्खरो नामेह राक्षसः ।
उत्पाट्य तापसान्सर्वाञ्जनस्थाननिवासिनः ११

" भगवन् माझ्या ठिकाणीं पूर्वीच्या राजांसारखें कांहीं वर्तन अथवा तपस्व्यांना पीडा होईल अशा प्रकारचें कांहीं विरुद्ध वर्तन आपल्या दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ना ? प्रमादामुळें माझ्या महात्म्या कनिष्ठ भावाच्या—लक्ष्मणाच्या—हातून कांहीं अयोग्य आचरण घडल्याचें ऋषींच्या दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ना ? अथवा अर्घ्यपाद्यादिकांनीं तुमची शुश्रूषा करीत असलेली सीता केव्हां केव्हां माझ्या शुश्रूषेविषयीं तत्पर असल्यामुळें स्त्रियांना उचित असें तिचें योग्य वर्तन तुमच्या बाबतींत घडत नाहीं कीं काय ?" (५-७)

याप्रमाणें रामानें विचारल्यानंतर वयानें वृद्ध झालेला तो तपोवृद्ध ऋषि म्हातारपणामुळें कांपत कांपत भूतदयेविषयीं तत्पर असलेल्या रामाला म्हणाला, " सुस्वभावी आणि परहिताविषयीं दक्ष अशा सीतेच्या वृत्तीमध्यें आणि विशेषतः आम्हां तपस्व्यांच्या बाबतींत फरक कोठून असणार ? परंतु तुझ्यामुळें राक्षसांपासून हें भय तपस्वी लोकांना उत्पन्न झालें आहे आणि यामुळें ते तपस्वी उद्विग्न होऊन आपापसांत बोलत आहेत. रावणाचा कोणी एक धाकटा भाऊ खर

धृष्टश्च जितकाशी च नृशंसः पुरुषादकः ।
अवलिप्तश्च पापश्च त्वां च तात न मृष्यते १२
त्वं यदाप्रभृति ह्यस्मिन्नाश्रमे तात वर्तसे ।
तदाप्रभृति रक्षांसि विप्रकुर्वन्ति तापसान् १३
दर्शयन्ति हि बीभत्सैः क्रूरैर्भीषणकैरपि ।
नानारूपैर्विरूपैश्च रूपैरसुखदर्शनैः १४
अप्रशस्तैरशुचिभिः संप्रयुज्य च तापसान् ।
प्रतिघ्नन्त्यपरान्क्षिप्रमनार्याः पुरतः स्थितान् १५
तेषु तेष्वाश्रमस्थानेष्वबुद्धमवलीय च ।
रमन्ते तापसांस्तत्र नाशयन्तोऽल्पचेतसः १६
अवक्षिपन्ति स्रुग्भाण्डानग्नीन्सिञ्चन्ति वारिणा ।
कलशांश्च प्रमर्दन्ति हवने समुपस्थिते १७
तैर्दुरात्मभिराविष्टानाश्रमान्प्रजिहासवः ।
गमनायान्यदेशस्य चोदयन्त्यृषयोऽद्य माम् १८

---

या नांवाचा राक्षस येथें आहे. त्यानें जनस्थानामध्यें राहणाऱ्या सर्व तपस्व्यांचा फडशा पाडावयास सुरवात केली असून त्या धीट, निर्भय, दुष्ट, मनुष्यभक्षक, गर्विष्ठ आणि पापी राक्षसाला, रामा ! तुझें येथें राहणें सहन होईनासें झालें आहे. रामा ! तूं जेव्हांपासून या आश्रमामध्यें रहात आहेस, तेव्हांपासून राक्षस तपस्वी लोकांना उपद्रव देत आहेत. बीभत्स, क्रूर, भयंकर, कुरूप आणि दर्शन झालें असतां दुःख देणारीं, अशीं रूपें धारण केलेले ते दृष्टीस पडतात. असंगल व अपवित्र पदार्थांची तपस्वी लोकांवर वृष्टि करून ते दुष्ट राक्षस कांहीं गरीब तपस्व्यांना अतिशयच पीडा देतात. (८–१५)

"आश्रमामध्यें ठिकठिकाणीं कोणाच्या लक्षांत न येईल अशा रीतीनें ते दडून बसतात आणि ते मूर्ख राक्षस तपस्व्यांचा नाश करण्यांत आनंद मानतात. होम सुरू झाला असतां ते स्रुचा वगैरे यज्ञपात्रें इकडे तिकडे फेकून देतात, अग्नीवर पाणी शिंपडतात आणि कलश फोडून टाकतात. तेव्हां त्या दुष्टांनीं व्यापलेले आश्रम सोडण्याच्या उद्देशानें व दुसऱ्या देशाला जाण्यासाठीं ऋषि मला

तत्पुरा राम शारीरीमुपहिंसां तपस्विषु ।
दर्शयन्ति हि दुष्टास्ते त्यक्ष्याम इममाश्रमम् १९
बहुमूलफलं चित्रमविदूरादितो वनम् ।
अश्वस्याश्रममेवाहं श्रयिष्ये सगणः पुनः २०
खरस्त्वय्यपि चायुक्तं पुरा राम प्रवर्तते ।
सहास्माभिरितो गच्छ यदि बुद्धिः प्रवर्तते २१
सकलत्रस्य संदेहो नित्यं युक्तस्य राघव ।
समर्थस्यापि सहितो वासो दुःखमिहाद्य ते २२
इत्युक्तवन्तं रामस्तं राजपुत्रस्तपस्विनम् ।
न शशाकोत्तरैर्वाक्यैरवबद्धुं समुत्सुकम् २३
अभिनन्द्य समापृच्छ्य समाधाय च राघवम् ।
स जगामाश्रमं त्यक्त्वा कुलैः कुलपतिः सह २४
रामः संसाध्य ऋषिगणमनुगमनाद्देशात्तस्मात्कुलपतिमभिवाद्य ऋषिम् ।

---

आज निक्षून सांगत आहेत. तेव्हां रामा ! अजून ते दुष्ट तपस्व्यांचा प्राण घेऊं लागले नाहींत तोंच आम्ही हा आश्रम सोडून जातों. येथून जवळच पुष्कळ फळें मुळें असलेलें असें एक मनोहर वन आहे. त्या वनांत अश्वमहर्षींच्या आश्रमांतच मी या ऋषिगणांसह रहावयास जाणार आहे. रामा ! तो खर राक्षस अजून जोंपर्यंत तुझ्याशीं अयोग्य वर्तन करूं लागला नाहीं, तोंच तुझी इच्छा असल्यास तूंदेखील आम्हांबरोबर येथून चल. कारण राघवा ! तूं कितीही सावधान व समर्थ जरी असलास तरी या वेळीं भार्येसह येथें राहणें तुला भयप्रद व त्रासदायकच होणार आहे." ( १९-२२ )

याप्रमाणें ते तपस्वी मुनि बोलले असतां तो राम आपली पराकाष्ठा करूनहि त्या जाण्याकरितां उत्सुक झालेल्या मुनींना थोपवून धरण्यास समर्थ झाला नाहीं. तेव्हां ते आश्रमाधिपति मुनि रामाची स्तुति करून, त्याचें समाधान करून आणि त्याचा निरोप घेऊन आपल्या ऋषिगणासह तो आश्रम सोडून निघून गेले. तेव्हां रामानें बरोबर जाऊन त्या ऋषिगणाला त्या प्रदेशांतून पुढें पोंचविल्यावर त्या

सम्यक्प्रीतैस्तैरनुमत उपदिष्टार्थः पुण्यं वासाय स्वनिलयमुपसंपेदे
आश्रममृषिविरहितं प्रभुः क्षणमपि न जहौ स राघवः ।
राघवं हि सततमनुगतास्तापसाश्चार्षचरिते धृतगुणाः २६

इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तदशोत्तरशततमः सर्गः ॥११७॥

अष्टादशोत्तरशततमः सर्गः । [४२५१]

राघवस्त्वपयातेषु सर्वेष्वनुविचिन्तयन् ।
न तत्रारोचयद्वासं कारणैर्बहुभिस्तदा १
इह मे भरतो दृष्टो मातरश्च सनागराः ।
सा च मे स्मृतिरन्वेति तान्नित्यमनुशोचतः २
स्कन्धावारनिवेशेन तेन तस्य महात्मनः ।
हयहस्तिकरीषैश्च उपमर्दः कृतो भृशम् ३
तस्मादन्यत्र गच्छाम इति संचिन्त्य राघवः ।

---

आश्रमाधिपति ऋषींना वंदन केलें आणि नंतर सुप्रसन्न झालेल्या त्या ऋषींनीं परत जाण्याची अनुज्ञा देऊन तेथें न राहण्याचा उपदेश पुनः एकदां केल्यावर तो राम आपल्या पवित्र निवासस्थानाकडे परतला. आश्रमांतून ऋषि निघून गेल्यानंतर तो प्रभु राम सीतेचें रक्षण करण्याकरितां क्षणभरही तो आश्रम सोडून कोठें गेला नाहीं आणि ऋषीप्रमाणें वर्तन असलेल्या रामाजवळ आपलें रक्षण करण्यास अवश्य असणारे गुण आहेत असा निश्चय धरून कांहीं तपस्वी आश्रम सोडून न जातां नेहमीं रामाच्याच बरोबर तेथें राहूं लागले. (२३–२६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंसत्रावा सर्ग संपला. ॥११७॥

तेथून ते सर्व ऋषि निघून गेल्यानंतर राम विचार करूं लागला असतां पुष्कळ कारणांमुळें तेथें राहणें त्याला पसंत पडेना. " या ठिकाणीं भरत, माता आणि नगरवासी लोक माझ्या दृष्टीस पडले आहेत, तेव्हां त्यांची मला वारंवार आठवण येऊन शोक होणें स्वाभाविक आहे. शिवाय त्या महात्म्या भरताच्या सैन्याचा तळ येथें पडला असल्यामुळें घोड्यांच्या लिदीनें व हत्तींच्या लेंड्यांनीं हा भूप्रदेश अगदीं घाणेरडा करून टाकलेला आहे. यासाठीं दुसरीकडे जावें

प्रातिष्ठत स वैदेह्या लक्ष्मणेन च संगतः ४
सोऽत्रेराश्रममासाद्य तं ववन्दे महायशाः ।
तं चापि भगवानत्रिः पुत्रवत्प्रत्यपद्यत ५
स्वयमातिथ्यमादिश्य सर्वमस्य सुसत्कृतम् ।
सौमित्रिं च महाभागं सीतां च समसान्त्वयत् ६
पत्नीं च तमनुप्राप्तां वृद्धामामन्त्र्य सत्कृताम् ।
सान्त्वयामास धर्मज्ञः सर्वभूतहिते रतः ७
अनसूयां महाभागां तापसीं धर्मचारिणीम् ।
प्रतिगृह्णीष्व वैदेहीमब्रवीदृषिसत्तमः ८
रामाय चाचचक्षे तां तापसीं धर्मचारिणीम् ।
दश वर्षाण्यनावृष्ट्या दग्धे लोके निरन्तरम् ९
यया मूलफले सृष्टे जाह्नवी च प्रवर्तिता ।
उग्रेण तपसा युक्ता नियमैश्चाप्यलंकृता १०
दश वर्षसहस्राणि यया तप्तं महत्तपः ।
अनसूयाव्रतैस्तात प्रत्यूहाश्च निबर्हिताः ११

हें बरें " असा विचार करून राम सीता व लक्ष्मण यांसह तेथून निघाला. नंतर अत्रिमुनींच्या आश्रमाला येऊन महायशस्वी रामानें त्यांना वंदन केलें असतां भगवान् अत्रिमुनींनींहीं पुत्राप्रमाणें त्याला मानून व स्वतः त्याचें उत्तम प्रकारें सत्कारपूर्वक आदरातिथ्य करून त्या महाभाग्यवान् रामाचें, लक्ष्मणाचें व सीतेचें त्यांनीं सांत्वन केलें. (१-६)

त्यानंतर सर्वांना पूज्य असलेली, महाभाग्यवती, परमात्मचिन्तनामध्यें नेहमीं निरत, यथाविधि पत्नीधर्माचें आचरण करणारी आपली वृद्ध पत्नी अनसूया तेथें आली असतां प्रेमानें तिला त्यांनीं सीता दाखविली आणि " या सीतेचा तूं सांभाळ कर. " असें त्या श्रेष्ठ ऋषींनीं त्या अनसूयेला सांगितलें व नंतर ते त्या धर्मनिष्ठ तापसी अनसूयेचा वृत्तांत रामाला सांगूं लागले. ते म्हणाले, " दहा वर्षें पाऊस न पडल्यामुळें लोक एकसारखे पीडित होऊं लागले असतां या अनसूयेनें फळें व मुळें उत्पन्न करून या आश्रमामध्यें गंगा आणली. ही उग्र तपश्चर्या

देवकार्यनिमित्तं च यया संत्वरमाणया ।
दशरात्रं कृता रात्रिः सेयं मातेव तेऽनघ १२
तामिमां सर्वभूतानां नमस्कार्यां तपस्विनीम् ।
अभिगच्छतु वैदेही वृद्धामक्रोधनां सदा १३
एवं ब्रुवाणं तमृषिं तथेत्युक्त्वा स राघवः ।
सीतामालोक्य धर्मज्ञामिदं वचनमब्रवीत् १४
राजपुत्रि श्रुतं त्वेतन्मुनेरस्य समीरितम् ।
श्रेयोऽर्थमात्मनः शीघ्रमभिगच्छ तपस्विनीम् १५
अनसूयेति या लोके कर्मभिः ख्यातिमागता ।
तां शीघ्रमभिगच्छ त्वमभिगम्यां तपस्विनीम् १६
सीता त्वेतद्वचः श्रुत्वा राघवस्य यशस्विनी ।
तामत्रिपत्नीं धर्मज्ञामभिचक्राम मैथिली १७
शिथिलां वलितां वृद्धां जरापाण्डुरमूर्धजाम् ।
सततं वेपमानाङ्गीं प्रवाते कदलीमिव १८

---

करणारी असून सर्व नियमांनींही हिला शोभा आलेली आहे. दहा हजार वर्षेपर्यंत हिनें मोठें तप केलें आहे आणि रामा ! या अनसूयेच्याच व्रतांच्या सामर्थ्यानें ऋषींच्या तपामध्यें येणारीं विघ्नें नाहींशीं झालीं आहेत. देवकार्याकरितां झटत असतांना जिनें घाई करून दहा रात्रींची एक रात्र केली ती ही अनसूया, हे निष्पाप रामा ! तुला मातेप्रमाणें आहे. तेव्हां सर्वांना वंद्य व शांतचित्त अशा या वृद्ध तपस्विनीकडे सीतेला जाऊं दे." (७–१३)

याप्रमाणें ते अत्रिऋषि सांगूं लागले असतां त्यांना "ठीक आहे" असें म्हणून आणि धर्मशील सीतेकडे पाहून तो राम म्हणाला, "राजकन्ये ! या मुनींनीं काय सांगितलें तें ऐकलेस ना ? तूं आपल्या कल्याणाकरितां त्या तपस्विनीकडे जा. कर्मांच्या योगानें जी अनसूया या नांवानें लोकांमध्यें प्रसिद्धीला आली आहे आणि जिच्याजवळ राहणें अत्यंत कल्याणकारक आहे अशा त्या तपस्विनीकडे लवकर जा." हें रामाचें भाषण ऐकून जनककन्या सीता त्या धर्मशील अत्रिपत्नी-कडे गेली. त्या वृद्ध अत्रिपत्नीचीं गात्रें शिथिल झालीं होतीं, अंगावर सुरकुत्या

तां तु सीता महाभागामनसूयां पतिव्रताम् ।
अभ्यवादयदव्यग्रा स्वं नाम समुदाहरत् १९
अभिवाद्य च वैदेही तापसीं तां दमान्विताम् ।
बद्धाऽञ्जलिपुटा हृष्टा पर्यपृच्छदनामयम् २०
ततः सीतां महाभागां दृष्ट्वा तां धर्मचारिणीम् ।
सान्त्वयन्त्यब्रवीद्वृद्धा दिष्ट्या धर्ममवेक्षसे २१
त्यक्त्वा ज्ञातिजनं सीते मानवृद्धिं च मानिनि ।
अवरुद्धं वने रामं दिष्ट्या त्वमनुगच्छसि २२
नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाऽशुभः ।
यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयाः २३
दुःशीलः कामवृत्तो वा धनैर्वा परिवर्जितः ।
स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः २४
नातो विशिष्टं पश्यामि बान्धवं विमृशन्त्यहम् ।
सर्वत्र योग्यं वैदेहि तपः कृतमिवाव्ययम् २५

पडल्या होत्या, म्हातारपणामुळें केस पांढरे झाले होते आणि वारा सुटला असतां हलणाऱ्या केळीप्रमाणें तिचें शरीर कांपत होतें. त्या कर्तव्यदक्ष सीतेनें महाभाग्यवती अशा पतिव्रता अनसूयेला अभिवंदन केलें आणि आपलें नांव सांगितलें. याप्रमाणें त्या मनोनिग्रही तापसीला अभिवंदन केल्यावर आनंदित झालेल्या सीतेनें हात जोडून तिला कुशल प्रश्न केले. (१४-२०)

तेव्हां त्या महाभाग्यवती धर्मचारिणी सीतेला पाहून ती वृद्ध अनसूया सामोपचारपूर्वक तिला म्हणाली, "धर्माकडे तुझें लक्ष आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. हे मानिनि सीते ! मानाची आणि बांधवांची पर्वा न करितां पित्यानें वनांत जाण्याची आज्ञा केल्याबरोबर रामाच्या मागोमाग तूंहि वनांत निघालीस. नगरांत असो अथवा वनांत असो आणि त्याचप्रमाणें अनुकूल असो अथवा प्रतिकूल असो. ज्या स्त्रियांना भर्ता प्रिय आहे त्यांना उत्तमोत्तम लोक मिळतात. पति दुःशील असो, स्वेच्छाचारी असो अथवा निर्धन असो. कुलशीलवती स्त्रियांचें तेंच मुख्य दैवत होय. सीते ! विचार करून पाहूं लागलें असतां भर्त्यापेक्षां प्रिय बांधव मला

न त्वेवमनुगच्छन्ति गुणदोषमसत्स्त्रियः ।
कामवक्तव्यहृदया भर्तृनाथाश्चरन्ति याः २६
प्राप्नुवन्त्ययशश्चैव धर्मभ्रंशं च मैथिलि ।
अकार्यवशमापन्नाः स्त्रियो याः खलु तद्विधाः २७
त्वद्विधास्तु गुणैर्युक्ता दृष्टलोकपरावराः ।
स्त्रियः स्वर्गे चरिष्यन्ति यथा पुण्यकृतस्तथा २८
तदेवमेतं त्वमनुव्रता सती पतिप्रधाना समयानुवर्तिनी ।
भव स्वभर्तुः सहधर्मचारिणी यशश्च धर्मं च ततः समाप्स्यसि२९

इत्यार्षे श्री०वा० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे अष्टादशोत्तरशततमः सर्गः ॥११८॥

एकोनविंशत्युत्तरशततमः सर्गः । [२२८०]

सा त्वेवमुक्ता वैदेही त्वनसूयानसूयया ।
प्रतिपूज्य वचो मन्दं प्रवक्तुमुपचक्रमे १

---

दुसरें कोणीही आढळत नाहीं. अक्षय तपाचें अनुष्ठान ज्याप्रमाणें इहलोकीं आणि परलोकीं इष्टप्राप्तीचें साधन होतें, त्याचप्रमाणें भर्ताच इहलोकीं आणि परलोकीं इष्ट प्राप्तीचें साधन असल्यामुळें तो सेवेला योग्य आहे. (२१-२५)

"भर्त्यावरच अधिकार चालविणाऱ्या, विषयोपभोगाकडेच मनाचा कल असलेल्या आणि स्वेच्छेनें वागणाऱ्या दुष्ट स्त्रिया या गुणदोषाकडे, पतिसेवेंतच कल्याण आहे व पतीचा त्याग करणें यांतच अकल्याण आहे याकडे लक्षच देत नाहींत आणि सीते! खरोखर निषिद्ध कर्माच्याच आधीन होऊन राहिलेल्या ज्या तशाप्रकारच्या स्त्रिया असतात, त्या धर्मभ्रष्ट होऊन अपकीर्तीला पात्र होतात; परंतु तुझ्यासारख्या जगतांतील बऱ्या वाईट गोष्टींचा विचार करणाऱ्या ज्या गुणसंपन्न स्त्रिया असतात त्या पुण्यवान् लोकांप्रमाणें स्वर्गामध्यें स्थान मिळवितात. यासाठीं पति हेंच मुख्य दैवत समजून सदाचरणाला अनुसरून वागणारी आणि पतिसेवेविषयीं तत्पर राहून तूं आपल्या भर्त्याची सहधर्मचारिणी हो म्हणजे तुला यश व पुण्य खात्रीनें मिळेल." (२६-२९)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंअठरावा सर्ग संपला. ॥११८॥

नैतदाश्चर्यमार्यायां यन्मां त्वमनुभाषसे ।
विदितं तु ममाप्येतद्यथा नार्याः पतिर्गुरुः      २
यद्यप्येष भवेद्भर्ता अनार्यो वृत्तिवर्जितः ।
अद्वैधमत्र वर्तव्यं तथाप्येष मया भवेत्      ३
किं पुनर्यो गुणश्लाघ्यः सानुक्रोशो जितेन्द्रियः ।
स्थिरानुरागो धर्मात्मा मातृवत्पितृवत्प्रियः      ४
यां वृत्तिं वर्तते रामः कौसल्यायां महाबलः ।
तामेव नृपनारीणामन्यासामपि वर्तते      ५
सकृद्दृष्टास्वपि स्त्रीषु नृपेण नृपवत्सलः ।
मातृवद्वर्तते वीरो मानमुत्सृज्य धर्मवित्      ६
आगच्छन्त्याश्च विजनं वनमेवं भयावहम् ।
समाहितं हि मे श्वश्र्वा हृदये यत्स्थिरं मम      ७

याप्रमाणें अनसूयेनें सांगितलें असतां ती अनसूया म्हणजे निर्मत्सर सीता तिच्या भाषणाची प्रशंसा करण्याच्या उद्देशानें हळूहळू बोलूं लागली, " आपण जो मला उपदेश केला, तो सर्व सद्धर्माचें आश्रयस्थान असून सर्वश्रेष्ठ अशा आपणांकडून होणें उचितच आहे. त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण स्त्रीचा गुरु पति हें आपल्या उपदेशाप्रमाणें मलाही माहीत आहेच. भर्ता हा जरी दुर्वर्तनी आणि दरिद्री असला तरी माझ्यासारख्या स्त्रीनें त्याच्याशीं एकनिष्ठेनेंच वागलें पाहिजे. पण गुणांमुळें प्रशंसेस पात्र असलेला, दयाळु, जितेंद्रिय, अढळ प्रेम करणारा, धर्मात्मा आणि मातापितरांप्रमाणें माझ्याहि प्रीतीस पात्र झालेला जो भर्ता त्याच्याशीं एकनिष्ठेनें वागणें अवश्य आहे, यांत शंका कसली ? महाबलाढ्य राम जसें कौसल्येबरोबर वागतो, तसेंच इतरही राजस्त्रियांशीं वागत आला आहे. (१–५)

"इतकेंच नव्हे परंतु उपभोग्य या बुद्धीनें ज्या स्त्रियांकडे दशरथराजानें एकदां पाहिलें आहे, त्या सर्व स्त्रियांकडे हा नृपवत्सल धर्मशील वीर अभिमान सोडून देऊन मातेप्रमाणें वर्तन ठेवीत असतो. मी निर्जन व भयंकर वनामध्यें येऊं लागलें असतां सासूबाईनीं मला जो याप्रमाणें उपदेश केला, तो माझ्या हृदयामध्यें अगदीं

पाणिप्रदानकाले च यत्पुरा त्वग्निसंनिधौ ।
अनुशिष्टं जनन्या मे वाक्यं तदपि मे धृतम् ८
न विस्मृतं तु मे सर्वं वाक्यैः स्वैर्धर्मचारिणि ।
पतिशुश्रूषणान्नार्यास्तपो नान्यद्विधीयते ९
सावित्री पतिशुश्रूषां कृत्वा स्वर्गे महीयते ।
तथावृत्तिश्च याता त्वं पतिशुश्रूषया दिवम् १०
वरिष्ठा सर्वनारीणामेषा च दिवि देवता ।
रोहिणी न विनाचन्द्रं मुहूर्तमपि दृश्यते ११
एवंविधाश्च प्रवराः स्त्रियो भर्तृदृढव्रताः
देवलोके महीयन्ते पुण्येन स्वेन कर्मणा १२
ततोऽनसूया संहृष्टा श्रुत्वोक्तं सीतया वचः ।
शिरस्याघ्राय चोवाच मैथिलीं हर्षयन्त्युत १३
नियमैर्विविधैराप्तं तपो हि महदस्ति मे ।
तत्संश्रित्य बलं सीते छन्दये त्वां शुचिव्रते १४

---

ठसून बसलेला आहे. पूर्वी पाणिग्रहणाच्या वेळीं अग्नीसमक्ष मातेनें जो मला उपदेश केला, तोही मीं लक्षांत ठेवला आहे. हे धर्मचारिणि ! माझ्या बांधवांनीं जो मला आपआपल्या भाषणांनीं उपदेश केला आहे, त्यांपैकींही मी कांहींएक विसरलें नाहीं. स्त्रीला पतिसेवेहून दुसरें तप सांगितलेलेंच नाहीं. सावित्री पतिसेवा करून आतां स्वर्गामध्यें पूज्य होऊन बसली आहे आणि त्या सावित्रीप्रमाणेंच वागणाऱ्या आपणही पतिसेवेनें स्वर्ग आपलासा करून घेतला आहे. सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेली ही देवता रोहिणी चंद्रावांचून एक क्षणभरही स्वर्गामध्यें दिसत नाहीं. सारांश, पूर्वजन्मीं एकनिष्ठपणानें पतिसेवा केल्यामुळेंच तिला हें पतिसान्निध्य मिळालें आहे. याप्रमाणें अशाच प्रकारच्या महापतिव्रता श्रेष्ठ स्त्रिया स्वतःच्या पुण्य कर्मानें देवलोकामध्यें पूज्य होऊन बसल्या आहेत.” (६–१२)

सीतेचें हें भाषण ऐकून अनसूयेला आनंद झाला आणि सीतेचें मस्तक हुंगून तिला अधिक उल्हसित करण्यासाठीं म्हणाली, “नानाप्रकारच्या नियमांनीं मीं मोठें तप संपादन करून ठेविलें आहे. त्या तपोबलाच्या आधारावर हे सदा-

उपपन्नं च युक्तं च वचनं तव मैथिलि ।
प्रीता चास्म्युच्यतां सीते करवाणि प्रियं च किम् १५
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा विस्मिता मन्दविस्मया ।
कृतमित्यब्रवीत्सीता तपोबलसमन्विताम् १६
सा त्वेवमुक्ता धर्मज्ञा तया प्रीततराभवत् ।
सफलं च प्रहर्षं ते हन्त सीते करोम्यहम् १७
इदं दिव्यं वरं माल्यं वस्त्रमाभरणानि च ।
अङ्गरागं च वैदेहि महार्हमनुलेपनम् १८
मया दत्तमिदं सीते तव गात्राणि शोभयेत् ।
अनुरूपमसंक्लिष्टं नित्यमेव भविष्यति १९
अङ्गरागेण दिव्येन लिप्ताङ्गी जनकात्मजे ।
शोभयिष्यसि भर्तारं यथा श्रीर्विष्णुमव्ययम् २०
सा वस्त्रमङ्गरागं च भूषणानि स्रजस्तथा ।
मैथिली प्रतिजग्राह प्रीतिदानमनुत्तमम् २१

---

चरणसंपन्न सीते ! तूं माझ्यापाशीं वर मागावास अशी माझी इच्छा आहे. हे मैथिलि ! तुझें भाषण अर्थयुक्त असून योग्य आहे. यासाठीं हे सीते ! मी तुझें काय प्रिय करूं तें सांग." (१३–१५)

तें तिचें भाषण ऐकून सीता आश्चर्यचकित झाली आणि तपःसामर्थ्यानें युक्त असलेल्या त्या अनसूयेला मंदस्मित करून म्हणाली, "आपल्या अनुग्रहानेंच माझें सर्व कांहीं यथास्थित आहे; मला कसलीही उणीव नाहीं." याप्रमाणें त्या सीतेनें सांगितलें असतां ती अनसूया तिच्यावर अधिकच प्रसन्न झाली आणि म्हणाली, "हे सीते ! निर्लोभीपणामुळें तुझ्या ठिकाणीं नित्य वसत असलेला हा तुझा आनंद आज मी सफल करतें. ही दिव्य श्रेष्ठ माला, वस्त्र, भूषणें, उटी आणि मोठें मूल्यवान् अनुलेपन मी तुला देतें. सीते ! हें मीं दिलेलें तुझ्या अवयवांना शोभा आणील आणि नेहमीं ताजें राहून तुला साजेसें दिसेल. हे जनककन्ये ! ही दिव्य उटी तूं आपल्या अंगाला लावलीस म्हणजे विष्णूला शोभविणाऱ्या लक्ष्मीप्रमाणें तूं आपल्या पतीला शोभविशील" (१४–२०)

प्रतिगृह्य च तत्सीता प्रीतिदानं यशस्विनी।
श्लिष्टाञ्जलिपुटा धीरा समुपास्त तपोधनाम् २२
तथा सीतामुपासीनामनसूया दृढव्रता।
वचनं प्रष्टुमारेभे कथां कांचिदनु प्रियाम् २३
स्वयंवरे किल प्राप्ता त्वमनेन यशस्विना।
राघवेणेति मे सीते कथा श्रुतिमुपागता २४
तां कथां श्रोतुमिच्छामि विस्तरेण च मैथिलि।
यथाभूतं च कार्त्स्न्येन तन्मे त्वं वक्तुमर्हसि २५
एवमुक्ता तु सा सीता तापसीं धर्मचारिणीम्।
श्रूयतामिति चोक्त्वा वै कथयामास तां कथाम् २६
मिथिलाधिपतिर्वीरो जनको नाम धर्मवित्।
क्षत्रकर्मण्यभिरतो न्यायतः शास्ति मेदिनीम् २७
तस्य लाङ्गलहस्तस्य कृषतः क्षेत्रमण्डलम्।

याप्रमाणें अनसूयेनें सांगितल्यावर वस्त्र, उटी, भूषणें आणि माला अशा ज्या उत्कृष्ट वस्तु तिनें प्रेमपूर्वक दिल्या, त्या सीतेनें घेतल्या आणि प्रेमानें दिलेल्या त्या वस्तूंचा स्वीकार करून यशस्विनी व उदार सीता हात जोडून त्या तपस्विनीच्या जवळ बसली. तशाप्रकारें ती सीता बसली असतांना स्वीकारलेलें व्रत नेटानें चालविणारी अनसूया कांहीं प्रिय गोष्टी ऐकण्याच्या उद्देशानें तिला विचारूं लागली. "सीते ! या यशस्वी रामानें स्वयंवरामध्यें तुला आपलीशी करून घेतली अशी गोष्ट माझ्या कानावर आली आहे व मैथिलि ! ती हकीकत सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा असल्यानें तूं सर्व हकीकत मला सविस्तरपणें सांग." (२१-२५)

याप्रमाणें अनसूयेनें सीतेला विनंती केली असतां ती सीता त्या धर्मचारिणी तापसीला "ऐका" असें म्हणून ती हकीकत सांगूं लागली. ती म्हणाली- "जनक म्हणून एक मिथिलानगरीचा धर्मशील वीर राजा आहे. तो क्षात्रधर्माविषयीं तत्पर असून न्यायानें पृथ्वीचें परिपालन करीत आहे. यज्ञदीक्षा घेतल्यावर तो जनकराजा हातांत नांगर घेऊन यज्ञभूमि नांगरूं लागला असतां मी

अहं किलोत्थिता भित्त्वा जगतीं नृपतेः सुता २८
स मां दृष्ट्वा नरपतिर्मुष्टिविक्षेपतत्परः ।
पांसुगुण्ठितसर्वाङ्गीं विस्मितो जनकोऽभवत् २९
अनपत्येन च स्नेहादङ्कमारोप्य च स्वयम् ।
ममेयं तनयेत्युक्त्वा स्नेहो मयि निपातितः ३०
अन्तरिक्षे च वागुक्ता प्रतिमा मानुषी किल ।
एवमेतन्नरपते धर्मेण तनया तव ३१
ततः प्रहृष्टो धर्मात्मा पिता मे मिथिलाधिपः ।
अवाप्तो विपुलामृद्धिं मामवाप्य नराधिपः । ३२
दत्त्वा चास्मीष्टवद्देव्यै ज्येष्ठायै पुण्यकर्मणे ।
तया संभाविता चास्मि स्निग्धया मातृसौहृदात् ३३
पतिसंयोगसुलभं वयो दृष्ट्वा तु मे पिता ।
चिन्तामभ्यगमद्दीनो वित्तनाशादिवाधनः ३४
सदृशाच्चापकृष्टाच्च लोके कन्यापिता जनात् ।

भूमींतून वर निघालें, एवढ्याच कारणानें मी त्या जनक राजाची कन्या आहें. तेव्हां हातांतील बीं जमिनींत टाकण्यामध्यें गर्क झालेला तो जनकराजा धुळीनें सर्वांग भरलेल्या मला पाहून आश्चर्यचकित झाला. त्याला संतति नसल्यामुळें त्यानें प्रेमानें स्वतः मला मांडीवर घेऊन आणि " ही माझी कन्या " असें म्हणून माझ्यावर प्रेम करावयास सुरवात केली. (२९–३०)

"इतक्यांत आकाशामध्यें " राजा ! या तुझ्या म्हणण्याप्रमाणें न्यायानें ही तुझी कन्याच आहे " अशी मनुष्यवाणीसारखी वाणी झाली, असें म्हणतात. अशी आकाशवाणी झाल्यानंतर माझा पिता धर्मात्मा मिथिलाधिपति आनंदित झाला आणि यज्ञभूमींत मी त्याला मिळाल्यापासून उत्तरोत्तर त्याला मोठेंच ऐश्वर्य लाभलें. राजानें आपल्या सत्कर्मनिष्ठ आणि संततीची इच्छा करणाऱ्या अशा ज्येष्ठ पत्नीच्या स्वाधीन मला केलें व त्या दयाळू राजपत्नीनें मातृप्रेमानें माझें परिपालन केलें. नंतर पाणिग्रहण होण्याला योग्य असें माझें वय झालें आहे असें पाहून माझ्या पित्याला, वित्तनाशामुळें चिंताक्रांत होणाऱ्या दरिद्री पुरुषाप्रमाणें, काळजी निर्माण

प्रधर्षणमवाप्नोति शक्रेणापि समो भुवि ३५
तां धर्षणामदूरस्थां संदृश्यात्मनि पार्थिवः।
चिन्तार्णवगतः पारं नाससादाप्लवो यथा ३६
अयोनिजां हि मां ज्ञात्वा नाध्यगच्छत्स चिन्तयन्।
सदृशं चाभिरूपं च महीपालः पतिं मम ३७
तस्य बुद्धिरियं जाता चिन्तयानस्य संततम्।
स्वयंवरं तनूजायाः करिष्यामीति धर्मतः ३८
महायज्ञे तदा तस्य वरुणेन महात्मना।
दत्तं धनुर्वरं प्रीत्या तूणी चाक्षय्यसायकौ ३९
असंचाल्यं मनुष्यैश्च यत्नेनापि च गौरवात्।
तन्न शक्ता नमयितुं स्वप्नेष्वपि नराधिपाः ४०

झाली. कारण कन्येचा पिता इंद्राप्रमाणें जरी पृथ्वीमध्यें असला तरी सारख्या योग्यतेच्या अथवा कमी योग्यतेच्याही वरपक्षाकडून त्याचा × अपमान होतोच. मग योग्यतेनें अधिक असलेल्या वरपक्षाची तर गोष्ट पाहिजे कशाला? (३१–३५)

"तेव्हां आपल्या अपमानाची वेळ जवळच आलेली पाहून चिंताक्रान्त झालेला जनकराजा, समुद्रांत पडलेला मनुष्य तरून जाण्याचें साधन जवळ नसल्यामुळें जसा परतीला जाऊन पोंचत नाहीं तसा, त्या चिंतासागरांतून पार जाईना. मी अयोनिसंभव आहें हें लक्षांत घेऊन तो राजा विचार करूं लागला असतां कुलीन आणि योग्यतेनें मला साजेल असा पति त्याला कोणीही आढळेना. तेव्हां एक-सारखा विचार करतां करतां "क्षात्रधर्माला अनुसरून मी आपल्या कन्येचें स्वयंवर करावें." असें त्यानें विचारांतीं ठरविलें. दक्षयज्ञामध्यें माझ्या पित्याच्या पूर्वज अशा देवराताला महात्म्या वरुणानें प्रेमपूर्वक एक मोठें धनुष्य आणि दोन अक्षय भाते दिले होते. तें धनुष्य जड असल्यामुळें मनुष्यांना प्रयत्नानेंही हालवितां येत नव्हतें; इतकेंच नव्हे परंतु राजे स्वप्नामध्येंही तें धनुष्य वाकविण्यास समर्थ नव्हते. (३६–४०)

× वरपक्षानें स्वतःला श्रेष्ठ समजण्याची पद्धत अतिप्राचीन कालापासूनच सुरू आहे असें, दिसतें.

तद्धनुः प्राप्य मे पित्रा व्याहृतं सत्यवादिना ।
समवाये नरेन्द्राणां पूर्वमामन्त्र्य पार्थिवान् ४१
इदं च धनुरुद्यम्य सज्यं यः कुरुते नरः ।
तस्य मे दुहिता भार्या भविष्यति न संशयः ४२
तच्च दृष्ट्वा धनुः श्रेष्ठं गौरवाद्गिरिसंनिभम् ।
अभिवाद्य नृपा जग्मुरशक्तास्तस्य तोलने ४३
सुदीर्घस्य तु कालस्य राघवोऽयं महाद्युतिः ।
विश्वामित्रेण सहितो यज्ञं द्रष्टुं समागतः ४४
लक्ष्मणेन सह भ्रात्रा रामः सत्यपराक्रमः ।
विश्वामित्रस्तु धर्मात्मा मम पित्रा सुपूजितः ४५
प्रोवाच पितरं तत्र राघवौ रामलक्ष्मणौ ।
सुतौ दशरथस्येमौ धनुर्दर्शनकाङ्क्षिणौ ४६
इत्युक्तस्तेन विप्रेण तद्धनुः समुपानयत् ।
तद्धनुर्दर्शयामास राजपुत्राय दैविकम् ४७
निमेषान्तरमात्रेण तदानम्य महाबलः ।

"तें धनुष्य मिळाल्यावर आधीं राजेलोकांना आमंत्रण करून त्या राजांच्या समाजामध्यें माझ्या त्या सत्यप्रिय पित्यानें "हें धनुष्य उचलून याला जो पुरुष दोरी चढवील, त्याला माझी कन्या निःसंशय माळ घालील." अशी घोषणा केली. तेव्हां पर्वतप्राय असलेलें तें मोठें व जड धनुष्य पाहिल्याबरोबर तें तोलण्याविषयीं असमर्थ असलेले राजे त्याला नमस्कार करून जाऊं लागले. याला बराच काल लोटल्यावर हा महातेजस्वी व अमोघपराक्रमी रघुवंशज राम आपल्या भावाला-लक्ष्मणाला-बरोबर घेऊन विश्वामित्र मुनींसह यज्ञ पाहण्यासाठीं तेथें आला. तेव्हां माझ्या पित्यानें धर्मात्म्या विश्वामित्र मुनींचें यथा योग्य आदरातिथ्य केल्यावर ते त्यावेळीं माझ्या पित्याला म्हणाले, " हे रघुवंशज राम लक्ष्मण दशरथ राजाचे पुत्र आहेत व धनुष्य पाहण्याची यांची इच्छा आहे." (४१-४६)

याप्रमाणें त्या ज्ञानी विश्वामित्रांनीं राजाला सांगितलें असतां त्यानें तें धनुष्य आणविलें आणि तें दिव्य धनुष्य राजकुमाराला दाखविलें. तेव्हां डोळ्याचें पातें

ज्यां समारोप्य झटिति पूरयामास वीर्यवान् ४८
तेनापूरयता वेगान्मध्ये भग्नं द्विधा धनुः ।
तस्य शब्दोऽभवद्भीमः पतितस्याशनेर्यथा ४९
ततोऽहं तत्र रामाय पित्रा सत्याभिसंधिना ।
उद्यता दातुमुद्यम्य जलभाजनमुत्तमम् ५०
दीयमानां न तु तदा प्रतिजग्राह राघवः ।
अविज्ञाय पितुश्छन्दमयोध्याधिपतेः प्रभोः ५१
ततः श्वशुरमामन्त्र्य वृद्धं दशरथं नृपम् ।
मम पित्रा त्वहं दत्ता रामाय विदितात्मने ५२
मम चैवानुजा साध्वी ऊर्मिला शुभदर्शना ।
भार्यार्थे लक्ष्मणस्यापि दत्ता पित्रा मम स्वयम् ५३
एवं दत्तास्मि रामाय तदा तस्मिन्स्वयंवरे ।
अनुरक्तास्मि धर्मेण पतिं वीर्यवतां वरम् ५४

इत्यार्षे श्री०वा०आ०अयोध्याकाण्डे एकोनविंशोत्तरशततमः सर्गः॥११९॥[४३३४]

---

लवलें नाहीं तोंच महाबलाढ्य वीर्यवान् राघवानें तें वांकवून व त्यावर दोरी चढवून कानापर्यंत तें ओढून दाखविलें. तेव्हां वेगानें तो तें धनुष्य ओढूं लागला असतां मध्यें मोडून त्याचे दोन तुकडे झाले व वीज पडल्याप्रमाणें त्याचा भयंकर आवाज झाला. त्यानंतर त्या सत्यवचनी पित्यानें हातामध्यें उत्तम पाण्यानें भरलेलें भांडें घेऊन मला रामाला देण्याकरितां पुढें केलें; परंतु अयोध्याधिपति दशरथराजाची-आपल्या पित्याची इच्छा समजली नसल्यामुळें माझा पिता जरी मला देऊं लागला तरी राघवानें त्यावेळीं माझा स्वीकार केला नाहीं. (४७-५१)

"तेव्हां माझ्या श्वशुराला-वृद्ध दशरथराजाला-बोलावून आणून आत्मज्ञानी रामाला पित्यानें मला देऊन टाकलें व सुंदर नेत्र असलेली माझी धाकटी बहीण साध्वी ऊर्मिला माझ्या पित्यानें आपण होऊनच लक्ष्मणाला दिली. असो. याप्रमाणें त्या स्वयंवरामध्यें मी रामाच्या गळ्यांत माळ घातली आणि वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या पतीवर मी धर्माला स्मरून प्रेम करीत आहें." (५२-५४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंएकोणिसावा सर्ग संपला ॥११९॥

विंशोत्तरशततमः सर्गः ।

अनसूया तु धर्मज्ञा श्रुत्वा तां महतीं कथाम् ।
पर्यष्वजत बाहुभ्यां शिरस्याघ्राय मैथिलीम् १
व्यक्ताक्षरपदं चित्रं भाषितं मधुरं त्वया ।
यथा स्वयंवरं वृत्तं तत्सर्वं च श्रुतं मया २
रमेयं कथया ते तु दृढं मधुरभाषिणि ।
रविरस्तंगतः श्रीमानुपोह्य रजनीं शुभाम् ३
दिवसं परिकीर्णानामाहारार्थं पतत्रिणाम् ।
संध्याकाले निलीनानां निद्रार्थं श्रूयते ध्वनिः ४
एते चाप्यभिषेकार्द्रा मुनयः कलशोद्यताः ।
सहिता उपवर्तन्ते सलिलाप्लुतवल्कलाः ५
अग्निहोत्रे च ऋषिणा हुते च विधिपूर्वकम् ।
कपोताङ्गारुणो धूमो दृश्यते पवनोद्धतः ६
अल्पपर्णा हि तरवो घनीभूताः समन्ततः ।
विप्रकृष्टेन्द्रिये देशे न प्रकाशन्ति वै दिशः ७

ही मोठी कथा ऐकल्यावर सीतेचें मस्तक अवघ्राण करून धर्मवेत्त्या अनसूयेनें आपल्या बाहूंनीं तिला कटाळून धरिलें आणि ती तिला म्हणाली, " स्वयंवराची सर्व हकीकत तूं स्पष्ट शब्दांनीं, आश्चर्यकारक व मधुर वाणीनें सांगितलीस आणि ती सर्व मीं ऐकली. हे मधुरभाषिणि सीते ! या तुझ्या हकीकतीनें मला फारच बरें वाटलें; परंतु आतां तेजस्वी सूर्य शुभकारक रात्रीला येथें सोडून अस्तास गेला आहे. सर्व दिवसभर आहाराकरितां संचार करून संध्याकाळीं निद्रेकरितां घरट्यांत जाऊन बसलेल्या पक्ष्यांचा किलबिलाट कानावर येत आहे. पाण्यामध्यें आपलीं वल्कलें धुवून व स्नान करून ओल्या शरिरानेंच हे हातांत कलश घेतलेले मुनि एकत्र मिळून येत आहेत. (१–५)

" ऋषींनीं विधिपूर्वक अग्निहोत्र होम केला असल्यामुळें पारव्यांच्या कंठासारख्या वर्णाचा आणि वायूनें हालविलेला धूर दृष्टीस पडत आहे. अंधार लागल्यामुळें पानें नाहींशीं होत चाललेले वृक्ष चहूंकडे सर्व बाजूंनीं अगदीं दाट झाल्या-

रजनीचरसत्त्वानि प्रचरन्ति समन्ततः ।
तपोवनमृगा ह्येते वेदितीर्थेषु शेरते ८
संप्रवृत्ता निशा सीते नक्षत्रसमलंकृता ।
ज्योत्स्नाप्रावरणश्चन्द्रो दृश्यतेऽभ्युदितोऽम्बरे ९
गम्यतामनुजानामि रामस्यानुचरी भव ।
कथयन्त्या हि मधुरं त्वयाहमपि तोषिता १०
अलंकुरु च तावत्त्वं प्रत्यक्षं मम मैथिलि ।
प्रीतिं जनय मे वत्से दिव्यालंकारशोभिनी ११
सा तदा समलंकृत्य सीता सुरसुतोपमा ।
प्रणम्य शिरसा पादौ रामं त्वभिमुखी ययौ १२
तथा तु भूषितां सीतां ददर्श वदतां वरः ।
राघवः प्रीतिदानेन तपस्विन्या जहर्ष च १३
न्यवेदयत्ततः सर्वं सीता रामाय मैथिली ।
प्रीतीदानं तपस्विन्या वसनाभरणस्रजाम् १४

---

सारखे दिसत आहेत आणि दृष्टीला दूर असलेले प्रदेश दिसेनासे झाले आहेत. निशाचर प्राण्यांचा चोहोंकडे संचार सुरू झाला आहे आणि हे तपोवनांतील मृग पुण्यकारक आश्रमामध्यें पडले आहेत. सीते ! नक्षत्रांनीं भूषित झालेल्या रात्रीचें आगमन होऊन चंद्रिकेचें पांघरूण घेतलेला चंद्र आकाशामध्यें उदय पावलेला दिसत आहे. आतां जा; मी तुला परवानगी देतें; रामाच्या शुश्रूषेमध्यें तत्पर रहा. मधुर गोष्टी सांगून तूं मलाही संतुष्ट केलें आहेस. सीते ! माझ्यासमक्ष तूं अलंकार अंगावर घाल आणि त्यांनीं शोभित होऊन, हे वत्से ! मला आनंद दे " (६-१०)

याप्रमाणें अनसूयेनें सांगितल्यावर देवकन्येसारख्या असलेल्या सीतेनें अलंकार धारण केले आणि अनसूयेच्या पायांवर डोकें ठेऊन प्रणाम केला व ती रामाकडे निघाली. तेव्हां ऋषिपत्नी अनसूयेनें प्रेमपूर्वक दिलेल्या अलंकारानें भूषित झालेल्या सीतेला पाहून वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाला अतिशय आनंद झाला. त्यावेळीं ऋषिपत्नीनें वस्त्रें, भूषणें व पुष्पमाला प्रेमपूर्वक दिल्याची

प्रहृष्टस्त्वभवद्रामो लक्ष्मणश्च महारथः।
मैथिल्याः सत्क्रियां दृष्ट्वा मानुषेषु सुदुर्लभाम् १५
ततः स शर्वरीं प्रीतः पुण्यां शशिनिभाननाम्।
अर्चितस्तापसैः सर्वैरुवास रघुनन्दनः १६
तस्यां रात्र्यां व्यतीतायामभिषिच्य हुताग्निकान् ।
आपृच्छेतां नरव्याघ्रौ तापसान्वनगोचरान् १७
तावचूस्ते वनचरास्तापसा धर्मचारिणः ।
वनस्य तस्य संचारं राक्षसैः समभिप्लुतम् १८
रक्षांसि पुरुषादानि नानारूपाणि राघव ।
वसन्त्यस्मिन्महारण्ये व्यालाश्च रुधिराशनाः । १९
उच्छिष्टं वा प्रमत्तं वा तापसं ब्रह्मचारिणम् ।
अदन्त्यस्मिन्महारण्ये तान्निवारय राघव २०
एष पन्था महर्षीणां फलान्याहरतां वने ।
अनेन तु वनं दुर्गं गन्तुं राघव ते क्षमम् २१

---

सर्व हकीकत जनककन्या सीतेनें रामाला सांगितली. तेव्हां मनुष्यलोकामध्यें अत्यंत दुर्लभ असा सीतेचा सत्कार झालेला पाहून रामाला व महारथि लक्ष्मणाला पराकोटीचा हर्ष झाला. (१२-१५)

सर्व तपस्वी जनांनीं सत्कार केलेल्या त्या रघुनंदन रामानें आनंदित मनानें चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या पवित्र सीतेला पहातच ती रात्र तेथें घालविली. ती रात्र निघून गेल्यावर स्नान करून ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण अग्नींना होम देऊन बसलेल्या वनांतील तपस्वी मुनींचा पुढें जाण्याकरितां निरोप घेऊं लागले. तेव्हां वनामध्यें निवास करणारे ते धर्मनिष्ठ तपस्वी त्यांना म्हणाले, " या वनांतील प्रदेशांत राक्षसांचा फारच उपद्रव आहे. राघवा ! नाना प्रकारचे मनुष्यभक्षक राक्षस आणि रक्तपिपासु श्वापदें या महारण्यामध्यें राहतात आणि एखादा तपस्वी अथवा ब्रह्मचारी अपवित्र किंवा बेसावध असला म्हणजे या महारण्यामध्यें राक्षस त्याला खाऊन टाकतात. तेव्हां राघवा ! तूं त्यांचें निवारण कर. या मार्गानें तपस्वी फळें घेऊन येत असतात व याच मार्गानें, राघवा ! गहन

**इतीरितः प्राञ्जलिभिस्तपस्विभिर्द्विजैः कृतस्वस्त्ययनः परंतपः ।**
**वनं सभार्यः प्रविवेश राघवः सलक्ष्मणः सूर्य इवाभ्रमण्डलम् २२**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे
विंशोत्तरशततमः सर्गः ॥१२०॥ [४३५६]

**॥ इति अयोध्याकाण्डं समाप्तम् ॥**

---

वनामध्यें जाणें तुला योग्य आहे." याप्रमाणें कुशल चिंतून तपस्वी ब्राह्मणांनीं हात जोडून रामाला सांगितलें असतां त्या शत्रूंना त्रास देणाऱ्या रामानें मेघमंडलांत प्रविष्ट होणाऱ्या सूर्याप्रमाणें भार्या आणि लक्ष्मण यांसह वनामध्यें प्रवेश केला. (१६–२२)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण या नांवाच्या आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंविसावा सर्ग संपला. ॥ १२० ॥

**॥ अयोध्याकांड समाप्त ॥ २ ॥**



# वाल्मीकिरामायण

## अयोध्याकाण्ड उत्तरार्धाचें निरीक्षण

### (१) कौसल्या राममाता

[ लेखक- वाल्मीकिवाक्प्रदीप **विष्णुशास्त्री पंडित** ]

कौसल्या ही दक्षिण कोसल देशाच्या भानुमान् राजाची कन्या आणि अयोध्येचा ( उत्तर कोसल देशाचा ) राजा दशरथ याची सर्वांत वडील पट्टराणी. हिच्याविषयीं आनन्दरामायणसार-काण्ड अध्याय १ मध्यें असा उल्लेख आहे—

**"अयोध्यायास्तु सांनिध्ये देशे श्रीकोसलाह्वये ।**
**कोसलायां महापुण्यः कोसलाख्यो नृपो महान् ३२**
**तस्यासीत् दुहिता रम्या कौसल्या पतिकामुका ।**
**तस्या दशरथेनाशु विवाहो निश्चितो मुदा ३३**

म्हणजे, अयोध्येला ( उत्तर कोसल देशाला ) लागूनच दक्षिण कोसल नांवाचा देश होता. त्याच्या कोसला नांवाच्या राजधानींत महापुण्यवान् कोसलराज नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याची कौसल्या नांवाची एकुलती एक कन्या अत्यन्त रूपवती- उपवर होती. तिच्याशीं दशरथाचा विवाह निश्चित झाला होता. आणि त्या अन्वयें कौसल्या ही दशरथ राजाला विवाहविधीनें दिली गेली होती. या वृत्तान्तावरून " दशरथराजा व कौसल्या हीं सख्खी बहिण-भावंडें होतीं " असें विधान कांहीं आधुनिक विद्वान् जैन बौद्ध ग्रंथाधारें करतात, तें सर्वथैव असमंजसपणाचें व अत्यन्त खोटें आहे असें ठरतें. या कोसल राजाचेंच भानुमान हें विशेषनाम आहे.

कौसल्येला तिच्या बापाकडून एक हजार गांवें " स्त्री-धन म्हणून " पृथक् मिळालीं होतीं. ( अयोध्या कांण्ड सर्ग ३१ श्लोक २२-२४ )

( १ ) **कौसल्येचें वैवाहिक जीवनः-** दशरथराजा आपली आवडती राणी कैकेयी हिच्या अत्यन्त नादीं असल्याकारणानें, त्याच्याकडून हिची बरीच हेळसांड होत असे, व त्यामुळें कैकेयीकडून ही हिचा पाणउतारा सारखा होत

असे. " उद्यां आपला राम राजा होईल व आपल्याला पुढें सुखाचे दिवस येतील " या एका आशेवर तें सर्व दुःख गिळून ती उदासपणें काळ कंठित होती.

ही गोष्ट वनवासास जाण्यापूर्वीं, राम निरोप घेण्यासाठीं तिच्याकडे गेला त्या वेळीं त्याला उद्देशून केलेल्या तिच्या भाषणावरून स्पष्टतया दिसून येत आहे. तें भाषण असें आहे–

**न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा पतिपौरुषे ।**
**अपि पुत्रे विपश्येयं इति रामास्थितं मया ॥ ३८ ॥**

( अयोध्या कां. सर्ग २० )

पण, राम वनवासास गेल्या कारणानें तिच्या सर्व आशांचा भंग झाला व तिचें वैवाहिक जीवन अधिकच दुःखप्रद झालें.

( २ ) **कौसल्येची गृहिणी या नात्यानें योग्यता**– अनेक प्रकारांनीं विनवण्या करूनही, जेव्हां कैकेयी आपला हेका सोडीना, आणि आतां रामाला वनांत पाठविणें टळत नाहीं असें जेव्हां दशरथाच्या लक्ष्यांत आलें, तेव्हां त्यास कौसल्येची आठवण झाली. आणि आजपर्यन्त आपण कौसल्येची अवहेलना करीत आलों असून देखाल तिची आपल्यावरची निष्ठा यत्किंचितही ढळली नाहीं व तिनें आपली किती काळजीपूर्वक सेवा केली आहे, या संबंधांत तिचे गुण आठवून दशरथ राजा म्हणतो–

**" यदा यदा हि कौसल्या दासीव च सखीव च ।**
**भार्यावत् भागिनीवत् च मातृवत् चोपतिष्ठति ६९**

( अयोध्या. सर्ग १२ )

या दशरथाच्या भाषणावरून कौसल्येची " आदर्श गृहिणी या नात्यानें " योग्यता केवढी मोठी होती, हें स्पष्टतया दिसून येत आहे. आदर्श गृहिणी कशी असते, हें महर्षींनीं या एकाच श्लोकांत दाखवून दिलें आहे.

( ३ ) **कौसल्येचें शील**:– श्रीराम वनांत गेल्या दिवसापासून. दशरथ राजा कौसल्येच्या महालांतच राहूं लागला. ज्या दिवशीं, श्रीराम सीता व लक्ष्मण यांसह अयोध्येतून गेला त्या दिवशीं रात्रीं कौसल्येला पुत्रशोक अनावर होऊन, ती दशरथ राजाला बरेंच टाकून बोलली. ( अयोध्या सर्ग ४३-४४ ) त्या वेळीं,

आधीच शोकसागरांत निमग्न झालेला तो दशरथराजा अत्यन्त काकुळतीस येऊन त्यानें कौसल्येपुढें हात जोडले आणि तिची क्षमा मागितली, तेव्हां– " आपण पत्नीधर्मापासून च्युत झालों, पति कसाही असला तथापि त्याला टाकून बोलणें हें सत् कुलीन पतिव्रता स्त्रियांचें शील नव्हे, आपल्याकडून अत्यन्त निन्द्य वर्तन घडलें आहे " असें वाटून तिला अतिशय पश्चात्ताप झाला व ती मोठ्यानें रडूं लागली आणि " केवळ पुत्रशोकाचे आधीन होऊन, असें शब्द बोललें, मला क्षमा करावी– म्हणून तिनें तत्काळ दशरथ राजाची क्षमा मागितली आणि पुन्हाः त्याला कधीं देखील या संबंधांत मर्मभेदक भाषण बोलली नाहीं आणि अन्तकालापर्यन्त त्याच्या अगदीं सन्निध राहून, तिनें त्याची एकनिष्ठपणें सेवा केली.

कैकेयीकडून तिचा नेहमीं पाणउतारा होत असून देखील ती कैकेयीला अगदीं पाठच्या बहिणीसारखी मानीत असे, हें भरत कैकेयीची निर्भर्त्सना करीत असतांना त्याच्या बोलण्यावरूनच दिसून येत आहे. तें असें—

**तथा ज्येष्ठा हि मे माता कौसल्या दीर्घदर्शिनी ।**
**त्वयि धर्मं समास्थाय भगिन्यामिव वर्तते ॥**

( अयोध्या. सर्ग ७३, श्लोक १० )

**( ४ ) कौसल्येचें पुत्रवात्सल्यः**– श्रीराम वनांत गेल्यावर कौसल्या पुत्रशोकानें अगदीं विव्हळ झाली असतां ती दशरथ राजाला म्हणत आहे कीं–

**अथास्मिन् नगरे रामः चरन् भैक्ष्यं गृहे वसेत् ।**
**कामकारो वरं दातुं अपि दासं ममात्मजम् ॥**

( अयोध्या. सर्ग ४३, श्लोक ४ )

म्हणजे, कैकेयीला भरतासाठीं राज्य हवें होतें, तर तिनें तें खुशाल मागून घ्यावयाचें होतें; पण रामाला वनवास मागून घेतला त्या ऐवजीं, तिनें "रामानें घरोघर भिक्षा मागून येथेंच ( अयोध्येंत ) रहावें " असा जरी वर मागून घेतला असता, तरी बरें झालें असतें. म्हणजे मला माझ्या रामाचा वियोग तरी सहन करावा लागला नसता ! असें म्हणत आहे. त्याचप्रमाणें—

*

**त्वद्वियोगात् न मे कार्यं जीवितेन सुखेन च ।**
**त्वया सह मम श्रेयः तृणानां अपि भक्षणम् ॥२६॥**

( अयोध्या. सर्ग २१ )

या तिच्या भाषणावरून, रामाविषयींचें तिचें प्रेम किती उत्कट होतें व रामाचा वियोग तिला किती दुःसह वाटत होता, हें दिसून येत आहे. तथापि तिची वृत्ति धर्ममार्गावरून यत्किंचितही चळत नाहीं. शोकावेगामुळें क्वचित् तसा भास झाल्यासारखा दिसतो; पण ती लागलींच शुद्धीवर येते व तिला पश्चात्ताप होतो, हें दशरथाला टोंचून बोलल्यानन्तर लागलींच त्याबद्दल पश्चात्ताप होऊन तिनें त्याची क्षमा मागितली त्या वेळच्या तिच्या भाषणावरून स्पष्टतया दिसून येत आहे. तें समग्र भाषण अयोध्याकाण्ड सर्ग ६२ मध्यें मुळांतूनच पाहणें योग्य होईल.

कैकेयीच्या वचनास्तव दशरथानें श्रीरामास अरण्यवासाची आज्ञा दिली. त्या वेळीं लक्ष्मण बहुतच संतापला आणि—

**गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यं अजानतः ।**
**उत्पथप्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥**

. ( अयोध्या. सर्ग २१, श्लो. १३ )

असें म्हणून—

**अमित्रभूतो निःसंगं वध्यतां बध्यतां अपि ।**

असें म्हणण्यापर्यंत त्याची मजल गेली. त्या वेळीं कौसल्या श्री रामास म्हणाली कीं—

**भ्रातुस्ते वदतः सौम्य लक्ष्मणस्य श्रुतं त्वया ।**
**यदत्रानन्तरं तत्त्वं कुरुष्व यदि रोचते ॥२१॥**

( अयोध्या. सर्ग २१ )

या श्लोकांतील- " **कुरुष्व यदि रोचते** " म्हणजे तुला नीट दिसेल, तर कर, असें म्हणण्यांत "माझें या कृत्याला अनुमोदन नाहीं." असाच भाव कौसल्येचा आहे. पितृ-आज्ञेनुसार वनवासास जाण्याची रामाच्या मनाची दृढता किती आहे हें पाहण्याचा तिचा हेतु यांत दिसून येत आहे.

कांहीं विद्वान् लोक " लक्ष्मणाच्या म्हणण्यास कौसल्येनें मूक अनुमति दिली होती. " असें जें अनुमान काढतात तें सत्य दिसत नाहीं; कारण तिच्या एकंदर चरित्रावरून पाहतां, कौसल्येसारखी अत्यन्त धर्मभीरू, अत्यन्त पतिनिष्ठ आर्य-स्त्री पतीचा वध करण्याला अनुमति देण्याइतक्या मर्यादेपर्यंत जाणें संभवतच नाहीं.

या वेळीं कौसल्या दुहेरी प्रसंगांत होती. एकीकडे पुत्र-वात्सल्य व एकीकडे पतिभक्ति. अशा आणीबाणीच्या– प्रसंगीं आधीच वार्धक्यामुळें जर्जर झालेल्या व भावी पुत्रवियोगामुळें– अत्यन्त दुःखसागरांत बुडून गेलेल्या आपल्या पतीला सोडून दूर राहणें ही तिला इष्ट नव्हते आणि पुत्रवात्सल्यामुळें रामाचा वियोग सहन होणें शक्य नसल्या कारणानें तिला त्याचे बरोबर वनांत ही जावेसें वाटे. आणि त्याप्रमाणें, पुत्रवात्सल्याची तिची भावना– एक क्षणभरच कां होईना प्रबलतर– होऊन, तिनें आपणांला ही वनांत बरोबर नेणेंविषयीं श्रीरामाला अत्याग्रहानें म्हटलें ही. पण श्रीरामानें जेव्हां—

**कैकेय्या वंचितो राजा मयि चारण्यमाश्रिते ।**
**त्वया चैव परित्यक्तः न नूनं वर्तयिष्यति ॥११॥**

(अयोध्या. सर्ग २४)

असें म्हणून– दशरथाच्या जिवाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें, त्याच्यापाशीं अयोध्येंतच तिनें असण्याची अत्यन्त आवश्यकता आहे. हें जेव्हां तिला पटवून दिलें तेव्हां पुत्रवात्सल्य एकीकडे सारून व पुत्रावियोगाचें दुःख गिळून, पतीच्या सेवेंतच तिनें राहणें पतकरलें. अशी पतिभक्तिनिष्ठ स्त्री पतीचा वध करण्यास अनुमति देईल हें संभवतच नाहीं.

(५) **कौसल्येचा सीतेला उपदेशः**– श्रीरामाबरोबर सीता वनांत जावयास निघाली, त्या वेळीं तिला पोटाशीं धरून कौसल्येनें जो उपदेश केला आहे, तो प्रत्येक गृहिणीनें आपल्या हृदयांत जतन करून ठेवण्यासारखा आहे. हा उपदेश करतांना, तिनें सीतेला असती–स्त्रियांचीं लक्षणें सांगून, तदनन्तर साध्वी स्त्रिया कशा असतात हें तिला सांगीतलें. त्याचें वर्णन महर्षि देत आहेत– (आयोध्याकांड सर्ग ३९)

असत्यः सर्वलोकेऽस्मिन् सततं सत्कृता प्रियैः ।
भर्तारं नानुमन्यन्ते विनिपातगतं स्त्रियः ॥२०॥
एष स्वभावो नारीणां अनुभूय पुरा सुखम् ।
अल्पामप्यापदं प्राप्य दुष्यन्ति प्रजहत्यपि ॥२१॥
असत्यशीला विकृता दुर्गा अहृदयाः सदा ।
असत्यः पापसंकल्पाः क्षणमात्रविरागिणः ॥२२॥
न कुलं न कृतं विद्यां न दत्तं नापि च श्रुतम् ।
स्त्रीणां गृह्णाति हृदयं अनित्यहृदया हि ताः ॥२३॥

याचा भावार्थ– असती स्त्रिया ज्या असतात, त्यांचे नवऱ्यानें कितीही लाड पुरविले, नेहमी त्यांचीच भर करीत राहिला, तथापि त्याचा थोडा पडता काळ आला कीं, त्या त्याची पूर्ववत् काळजी घेईनाशा होतात व त्याचा तिरस्कार करूं लागतात॥२०॥असती स्त्रिया असतात त्या पूर्वी नवऱ्याच्या चालत्या काळांत अनेक प्रकारच्या सुखाचा यथेच्छ उपभोग घेऊन देखील, पुढें दैववशात् त्याला दारिद्र्य आल्यामुळें किंवा कांही रोगाची भावना झाल्यामुळें तो बिचारा संकटांत सांपडला तर त्याला मर्मभेदक भाषणें बोलून अनेक प्रकारें दूषण लावितात. तेवढेंच नव्हे तर त्यास सोडूनही चालत्या होतात ।। २१ ॥ असती स्त्रिया ज्या असतात, त्या नेहमीं खोटें बोलणाऱ्या, कुकर्मामध्यें निमग्न, दुष्ट लोकांच्या नादीं लागलेल्या, स्वतः-च्या पतीवर मुळींच प्रेम नसणाऱ्या, ज्यांचे चित्तांत नेहमीं परपुरूषाविषयींच विचार चाललेले असतात अशा, इवल्याशा क्षुद्रकारणास्तव, पतिवरचें प्रेम क्षणांत तोडून टाकणाऱ्या अशा असतात. ॥२२॥ असती स्त्रिया ज्या असतात त्यांस आपला पति केवढ्याही मोठ्या कुलांतला असो, त्याच्या कुलाचा त्यांना अभिमान मुळींच नसतो. पतीचे त्यांच्यावर केवढेही उपकार असोत त्या उपकारांची त्यांना जाणीवच नसते. पति केवढाही मोठा विद्वन् असो त्याचें त्यांना भूषनच वाटत नाहीं. पतीनें केवढ्याही उंची वस्त्रांनीं व अलंकारांनीं यांना मढवून काढल्या असो त्याचें ही त्यांना कांही देखील भूषण वाटत नाहीं. त्यांचे अनेक अपराध घडतांना-प्रत्यक्ष पाहून देखील, त्यांचा त्याग न करतां त्यांना क्षमा करतो. तथापि त्यांना त्याच्या उदारपणाची मुळींच किंमत वाटत नाही ? तात्पर्य, पतीच्या कोणत्याही

गुणावर त्यांचें प्रेम जडत नाहीं, कुलाच्या नांवलौकिकाची लवमात्र पर्वा न करतां, या असती–स्त्रियांची– सर्वकाल परपुरुषाकडेच चित्तवृत्ति व पापकर्माकडेच प्रवृत्ति असते. कारण त्यांचें चित्त अत्यन्त चञ्चल असल्या कारणानें, त्यांचे पतिप्रेमही अत्यन्त क्षणिक असतें.

येणेंप्रमाणें, असती स्त्रियांचीं लक्षणें सांगून, कौसल्या सीतेला साध्वी स्त्रियांचीं लक्षणें सांगत आहे कीं–

**साध्वीनान्तु स्थितानां तु शीले सत्ये श्रुते स्थिते ।**
**स्त्रीणां पवित्रं परमं पतिरेको विशिष्यते ॥ २४ ॥**

म्हणजे, साध्वी पतिव्रता स्त्रिया ज्या असतात, त्या मोठ्या शीलवती, चारित्र्यवती अशा असतात. अत्यन्त सत्यनिष्ठ असतात. वडील माणसांच्या उपदेशावर त्यांची दृढ श्रद्धा असते. आपल्या कुलोचित मर्यादा अत्यन्त काळजीपूर्वक पालन करून, कुलाचा नांवलौकिक रक्षण करण्याविषयीं अत्यन्त दक्ष असतात. आणि, सर्व धर्मसाधनांपेक्षांही-पुण्यसंपादनाचा-अत्यन्त पवित्र मार्ग म्हणजे "एक पतीच म्हणजे पतिसेवाच" सर्वांत श्रेष्ठ आहे, असें त्या मानतात. यास्तव मुली–

**स त्वया नावमन्तव्यः पुत्रः प्रव्राजितो वनम् ।**
**तव देवसमस्त्वेषः निर्धनः सधनोऽपि वा ॥२५॥**

तूं त्याचा केव्हांही अपमान करूं नकोस. तो वनामध्यें हाकून लावलेला असो, तो श्रीमन्त असो अथवा दरिद्री असो, तुला तर तो देवासमानच आहे.

साध्वी स्त्रियांचें वर्तन कसें असतें व त्यांनीं कसें वागावें, हें सांगतांना, तत्पूर्वी असाध्वी स्त्रियांचीं लक्षणें सीतेला सांगण्याचा हेतु हा आहे कीं, तिला असाध्वी स्त्रियांचे दुर्गुण टाळतां यावेत. याच कारणास्तव त्यांचें विस्तारपूर्वक परिगणन केलें आहे.

( ६ ) **कौसल्येचा दानधर्म**– कौसल्येचा दानधर्म फार मोठा होता, असें दिसतें. प्रतिवर्षी गुरुकुलांमधून उत्तीर्ण झालेले शेकडों विवाहेच्छु स्नातक द्रव्यसहायार्थ तिच्या दारीं येऊन बसलेलेच असत. त्यांचे सर्वांचे विवाह करून देऊन, त्यांस संसाराला आरंभ करण्यास अडचण पडूं नये म्हणून, पुरेसें द्रव्यसाहाय्यही त्यांस तिच्याकडून मिळत असे. वनवासास जातांना श्रीरामानें लक्ष्मणास त्या

लोकांचा परामर्ष घेण्यास सांगितलें त्यावरून हें स्पष्टतया दिसून येत आहे. तें असें–

**मेखलीनां महासंघः कौसल्यां समुपस्थितः ।**
**तेषां सहस्रं सौमित्रे प्रत्येकं संप्रदापय ॥ २१ ॥** ( सर्ग ४२ )

प्रत्येकास १००० मोहरा देणें म्हणजे विवाह आटोपून आजन्म सुखानें संसार करण्यास कांहीं कमी नाहीं.

**मेखलीनां महासंघः**– या वर्णनावरून, असे विवाहेच्छु स्नातक फारच मोठ्या संख्येंत प्रतिवर्षी तिजकडे येत असत असें दिसतें. त्यांपैकीं, प्रत्येकाला १००० मोहरा देणें म्हणजे कांहीं सामान्य रक्कम नव्हे.

## राममाता कौसल्या व युधिष्ठिरमाता कुन्ती यांची तुलना–

कौसल्येचें पुत्रप्रेम अगदीं आंधळें दिसतें. आपला राम आपणांपासून दूर जाऊं नये, त्याची आणि आपली ताटातूट होऊं नये– ( मग त्याला शत्रूचें दास्य करावें लागलें, पोटासाठीं घरोघर भिक्षा मागावी लागली, किंवा याहीपेक्षां अधिक अपमान अथवा उपमर्द सहन करावा लागला, तरी लागो )– येवढीच काय ती तिची इच्छा होती. म्हणजे कौसल्येच्या-पुत्रप्रेमांत आपल्या पुत्राच्या अभ्युदयाची भावनाच नाहीं.

"उद्यां आपला राम मोठा होईल, तो राजा होईल, आणि आपल्याला सुखाचे दिवस येतील व आपल्याला सुख लागेल" येवढीच काय ती तिची परमावधीची इच्छा. "आपल्या पुत्रावर अन्याय झाला आहे, तो सर्वस्वी अवनतीच्या खोल गर्तेंत जाऊन पडला आहे. त्याची पुनः उन्नति कशी होईल, तो राज्यपदावर आरूढ कसा होईल ?" याविषयींची महत्त्वाकांक्षा कौसल्येचे ठिकाणीं मुळींच दिसून येत नाहीं. हें तिच्या त्या वेळच्या भाषणावरून स्पष्टतया दिसून येत आहे. तें भाषण असें आहे–

**त्वत् वियोगात् न मे कार्यं जीवितेन सुखेन वा ।**
**त्वया सह मम श्रेयः तृणानामपि भक्षणम् ॥२६॥**

( अयोध्याकांड सर्ग २१ )

**अथास्मिन् नगरे राम चरन् भैक्ष्यं गृहे वसेत् ।**
**कामकारो वरं दातुं अपि दासं ममात्मजम् ॥ ४ ॥**

( अयोध्या. सर्ग ४३ )

म्हणजे, हे रामा तुझा वियोग झाला असतां मला जगून तरी काय करावयाचें आहे व कितीही सुखोपभोग मिळाले तरी तुझ्यावांचून त्यांचा मला काय उपयोग आहे ? तूं माझ्या जवळ असल्यावर मला तृण भक्षण करून जगण्याची जरी पाळी आली तरी देखील मला तें अधिक श्रेयस्कर वाटेल ॥ २६ ॥ कैकेयीला भरतासाठीं राज्य हवें होतें तर तिनें तें खुशाल मागून घ्यावयाचें होतें. पण रामासाठीं वनवास मागून घेतला त्याऐवजीं " रामानें अयोध्येंतच राहून, घरोघर भिक्षा मागून पोट भरावें व भरताचें दास्य करावें " असें मागून घेतलें असतें, तरी उत्तम झालें असतें. म्हणजे माझी व माझ्या रामाची ताटातूट तरी झाली नसती !

याच्या उलट, कुन्तीचें भाषण पाहतां, तिला स्वतःच्या सुखाची चाडच नाहीं, असें दिसून येईल. केवळ " आपलीं मुलें खालीं पडलीं आहेत, त्यांचा अभ्युदय कसा होईल, त्यांच्या शत्रूंचा निःपात कसा होईल, आपला युधिष्ठिर पुनः राजपदावर आरूढ कसा होईल– " या महत्त्वाकांक्षेनें कुन्तीचें अन्तःकरण एकसारखें तळमळत होतें. " युधिष्ठिर राजा कधीं होईल व आपल्याला सुखाचे दिवस कधीं येतील " यासाठीं ती जगलीच नव्हती. तिचें ' एकमेव ' ध्येय आपला युधिष्ठिर " फिरून सिंहासनारूढ कसा होईल व आपल्या पतीच्या वंशाची उन्नति कशी होईल ?" एवढेंच होतें. ही तिच्या जन्माची इति-कर्तव्यता होती, व ती, इच्छेनुसार पूर्णपणें पार पडल्याबरोबर, ती गान्धारी व धृतराष्ट्र यांच्या सहवर्तमान ( त्यांची सेवा करण्याचेच केवळ हेतुनें ) एकदम वनांत जाण्यास निघाली. या प्रसंगींचा तिचा युधिष्ठिराशीं झालेला संवाद लक्ष्यांत घेण्यासारखा आहे.

कुन्तीनें वनांत जाऊं नये, आपल्यापाशींच राहवें म्हणून युधिष्ठिर अत्यन्त काकुळतीस येऊन तिला म्हणाला:—

**" यदा राज्यं इदं कुन्ति भोक्तव्यं पुत्रनिर्जितम् ।**
**प्राप्तव्या राजधर्मास्ते तदेयन्ते कुतो मतिः ॥२५॥**

किं वयं कारिता कुन्ति भवत्या पृथिवीक्षयम् ।
वनात् चापि किमानीता भवत्या बालका वयम् २६
प्रसीद मातर्मागास्त्वं वनमद्य यशस्विनि ।
श्रियं यौधिष्ठिरीं तावत् भुंक्ष्व मातर्बलार्जितम् २८

( आश्रमवासितपर्व कुन्तीप्रस्थान अध्याय १६।१७ )

म्हणजे, ज्या वेळीं आपल्या पुत्रानें स्वपराक्रमानें जिंकून घेतलेल्या राज्याचा उपभोग घ्यावयाचा, त्या वेळीं ही वनांत जाण्याची बुद्धि तुला कोठून झाली ? तुला राजैश्वर्य नको होतें व वनांतच जावयाचें होतें, तर आम्हांला तरी तूं वनांतून इकडे कां आणिलेस ? आणि आमच्या हातून हा येवढा पृथ्वीक्षय कां करविलास? आई क्षमा कर. तूं वनांत जाऊं नकोस. म्यां युधिष्ठिरानें, पराक्रमानें प्राप्त करून घेतलेल्या या राजैश्वर्याचा तूं यथेष्ठ उपभोग घे ॥ २८ ॥

येणेंप्रमाणें युधिष्ठिरानें पुष्कळ काकुळतीस येऊन, म्हटलें असतां त्यास कुन्ती ( सर्ग १७, आश्रमवासी पर्व ) उत्तर देत आहे—

एवं एतन् महाबाहो यथा वदसि पांडव ।
कृतं उद्धर्षणं पूर्वं मया वः सीदतां नृपाः ॥ १ ॥
द्यूतापहृतराज्यानां पतितानां सुखादपि ।
ज्ञातिभिः परिभूतानां कृतं उद्धर्षणं मया ॥ २ ॥
कथं पाण्डोर्न नश्येत, सन्ततिः पुरुषर्षभः ।
यशश्च वो न नश्येत इति चोद्धर्षणं मया ॥ ३ ॥
यूयं इन्द्रसमालोके देवतुल्यपराक्रमाः ।
मा परेषां मुखप्रेक्षास्थेत्येवं तत्कृतं मया ॥ ४ ॥
कथं धर्मभृतां श्रेष्ठः राजा त्वं धर्ममाश्रितः ।
पुनर्वने न दुःखी स्याः इति चोद्धर्षणम् कृतम्॥५॥
नाहं राज्यफलं पुत्राः कामये पुत्रनिर्जितम्।
पतिलोकान् अहं पुण्यान् कामये तपसावृतान् ॥६॥

**श्वश्रूश्वशुरयोः पादान् शुश्रूषन्ती वने त्वहम् ।**
**गान्धारीसहिता वत्स्ये तापसी मलपङ्किनी ॥ ७ ॥**

याचा भावार्थ– खरोखर तूं म्हणतोस तें तसेंच आहे. तुम्ही संकट भोगीत असल्याचें पाहून मींच प्रथम तुम्हांस भर दिली ॥ १ ॥ द्यूतामध्यें शत्रूंनीं तुमच्या राज्याचा अपहार केल्या कारणानें सर्व सुखांना आंचवलेले व भावाबंदाकडून सर्व प्रकारें तुच्छ लेखले जात असतांना पाहून तुम्हांस मी ईर्ष्या उत्पन्न केली ॥ २ ॥ काय उपाय केला असतां पण्डूची सन्तति नाश पावणार नाहीं, व तुमचें यश नष्ट होणार नाहीं याच विचारांत अहोरात्र मग्न राहून तुम्हांस मीं उत्तेजन दिलें. ॥ ३ ॥ अरे, तुम्ही इन्द्रासमान तेजस्वी व देवांसारखे पराक्रमी असतां, तुम्हांस दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून मींच तुम्हांस युद्ध करण्याची भर दिली. ॥ ४ ॥ तूं सर्व धर्माचरण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ व धर्मानुसार वर्तन करणारा राजा आहेस, त्या तुला– काय उपाय केला असतां– पुनः वनवासाचा प्रसंग येणार नाहीं, याचा पूर्ण विचार करूनच मी तुम्हांस भर दिली ॥ ५ ॥ बाळांनो ! मला तुम्ही मिळविलेल्या राज्यसुखाचा– उपभोग घेत पडून राहण्याची मुळींच इच्छा नाहीं. मी तर आपल्या तपोबलानें पतिलोकाची प्राप्ति करून घेण्याची इच्छा करीत आहें ॥ ६ ॥ आतां पांडूंचा वंश नष्ट झाला होता, त्याचा उद्धार झाला. तुम्ही अवनतीच्या खोल गर्तेत जाऊन पडला होता ते तुम्ही फिरून आपल्या पूर्वस्थितीवर आलांत, झालें, माझ्या जगण्याची इतिकर्तव्यता झाली; आतां मला आपल्या– माझ्या जन्माचें सार्थक करून घेणेस्तव पतिलोकप्राप्त्यर्थ तपोवनांत जाणेंच इष्ट आहे. या कारणास्तव, पतिव्रताधर्माचें पालन करून, सासूसासऱ्यांसमान पूज्य गांधारी व धृतराष्ट्र यांच्या चरणाची सेवा करीत राहून मी आपलें शेष आयुष्य तापसीसारखें तपोवनांत आश्रमामध्येंच व्यतीत करीन ॥ ७ ॥

( १ ) कौसल्या म्हणते—

**न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा पतिपौरुषे ।**
**अपि पुत्रे विपश्येयं इति रामास्थितं मया ॥**

कुन्ती म्हणते—

**नाहं राजफलं पुत्राः कांक्षये पुत्रनिर्जितम् ।**
**पतिलोकान् अहं पुण्यान् कांक्षये तपसार्जितान् ॥**

( २ ) कौसल्या म्हणते—

**अथास्मिन् नगरे रामश्चरन् भैक्ष्यं गृहे वसेत् ।**
**कामकारो वरं दातुं अपि दासं ममात्मजम् ॥**

कुन्ती म्हणते—

**यूयं इन्द्रसमा लोके देवतुल्य पराक्रमाः ।**
**मा परेषां मुखप्रेक्षाः स्थेत्येवं तत् कृतं मया ॥**
**द्यूतापहत राज्यानां पतितानां सुखादपि ।**
**ज्ञातिभिः परिभूतानां कृतं उद्धर्षणं मया ॥**

( ३ ) कौसल्या म्हणते—

**त्वद्वियोगात् न मे कार्यं जीवितेन सुखेन वा ।**
**त्वया सह मम श्रेयः तृणानामपिभक्षणम् ॥**

कुन्ती म्हणते—

**कथं पाण्डोर्न नश्येत सन्ततिः पुरुषर्षभाः ।**
**यशश्च वो न नश्येत इति चोद्धर्षणं कृतम् ॥**

हीं जीं अवतरणें वर दिलीं आहेत, त्यावरून कौसल्येच्या मनोवृत्ति किती मृतप्राय झाल्या होत्या, व तिचा स्वाभिमान आणि महत्वाकांक्षा हीं कशीं मरून गेलीं होतीं; उलट कुन्तीचा स्वाभिमान किती जाज्वल्य होता व तिची महत्त्वाकांक्षा किती तीव्र होती हें दिसून येतें.

कौसल्येच्या अंगीं इतकी निराशा व्यापण्याला व तिच्या मनोवृत्ति इतक्या मृतप्राय होण्याला कारण-दशरथाकडून तिची होणारी अवहेलना आणि त्यामुळें कैकेयीकडून तिचा नेहमीं होत असलेला पाणउतारा हें तर आहेच, पण, उपजतच तिचा अंगीं असणारी भीरुता आणि अशा प्रसंगीं संकटास तोंड देण्याइतक्या मानसिक धैर्याचा अभाव व स्वभावाची अत्यन्त सरलता— हीं ती कारणें आहेत असें म्हटल्यास अन्यथा होणार नाहीं.

" आपला राम राजा होईल, व त्याच्या राज्यांत तरी आपल्याला सुखाचे दिवस येतील " या आशेवर प्राण धारण करून राहिलेल्या कौसल्येची जेव्हां शेवटची निराशा झाली तेव्हां ती सर्वप्रकारें गलितधैर्य होऊन—

**( १ ) "त्वया सह मम श्रेयः तृणानां अपि भक्षणम् "**

**( २ ) "अथाऽस्मिन् नगरे रामः चरन् भैक्ष्यं गृहे वसेत् ।**
**कामकारो वरं दातुं अपि दासं ममात्मजम् "—**

येथपर्यंन्त हीन वृत्ति पतकरण्यास प्रवृत्त होते; पण **कुन्ती** ? आपले पुत्र अंगदीं रसातळाला गेले असतां, सर्व संकटांना धैर्यानें तोंड देऊन, त्यांच्याच उन्नतीस्तव, केवळ निःस्वार्थीपणानें झटते. तिचें धैर्य लवमात्र कमी होत नाहीं, आणि त्यांस परोपरीनें उत्तेजन देऊन, त्यांचा उत्कर्ष घडवून आणते; येवढेंच नव्हे, तर ज्या धृतराष्ट्र व गान्धारी यांच्या पुत्रांकडून आपल्या पुत्रां संबंधांत अनेक प्रकारें डोंगरायेवढे अन्याय झाले असून देखील, ते सर्व पोटांत घालून, पुत्रांच्या ऐश्वर्याच्या मोहांत न पडतां—

**" श्वसूश्वशुरयोः पादान् शुश्रूषन्ती वने त्वहम् ।**
**गान्धारी सहिता वत्से तापसी मलपंकिनी "—**

**असें उत्तर युधिष्ठिरास देऊन**, त्यांच्या सेवेसाठीं ती त्यांच्याबरोबर पुनः वनांत निघून गेली.

या तिच्या स्वभावाच्या उदारपणाला इतिहासांत तोड नाहीं. युधिष्ठिराला " अजातशत्रु " म्हणतात; पण **कुन्ती खरी " अजातशत्रु "** आहे. युधिष्ठिराचे ठिकाणीं जो " **अजात शत्रुत्वाचा गुण आला आहे, तो कुन्तीपासून आला आहे. असें म्हटल्यास अन्यथोक्ति होणार नाहीं**. कुन्तीची तेजस्विता कौसल्येमध्यें नाहीं. कुन्तीशीं तुलना केल्यास कौसल्या ही अत्यन्य सामान्य स्त्री दिसते.

# (२) सुमित्रा (लक्ष्मणमाता)

सुमित्रा ही मगध देशाच्या शूरसेन राजाची कन्या आणि दशरथ राजाच्या तीन मुख्य राण्यांपैकीं मधली, कौसल्येपेक्षां धाकटी व कैकेयीपेक्षां वडील. हिच्या संबंधांत आनन्दरामायणांत सारकाण्ड सर्ग २, श्लोक ७० मध्यें असा उल्लेख आहे—

**ततो राजा दशरथः सुमित्रां मगधेशजाम् ।**
**विवाहेनापरां पत्नीं चकार दयितां प्रियाम्     ७०**

यावरून " सुमित्रा राजकन्या नव्हती, हलक्या कुलांतली होती " असें जें विधान कांहीं आधुनिक संशोधक विद्वानांनीं केलें आहे, तें अगदीं मिथ्या आहे असें ठरतें. सुमित्रा जर "राजकन्या नसती, हलक्या कुलांतली असती तर तिला मुख्य पट्टराण्यांमध्यें व तेंही कैकेयीच्यावर स्थान मिळालेंच नसतें.

कैकेयीला विवाह करून आणिल्यानन्तर दशरथ राजाचें– कौसल्येप्रमाणें– हिच्यावरचेंही प्रेम ओसरलें. तथापि ही मनाची अति गंभीर व सारासारविचार-पूर्वक परिस्थिति ओळखून वागणारी असल्याकारणानें हिनें कौसल्या आणि कैकेयी या दोघींशींही मिळतें घेऊन, आपलें सुमित्रा हें नांव सार्थ केलें होतें.

ही स्वभावतः शान्तताप्रिय असल्याकारणानें, राजकीय भानगडी पासून दूरच राहत असे. तथापि, प्रसंगीं सत्यपक्षालाच सहाय्य करण्याइतकें मनोधैर्य तिच्या अंगीं पूर्णपणें वसत होतें. हें, श्रीराम वनांत जातांना तिनें लक्ष्मणाला त्याच्या बरोबर जाण्यास आपण होऊन जें उत्तेजन दिलें व जो उपदेश केला आहे त्यावरूनच सिद्ध होत आहे. ती लक्ष्मणाला म्हणाली—

**सृष्टस्त्वं वनवासाय स्वनुरक्तः सुहृज्जने ।**
**रामे प्रमादं मा कार्षीः पुत्र भ्रातरि गच्छति     ५**

( अयोध्या. कां. सर्ग ४० )

**व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ ।**
**एष लोके सतां धर्मः यत् ज्येष्ठवशगो भवेत्     ६**

**इदं हि वृत्तं उचितं कुलस्यास्य सनातनम् ।**
**दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ७**
**लक्ष्मण त्वेवमुक्त्वासौ संसिद्धं प्रियराघवम् ।**
**सुमित्रा गच्छ गच्छेति पुनः पुनरुवाच तम् ८**

( अयोध्या. सर्ग २० )

भावार्थ- हे पुत्रा, तुझें रामावर अत्यन्त प्रेम आहे. म्हणूनच त्याच्या बरोबर वनवासाला जाण्याची मी तुला अनुज्ञा दिली आहे. वास्तव आपल्या सुहृद् जनांच्या ठिकाणीं प्रेम भावना उत्पन्न करणारा असा तुझा ज्येष्ठ भ्राता राम वनांतून जाऊं लागला असतां तूं कधींही गैरसावध रहात जाऊं नकोस ॥५॥ संकटांत सांपडेला असो अथवा समृद्ध असो, हे निष्पाप पुत्रा, हा रामच तुझी गति आहे. आणि ज्येष्ठ भ्रात्याला अनुसरून वागणें हाच या जगामध्यें सज्जनांना संमत असा धर्म आहे ॥॥ ६ ज्येष्ठाला अनुसरून वागणें हेंच आचरण या कुलाला उचित असून, तें परंपरागत चालत आलेलें आहे. आणि सत्पात्रीं दान, यज्ञ, दीक्षा व युद्धामध्यें देहत्याग हे धर्मही या आपल्या क्षत्रिय कुलाला उचित आहेत.

रामावर अत्यन्त प्रेम असल्या कारणानें त्याच्या बरोबर वनवासास जाण्यास सिद्ध झालेल्या लक्ष्मणाला येणेंप्रमाणें उपदेश केल्यावर "जा जा" असें पुनः पुनः सांगत सुमित्रा त्याला आणखी म्हणाली-

**रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।**
**अयोध्यां आटवीं विद्धि गच्छ तात यथा सुखम् ॥ ९ ॥**

बाळा रे, राम हाच दशरथ आहे असें मान, जनककन्या सीता हिलाच माझ्या ठिकाणीं मान आणि अरण्य हीच अयोध्या असें मान आणि आनन्दानें तूं खुशाल रामाबरोबर अरण्यांत जा.

यावरून, सुमित्रा ही यद्यपि दोघींही राण्यांशीं समताबुद्धीनें मिळून मिसळून वागत असे, तथापि, ती सत्-पक्षनिष्ठ होती आणि म्हणूनच कैकेयीकडून कौसल्येसंबंधांत अन्यायाचें वर्तन होत आहे, हें पाहून तिनें कौसल्येचा पक्ष- धरून आपल्या प्रिय पुत्राला ( लक्ष्मणाला ) श्रीरामाबरोबर वनवासास जावयास

उत्तेजन दिलें. कदाचित् कौसल्येकडून कैकेयीसंबंधांत अशाच प्रकारचें अन्यायाचें वर्तन झालें असतें आणि भरताला वनवासास जावें लागलें असतें, तर तिनें- भरताबरोबर वनवासास जाण्यासाठीं शत्रुघ्नालाही पाठवून असाच उपदेश केला असता, इतकी ती- सुमित्रा- समतोल मनाची स्त्री होती.

श्रीरामाला वनवासास जाण्याची आज्ञा झाली व तो कौसल्येचा निरोप घेण्यासाठीं तिच्या महालांत गेला, त्या वेळीं सुमित्रा कौसल्येच्या पाशीच बसली होती. श्रीरामानें जेव्हां कौसल्येला हा वृत्तान्त सांगितला व तिचा निरोप मागितला तेव्हां कौसल्या अत्यन्त शोक करूं लागली होती. त्या प्रसंगीं सुमित्रेनेंच तिला धीर देऊन तिचें सांत्वन केलें; आणि श्रीराम वनांत- गेल्या दिवसापासून चवदा वर्षांनीं तो परत येईपर्यन्त तिनें कौसल्येला मुळींच अन्तर दिलें नाहीं.

दशरथाचें प्राणोत्क्रमण कौसल्येच्या महालांत झालें. त्या वेळीं देखील सुमित्रा कौसल्येच्या संनिधच झोपलेली होती. यावरून, श्रीराम वनांत गेल्यामुळें दशरथराजा अत्यन्त शोकाकुल होऊन, मृत्युशय्येवर विवळत पडला असतां,- त्याची सेवा-शुश्रूषा करण्यांत कौसल्येला सुमित्रेचें पूर्ण सहाय्य होतें हें स्पष्टतया दिसून येतें.

श्रीरामाबरोबर वनांत जाण्याविषयीं लक्ष्मणाला उपदेश करण्यांत सुमित्रेची अत्यन्त दूरदृष्टि व शान्तताप्रियता दिसून येते. ती अशी कीं, लक्ष्मण हा जात्याच तीक्ष्ण स्वभावाचा व क्रोधी होता. कैकेयीच्या या कृत्यामुळें त्याचें अन्तःकरण भरताविषयीं अत्यन्त दूषित झालें होतें. व तो भरतावर आणि कैकेयीवर अतिशय जळफळत होता. हें त्याच्या-

**भरतस्याथ पक्ष्यो वा यो वास्य हितमिच्छति ।**
**सर्वांताँश्च वधिष्यामि मृदुर्हि परिभूयते ॥ १४ ॥**

( अयोध्या. सर्ग २१ )

या भाषणावरून, व त्याचप्रमाणें अयोध्याकांड सर्ग ९६ मधील भाषणावरून स्पष्टतया दिसून येत आहे. तें भाषण महर्षि येणेंप्रमाणें देत आहेत-

**अपि द्रक्ष्यामि भरतं यत्कृते व्यसनं महत् ।**
**त्वया राघवसंप्राप्तं सीतया च मया तथा ॥ २१ ॥**

यन्निमित्तं भवान् राज्यात् च्युतो राघव शाश्वतात्।
संप्राप्तोऽयं अरिर्वीर भरतो वध्य एवहि ॥ २२ ॥
भरतस्य वधे दोषं नाहं पश्यामि राघव।
पूर्वापकारिणं हत्वा नह्यधर्मेण युज्यते ॥ २३ ॥
पूर्वापकारी भरतः त्यागे धर्मश्च राघव।
एतस्मिन् निहते कृत्स्नां अनुशाधि वसुन्धराम् ॥२४॥
अद्य पुत्रं हतं संख्ये कैकेयी राज्यकामुका।
मया पश्येत् सुदुःखार्ता हस्तिभिन्नमिव द्रुमम् ॥२५॥
कैकेयीं च वधिष्यामि सानुबन्धां स बान्धवाम् ॥२६॥

× × × ×

शराणां धनुषश्चाहं अनृणोऽस्मिन् महाहवे।
ससैन्यं भरतं हत्वा भविष्यामि न संशयः ॥३०॥

**भावार्थ**– "हे रामा, ज्या भरतामुळें आपण कायमचे राज्याला मुकला आहांत आणि आपणांला, सीतेला व मला हें मोठें संकट प्राप्त झालें आहे, तो भरत माझ्या दृष्टीस पडेल तर छान होईल. हे वीरा, हा आपला शत्रु भरत आपण होऊनच चालून आला आहे. या कारणास्तव हा वध करण्यालाच योग्य आहे, हे राघवा, भरताचा वध करण्यांत मला यत्किंचितही दोष दिसत नाहीं ॥२३॥ जो अपकार करण्यास प्रथम प्रवृत्त होतो त्याचा वध केल्यानें अधर्म होत नाहीं. ज्याअर्थी, अपकार करण्यास भरतच प्रथम प्रवृत्त झाला आहे, त्याअर्थी हे राघवा, त्याचा वध करण्यानें धर्मच होणार आहे. याचा वध झाला असतां तूं संपूर्ण पृथ्वीचें राज्य करशील, ॥ २४-२५ ॥ राज्याचा अभिलाष धरणारी ही कैकेयी, हत्तीनें मोडून पाडलेल्या वृक्षाप्रमाणें, माझ्या हातून आपला पुत्र भरत रणामध्यें वध पावून पडलेला पाहो व तिला पराकाष्ठेचें दुःख होवो. फार कशाला, मी तिचे अनुयायी व बान्धव यांसहवर्तमान कैकेयीचा देखील वध करीन॥२५-२६॥ या महा वनामध्यें, सैन्यासहवर्तमान भरताचा वध करून आज मी बाणांच्या व धनुष्याच्या ऋणांतून मुक्त होईन." ॥ ३० ॥

लक्ष्मणाच्या या भाषणावरून उघड दिसतें कीं, श्रीराम वनांत एकटाच गेला

असता तर, त्याच्या पश्चात्, अत्यन्त तीक्ष्ण स्वभावामुळें, लक्ष्मणाचा, भरताशीं व विशेषतः कैकेयीशीं खटका उडून, भयंकर रक्तपात होण्याचा प्रसंग आला असतां तो टाळण्याच्या दूर दृष्टीनें, सुमित्रेनें लक्ष्मणाला– श्रीराम व सीता यांच्या बरोबर, त्यांच्या रक्षणार्थ म्हणून– वनामध्यें– जाण्यास उत्तेजन दिलें; आणि येणेंप्रमाणें, सुमित्रेनें एकाच कार्यांत– राज्यावरील पुढील भावि संकट टाळणें आणि श्रीराम व सीता यांचें रक्षण अशीं दोन कार्यें साधलीं.

**कैकेयी व सुमित्रा यांची तुलना**– ( १ ) कैकेयी अत्यन्त स्वार्थी, तर सुमित्रा अत्यन्त स्वार्थत्यागी. आपल्या पुत्राला ( भरताला ) राज्य प्राप्त व्हावें म्हणून, आपली परोपरीनें मनधरणी करणाऱ्या आणि आपल्या प्राणांच्याही पलीकडे आपल्यावर प्रेम करणाऱ्या, आपल्या प्रत्यक्ष पतीच्या प्राणांवर येणाऱ्या संकटाची काडीइतकी पर्वा न करतां अकाण्डताण्डव करून, आपला स्वार्थ साधून घेण्यास कैकेयी मागें सरत नाहीं. तर सुमित्रा– राज्यावर ओढवणारीं पुढील संकटें टाळण्यास्तव व श्रीरामाला वनवासांत सर्व प्रकारें सहाय्य व्हावें म्हणून प्रत्यक्ष आपल्या पोटच्या गोळयालाही-आपण होऊन श्रीरामाबरोबर वनवासास धाडीत आहे. ( २ ) कैकेयी अत्यन्त क्रोधी, तर, सुमित्रा अत्यन्त शान्त स्वभावाची ! ( ३ ) माता या दृष्टीनें कैकेयी व सुमित्रा या दोघीही पुत्रवत्सल खऱ्या; पण, कैकेयीचें पुत्रवात्सल्य पराकाष्ठेच्या स्वार्थीपणांत परिणत झालेलें दिसून येतें, तर सुमित्रेचें पुत्रवात्सल्य पराकाष्ठेच्या स्वार्थत्यागीपणांत परिणत झालेलें दिसून येतें. ( ४ ) कैकेयी जात्या इतकी वाईट नाहीं. पण, स्वभावाची उथळ दिसते. तिला सारासार विचार करण्याची शक्ति नाहीं. ती दुसऱ्याच्या तावडींत सहज सांपडण्याइतकी अल्लड आहे. आणि म्हणूनच मन्थरेच्या वक्तृत्वाची छाप तिच्यावर पडली व ती मन्थरेच्या आहारीं गेली. सुमित्रा बुद्धीची गंभीर व स्वतंत्रपणें दूरवर विचार करणारी आहे ( ४ ) कैकेयी आपला स्वार्थ साधण्यासाठीं केवढाही मोठा अनर्थ उत्पन्न करणारी आहे. तर सुमित्रा, अत्यन्त स्वार्थत्याग करूनही राज्यावरील भावि अनर्थ टाळण्याचा गंभीरपणें मोठा प्रयत्न करणारी आहे.

# (३) कैकेयी (भरतमाता)

कैकेयी ही केकय देशाच्या अश्वपति राजाची कन्या व दशरथ राजाची सर्वांत धाकटी पण अत्यन्त आवडती राणी. देवासुर संग्रामामध्यें दशरथ राजा देवांच्या पक्षानें शंबरासुराशीं युद्ध करीत असतां प्राणान्तिक जखमालागून तो बेशुद्ध होऊन पडला व त्याचा सारथीही मारला गेला. त्या अशा कठिण प्रसंगीं, कैकेयीनें स्वतः सारथ्यकरून, मोठ्या धैर्यानें व कौशल्यानें त्याचा रथ रणक्षेत्राच्या बाहेर काढून नेऊन, दशरथ राजास सुरक्षित स्थळीं नेऊन पोंहोचविलें आणि तेथें त्याची अत्यन्त काळजीपूर्वक शुश्रूषा करून, त्याला मृत्यूच्या दाढेंतून वांचविलें. या तिच्या उपकारानें तर दशरथ राजा तिच्या अगदिं-म्हणतात तसा-अंकितच झाला होता.

दशरथ राजाचें प्राणसंरक्षण करण्याचा कैकेयीला अशाप्रकारें अवसर मिळाल्या कारणानें, ती पर्यायानें, कौसल्या, सुमित्रा, आदि साडेतीनशें राण्यांचे सौभाग्य-रक्षण करण्यास कारणीभूत झाली होती. अर्थात्, त्या सर्वांही राण्यांवर तिचे महत् उपकार झाले होते. या कारणास्तव ती त्या सर्वही राण्याशीं तोऱ्यानें वागत असली तर त्यांत नवल काय ? त्यांत ही सर्वांत वडील राणी कौसल्या हिच्याशीं तर ती फारच आढ्यतेनें वागत असे व तिचा नेहमीं पदोपदीं पाणउतारा करीत असे, तथापि मन्थेरेनें बुद्धिभेद करी पर्यंत रामाविषयीं तिच्या मनांत कोणत्याही प्रकारें पाप नव्हतें. किंबहुना, रामावर तिचें निष्कपट असें प्रेमच होतें. हें, मन्थरा जेव्हां रामाविरुद्ध तिचा बुद्धिभेद करावयास आली त्या वेळीं तिनें मन्थरेशीं जें भाषण केलें व तिचें अभिनन्दन करून तिला जें बक्षीस दिलें त्यावरूनच सिद्ध होत आहे. तें भाषण महर्षि येणें प्रमाणें देत आहेत.

" मन्थराया वचः श्रुत्वा शयनात् सा शुभानना ।
उत्तस्थौ हर्षसंपूर्णा चन्द्रलेखेव शारदी ३१
'अतीव सा तु सन्तुष्टा कैकेयी विस्मयान्विता ।
दिव्यं आभरणं तस्यै कुब्जायै प्रददौ शुभम् ३२

*

दत्वा त्वाभरणं तस्यै कुब्जायै प्रमदोत्तमा ।
कैकेयी मन्थरां दृष्ट्वा पुनरेवाऽब्रवीत् इदम् ३३
इदं तु मन्थरे मह्यं आख्यातं परमं प्रियम् ।
एतन्मे प्रियमाख्यातं किंवा भूयः करोमि ते ३४
रामे वा भरते वाऽहं विशेषं नोपलक्षये ।
तस्मात् तुष्टास्मि यत् राजा रामं राज्येऽभिषेक्ष्यति ३५
न मे परं किञ्चिदितो वरं पुनः । प्रियं प्रियार्हे सुवचं वचोऽमृतम्॥
तथा ह्यवोचस्त्वमतः प्रियोत्तरं वरं परं ते प्रददामि तं वृणु ३६
( अयोध्याकांड सर्ग ७ )

**भावार्थ-**" दशरथ राजा रामाला यौवराज्याभिषेक करणार " हें मन्थरेचें वचन श्रवण करून कैकेयी अत्यन्त हर्षानें उठून बसली व मन्थरेवर अत्यन्त प्रसन्न होऊन, तिला एक अत्यन्त मौल्यवान् अलंकार बक्षीस दिला. आणि म्हणाली, मन्थरे, तूं मला हें अत्यन्त प्रिय वर्तमान ऐकविलेंस. यास्तव तुझ्या साठीं मी आणखी काय करूं ? बोल ! राम व भरत यांमध्यें मला मुळीं देखील न्यूनाधिक्य दिसत नाहीं. रामाला उद्यां राज्याभिषेक होणार म्हणून जो तूं हा अमृतोपम वृत्तान्त मला ऐकविलास, त्या पेक्षां मला अधिक प्रियतम असें कांहींच नाहीं. तर बोल तुला मी आणखी बक्षीस काय देऊं ? तुझ्या इच्छेस वाटेल ते माग. ३६

कैकेयीचें हें भाषण मन्थरेला अर्थातच आवडलें नाहीं. तिला कैकेयीच्या अल्ल-डपणाची कींव आली, आणि "राम राजा झाला तर तुझा व भरताचा केवढा अधःपात होईल, तूं देखील आमच्याच सारखी कौसल्येची दासी होशील व भर-ताला रामाचें दास्य करावें लागेल" इत्यादि अनेक प्रकारांनीं तिनें कैकेयीचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न केला ( सर्ग श्लोक १-१२ ). तथापि, कैकेयीला मन्थरेचें म्हणणें पटेना. मन्थरा रामाविरुद्ध तिचें मन कलुषित करण्याचा इतका यत्न करीत असून देखील ती ( कैकेयी ) रामाचेच गुण वेऊं लागली. तिनें मन्थरेला उत्तर दिलें तें पाहण्यासारखें आहे—

धर्मज्ञो गुणवान् दान्तः कृतज्ञो सत्यवान् शुचिः ।
रामो राजसुतो ज्येष्ठो यौवराज्यं अतोऽर्हति ॥१४॥

भ्रातॄन् भृत्यांश्च दीर्घायुः पुत्रवत् पालयिष्यति ।
संतप्यसे कथं कुब्जे श्रुत्वा रामाभिषेचनम् ॥१५॥
भरतश्चापि रामस्य ध्रुवं वर्षशतात् परम् ।
पितृपैतामहं राज्यं अवाप्स्यति नरर्षभः ॥१६॥
सा त्वं अभ्युदये प्राप्ते दह्यमानेव मन्थरे ।
भविष्यति च कल्याणे किमिदं परितप्यसे ॥१७॥
यथा वै भरतो मान्यः तथा भूयोऽपि राघवः ।
कौसल्यातोऽतिरिक्तं च मम शुश्रूषते बहु ॥१८॥
राज्यं यदि हि रामस्य भरतस्यापि तत् तदा ।
मन्यते हि यथात्मानं तथा भ्रातॄंस्तु राघवः ॥१९॥

**भावार्थः**— कैकेयी मन्थरेला म्हणत आहे कीं, राम हा मोठा धर्मज्ञ, गुणवान, मनोनिग्रही, कृतज्ञ, व आचरणानें अत्यन्त पवित्र असून राजाचा सर्वांत ज्येष्ठ पुत्र आहे, यास्तव तो युवराज होणें योग्यच आहे. तो राजा झाला तर सर्व भावांचे व नोकरचाकर लोकांचें पितृवत् पालन करील. रामाला राज्याभिषेक होणार हें ऐकून, कुब्जे तुला इतकें दुःख काय म्हणून वाटत आहे? रामानन्तर भरताला देखील आपलें वाडवडिलांपासून चालत आलेलें राज्य प्राप्त होईल. तर ही अभ्युदयाची वेळ प्राप्त- झाली असतां, (आनन्द मानावयाचा तो न मानतां) अशी क्रोधाने जळफळतेस काय म्हणून? जसा भरत मला प्रिय आहे तसाच— किंबहुना अधिक— राम मला प्रिय आहे. कारण, तो कौसल्येपेक्षांहि मला अधिक मानतो. या कारणास्तव, रामाला राज्य प्राप्त झालें तर तें भरतालाही प्राप्त झाल्या सारखेंच आहे. कारण, राम सर्वही भ्रात्यांना आपल्या सारखेंच मानतो. या भाषणावरून कैकेयीचें अन्तःकरण रामाविषयीं किती शुद्ध आहे, हें स्पष्टतया दिसून येत आहे. कौसल्येशीं ती तोऱ्यानें वागत असली तथापि रामाविषयी तिच्या मनांत द्वेष मुळींच नव्हता. तो तिच्या मनांत मन्थरेनें उत्पन्न केला व वाढविला. कैकेयी जात्या कांहीं इतकी वाईट नाहीं. पण दुसऱ्याच्या सहज आहारीं जाण्याइतकी अल्लड मात्र आहे. सरळ स्वभावाची पण, स्वतःची सदसत् विचारशक्ति नसलेलीं माणसें दुःसंगतीनें अकस्मात् कशीं बहकतात याचें मूर्तिमन्त उदाहरण—

"कैकेयी—" हें आहे.

कैकेयीशीं विवाह ठरवितें समयीं, तिच्याच पुत्राला राज्य देण्याचें अभिवचन दशरथराजानें कैकेयीच्या पित्याला दिलें असल्याबद्दल श्रीरामाच्या भाषणावरून काय तें दिसतें. तें भाषण असें आहे—

"पुरा भ्रातः पिता नः सः मातरं ते समुद्वहन् ।
मातामहे समाश्रौषीत् राज्यशुल्कं अनुत्तमम् ३

( अयोध्या कांण्ड सर्ग १०७ )

म्हणजे, भरत जेव्हां श्रीरामास परत आणण्यासाठीं चित्रकूटावर गेला व श्रीराम परत येत नाहीं असें पाहून प्रायोपवेशन करण्यास सिद्ध झाला, त्या वेळीं त्याची समजूत घालतांना श्रीराम भरताला असें म्हणाला आहे. आणि श्रीरामाच्या यौवराज्याभिषेक प्रसंगीं दशरथानें भरता संबंधांत व्यक्त केलेल्या शंकेवरून ( अयोध्याकांड सर्ग ४ श्लो.२५) त्याची स्पष्टताही होत आहे.

पण, असें होतें तर सत्य प्रतिज्ञ व धर्म परायण अशा दशरथ राजानें, ( बाल कांड सर्ग ६ श्लोक २ व ५ ) कैकेयीच्या पित्याला आधीच वचन दिलें असतां, भरताच्या पश्चात् रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याचा घाट कसा घातला ? बरें, श्रीरामानें तरी ( हें सर्व माहीत असून ) या संबंधांत दशरथास स्मरण दिल्याचें ग्रन्थांत कोठें दिसून येत नाहीं. जर श्रीरामाला ही गोष्ट माहीत होती, तर दशरथानें त्याला यौवराज्याचा अभिषेक करण्याचा विचार त्याचेपाशीं प्रकट केला त्याच वेळीं— भरताला राज्य देणें विषयीं त्याच्या मातामहास पूर्वींच वचन दिलें असल्याबद्दल- त्यानें दशरथराजास स्मरण कां दिलें नाहीं ? कदाचित्, "पितृ आज्ञा" तिच्या संबंधांत कोणतेंही प्रकारें विचिकित्सा करावयाची नाहीं तिच्यावर कोणतीही शंका कुशंका घ्यावयाची नाहीं. ती निमुटपणें पालन करावयाची" या पुत्र धर्मास अनुसरून, तसें स्मरण देणें श्रीरामाला योग्य वाटलें नसेल असें ही असणें शक्य आहे.

बरें, पण, मन्थरेसारख्या जुन्या व अत्यन्त चौकस अशा दासीला देखील या इतक्या महत्वाच्या गोष्टीचा मागमूसही कां नसावा ? कारण, मन्थरेला जर या संबंधांत कांहीं माहिती असती, तर—कैकेयीला बहकविणेंचे वेळीं- या अस्त्राचा

प्रयोग तिच्यावर करण्यास ती केव्हांही चुकली नसती. कदाचित्,- "दशरथानें जें वचन कैकेयीच्या पित्याला तिच्याशीं विवाह घडवून आणण्याच्या वेळीं दिलें होतें, त्याला अधिकच पक्कें करून घेण्याच्या हेतूनें,"- भरताकारितां राज्य मागून घेण्यासाठीं तिनें कैकेयीला भर दिली असावी असें म्हणावें, तर कैकेयीला पढवितेसमयीं त्या अभिवचनासंबन्धांत तसा उल्लेख मन्थरेच्या भाषणांत असावयास पाहिजे होता, पण तिच्या भाषणांत तसा उल्लेख कोठेंही नाहीं. यावरून, या अभिवचनासंबन्धांत मन्थरेलादेखील कांहींच माहिती नव्हती हेंच सिद्ध होतें.

यावरून, एकंदरींत विचार करतां, असें दिसतें कीं, हें जें अभिवचन दिलें गेल्याचें श्रीराम भरताला म्हणत आहे. तें कैकेयीचे विवाहासंबन्धांत प्रत्यक्ष कैकेयीचा पिता व स्वतः दशरथराजा या उभयतांमध्येंच एकान्तात बोलणें चाललें असतां (बोलण्याच्या ओघांत) दशरथ राजाच्या मुखांतून सहज निघून गेलें असावें. त्याला शपथेचें ( कायदेशीर करारार्चें ) स्वरूप प्राप्त झालें नसावें, तथापि, कशाही स्वरूपाचा कां असेनां,- शब्द निघून गेल्या कारणानें, तो तेवढाच शब्द जमेस धरून, युधाजित् आपल्या भाच्याचा म्हणजे भरताचा हक्क पुढें मांडून मध्येंच विघ्न उपस्थित करील- अशी शंका दशरथाला वाटणें साहजिकच होतें व तें त्यानें तसें श्रीरामाजवळ पर्यायानें बोलूनही दाखविलें होतें.

या अशा प्रकारच्या भाषणाला, शपथेचें म्हणजे कायदेशीर करारार्चें स्वरूप येत नसल्या कारणानें, दशरथ राजाकडे वचनभंगाचा दोष येत नाहीं अर्थात् त्याच्या "सत्याभि सन्धत्वाला व धर्मपरत्वाला" बाध येत नाहीं. कारण-

**कामिनीषु विवाहेषु गवां भक्ष्ये तथेन्धने ।**
**ब्राह्मणाभ्युपपत्तौ च शपथे नास्ति पातकम् ।**

(मनु. अ. ८ श्लोक ११२)

**विवाहमैथुननर्मार्तसंयोगेषु अदोषं एके अनृतम् ।** १

( गौतम. अ. ६ )

**उद्वाहकाले रतिसंप्रयोगे प्राणात्यये सर्वधनापहारे ।**
**विप्रस्य चार्थे ह्यनृतं वदेयुः पञ्चानृतान्याहुरपातकानि** २

( वसिष्ट स्मृ. अ. १६ )

**न नर्मयुक्तं वचनं हिनास्ति । न स्त्रीषु राजन् न विवाह काले ।**
**प्राणात्यये सर्वधनापहारे । पंचानृतान्याहुः अपातकानि ३**

(म. भा. आ. पर्व ८२·१६ )

तात्पर्य दशरथाने कैकेयीच्या बापास तसें वचन दिलें असलें तरी तें मोडून श्रीरामाला अभिषेक करण्यांत त्याजकडे मिथ्याभाषित्वाचा दोष येत नाहीं. श्रीरामानें फक्त भरताला वळविण्यासाठीं त्या वचनाचा उपयोग केला येवढेंच.

असें मानवादि धर्मशास्त्र सांगत आहे. म्हणजे उपभोग्य स्त्रियां संबंधांत, लग्न जुळवून आणण्या संबंधांत, गाईसाठीं गवत चोरून आणण्यासंबंधांत अथवा यज्ञार्थ इन्धन चोरून आणण्यासंबंधांत " **खोटी शपथ** " दोषावह होत नाहीं. म्हणजे, या यांच प्रसंगीं मिथ्या भाषण केल्यास पाप लागत नाहीं.

सारांश, हें जें अभिवचन दशरथ राजानें कैकेयीच्या पित्याला दिलें होतें म्हणून श्रीराम भरताला म्हणत आहेत, तें नुसते बरवर होतें याची जाणीव श्रीरामालाही होती, परंतु भरतानें आपला आग्रह सोडावा व राज्याचा स्वीकार करावा- याच हेतूने केवळ त्यानें आपल्या भाषणांत त्या अभिवचनाचा उल्लेख केला एवढेंच.

मन्थरेनें कैकेयीला बनवल्यानंतर मात्र कैकेयीची स्वार्थपरायणता तर पराकाष्ठेला पोहचली होती. स्वार्थानें ती केवळ अंध झाली होती. " श्रीराम वनांत गेला तर त्याच्या वियोगानें मी क्षणभर ही जिवन्त राहूं शकणार नाहीं ( अयोध्या सर्ग १२ श्लोक ७४।७५ )" असें दशरथ राजा मोठ्या काकुळतीस येऊन म्हणत असतां व आपला हेका सोडण्याविषयीं तिला तो परोपरीनें विनवीत असतां देखील कैकेयीनें त्याची मुळींच पर्वा केली नाहीं. तिच्या अन्तःकरणाला लवमात्र द्रव आला नाहीं.

जेव्हां, ती आपल्या पतीच्याही मृत्यूची पर्वा करीत नाहीं व आपला दुराग्रह सोडीत नाहीं असें पाहिलें, तेव्हां वृद्ध सुमंत्र अत्यन्त संतापला व दांत ओठ चावीत अत्यन्त मर्मभेदक शब्दांनीं तिची निर्भत्सना करून तिला बोलूं लागला. तो संतापानें इतका बेभान झाला होता कीं ही आपली स्वामिनी आहे व आपण हिचे सेवक आहोत- याची त्याला शुद्धच राहिली नाहीं. " केवळ आपला हट्ट पुरवून

घेण्यासाठी प्रत्यक्ष आपल्या पतीच्याही प्राणावर उठण्यास मागें न सरणें " हा तिच्या आईचाच गुण तिच्यामध्यें पूर्णपणें उतरला आहे " असें बोलून तिच्या आईच्या वर्तनाचा पाढा त्यानें तिच्यापुढें सर्वां समक्ष साग्र वाचला. तो असा—

कैकेयीच्या पित्याला ( अश्वपति राजाला ) कोणा सिद्ध पुरुषाच्या प्रसादानें सर्व पशु पक्ष्यांची भाषा समजूं लागली होती. पण- " त्याचा अर्थ त्यानें इतर कोणासही सांगूं नये, सांगितल्यास त्याला तत्काळ मृत्यु येईल—" असेंही त्यास त्या सिद्धानें निक्षून सांगितलें होतें. एकदां जृंभ नांवाच्या पक्ष्याचें भाषण ऐकून त्याला हांसु आलें. तें पाहून, तो आपल्यालाच हांसला आहे असें वाटून, कैकेयी-च्या आईनें; त्या हांसण्याचा अर्थ त्याला विचारला. तेव्हां " याचा अर्थ मी तुला सांगितला तर मला तत्काळ मृत्यु येईल, या कारणास्तव मी तो सांगूं शकत नाहीं" असें त्यानें तिला बहुत प्रकारें समजावून सांगितलें. पण, ''तूं खुशाल मर किंवा जग, मला या तुझ्या हसण्याचा अर्थ तूं सांगितलाच पाहिजे, नाहींतर मी जीव देईन" असा हट्ट ती धरून बसली. तेव्हां तो ( कैकेयीचा पिता ) अत्यन्त कष्टी होऊन त्या साधुकडे गेला व त्याला हा सर्व वृतान्त विदित करून " पुढें काय उपाय करावा ?" म्हणून त्यानें त्या सिद्धास विचारिलें. तेव्हां त्या सिद्धानें त्याला स्पष्टपणें सांगितलें कीं, "तिला खुशाल मरूं दे, तुला आपला जीव हवा असला तर याचा अर्थ तिला मुळींच सांगू नको " त्याप्रमाणें त्या अश्वपति राजानें कैकेयीच्या आईचा त्याग केला आणि आपण सुखानें कालक्रमणा करूं लागला.

ही गोष्ट दशरथराजा समोर कैकेयीला मुद्दाम बोलून दाखविण्यांत,- "ज्या-प्रमाणें कैकेयीचा पिता कैकेयीच्या आईचा त्याग करून सुखी झाला, त्याच प्रमाणें, दशरथ राजानें ही कैकेयीचा त्याग करून सुखी व्हावें" अशी सुमंत्रा कडून दश-रथाला गर्भित सूचनाच होती असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. पण, दश-रथाच्या अंगीं कैकेयीचा त्याग करण्या इतकें धैर्य नव्हतें व श्रीरामही कैकेयीच्याच म्हणण्याला अनुसरला होता, या कारणांनीं सुमंत्राच्या या सूचनेचा कांहीं उपयोग झाला नाहीं व कैकेयीचाच हट्ट शेवटास गेला. या संबंधांत अयोध्या कांड सर्ग ३२ विशेषतः श्लोक १७ ते २८ पर्यन्त मूळ ग्रन्थांतूनच पाहणें योग्य होईल.

विवाहाच्या वेळीं कुल पहावें म्हणतात तें या साठींच होय.

# ऋषींचा कट

## रावणसाम्राज्याचा नाश करूं इच्छिणारे क्रान्तिकारी ऋषि व मुनि

तमप्रतिमतेजोभ्यां भ्रातृभ्यां रोमहर्षणम् ।
विस्मिताः संगमं प्रेक्ष्य समुपेता महर्षयः ॥ १ ॥
अन्तर्हिता मुनिगणाः स्थिताश्च परमर्षयः ।
ततस्त्वृषिगणाः क्षिप्रं दशग्रीववधैषिणः ।
भरतं राजशार्दूल इत्यूचुः संगता वचः ॥ ४ ॥
कुले जात महाप्राज्ञ महावृत्त महायशः ।
ग्राह्यं रामस्य वाक्यं ते पितरं यद्यवेक्षसे ॥ ५ ॥
सदानृणमिमं रामं वयमिच्छामहे पितुः ।
अनृणत्वाच्च कैकेय्याः स्वर्गं दशरथो गतः ॥ ६ ॥
एतावदुक्त्वा वचनं गंधर्वाः समहर्षयः ।
राजर्षयश्चैव तथा सर्वे स्वां स्वां गतिं गताः ॥ ७ ॥

( अयोध्या. ११३ )

' त्या अप्रतिम तेजस्वी भावांचा अंगावर रोमांच आणणारा संवाद ऐकून तेथें जमलेले ऋषि व महर्षी आश्चर्यचकित झाले. गुप्त रूपानें तेथें आलेले ते महर्षि व मुनिगण राम व भरत यांची फारच प्रशंसा करूं लागले. रावणाचें साम्राज्य नष्ट करून त्याचा वध व्हावा अशी इच्छा करणारे ते मुनीगण एकत्र जमून भरताला म्हणाले, भरता तूं कुलीन, ज्ञानी, सदाचारी व यशस्वी आहेस म्हणून

तूं रामाच्या म्हणण्याप्रमाणें वागावेंस हेंच तुला योग्य आहे. रामानें पित्याच्या ऋणांत कधींहि राहूं नये अशी आमची इच्छा आहे. राम वनवासांत आल्यानें दशरथ कैकेयीच्या ऋणांतून मुक्त झाला व स्वर्गाला गेला आहे, इतकें सांगून तें आपआपल्या मार्गानें निघून गेलें.

यावरून उघड दिसतें कीं रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याचा जो क्रान्तिचा कट ऋषिमुनिंनीं केला होता, तो सिद्धिस जाण्यासाठीं राम व लक्ष्मण यांनीं वनांतच राहणें इष्ट होतें. जर भरताच्या म्हणण्याप्रमाणें यावेळीं राम वनांत न राहतां परत अयोध्येस गेला असता तर ऋषिंचा बेत फिसकटला असता. रामायणांतील वृत्तांत पाहिला म्हणजे असें दिसतें कीं, कांहीं ऋषि रामचंद्राच्या हालचालीवर देखरेख ठेवीत होते. राम परत जाण्याचा जेथें जेथें संभव उत्पन्न होतो, तेथें तेथें नेमके ऋषि येतात व रामास वनांत राहण्यासच प्रवृत्त करतात. या वेळीं भरत रामांचें बोलणें चाललें असतां ऋषींचें येणें हें यापैकीं एक आहे. त्यांनीं भरताला परत पाठवलें व रामाला वनांत ठेवलें. ही ऋषींची हालचाल रामायणांत लक्ष्यपूर्वक पाहण्यासारखी आहे.

## रामाचा वनवास राष्ट्राला सुख देईल

**न दोषेणावगन्तव्या कैकेयी भरत त्वया ।**
**रामप्रव्राजनं ह्येतत् सुखोदर्कं भविष्यति ॥ ३० ॥**
**देवानां दानवानां च ऋषीणां भावितात्मनाम् ।**
**हितमेव भविष्यद्धि रामप्रव्राजनादिह ॥ ३१ ॥**

( अयोध्या. ९२ )

भरत जेव्हां आपल्या आईची–कैकेयीची–अत्यंत निर्भत्सना करूं लागला, तेव्हां भरद्वाज ऋषि भरताला म्हणाले, ‘ बा भरता ! तूं आपल्या आईची अशी निंदा करूं नकोस. रामाचा वनवास हा शेवटीं लोकांना सुख देणाराच होईल. देव, दानव व ऋषि या सर्वांचें यामुळें हित होईल.

यावरून असें दिसतें कीं ऋषिनीं रावणाचें साम्राज्य नष्ट करण्याचा जो कट केलेला होता, तो भरद्वाज ऋषिंना माहित होता. तो तडीस जावा म्हणून ऋषिंनीं

व देवांनीं मन्थरेला तयार केली व तिनें कैकेयीकडून रामाचा वनवास घडवून आणला. राज्यक्रान्तिच्या मोठ्या कार्यांतील हा एक डुबा होता. यावेळीं त्याचा बभ्रा होणें योग्य नव्हतें. म्हणून भरद्वाज म्हणत आहेत कीं कैकेयीवर इतका संताप करण्याचें कारण नाहीं. रामाचा वनवास हा आवश्यकच आहे व पुढें तो सर्वांला आनंदच देईल.

## कैकेयीवर रागाऊं नकोस

कामाद्वा तात लोभाद्वा मात्रा तुभ्यमिदं कृतम् ।
न तन्मनसि कर्तव्यं वर्तितव्यं च मातृवत् १९
मातरं रक्ष कैकेयीं मा रोषं कुरु तां प्रति ।
मया च सीतया चैव शप्तोऽसि रघुनन्दन २८

( अयोध्या. ११२ )

‘ प्रेमानें अथवा लोभानें तुझ्या मातेनें हें जें केलें आहे, तें मनांत ठेऊं नकोस व तिच्याशीं मातृप्रेमानें वाग. कैकेयी मातेचें रक्षण कर, तिच्यावर रागाऊं नकोस, हे भरता ! तुला माझी व सीतेची शपथ आहे. ’

हें श्रीरामाचें म्हणणें आहे. रामाला अजून रावणाच्या साम्राज्याविरुद्ध चाललेल्या ऋषींच्या क्रान्तिकारी कटाची कल्पना नव्हती. पण राक्षसांचा उपद्रव ऋषिंना फार होत आहे तो दूर केला पाहिजे, एवढें मात्र यावेळी रामाला चांगलें कळून चुकलें होतें व राम एवढ्या पुरतीच आपली जबाबदारी आहे असें समजत होता. रामावरची ही जबाबदारी उत्तरोत्तर वाढत जाणार आहे. रामाचे कुल-पुरोहित वसिष्ठ ऋषि व त्यांचे मित्र विश्वामित्र ऋषि यांनां मात्र या कटाची सर्व माहिती होती. पण यांपैकीं कोणीहि रामाला त्याबद्दल या वेळीं कळविलें नव्हतें. कारण तें आधीं कळवून उपयोगीहि नव्हतें.

भरद्वाज ऋषि व दुसरे गुप्त वेषानें आलेले ऋषिमुनि, कैकेयीवर रागाऊं नकोस असें भरतास सांगतात व तेंच रामही सांगत आहे. या सांगण्याच्या आंतील कारण एकच असण्याचा बराच संभव आहे. जरी यावेळीं रामाला ऋषींनीं केलेल्या कटाची अथवा रावणवधाची कल्पना नसली तरी राक्षसांचा उपद्रव कमी

केला पाहिजे, याशिवाय सनातन धर्मावरील संकट दूर होणार नाहीं एवढें यावेळीं रामाच्या ध्यानीं नक्की येऊन चुकलें होतें.

विश्वामित्र ऋषिनें रामाला दिलेलें शिक्षण हेंच बीजारोपण करण्यास कारण झालें होतें. त्यानंतर आतापर्यंत त्यानें स्वतः वनवासांत प्रत्यक्षही अवलोकन केलें होतें. यामुळें रामासारख्या हुषार व पराक्रमी राजपुत्राच्या मनांत सर्व परिस्थितिची जाणीव झालीच असली पाहिजे. ऋषिमुनींनीं तर रावण साम्राज्य समूळ नष्ट करण्याचा कटच केलेला होता. तेव्हां वनवासांत ऋषींशीं रामलक्ष्मणांचीं जीं बोलणीं झालीं असतील, त्यांचा संबंधही दुसरा तिसरा असण्याचा संभव नाहीं. ऋषींनीं साक्षात् बोलणें केलें नसलें, तरी एकंदर राक्षसांविषयीं रामाच्या मनांत अप्रीति उत्पन्न होईल असेंच त्यांचें बोलणें होण्याचा संभव अधिक असणें स्वाभाविक आहे.

## ऋषिंच्या तक्रारी

चित्रकूटावरून राम अत्रिऋषिच्या आश्रमाजवळ गेला. अत्रिऋषि व त्यांची पत्नी अनुसूया यांनीं राम लक्ष्मण व सीता यांचें स्वागत करून आपल्या आश्रमांत त्यांस ठेऊन घेतलें. सती अनुसूयेनें सीतेला पुष्पमाला, वस्त्रें व आभूषणें दिलीं व उटणेंही दिलें. त्यांचा सीतेनें स्वीकार केला .ही पुष्पमाला न कोमेजणारी होती, वस्त्र न मळणारें व उटणें नेहमीं उत्तम रीतिनें टिकणारें होतें.

अत्रिच्या आश्रमाचा निरोप घेऊन पुढें जातानां तेथील ऋषि रामाला म्हणाले कीं येथें राक्षसांचा फारच उपद्रव होत आहे. त्याचें आपण निवारण करावें. ( अयोध्या. ११९।२० )

ऋषींनीं रामाला पुढील वनाचा मार्ग दाखविला. तेव्हां राक्षसांच्या नाशाचा विचार करीत रामानें त्या वनामध्यें प्रवेश केला. रामाच्या याच्या पुढच्या योजना सर्वच्या सर्व राक्षसांचा नाश कसा करावा या संबंधीच्याच होणें स्वाभाविक होतें. राक्षसांचें मूळ कोठें आहे याचाही शोध रामानें केला असावा. कारण वालीवधाच्या वेळीं राम आपणास दशरथानें वनाचें राज्य दिलें आहे, अशी अधिकाराची भाषा बोलत असलेला दिसतो. माझा या वनावर अधिकार असल्यानें येथें सुव्यवस्था ठेवण्याचा भार मजवर आहे असा याचा आशय होतो.

## रामामुळें राक्षसांचें भय वाढलें.

चित्रकूट पर्वतावर राम येण्यपूर्वी व नंतर तेथें पुष्कळच तपस्वी राहत असत. राम तेथें आल्यावर तर त्यांची संख्या अधिकच वाढली, पण जसा जसा राम तेथें अधिक राहूं लागला, तसतसा राक्षसांचा उपद्रव अधिकाधिक होऊं लागला. तेव्हां तपस्वी आपसांत कुजबुजूं लागले. रामाच्या पुढें येऊन बोलण्याचा त्यांस संकोच वाटूं लागला. कारण रामाची वागणूक फारच उत्तम होती व तो राजपुत्र ही होता. पण प्रतिदिवशीं राक्षसांचा उपद्रव वाढूं लागल्यामुळें तपस्व्यांचा ही अगदीं निरुपाय झाला. शेवटीं रामानेंच विचारलें तेव्हां एक तपस्वी म्हणाला—

त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रतिवर्तते ।
रक्षोभ्यस्तेन संविग्नाः कथयन्ति मिथः कथाः १०
रावणावरजः कश्चित्खरो नामेह राक्षसः ।
उत्पाट्य तापसान्सर्वाञ्जनस्थाननिवासिनः ११
धृष्टश्च जितकाशी च नृशंसः पुरुषादकः
अवलिप्तश्च पापश्च त्वां च तात न मृष्यते १२
त्वं यदा प्रभृति ह्यस्मिन्नाश्रमे तात वर्तसे ।
तदा प्रभृति रक्षांसि वि प्रकुर्वन्ति तापसान् १३
प्रतिघ्नन्त्यपरान् क्षिप्रमनार्याः पुरतः स्थितान् ।
तैर्दुरात्मभिराविष्टानाश्रमान्प्रजिघांसवः ।
गमनायान्यदेशस्य चोदयन्त्यृषयोऽद्य माम् १८
खरस्त्वय्यपि चायुक्तं पुरा राम प्रवर्तते
सहास्माभिरितो गच्छ यदि बुद्धिः प्रवर्तते २१
सकलत्रस्य संदेहो नित्यं युक्तस्य राघव ।

( अयोध्या ११७ )

'हे रामा ! तुझ्यामुळें येथील तापसी लोकांना हे कष्ट राक्षसांपासून होऊं लागले आहेत. म्हणून हे तापसी हा चित्रकूट पर्वत सोडून दुसरीकडे निघून जात आहेत. रावणाचा कोणी एक धाकटा भाऊ खर या नांवाचा आहे. तो येथील

ऋषिमुनींना त्रास देऊं लागला आहे. तुझें येथें राहणें त्यास सहन होईनासें झालें आहे. ते राक्षस धीर, निर्भय, दुष्ट, मनुष्यभक्षक, गर्विष्ठ व पापी आहेत. ते तापसी दिसला कीं त्यास ठार मारतात. म्हणून त्यांच्या भीतिनें हे तापसी हा देश सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाऊं लागले आहेत. हा खर अजून पर्यंत तुझ्या वाटेस गेला नाहीं, तोंच तूं येथून दुसरीकडे जावें हे योग्य होय. विशेषतः बरोबर बायको असणें हें तर फारच वाईट. म्हणून तुला वाटत असेल तर आमच्याबरोबर चल.'

असें म्हणून बरेच तापसी निघून गेले पण त्यांपैकीं कांहीं रामाजवळ राहिले. अशा रीतिनें रामाचा कांटा काढावा म्हणून रावणाचे व त्याच्या प्रेरणेनें राक्षसांचे प्रयत्न चालले होते.

## राक्षस रामाचा द्वेष करीत.

रामानें मारीचाला घायाळ करून फेंकून दिलें. सुबाहूला ठार केलें व ताटिकेला ठार केलें. यामुळें राक्षस चिडले होते.

खर राक्षस हा विश्रवा ऋषिला राकेपासून झालेला मुलगा. रावणाचा हा सावत्र भाऊ व शूर्पणखा ही त्याची सख्खी बहीण होय. (म. भा. वन०) खर हा रावणाचा सीमासंरक्षक चौदा हजार राक्षसांचा सेनापति होता. याच्या हाताखालीं निरनिराळे १४ सेनापति होते.

मारीच हा सुंदापासून ताटिकेस झालेला वडील मुलगा. सुमालीच्या चार प्रधानापैकीं हा एक होता. विश्वामित्राच्या यज्ञाच्या रक्षणासाठीं राम लक्ष्मण गेले होते. त्यांनीं याला घायाल केलें होते. त्यानंतर तो रावणाजवळ जाऊन राहूं लागला. यानें रामाचा वृत्तांत रावणास कळविला होता. त्यामुळें खर राक्षसाला रामाचा बंदोबस्त करावयास त्यानें सांगितले असलें पाहिजे, अर्थात् रामा विषयीं या वेळीं रावणास चांगली माहिती झाली होती.

सुबाहूही सुंद व ताटिका यांचाच पुत्र होय. हा विश्वामित्राच्या यज्ञाच्या वेळीं रामाच्या बाणानें ठार झाला होता. हा वृत्तांत रावणास कळला तेव्हां त्यानें खराला सांगितलें कीं रामाचा बंदोबस्त कर. अर्थात् ताटिका वधापासून रामाची माहिती रावणास होती व रामाचा कांटा काढावा म्हणून त्यानें वारंवार यत्नही केले होते.

या प्रमाणें राम वनावर आपलें राज्य आहे असें म्हणून वनांत राहूं लागला होता. राक्षसांचे हल्ले वारंवार होऊं लागले होते. प्रत्यक्ष. रामावर हल्ले होत नसले तरी ऋषींच्या आश्रमांवर हल्ले होत असत, हा एक प्रकारें रामाला आह्वान करण्याचाच प्रकार होता. रावणाला रामाच्या सामर्थ्याची माहिती उत्तम प्रकारें झाली होती. राक्षसांवर हात टाकण्यास धजणारा रामाच्या पूर्वी कोणीच आर्यवीर नव्हता. राक्षस आले म्हणजे भिऊन पळावें असें पूर्वी होतें. तें या नव्या पिढींतून पार लोपलें व त्या जागीं प्रतिकारासाठीं ठाण मांडून उभें रहावें, इतकेंच नव्हे तर वेळ प्रसंगी राक्षसाचा वध ही करावा, येथपर्यंत आर्य तरुणांचा उत्साह वाढला होता. आतां पर्यंत रामानें कित्येक राक्षसांस ठार केलें होतें– कित्येकांस ठार न करतां जखमी करून सोडून दिलें होतें. याचा उद्देश असा उघड दिसतो कीं ही क्रांतीची परिस्थिति राक्षसांच्या केन्द्रस्थानी समजावी व या नव्या शक्तिची जाणीव तेथें व्हावी. तसें झालें ही.

अयोध्येमध्यें राम भरत, कैकेयी, कौसल्या वगैरेंच्या ज्ञाती–बांधवांचें गट प्रबळ होते. राम भरत वगैरे मध्यें वैर मुळींच नव्हतें. तरी अमक्यास गादी मिळावी व अमक्यास मिळूं नये, याबद्दल या अनुयायांच्या गटांत अत्यंत तीव्र मतभेद वाढलेले होते, याचा पुरेपूर फायदा ऋषींनीं घतला व रामाला बाहेर काढलें. भरता सारख्या शुद्ध अंतःकरणाच्या राजपुत्राबद्दल ही कसे विचार प्रसृत झाले होते, हें पाहण्या सारखें आहेत–

## भरताविषयीं कौसल्येला संशय

यदि पञ्चदशे वर्षे राघवः पुनरेष्यति ।
जह्याद्राज्यं च कोशं च भरतो नोपलक्ष्यते ॥११॥

( अयोध्या. ६१ )

'पंधराव्या वर्षी राम घरीं परत आला तरी त्या वेळीं भरत राज्य त्याला देईल व खजिना सोडण्यास तयार होईल, असें दिसत नाहीं ' हें कौसल्या म्हणत आहे. या वरून कौसल्येच्या मनांत ही भरताविषयीं थोडा तरी संशय वाटत होता असें म्हणावें लागतें.

जरी असें कौसल्येस वाटलें, तरी भरताच्या आचरणांत असें कोठेंहि घडलेलें नाहीं; पण अयोध्येमध्यें जे कैकेयी, कौसल्या, राम यांच्या **'अनुयायांचे'** पक्ष होते, दशरथाच्या अनुयायांचाहि एक पक्ष होता, त्या सर्व पक्षांत अत्यंत चुरस होती. ती चुरस कौसल्येच्या कानीं आली असेल व त्यामुळें कौसल्येस असें वाटलें असेल. १४ वर्षें राज्य केल्यावर कदाचित् अधिकार, धन व राज्य यांचा लोभ भरताच्या मनांत उत्पन्न होईल व जर असा लोभ उत्पन्न झाला, तर १४ वर्षांनंतरहि आपल्या मुलास – रामास – राज्य मिळणार नाहीं, असें म्हणून कौसल्या दुःख करीत आहे. अयोध्येंतील मतभेद किती विकोपास गेले होते, तें यावरून कळतें.

## भरद्वाज मुनींनाही भरताबद्दल संशय

**भरतं प्रत्युवाचेदं राघवस्नेहबंधनात् ।**
**किमिहागमने कार्यं तव राज्यं प्रशासतः ९**
**एतदाचक्ष्व सर्वं मे न हि मे शुध्यते मनः ।**
**भ्रात्रा सह सभार्यो यश्चिरं प्रव्राजितो वनम् ११**
**कच्चिन्न तस्यापापस्य पापं कर्तुं इहेच्छसि ।**
**अकण्टकं भोक्तुमना राज्यं तस्यानुजस्य च १३**

( अयोध्या. सर्ग ९० )

रामाच्या ठिकाणीं प्रेम असल्यामुळें भरद्वाज ऋषि भरताला म्हणाले– 'राज्य चालवीत असतांना तुला येथें येण्याचें कारण काय? तुझ्या मनांतील हेतु चांगलाच असेल असें मला वाटत नाहीं. राम, सीता व लक्ष्मण यांना वनांत पाठवलें. आतां तूं त्यांचें आणखी काय बरें वाईट करण्याची इच्छा करीत आहेस? त्यांचा कांटा समूळ उपटून टाकावा, असें तर तुझ्या मनांत नाहीं ना आलें?'

भरद्वाजांच्या मनांतहि आपणाविषयीं संशय आला आहे, हें पाहून भरताला फारच वाईट वाटलें व तो म्हणाला– 'आपणही जर असा संशय घेत असाल, तर मग माझा जन्मच व्यर्थ झाला असें समजलें पाहिजे! माझ्या आईनें जें केलें, तें मला मुळींच पसंत नाहीं. मी रामाला परत आणण्यासाठीं त्याच्याकडे

जात आहें.' हें ऐकून भरद्वाजांना आनंद वाटला व त्यांनीं त्याला आशीर्वाद दिला.

## गुहाच्या मनांत भरताबद्दल संशय

भरताच्या सैन्याचा तळ गंगा नदीच्या तीरावर पडलेला पाहून गुह आपल्या धीवरांना म्हणतो– 'ही सागरासारखी प्रचंड सेना भरतानें इकडे कशाला आणली आहे, याचा मला थांग लागत नाहीं. (**नास्यान्तं अवगच्छामि** ।) ज्या अर्थीं हा कोविदारध्वज या रथावर दिसत आहे, त्या अर्थीं (**दुर्बुद्धिः भरतः स्वयं आगतः**) हा भरतच कांहींतरी दुष्टबुद्धि धारण करून आला आहे, यांत शंका नाहीं. मी रामाचा मित्र असल्यानें (**बन्धयिष्यति वधिष्यति वा**) हा आम्हांला बंधनांत घालील अथवा ठार तरी मारील. कदाचित् हा (**रामं हन्तुं**) रामाचा वध करण्यासाठींहि चालला असेल. राम माझा मित्र आहे. यासाठीं त्याचें हित करण्यासाठीं तुम्ही सर्व येथें तयारी करून रहा. (अयोध्या. ८४।२-८) प्रत्येक नौकेंत शंभर तरुण कैवर्त ठेवा व अशा पांचशें नौका तयार ठेवा. जर भरत शुद्ध अन्तःकरणानें आला असेल, तर त्याला आपण पर तीराला नेऊन पोंचवूं. नाहीं तर कोणालाही नदी पार करावयाचें नाहीं.' (अयोध्या. ८४।९-१०)

**अब्रवीत्प्राञ्जलिर्भूत्वा गुहो गहन-गोचरः ।**
**दाशास्त्वनुगमिष्यन्ति देशज्ञाः सुसमाहिताः ५**
**अहं चानुगमिष्यामि राजपुत्र महाबल ।**
**कच्चिन्न दुष्टो व्रजसि रामस्याक्लिष्टकर्मणः ६**
**इयं ते महती सेना शंकां जनयतीव मे ॥**

(अयोध्या. स. ८५)

भरतानें भरद्वाजाच्या आश्रमास जाण्याचा मार्ग विचारला, तेव्हां अरण्यांत राहणारा गुह हात जोडून त्यास म्हणाला– 'हे राजपुत्रा भरता ! आमचे सर्व धीवर व मीहि तुझ्याबरोबर येऊं; पण मला हें समजूं दे कीं तूं कांहींतरी दुष्ट हेतु मनांत धरून तर आला नाहींस ना ? तुझ्याबरोबर हें एवढें सैन्य आहे, म्हणून मला संशय येत आहे.'

त्यानंतर भरतानें त्यास आपल्या येण्याचा हेतु सांगितला व रामाला परत

नेण्यासाठींच मी त्याच्याकडे जात आहें, अशी गुहाची त्यानें खात्री केली. तेव्हांच गुहानें त्याला नदी तरून नेण्याच्या कामीं सहाय्य केलें.

पण हें समजण्यापूर्वी गुहानें भरताचा प्रतिकार करण्याची जय्यत तयारी केली होती. शस्त्रसहित करोल पांच हजार सैन्य भरताचा प्रतिकार करण्यास तयार ठेऊन गुह भरताच्या भेटीस गेला होता. अयोध्येंतील पक्षोपपक्ष किती एक-मेकांविषयीं संशयग्रस्त झाले होते, तें यावरून समजतें. भरद्वाज ऋषीसारखे ऋषि व गुहासारखा कुलाचारानें दशरथ-कुलाचा मित्र, हे सर्व भरताबद्दल संशय घेतात व एकालाही भरताबद्दल प्रथम सहानुभूति वाटत नाहीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे; पण भरत मात्र अगदींच शुद्ध अन्तःकरणाचा राजपुत्र होता. पहा—

## भरताचें शुद्ध अन्तःकरण

**चरितब्रह्मचर्यस्य विद्यास्नातस्य धीमतः ।**
**धर्मे प्रयतमानस्य को राज्यं मद्विधो हरेत्** ११
**कथं दशरथाज्जातो भवेद्राज्यापहारकः ।**
**राज्यं चाहं च रामस्य धर्मं वक्तुमिहार्हसि** १२

( अयोध्या. स. ८२ )

'ब्रह्मचर्य पालन करून जो स्नातक झाला आहे, जो बुद्धिवान् आणि यत्नपूर्वक धर्माचें पालन करणारा आहे, अशा त्या रामाचें राज्य माझ्यासारखा कसें बरें हरण करील ? दशरथापासून झालेला मुलगा आपल्या रामासारख्या भावाच्या राज्याचें हरण करणारा कसा बरें होईल ? हे वसिष्ठ ऋषे ! तुम्ही तर आम्हांला धर्माचा मार्गच सांगितला पाहिजे ! '

असें भरत वसिष्ठ ऋषीला म्हणाला. दशरथाच्या बीजापासून उत्पन्न झालेला मुलगा लोभी होणारच नाहीं असें भरत येथें म्हणत आहे. आपल्या कुलांत असे लोभी कोणीहि झालेले नाहींत, असें तो म्हणत आहे. येथें भरताचें शुद्ध अन्तःकरण स्पष्ट दिसत आहे.

या वेळीं कोणीहि भरतास राज्यावर बसवण्याच्या विरुद्ध नव्हते. बाहेरून झाले तरी ते अनुकूल होते. तथापि भरताचें शुद्ध अन्तःकरण यावेळीं अधिकच पवित्र दिसून आलें.

*

# भरताचें अन्तरंग

भरताचें अन्तःकरण किती शुद्ध व निष्पाप होतें, तें त्याच्या पुढील बोलण्यावरून व्यक्त होतें—

**किं नु कार्यं हतस्येह मम राज्येन शोचतः ।**
**विहीनस्याथ पित्रा च भ्रात्रा पितृसमेन च** २
**राजानं प्रेतभावस्थं कृत्वा रामं च तापसम् ।**
**कुलस्य त्वमभावाय कालरात्रिरिवागता** ३
**अथवा मे भवेच्छक्तिर्योगैः बुद्धिबलेन वा ।**
**सकामां न करिष्यामि त्वां अहं पुत्रगर्धिनीम्** १७
**एष त्विदानीमेवाहमप्रियार्थं तवानघे ।**
**निवर्तयिष्यामि वनाद्भ्रातरं स्वजनप्रियम्** २६

( अयोध्या. स. ७३ )

' पिता व पित्यासारखा भाऊ राम यांचा वियोग झाल्यानंतर सर्वस्वी घात झाल्यामुळें शोक करीत बसलेल्या मला आतां हें राज्य घेऊन काय करावयाचें आहे ? राजाला ठार करून व रामाला तापसी बनवून तूं या आमच्या कुलाचा विध्वंस करणारी कालरात्रच येथें आली आहेस! मला जरी मंत्र्यांच्या सहाय्यानें राज्य करण्याचें सामर्थ्य प्राप्त होऊं शकलें, तरी मुलासाठीं लोभ धरणाऱ्या तुझ्यासारख्या आईचे मनोरथ मी सफल होऊं देणार नाहीं. यासाठीं तुला नापसंत असलेलेंच करण्यासाठीं मी वनांतून रामाला परत आणीन. '

या वेळीं भरत सहज प्राप्त झालेलें राज्य सोडण्यास तयार होतो व रामाला दृढप्रयत्नानें आणून गादीवर बसवण्याच्या उद्योगास लागतो. अयोध्येंतील सर्वथा प्रतिकूल परिस्थितिही भरतानें पाहिली असली पाहिजे. पण यापूर्वी भरताचें आचरणही येथें पाहण्यासारखें आहे. त्यानें रामाचें चित्र आपणाजवळ ठेऊन घेतलें होतें व त्याविषयीं तो पूज्यभाव दाखवीत होता. इतकी भावुकता भरतामध्यें होती. कैकेयीच्या पक्षाच्या लोकांनीं जो कट अयोध्येंत केला होत व ज्या पक्षाची पुढें होऊन बोलणारी मंथरा झाली होती, हिला ऋषिमुनींनीं

भारली होती, हें निर्विवाद होय. पण मुळांत वितुष्ट नसतीं तर असें ऋषिमुनींना करतां आलें नसतें.

भरत जरी आजोळीं होता, तरी त्याच्या अन्तःकरणाची एकतानता दशरथ व राम यांच्या अन्तःकरणांशीं पूर्णपणें झालेली होती. अशी एकतानता झालेली असली म्हणजेच मानसिक विचारांचें प्रतिबिंब दूरवर असलेल्या सुहृज्जनांवर व आप्तेष्टांवरहि उमटतें. दशरथाच्या मृत्यूच्या वेळीं जी अयोध्येंत खळबळ झाली, तिचा परिणाम भरताला सूचक स्वप्न पडण्यांत झाला. हें स्वप्न किती सूचक होतें तें पहा—

## भरताचें स्वप्न

राजा दशरथ अयोध्येंत मेला व दूत निरोप घेऊन पोंचले, त्याच रात्रीं भरताला एक भयंकर व अमंगल असें सूचक स्वप्न पडलें, तें असें—

'समुद्र आटला, चंद्र भूमीवर पडला, पृथ्वीवर सर्वत्र अंधार पडला, राजाच्या बसावयाच्या हत्तीच्या दांतांचे तुकडे, झाले पृथ्वी दुभंगली, लोखंडाच्या आसनावर राजा बसला आहे, तांबड्या फुलांच्या माळा त्याच्या गळ्यांत घातल्या आहेत, अंगाला रक्तचंदन माखलें आहे, गाढवांच्या रथांत बसून राजा दक्षिणेकडे निघाला आहे, अक्राळविक्राळ राक्षसी राजाला ओढून नेत आहे.' असें दृश्य भरतानें स्वप्नामध्यें पाहिलें व हें कांहींतरी अशुभसूचक आहे असें त्यास वाटलें व तो उदास झाला. या स्वप्नाच्या गोष्टी भरत आपल्या मित्राबरोबर बोलत असतां अयोध्येंतील दूत भरताकडे पोंचले व त्यांनीं त्यास तो निरोप सांगितला.

मृत्यूनंतर अशीं सूचक स्वप्नें पडत असतात. पण तीं अशाच लोकांस पडतात कीं, ज्यांचीं अन्तःकरणें प्रेमानें भरलेलीं असतात. या स्वप्नावरून उघड दिसतें कीं, भरत रामाच्या विरुद्ध जाणें शक्य नव्हतें.

## भरताचें प्रायोपवेशन

वसिष्ठ ऋषींनीं रामाला असें सांगितलें कीं, 'हे रामा! मी तुझा गुरु आहें, इतकेंच नव्हे तर तुझ्या वडिलांचाही गुरु आहें. यासाठीं मी सांगतों म्हणून तूं

राज्याचा स्वीकार करण्यांत सन्मार्गाचें उल्लंघन होणार नाहीं. ' ( अयोध्या. स. ११२ । १-८ )

यावर रामानें असें उत्तर दिलें कीं— ' आईबाप मुलांवर जे उपकार करतात, त्याचा प्रत्युपकार करतां येणें हें कधींच शक्य नाहीं. हवें तें देणें, निजविणें, अंगावर लावणें, गोड बोलणें, खेळविणें, आदि अनेक प्रकारांनीं आईबाप मुलांचें जें हित करतात, जे उपकार करतात, ते पुत्राच्या हातून फिटणें शक्यच नाहीं. यासाठीं माझ्या जनक पित्या दशरथानें जी मला आज्ञा केली आहे, ती कधींच असत्य होणार नाहीं. मी तिचें पालन करीनच करीन. ' ( अयोध्या ११२।८-११ )

याप्रमाणें रामाचें निश्चयाचें भाषण ऐकल्यावर भरतानें रामाच्या पर्णकुटीच्या पुढें सत्याग्रह करून प्रायोपवेशन करण्याचा निश्चय केला व या निश्चयानें रामाला वळविण्याचा त्यानें शेवटचा निश्चय केला. भरतानें याप्रमाणें आपला निश्चय केला खरा; पण तसें घडणें शक्य नव्हतें. कारण राम आतां राक्षसांचा संपूर्ण नाश करण्याच्या योजना करीत होता, त्याची महत्त्वाकांक्षा वाढली होती, राज्याच्या मोहांत सांपडून त्याला हें साधणें शक्य नव्हतें.

## रामाची प्रतिज्ञा

**लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् ।**
**अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञां अहं पितुः ॥**

( अयोध्या. स. ११२।१८ )

' चन्द्राची कान्ति चन्द्रापासून दूर होईल, हिमालयावरील बर्फ नाहींसें होईल, समुद्र आपल्या मर्यादेचें उलंघन करील, पण राम वडिलांची प्रतिज्ञा मोडणार नाहीं. '

राम अशी प्रतिज्ञा करीत आहे. रामाची प्रतिज्ञा अढळ होती. वनवासाला जाण्याच्या पहिल्या रात्रीला रामाला वाईट वाटलें होतें, हें खरें आहे. पण पुढें जी बोलणी ऋषिमुनींशीं त्याचीं झालीं, त्यामुळें कर्तव्याचें एक मोठें थोरलें दालनच त्याच्यापुढें उघडें झालें पुरुषार्थी व पराक्रमी रामाला असें कर्तव्यक्षेत्र पुढें आल्यावर राज्यवैभवावर जाऊन आयत्या पिठावर रेघा ओढीत बसणें बरें कसें वाटणार ? आपण आपल्या स्वतःच्या पराक्रमानें हा राक्षसांचा कांटा काढून

टाकला व ऋषिमुनींचा हेतु तडीस नेला तर तें फारच मोठें कार्य केल्यासारखें होईल. हें मोठें देवकार्य आहे, हें यावेळीं रामास पटलें होतें.

## पित्याचें वचन

उवाच रामः संप्रेक्ष्य पौरजानपदं जनम् २७
विक्रीतं आहितं क्रीतं यत्पित्रा जीवता मम ।
न तल्लोपयितुं शक्यं मया वा भरतेन वा २८
उपाधिर्न मया कार्यो वनवासे जुगुप्सितः ।
युक्तमुक्तं च कैकेय्या पित्रा मे सुकृतं कृतम् २९

( अयोध्या स. ११२ )

' पिता जिवंत असतांना त्यानें जें कांहीं कोणाला विकलें असेल, जी काय ठेव ठेवली असेल, किंवा जें काय विकत घेतलें असेल, तें भरताला किंवा मला नाहींसें करतां येणार नाहीं. कैकेयीनें जें सांगितलें तें योग्यच सांगितलें व वडिलांनीं जें केलें, तेंही योग्यच केलें आहे.'

म्हणून आम्ही दोघांनींहि पित्याला असत्यापासून मुक्त केलें पाहिजे. पित्याच्या वचनाचा आश्रय करण्यानेंच आपलें पुढें आलेलें जानपदविषयक कर्तव्य करण्याची शक्यता आहे, याची यावेळीं रामाला उत्तम जाणीव झाली होती. म्हणून तो यापुढें कोणत्याही प्रलोभनास बळी पडणें शक्य नव्हतें, हें यावरून उघड दिसत आहे.

## लक्ष्मणाचा क्रोध

जेव्हां लक्ष्मणानें सालवृक्षावर चढून भरत सैन्यासह येत आहे असें पाहिलें, तेव्हां त्याचा क्रोध अनावर झाला व तो रामास म्हणाला—

' ज्या भरतामुळें तुम्ही राज्यास मुकला आहां, तो आमचा शत्रु भरत आज इकडे येत आहे. याचा वध करणेंच योग्य आहे. यांत कांहींच दोष नाहीं. प्रथम त्यानें अपकार केला आहे, म्हणून त्याचा वध करणें अगदीं योग्यच होईल... अनुयायांसह कैकेयीचाही वध मी करीन. आज या पापी लोकांपासून ही पृथ्वी मुक्त होवो.' ( अयोध्या. स. ९७ )

रामानें लक्ष्मणाचें हें भाषण ऐकलें व त्याचें सांत्वन केलें. तो लक्ष्मणास म्हणाला– 'असा वध करून मिळणारे भोग मी विषासमान मानतों. अधर्मानें प्राप्त झालेलें राज्य मला नको आहे. भरत मला नेण्यासाठीं व राज्य परत करण्यासाठीं ( **राज्यं मे दातुं** ) येत आहे. भरतानें तुझें किंवा माझें कधीं-तरी अप्रिय केलें होतें काय? मग त्याच्या येण्यानें भयाचें काय कारण आहे बरें? यासाठीं भरताशीं कठोर भाषण करूं नकोस.' ( अयोध्या. स. ९८ )

याप्रमाणें रामानें लक्ष्मणाला शांत केलें व भरताची भेट घेण्यास राम तयार झाला पण या लक्ष्मणाच्या भाषणानें भरताविषयींचे गैरसमज किती दूरवर पोंचले होते तें मात्र स्पष्टपणानें कळून येतें.

## दुसऱ्यानें भोगलेलें राज्य राम घेणार नाहीं

कौसल्या म्हणते कीं—

( १ ) ज्याप्रमाणें आपल्या बांधवांना आधीं जेवावयास घातलें व नंतर श्रेष्ठ ब्राह्मणांना जेवावयास बसवलें तर तें त्या श्रेष्ठ ब्राह्मणांना पसंत पडत नाहीं. ( अयोध्या. ६१।१२–१३ )

( २ ) ज्याप्रमाणें शिंगें उपटून टाकणें बैलांना पसंत नसतें.(अयोध्या. ६१।१४)

( ३ ) ज्याप्रमाणें दुसऱ्यानें आणलेली शिकार वाघ खात नसतो.
( अयोध्या. ६१।१५–१६ )

( ४ ) ज्याप्रमाणें हविर्द्रव्यें, तूप, पुरोडाश, दर्भ व खदिर वृक्षाचा यूपस्तंभ हे एकदां यज्ञांत उपयोगांत आणलेले पुनः दुसऱ्या यज्ञांत उपयोगांत आणले जात नाहींत. ( अयोध्या. ६१।१७ )

त्याप्रमाणें माझा राम दुसऱ्यांनीं भोगलेलें राज्य कधींहि उपभोगणार नाहीं-

**तथा ह्यात्तमिदं राज्यं०**
**नाभिमन्तुमलं रामो०** ॥ १८ ॥ ( अयो. ६१ )

कौसल्येस असें वाटत आहे कीं, धाकट्या भावानें भोगलेलें राज्य वडील भाऊ कसें स्वीकारील? वास्तविक राज्याच्या संबंधानें असें मानण्याचें कारण नाहीं. स्त्रियांना असें वाटूं शकतें. कौसल्येचें मन कैकेयीविषयीं संत्रस्त झालेलें असल्यानें

ती असें म्हणत आहे.

## शत्रुघ्नाचें मत

स रामः सत्त्वसंपन्नः स्त्रिया प्रव्राजितो वनम् २
बलवान् वीर्यसंपन्नो लक्ष्मणो नाम योऽप्यसौ ।
किं न मोचयते रामं कृत्वाऽपि पितृनिग्रहम् ३
पूर्वमेव तु निग्राह्यः समवेक्ष्य नयानयौ ।
उत्पथं यः समारूढो नार्या राजा वशं गतः ४
( अयोध्या. स. ७८ )

' अहो, एवढा बलवान् राम, पण त्याला एका स्त्रीनें वनांत घालवून दिलें. त्याचा भाऊ बलवान् लक्ष्मण होता, त्यानें वडिलांना बंदिशाळेंत घालून रामाला सोडवलें पाहिजे होतें. न्यायान्याय न पाहून स्त्रीच्या आधीन होऊन अन्याय करणाऱ्या या राजाला त्यानें बंदिशाळेंत घातलें पाहिजे होतें. '

शत्रुघ्न हा आपल्या बंधु लक्ष्मणाप्रमाणेंच बोलत आहे. दोनही सुमित्रेचीं मुलें एकाच सारख्या स्वभावाचीं दिसत आहेत.

## मंत्र्यांचीहि सल्ला घेतली नाहीं

रामासारख्या लोकप्रिय राजकुमाराला वनवासाची शिक्षा येण्यापूर्वी राजा दशरथानें मंत्र्यांची व वृद्धांचीहि सल्ला घेतली नाहीं. पहा—

कैकेय्या विनियुक्तेन पापाभिजनभावया ।
मया न मन्त्रकुशलैर्वृद्धैः सह समर्थितम् १७
न सुहृद्भिर्न चामात्यैर्मन्त्रयित्वा न नैगमैः ।
मयायमर्थः संमोहात् स्त्रीहेतोः सहसा कृतः १९
भवितव्यतया नूनमिदं वा व्यसनं महत् ।
कुलस्यास्य विनाशाय प्राप्तं सूत यदृच्छया २०
( अयोध्या. सर्ग ५९ )

दशरथ राजा त्या सूताला म्हणाला— ' दुष्ट कुलामध्यें व दुष्ट लोकांमध्यें उत्पन्न झालेल्या दुष्ट कैकेयीनें रामाला वनवासांत पाठवण्यास सांगितलें असतां

त्याचा विचार मी आपल्या मंत्र्यांबरोबर, स्नेह्यांबरोबर व विद्वानांबरोबरसुद्धां केला नाहीं. स्त्रीसाठीं हा मोठा अनर्थ मजकडून घडला, याचा परिणाम आतां कुलाचा नाश होण्यामध्यें निःसंशय होईल.'

दशरथासारख्या राजानें याचा विचार आपल्या मंत्र्यांच्या सहाय्यानें केला पाहिजे होता. स्त्रीनें सांगितलें व राजानें रामाला हद्दपार केलें हें बरोबर झालें नाहीं. निदान सर्व लोकांनीं ज्यास राज्य देण्याचा ठराव केला, त्या रामासंबंधीं तरी असें होतां नये होतें. यांत जनतेच्या मताची पर्वा राजानें केली नाहीं हें वाईट झालें.

राजपुत्राला गादीवर बसवण्याच्या वेळीं प्रजेच्या प्रतिनिधींची संमति घ्यावी लागत असे. या काळीं अशी परिपाठी होती. ही परिपाठी उत्तम आहे. यामुळें राजपुत्राला आपलें वर्तन, आपली लोकप्रियता वाढावी, असेंच ठेवणें भाग होतें. जनमताचा राजपुत्रावर यामुळें एक प्रकारचा वचक राहतो. श्रीरामचंद्राच्या यौव-राज्याभिषेकाच्या वेळीं दशरथानें अशी जनतेच्या पुढाऱ्यांची बैठक बोलाविली होती व त्यांची संमति रामाच्या राज्याभिषेकासाठीं घेतली होती. सर्वांनीं एक-मतानें संमति दिली होती. सर्व मंत्रीही तेथें होते व त्यांनींहि आपलें अनुकूल मत दिलें होतें. जनसंमतीनें निवडलेल्या राजपुत्राला आपल्या एका राणीच्या हट्टामुळें हद्दपारीची शिक्षा देणें व कांहीएक कारण नसतां देणें हें दशरथाला मुळींच योग्य नव्हतें. या वेळीं राजानें लोकांच्या पुढाऱ्यांची व मंत्र्यांची सभा बोलावली पाहिजे होती. लोकांनीं निवडल्यामुळें राम हा या वेळीं लोकांचा झाला होता, असें असतांही एकदम रामाला वनांत पाठवलें, हें राज्यघटनेच्या दृष्टीनें योग्य झालें नाहीं. सर्व जनतेनें याच कारणासाठीं दशरथाचा निषेधही केला आहे व निषेध करूनच जनता गप्प राहिली नाहीं तर रामाबरोबर सर्व जनताही वनांत गेली होती व प्रजाजनांनीं सर्व अयोध्या ओस पाडली होती. हें सर्व योग्यच झालें.

पण रामच मुळीं अयोध्येंत रहावयास तयार नव्हता. खरें पाहिलें तर दशरथ राजानें रामाला वनांत जाण्यास सांगितलेंच नव्हतें. सर्व भाषण कैकेयीनेंच केलें. राजा दशरथ गप्प राहिला होता व कैकेयीचा धिक्कारच तो करीत होता, म्हणजे दशरथाची आज्ञा रामाला वनांत घालवण्यासाठीं झालीच नव्हती.

तेथें असलेले जे मंत्री त्यांनीं व कुलपति वसिष्ठ ऋषींनीं कैकेयीचा निषेधहि केलेला होता. सर्व मंत्र्यांची तशीच संमति होती. दशरथानें तर मला कैद कर व तूं राज्य कर असेंहि सांगितलें होतें. दशरथाची खरी आज्ञा म्हटली तर ती ही होती. दशरथानें रामाला वनांत जाण्याची आज्ञा दिली नाहीं, पण रामानें स्वतः म्हणून दशरथाची वचनांतून सोडवणूक करण्यासाठीं वनांत जाणें स्वीकारलें. म्हणून दशरथावर रामाला वनांत धाडण्याचा दोष येत नाहीं. ऋषींचा बेत वसिष्ठ ऋषीला माहीत होता, त्यामुळें राम वनांत जावा असें त्यांना मनांतून वाटत असावें असें वाटतें. म्हणून त्यांनीं औपचारिकरीत्या आपलें मत सांगितलें. यापेक्षां रामानें वनांत जाऊं नये म्हणून विशेष कांहीं केलें नाहीं. विश्वामित्रानें रामाची मागणी केली तेव्हां राम वनांत जावा म्हणून जसें दशरथाचें मन वसिष्ठ ऋषींनीं बळवलें, तसा प्रयत्न यावेळीं यांनीं केला नाहीं. जसें घडत आहे तसें घडूं द्यावें असें मत वसिष्ठांचें यावेळीं दिसत आहे. रामाला मात्र विश्वामित्राच्या यज्ञांतील अनुभवानें हें कळून चुकलें होतें कीं, राक्षसांचा उपद्रव आपल्या देशास फार होत आहे. तथापि यावेळीं राक्षसनाशाच्या हेतूनें रामानें वनवास स्वीकारला असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् रामानें केवळ आपलें पितृविषयक कर्तव्य पालन करण्यासाठींच स्वेच्छेनें वनवास स्वीकारला असें म्हणावें लागतें व पुढें वनांत गेल्यानंतर एकंदर राक्षसांचीं कारस्थानें त्याच्या पुढें आलीं व जें घडावयाचें तें घडलें.

## रामाचा निरोप

सर्वं अन्तःपुरं वाच्यं सूत मद्वचनात् त्वया १६
आरोग्यं अविशेषेण यथार्हमभिवादनम् ।
माता च मम कौसल्या ब्रूयाश्चैनामिदं वचः १७
धर्मनित्या यथाकालं अग्न्यागारपरा भव ।
अप्रमादं च वक्तव्या ब्रूयाश्चैनां इदं वचः १८
देवि देवस्य पादौ च देववत् परिपालय ।
अभिमानं च मानं च त्यक्त्वा वर्तस्व मातृषु १९

अनुराजानं आर्यां च कैकेयीं अम्ब कारय ।
कुमारे भरते वृत्तिर्वर्तितव्या च राजवत् ॥
अप्यज्येष्ठा हि राजानो राजधर्म मनुस्मर २०
भरतः कुशलं वाच्यो वाच्यो मद्वचनेन च ।
सर्वास्वेव यथान्यायं वृत्तिं वर्तस्व मातृषु २१
वक्तव्यश्च महाबाहुरिक्ष्वाकुकुलनन्दनः ।
पितरं यौवराज्यस्थो राज्यस्थमनुपालय २२
अतिक्रान्तवयो राजा मा स्मैनं व्यपरोरुधः ।
कुमारराज्ये जीवस्व तस्यैवाज्ञाप्रवर्तनात् २३

( अयोध्या. स. ५८ )

"हे सूता ! तूं माझ्या सांगण्यावरून सर्व अन्तःपुरांतील स्त्रियांना कुशल प्रश्न विचारून त्या मातांना माझा यथायोग्य नमस्कार सांग. माझ्या कौसल्या मातेलाही माझा प्रणाम सांग व सावधानपणानें वागत जा असें सांग. तसेंच–

१ योग्य वेळीं होमशाळेंत जाऊन होम-हवनाकडे लक्ष देत रहा.

२ राजाची सेवा कर, सावधपणानें रहा.

३ इतर मातांशीं अहंकार सोडून सौम्य रीतीनें वागत जा.

४ कैकेयी मातेच्या इच्छेप्रमाणें राजा वागत असल्यामुळें तिच्याशीं विरोध करूं नकोस.

५ कुमार भरताशीं राजाप्रमाणेंच आदरपूर्वक वागत जा. कारण राजे जरी वयानें लहान असले तरी ते पूज्यच असतात. हें राजधर्माचें तत्त्व लक्षांत ठेव.

६ कुमार भरताला माझा असा निरोप सांग कीं तू सर्व मातांबरोबर यथान्याय वागत जा. यौवराज्यावर बसल्यावरही वृद्ध झालेल्या राजाची आज्ञा पालन कर, त्याचा विरोध करूं नकोस."

यामध्यें दशरथाला 'कैकेयीच्या मर्जीप्रमाणें वागणारा' आहे असें जें म्हटलें आहे, तें तें त्याच्या अन्तःकरणांत जी खळबळ चाललेली होती, त्याचें सूचक आहे. तसेंच युवराज–स्थानावर बसलेल्या भरताचा सन्मान कर असें जें रामानें आपल्या आईला सांगितलें; तेंही मनांतील खळबळीचेंच सूचक आहे.

राम आपल्या आईला (अप्रमादं) सावध राहण्याची सूचना देत आहे. राजवाड्यांतील परिस्थिति फार बिकट होती, असें यावरून म्हणावें लागतें. राजा वांचणार नाहीं, किंवा निर्बल होईल, कैकेयीचें प्रस्थ वाढेल व यामुळें कौसल्येला फारच त्रास सोसावा लागेल म्हणून सावध रहा असें राम सांगत आहे. अभिमान सोडून गरिबीनें दुसऱ्या राण्यांबरोबर वाग, हें जें राम सांगत आहे, त्यावरून कौसल्येची स्थिति पराकाष्ठेची शोचनीय झाली होती, असें स्पष्ट दिसतें. सम्राटाची पट्टराणी कौसल्या, पण कैकेयीच्या हातीं राज्यसत्ता गेल्यासारखी झाली होती व ती तर उन्मत्त झालेली होती. राजा तिच्या हातांत गेला होता. यामुळें कौसल्या अगदीं हताश झालेली होती, ही सर्व परिस्थिति या रामाच्या निरोपांत दिसून येत आहे.

'भरत लहान असला तरी त्याला राजासारखा मान दे; कारण राजे वयानें लहान असले तरी ते पूज्य असतात.' असें जें राम आपल्या निरोपांत म्हणत आहे, तें राजांच्या अरेरावीचें द्योतक आहे. राजाचा थोडासा आपमान झाल्यासारखा जरी त्यास वाटला, तरी तें अपमानकर्त्याचा नाश करूं शकतात, म्हणून राम आपल्या आईला सुचवीत आहे कीं, भरत आतां कुमार राहिला नाहीं, तर तो राजा झालेला आहे. हें जाणून त्याचा मान राख व अगदीं गरिबीनें वाग. राजे लोकांची घातक शक्ति किती होती, तें यावरून समजून येतें. भरत याला अपवाद ठरला ही गोष्ट निराळी. पण परिस्थिति कशी बनली असती, तें यावरून अनुमानानें जाणतां येईल.

भरताविषयीं रामालाहि असें वाटलें, हें येथें विशेषच लक्षांत ठेवण्याजोगें आहे. राम व भरत यांचा संबंध १०-१२ वर्षें तुटला असल्यामुळें, व रामाला भरताच्या आईच्या पक्षांतील लोकांच्या वागणुकीचा पूर्ण परिचय असल्यामुळें रामाला भरताविषयींहि असा संशय येणें हें स्वाभाविक दिसतें.

## कैकेयीची भीति दशरथाला वाटत असे

**देव यस्या भयाद्रामं नानुपृच्छसि सारथिम् ।**
**नेह तिष्ठति कैकेयी विश्रब्धं प्रतिभाष्यताम् ॥**

(अयो. स. ५७।३१)

कौसल्या राजा दशरथास म्हणाली कीं– 'हे राजन्! तुम्ही जिच्या भीतिमुळें रामाचा वृत्तांत सारथ्यास विचारीत नाहीं, ती कैकेयी येथें नाहीं. तेंव्हां संकोच न करतां तो वृत्तांत खुशाल यास विचारावा.'

यांत कौसल्येच्या मनांतील सवतीमत्सर व्यक्त झालेला आहे. हा सकारण होता. यांत कौसल्येचा दोष नसून कैकेयीच कौसल्येस छळत असे, यामुळें कौसल्या असें त्रासिकपणानें बोलत आहे. रामाला हें सर्व माहीत असल्यानें तो कैकेयी-मुळें भरतावरहि संशय घेऊं लागला असला तर त्यांत कांहींच नवल नाहीं. कौसल्येला तर हा त्रास असह्य झाल्यामुळें तीसुद्धां दशरथाला टाकून बोलली व त्यामुळें दशरथानें तिला हात जोडून नमस्कार करण्यापर्यंत पाळी आली होती. पहा—

## दशरथ कौसल्येपुढें हात जोडतो

वेपमानोऽञ्जलिं कृत्वा प्रसादार्थमवाङ्मुखः ५
प्रसादये त्वां कौसल्ये रचितोऽयं मयाऽञ्जलिः ७
भर्ता तु खलु नारीणां गुणवान्निर्गुणोऽपि वा ।
धर्मं विमृशमानानां प्रत्यक्षं देवि दैवतम् ८
सा त्वं धर्मपरा नित्यं दृष्टलोकपरावरा ।
नार्हसे विप्रियं वक्तुं दुःखितापि सुदुःखितम् ९
तच्छ्रुत्वा करुणं वाक्य श्रुत्वा दीनस्य भाषितम् ।
कौसल्या व्यसृजद्बाष्पं प्रणालीव नवोदकम् १०

( अयोध्या. स. ६२ )

राजा दशरथानें कौसल्येचें कठोर भाषण ऐकलें व कांपत कांपत हात जोडले व खालीं तोंड करून तिला म्हणाला, 'हे कौसल्ये! माझ्यावर कृपा कर, तुझ्यापुढें मी हात जोडले आहेत. तुला माहीत आहे कीं पति गुणी असो वा निर्गुण, तो धर्म जाणणाऱ्या पत्नीला प्रत्यक्ष दैवतच आहे. तूं जगांतील बऱ्यावाईट परिस्थितीचें निरीक्षण केलें आहेस व तूं धर्मपरायणही आहेस. मलाहि फार दुःख झालेलें आहे हें तूं पहात आहेस, म्हणून तूं यावेळीं असें

कठोर करून मला आणखी दुःख द्यावें हें तुला योग्य नव्हे.' असें दशरथ राजाचें भाषण ऐकतांच कौसल्या अश्रु ढाळीत रडूं लागली. तिनें त्याची क्षमा मागितली व आपली चूक झाली असें तिनें म्हटलें. यावरून कौसल्या अति दुःखानें राजास बरें वाईट बोलली, हें उघड होतें. कौसल्या पुढें म्हणते—

**याचितास्मि हता देव क्षन्तव्याहं नहि त्वया ॥ १२**
**नैषा हि सा स्त्री भवति श्लाघनीयेन धीमता ।**
**उभयोर्लोकयोर्लोके पत्या या संप्रसाद्यते ॥ १३**

(अयोध्या. स. ६२)

'माझी प्रार्थना करण्याचा आपणावर प्रसंग आला हा माझा, घातच झाला आहे. कारण पतीनें स्त्रीला हात जोडणें योग्य नाहीं. पतीकडून जी हात जोडून घेते, ती दोनही लोकांमध्यें श्रेष्ठ समजली जात नाहीं.'

असें म्हणून कौसल्येनें दशरथाची क्षमा मागितली आहे. कौसल्येस पुत्रशोक अनावर झाला होता व कैकेयीची वर्तणूकही असह्य झालेली होती. म्हणूनच ती असें कठोर भाषण करून दशरथास दुःख देण्यास प्रवृत्त झाली. पण जेव्हां तो दुःखाचा वेग ओसरला, तेव्हां ती त्याची क्षमा मागावयास तयार झाली. हें तिच्या साध्वीपणाचें लक्षण आहे, यांत शंका नाहीं.

## पति माझा नाहीं

कौसल्या आपल्या पतीस म्हणते कीं, तूं माझा नव्हेस–

**तत्र त्वं मम नैवासि ।** (अयोध्या. स. ६१।२५)

'हे राजा! तुझा तर मला आश्रय नाहीं.' कारण तूं सर्वस्वी कैकेयीच्या तंत्रानें वागतोस व तिला हवें तें करतोस. म्हणून पतीच्या दृष्टीनें मी निराधार आहे. याचा परिणाम असा झाला आहे—

**हतं त्वया राष्ट्रमिदं सराज्यं हताः स्म सर्वाः सह मन्त्रिभिश्च ।**
**हता सपुत्रास्मि हताश्च पौराः सुतश्च भार्या च तव प्रहृष्टौ ॥**

(अयोध्या. स. ६१।२६)

'हे राजा ! राष्ट्राचा, सर्व प्रजांचा व आम्हां सर्वांचा घात झाला आहे. फक्त (तुझी आवडती) बायको (कैकेयी) व तिचा मुलगा (भरत) यांनाच तेवढा आनंद होत असेल.'

येथें दशरथाला 'तुझी बायको व तुझा मुलगा' हे शब्द कैकेयी व भरत यासाठीं वापरून आपल्या मनांतील जळफळाट कौसल्येनें व्यक्त केला आहे. पण हें सर्व पुत्रशोकाच्या असह्य वेदनांमुळें तिच्याकडून घडलें यांत शंका नाहीं.

## स्त्रीचे आश्रय

स्त्री स्वतः परतंत्र आहे. तिचे तीन आश्रय असूं शकतात—

**पतिरेका गतिर्नार्याः द्वितीया गतिरात्मजः ।**
**तृतीया ज्ञातयो राजन् चतुर्थी नैव विद्यते ॥ २४**

(अयोध्या. स. ६१)

'स्त्रीचा पति हा एक आश्रय आहे, दुसरा आश्रय पुत्र हा आहे, तिसरा आश्रय ज्ञातीबांधव होत. स्त्रीला चवथा आश्रय नाहीं.'

स्त्री ही स्वतंत्रपणानें राहील असें या वेळीं तरी कोणास वाटत नव्हते. कौसल्येला इकडे पतीचा आश्रय नाहीं व इकडे पुत्राचाही नाहीं अशी, शोचनीय स्थिति या वेळीं तिला प्राप्त झाली होती. म्हणून हताश झाल्याप्रमाणें ती बोलत आहे. स्त्री कितीहि सोशिक असली तरी या परिस्थितींत ती अशीच हताश होणें शक्य आहे.

## हद्दपारीचीं कारणें

जेव्हां भरताला कैकेयीकडून समजलें कीं, रामाला हद्दपार करून वनांत पाठवलें, तेव्हां त्याला फारच आश्चर्य वाटलें ! त्याला ज्या कारणांनीं हद्दपारीची शिक्षा होऊं शकते, तीं कारणें श्रीरामाच्या ठिकाणीं शक्य असूं शकतील, असें वाटलें नाहीं. भरताच्या मतानें हद्दपारीचीं कारणें हीं आहेत—

१ (**आढ्यो दरिद्रो वा अपापो हिंसितः** । ४४ ) निष्पाप, श्रीमंत वा दरिद्री माणसाचा प्राण घेतला असेल,

२ ( **ब्राह्मणधनं हृतं** । ४४ ) ब्राह्मणाचें धन हरण केलें असेल;

३ ( **परदारान् अभिमन्यते । ४५** ) परस्त्रीवर दृष्टि ठेवली असेल.

आज राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ करणाऱ्यांना हद्दपारी व तुरुंगवास या शिक्षा होत आहेत, त्यांची कल्पना भरताला किंवा वाल्मीकीलाही नव्हती. म्हणून ते पापाचरणामुळेंच हद्दपारी होते, असें समजत आहेत.

## पातकें

रामाला वनांत पाठवण्यांत आपलें अंग नाहीं. ज्याचें अंग असेल त्याला हीं पापें लागोत, असें भरत म्हणाला; याच्या या भाषणांत जी पापांची गणना झाली आहे, ती अशी आहे–( सर्ग ७५ )

१ ( **पापीयसां प्रैष्यं । २२** ) पापी लोकांची सेवा करणें,

२ ( **सूर्यं प्रति मेहतु । २२** ) सूर्याकडे तोंड करून लघ्वी करणें,

३ ( **हन्तुं पादेन गां सुप्तां ।** ) गाईला लाथ मारणें,

४ ( **कारयित्वा महत्कर्म भर्ता भृत्यं अनर्थकम् । २३** ) अधिक काम करवून घेऊन जो मालक मजुरास कमी वेतन देतो, किंवा कांहीं देत नाहीं,

५ ( **परिपालयमानस्य राज्ञो भूतानि पुत्रवत् । ततस्तु द्रुह्यतां पापं । २४** ) प्रजेचें पुत्रवत् पालन करणाऱ्या राजाचा जो द्रोह करतो [ यावरून उघड दिसतें कीं, पुत्रवत् पालन न करणाऱ्या किंवा शत्रुवत् व्यवहार करणाऱ्या राजाचा द्रोह करणें, हें पाप नसून तें कर्तव्यच ठरतें. ]

६ ( **बलिषड्भागमुद्धृत्य नृपस्यारक्षितुः प्रजाः । अधर्मः । २५** ) सहावा भाग कर रूपानें घेत असूनही जो राजा प्रजेचें नीट पालन करीत नाहीं, तो अधार्मिक अर्थात् पापी होय.

७ दक्षिणा देण्याचें वचन देऊन ती न देणें (२६),

८ **युद्धे, मा कार्षीत् सतां धर्मं । २७** ) युद्धामध्यें जो सत्यधर्म पालन करीत नाहीं,

९ आचार्यानें शिकवलेल्या उत्तम शास्त्राचा जो नाश करतो, (२८)

१० पायस, तिळोदक व बकऱ्याचें मांस दुसऱ्यांस न देतां खाणें, (३०)

११ गुरूचा अपमान करणें (३०),

१२ मित्राचा द्रोह करणें (३१),

१३ विश्वासघात करून गुप्त गोष्टीचा परिस्फोट करणें (३२),

१४ इतरांना न कळत, त्यांना सोडून एकट्यानें मिष्टान्न खाणें (३४),

१५ राजा, स्त्री, बाल व वृद्ध यांचा वध करणें (३७),

१६ सेवकांना निष्कारण सोडून देणें,

१७ लाख, दारू, मांस, लोखंड व विष यांचा व्यापार ( करून नोकरांचें पोषण ) करणें ( ३८ ),

१८ पळणाऱ्या शत्रूचा वध करणें ( ३९ ),

१९ परळ हातांत घेऊन व वल्कलें धारण करून जो भिक्षा मागत उन्मत्ताप्रमाणें हिंडेल ( ४० ),

२० मद्य, स्त्रिया व द्यूत यांत आसक्त होऊन कामक्रोधांत जो गुरफटत राहतो ( ४१ ),

२१ अपात्रीं दान करणें ( ४२ ),

२२ सकाळीं व संध्याकाळीं संध्या न करतां जो निजतो ( ४४ ),

२३ आग लावणें, गुरुपत्नीशीं गमन करणें, मित्रद्रोह करणें ( ४५ ),

२४ माता, पिता व देवता यांची सेवा न करणें ( ४६ ),

२५ सामर्थ्य असून दीन याचकांना कांहीं न देणें ( ५० ),

२६ कपट करणें, चहाडी करणें, अपवित्र आचरण करणें ( ५१ ),

२७ ऋतुकालीं इच्छा करणाऱ्या ऋतुस्नात पतिव्रतेशीं ऋतुसमयीं समागम न करणें ( ५१ ),

२८ ब्राह्मणाची संतति नष्ट करणें, ब्राह्मणाच्या पूजेमध्यें विघ्न करणें,

२९ वासराला पुरेसें न ठेवतां गाईचें दूध पिळून नेणें ( ५४ ),

३० धर्मपत्नीचा त्याग करून परस्त्रीशीं समागम करणें ( ५५ ),

३१ पाणी खराब करणें, विष देणें ( ५६ ),

३२ पाणी जवळ असून तें तहानेल्यास न देणें ( ५७ ),

ज्याच्या अनुमतीनें राम वनांत गेला असेल, त्याला हीं पापें लागतील, असें भरतानें म्हटलें व कौसल्येसमोर आपण निष्पाप असल्याचें सांगितलें.

## दशरथाचा मृत्यु

हा नृशंसे ममामित्रे कैकेयि कुलपांसिनि ७६
इति मातुश्च रामस्य सुमित्रायाश्च संनिधौ।
राजा दशरथः शोचञ्जीवितान्तमुपागमत् ७७
(अयोध्या. स. ६४)

ते च दृष्ट्वा तदा सुप्ते उभे देव्यौ च तं नृपम्।
सुप्तमेवोद्गतप्राणं अन्तःपुरमदृश्यत २०
तासामाक्रन्दशब्देन सहसोद्गतचेतने।
कौसल्या च सुमित्रा च त्यक्तनिद्रे बभूवतुः २२
कौसल्या च सुमित्रा च दृष्ट्वा स्पृष्ट्वा च पार्थिवम्।
हा भर्तेति परिक्रुश्य पेततुर्धरणीतले २३
ततः सर्वा नरेन्द्रस्य कैकेयीप्रमुखाः स्त्रियाः।
रुदत्यः शोकसंतप्ता निपेतुर्गतचेतनाः २६
(अयोध्या. स. ६५)

"हे पापिणि! कुलघातकी कैकेयी! माझ्या वैरिणी! असें दशरथ रडत, ओरडत व शोक करीत करीत कौसल्या, सुमित्रा यांच्या समीप मृत्यु पावला. या वेळीं कौसल्या व सुमित्रा शोकातिरेकानें निद्रित झाल्यामुळें राजाचा प्राण गेला आहे, हेंहि त्यांस समजूं शकलें नाहीं. अन्तःपुरांतील स्त्रियांनीं राजा गतप्राण झाला आहे असें समजून येतांच आक्रोश करण्यास प्रारंभ केला, तेव्हां त्या रडण्याच्या शोकानें कौसल्या, सुमित्रा जागया झाल्या व राजाचा प्राण गेला असें समजतांच हे नाथ ! असें म्हणून जमिनीवर लोळण घेऊन आक्रोश करूं लागल्या. यानंतर कैकेयी व इतर राण्या तेथें आल्या व त्याही शोक करूं लागल्या."

दशरथ राजा हा सार्वभौम सम्राट् होता. पण त्याच्या मृत्यूच्या म्हणजे प्राण जाण्याच्या वेळीं त्याच्याकडे पाहण्यासाठीं देखील कोणीहि तेथें नव्हतें. कौसल्या

*

व सुमित्रा या त्याच्या शुश्रूषेला तत्पर होत्या, पण राजाचा प्राण मध्य रात्रीस गेला, त्यावेळीं त्यांस गाढ झोंप लागली होती, ती श्रमातिरेक व शोकातिरेकानेंच होय. या त्याच्या प्राण जाण्याच्या वेळीं ज्या झोंपल्या, त्या सकाळीं जाग्या झाल्या. म्हणजे राजाचें प्रेत सुमारें सहा तास तसेंच तेथें पडून राहिलें होतें.

कैकेयी तर मरणाच्या वेळीं तेथें नव्हतीच. सर्व अन्तःपुरांतील स्त्रियांच्या घोळक्यानें जेव्हां किंकाळ्या मारल्या, त्या वेळीं कैकेयी तेथें आली. तोंपर्यंत ही आपल्याच महालांत निजलेली होती. तिनें या पांच सहा दिवसांत राजाची विचारपूसही केलेली नव्हती.

## राजाचें मस्तक

**कौसल्या बाष्पपूर्णाक्षी विविधं शोककर्शिता ।**
**उपगृह्य शिरो राज्ञः कैकेयीं प्रत्यभाषत २**

( अयोध्या. स. ६५ )

' शोकानें जर्जर झालेल्या कौसल्येनें राजाचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन ती कैकेयीस म्हणाली. ' राजा मरून सहा सात तासांनीं कौसल्येनें राजाचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलेलें आहे.

यानंतर कौसल्येनें कैकेयीची बरीच निर्भर्त्सना केलेली आहे– ' राजाला मारून तूं आतां या निष्कंटक राज्याचा उपभोग घे. आतां आपले मनोरथ पूर्ण करून घे. आपल्या नवऱ्याला मारून कैकेयीवांचून दुसरी कोणती बरें स्त्री जिवंत राहूं शकेल ? ' ( अयो० स. ६६।३–५ )

## ब्रह्महत्येचें पाप

श्रावण दशरथ राजाला म्हणतो–

**ब्रह्महत्याकृतं तापं हृदयादपनीयताम् ५०**
**न द्विजातिरहं राजन् मा भूत्ते मनसो व्यथा ।**
**शूद्रायामस्मि वैश्येन जातो नरवराधिप ५१**

( अयोध्या. स. ६३ )

' माझ्या वधानें तुला ब्रह्महत्येचा दोष लागेल हें भय तूं मनांत ठेऊं नकोस,

कारण मी शूद्रस्त्रीच्या पोटीं वैश्यापासून उत्पन्न झालों आहें. मी कांहीं द्विजातीचा तरुण नाहीं. मी ब्राह्मण नव्हे.'

या काळीं ब्राह्मण कुलांत उत्पन्न झालेल्याचा वध झाला, तर त्याचा परिणाम भयंकर तापदायक होतो, असा समज होता. म्हणून श्रावण-वध झाला तर ब्राह्मण-वध झाला, असें समजण्याचें कारण नाहीं. आपण शूद्रपुत्र आहों. मी ब्राह्मण नाहीं, असें तो राजा दशरथाला सांगत आहे. यावरून ब्राह्मण जातीविषयीं किती आदर होता तें स्पष्ट होत आहे. 'ब्रह्म-हत्या' हें मोठें पातक आहे. जातीनेंच ब्राह्मण्य मानण्यावर ही कल्पना आधारलेली आहे. जर गुणकर्मानें चातुर्वर्ण्य असेल तर अमुकाचा वध झाला असतां ती ब्रह्महत्या झाली कीं नाहीं, हें ठरवण्यास निश्चित असें कांहींच साधन राहणार नाहीं.

## मुनींचा शाप

**एवं त्वं पुत्रशोकेन राजन्कालं करिष्यसि ५४**
**अज्ञानात्तु हतो यस्मात्क्षत्रियेण त्वया मुनिः ।**
**तस्मात्त्वां नाविशत्याशु ब्रह्महत्या नराधिप ५५**
**त्वामप्येतादृशो भावः क्षिप्रमेव गमिष्यति ।**
**जीवितान्तकरो घोरो दातारमिव दक्षिणाम् ५६**

(अयोध्या. स. ६४)

'हे राजा! तुलाही असेंच पुत्र-शोकानें मरण येईल. तूं अज्ञानानें मुनीचा वध केलास म्हणून तुला ब्रह्महत्या बाधणार नाहीं. पण जसा पुत्रशोकानें आमचा मृत्यु होत आहे, तसाच तुझाही होईल.'

एखाद्याचा तळतळाट झाला तर त्याची ती वाणी सत्य होते. तसेंच येथें झालें.

## लहानपणचें पाप

**कुमारः शब्दवेधीति मया पापमिदं कृतम् ११**
**एवं मयाप्यविज्ञातं शब्दवेध्यमिदं फलम् ।**
**देव्यनूढा त्वमभवो युवराजो भवाम्यहम् १३**

(अयोध्या. स. ६३)

' हे कौसल्ये ! तुझ्याशीं माझें लग्न झालें नव्हतें, मी कुमार अवस्थेंतच होतों. त्या वेळीं मी शब्दवेध करण्यांत प्रवीण होतों. त्या युवराज अवस्थेंतच हें पाप मजकडून घडलें ! '

हें पाप म्हणजे श्रावणाचा वध होय. श्रावण आपल्या अंध व वृद्ध आईबापांसाठीं पाणी आणण्यास नदीवर आला. तेथें तो पाणी भरूं लागला. तो बुडबुड असा शब्द दशरथाच्या कानीं पडला. त्याला वाटलें कीं हत्ती असावा, त्यानें बाण मारला तो श्रावणाच्या मर्मी लागला व तो मेला. पुढें त्याच्या आईबापांनीं त्यास शाप दिला कीं, ' हे राजा ! तूं ही असाच आमच्यासारखा पुत्रशोकानें मरशील. '

हा वृत्तांत या वेळीं आठवला व राजा म्हणत आहे कीं त्या पापाचें हें फल आतां आपणास मिळत आहे.

दशरथ या वेळीं कुमार होता, त्याचें लग्नही झालेलें नव्हतें. तेव्हां दशरथास या शापानें आनन्द झाला असें जें कित्येक मानतात, तें खोटें आहे. लग्न होण्यापूर्वीचें हें कृत्य आहे. या वेळीं त्यास पुत्रशोकानें मृत्यु येईल, या शापामुळें आनंद होण्याचा संभव नव्हता.

## वानप्रस्थी व्रतीचा वध

वानप्रस्थाश्रमामध्यें असणाऱ्या व्रतीचा वध केला तर राजाचा नाश होतो, असें श्रावणाचा पिता म्हणत आहे.

**क्षत्रियेण वधो राजन् वानप्रस्थे विशेषतः ।**
**ज्ञानपूर्वं कृतः स्थानाच्च्यावयेदपि वज्रिणम्** २३
**सप्तधा तु भवेन्मूर्धा मुनौ तपसि तिष्ठति ।**
**ज्ञानाद्विसृजतः शस्त्रं तादृशे ब्रह्मवादिनि** २४
**अज्ञानाद्धि कृतं यस्मादिदं ते तेन जीवसे ।**

( अयोध्याकांड सर्ग ६४ )

' जर क्षत्रियानें जाणूनबुजून वानप्रस्थाश्रमी मुनीचा वध केला, तर तो राजा पदच्युत होईल, त्याच्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील. पण तूं न जाणतां शस्त्र चालविलेंस म्हणून तूं जिवंत राहिला आहेस. '

मुनीचा वध झाला तर राजाला एवढें मोठें भय प्राप्त होणें शक्य होतें.

## अराजक राष्ट्र

राष्ट्रामध्यें अराजकता उत्पन्न होऊं नये. कारण अशी अराजक स्थिति राष्ट्राची हानि करते. याविषयीं रामायणाच्या या अयोध्याकाण्डाचा ६७ वा अध्याय फारच लक्षपूर्वक पाहण्यासारखा आहे. यांपैकीं कांहीं परिस्थिति पहा—

१ अराजक राष्ट्र झालें तर तें नाश पावेल. ( ८ )

२ राष्ट्रामध्यें अराजकता वाढली तर कोणी मूठभरही धान्य पेरीत नाहीं. ( १० ) यामुळें लोकांस खावयास अन्न मिळत नाहीं.

३ अराजकता वाढली तर पुत्र पित्याच्या व स्त्री पतीच्या आधीन रहात नाहीं. अराजकामध्यें कोणाचें धन सुरक्षित नसतें व स्त्रीहि सुरक्षित नसते. ( ११ )

४ अराजक राष्ट्रामध्यें व्यापार–धंदा नीट चालत नाहीं. ( १३ )

५ अराजक राष्ट्रामध्यें सभा भरल्या जात नाहींत, रमणीय उद्यानें राहूं शकत नाहींत, यज्ञयाग होत नाहींत. ( १४ )

६ अराजक राष्ट्रामध्यें राष्ट्रसंवर्धक उत्सव होऊं शकत नाहींत. समाजाची वाढ होत नाहीं. ( १५ )

७ अराजक राष्ट्रामध्यें देशान्तरीय व्यापार वाढत नाहीं. ( १६ )

८ अराजक राष्ट्रामध्यें सुवर्णालंकार धारण करून कुमारिका उद्यानांत संध्याकाळीं खेळण्यासाठीं जाऊं शकत नाहींत. ( १७ )

९ शेतकारी व गवळी आपल्या घरांचीं दारें उघडीं टाकून रात्रौ अराजक राष्ट्रांत निजूं शकत नाहींत. ( १८ )

१० अराजक राष्ट्रामध्यें स्त्रीपुरुष वेगवान् यानांतून दूरवर फिरावयास जाऊं शकत नाहींत. ( १९ )

११ अराजक राष्ट्रामध्यें मुनि संचार करीत नाहींत; कारण कोणाचाही योगक्षेम तेथें चालत नाहीं. ( २३-२४ )

१२ अराजक राष्ट्रामध्यें कोणाचेंही जीवित व धन सुरक्षित नसतें. तेथील

लोक मत्स्यांप्रमाणें एकमेकास खात असतात. ( ३१ )

नियामक-सत्ता राष्ट्रामध्यें अवश्य पाहिजे, हें याचें तात्पर्य होय. हा सर्व अध्याय राष्ट्रीय उन्नतीच्या दृष्टीनें काळजीपूर्वक पाहण्यासारखा आहे.

## लोकसंमत राजा

यदि प्रव्राजितो रामो लोभकारणकारितम्।
वरदाननिमित्तं वा सर्वथा दुष्कृतं कृतम् २८
असमीक्ष्य समारब्धं विरुद्धं बुद्धिलाघवात्।
जनयिष्यति संक्रोशं राघवस्य विवासनम् ३०
अहं तावन्महाराजे पितृत्वं नोपलक्षये।
भ्राता भर्ता च बन्धुश्च पिता च मम राघवः ३१
सर्वलोकप्रियं त्यक्त्वा सर्वलोकहिते रते।
सर्वलोकोऽनुरज्येत कथं चानेन कर्मणा ३२
सर्वप्रजाभिरामं हि रामं प्रव्राज्य धार्मिकम्।
सर्वलोकविरोधेन कथं राजा भविष्यति ३३

( अयोध्या. स. ५८ )

लक्ष्मण म्हणतो कीं—

१ रामाला जरी लोभानें किंवा वरदानानें हद्दपार केलें असेल, तर तें अगदींच अयोग्य आहे.

२ क्षुद्रबुद्धीनें केलेलें हें कृत्य शोकाला कारण होईल.

३ दशरथ राजाशीं आतां माझें पितृत्वाचें नातें राहिलें आहे, असेंसुद्धा मला वाटत नाहीं.

४ माझा भाऊ पोषक, बन्धु व पिता आतां रामच आहे.

५ जनहित करणाऱ्या लोकप्रिय रामाला हद्दपार करून जनतेची प्रीति कशी बरें मिळूं शकेल ?

६ सर्व लोकांना प्रिय असलेल्या रामाला हद्दपार करून व अशा रीतीनें सर्व लोकांचा विरोध करून कोण, कसा बरें राजा होऊं शकेल ?

या लक्ष्मणाच्या म्हणण्यांत, जनसंमतीशिवाय कोणीहि राजा होऊं शकत नाहीं, हें तत्त्व स्पष्ट दिसत आहे. लोकांच्या संमतानेंच कोणीहि राज्यावर राजा म्हणून राहूं शकतो व लोकांच्या संमतिनेंच तो टिकूं शकतो. जनतेमध्यें ही शक्ति आहे, हें लक्ष्मण ओळखून होता, म्हणूनच जनतेचा ओढा रामावर आहे, तेवढा भरतावर नाहीं, यासाठीं दशरथ वा भरत यांपैकीं कोणीहि यापुढें राज्यावर टिकूं शकणार नाहींत असें भरत म्हणत होता.

दशरथाशीं पितृत्वाचें नातेंही तोडून टाकण्यास तो तयार झाला होता, इतका त्याचा संताप भनावर झाला होता. अशीच जनताही संतप्त झालेली होती, यामुळें भरताला राज्यावर सुखानें बसतां आलें असतें, हें संभवनीय दिसत नाहीं.

## राजाचें प्रेत

दशरथ राजाच्या मृत्यूच्या वेळीं त्याकडे पहावयास कोणी नव्हतें, इतकेंच नव्हे, तर त्याचा प्रेतसंस्कारही मृत्यूनंतर ७ दिवसपर्यंत होऊं शकला नाहीं—

**व्यपनिन्युः सुदुःखार्तां कौसल्यां व्यावहारिकाः** १३
**तैलद्रोण्यां तदामात्याः संवेश्य जगतीपतिम् ।**
**राज्ञः सर्वाण्यथादिष्टयश्चक्रुः कर्माण्यनन्तरम्** १४
**न तु संकालनं राज्ञो विना पुत्रेण मन्त्रिणः ।**
**सर्वज्ञाः कर्तुमीयुस्ते ततो रक्षन्ति भूमिपम्** १५
**तैलद्रोण्यां शायितं तं सचिवैस्तु नराधिपम् ।**

( अयोध्या. स. ६६ )

' नंतर व्यवहारकुशल सचिवांनीं कौसल्येस दूर करून राजाचें प्रेत तेलाच्या डोणींत ठेवलें. आणि वसिष्ठ आदि ऋषींच्या आज्ञेप्रमाणें करावयाचीं कर्में ते करूं लागले. त्यांना पुत्रावांचून प्रेतसंस्कार करावा असें वाटलें नाहीं. म्हणून त्यांनीं तेलाच्या डोणींत राजाचें प्रेत ठेवून त्याचें रक्षण ते करूं लागले. '

## भरताला निरोप

दशरथ राजाचें प्रेत तेलाच्या डोणींत ठेवलें व तें कुजूं नये, अशी व्यवस्था केली. नंतर वसिष्ठादिकांनीं विचार करून भरताला बोलावून आणावा असें ठरवलें.

त्यासाठीं दूतांबरोबर नजराणे देऊन त्यांस केकय देशांत पाठवलें. पण सर्व दूतांस निक्षून सांगितलें कीं, 'रामाचा वनवास अथवा राजाचा मृत्यु वगैरे कांहींसुद्धां तेथें सांगावयाचें नाहीं. जरुरीचें काम असल्यानें तुला लवकर बोलावलें आहे.' एवढाच निरोप त्यांना सांगितला होता.

बारीकसारीक गोष्टींत किती सावधगिरी घेतात, तें पाहण्यासारखें आहे. भरत इकडे अयोध्येस येऊन पोंचेपर्यंत त्याच्या आजोळीं दशरथाच्या मृत्यूची वार्ताही कळली नव्हती.

याला कारणही तसेंच होतें. जर भरत येण्यापूर्वी दशरथाच्या मृत्यूची वार्ता चहूंकडे पसरली असती तर एखादा शत्रु अयोध्येवर चाल करून येता, किंवा भरताचा मामाच भरताला राज्यावर बसवण्यासाठीं सैन्यासह येता. यासाठीं ही बातमी अगदीं गुप्त ठेवली होती. दशरथानेंही भरताला न आणतांच रामाला यौवराज्याभिषेक करण्याची घाई केली होती, हेंही येथें पहावें.

## भरताचा येण्याचा मार्ग

१ भरत राजवाड्यांतून पूर्वेकडे तोंड करून निघाला,

२ सुदामा नदीवर आला,

३ नंतर विस्तृत व अफाट अशा ल्हादिनी नदीवर आला,

४ नंतर शतद्रु नदीवर पोंचला,

५ नंतर ऐलधान गांवापाशीं येऊन अमरपर्वताजवळ आला,

६ नंतर शिला नदीवरून पलीकडे गेला, तेथून आग्नेयी दिशेला असलेल्या शल्यकर्षण देशाला पोंचला,

७ नंतर शिलावहा नदींत स्नान करून चैत्ररथ वनाला येऊन पोंचला,

८ नंतर गंगा व सरस्वती यांच्या संगमावर त्यानें येऊन स्नान केलें,

९ नंतर वीर-मत्स्य देशाच्या उत्तरेस असलेल्या देशांत येऊन भारुंद वनामध्यें येऊन पोंचला.

१० नंतर कुलिंगा नदींतून पार झाला व यमुनेच्या तीरावर आला व त्यानें आपल्या सैन्यास विश्रांति दिली.

११ नंतर तो निबिड अरण्यांतून पार होऊन अंशुधान गांवापाशीं येऊन, प्राग्वट नगराजवळील उतारावरून तो सैन्यासह गंगानदीच्या पार गेला. तेथून तो धर्मवर्धन गांवाकडे पोंचला.

१२ तेथून तो तोरण गांवाच्या दक्षिणेस जंबुप्रस्थ नामक नगराकडे पोंचला. तेथून वरूथ नगरीला गेला. तेथून रम्यवनांतूनच उज्जिहान नगरीला पोंचला.

१३ येथून आपली राजधानी जवळ आहे, असें पाहून त्यानें वेगवान् घोडे आपल्या रथाला जोडले व इतरास सावकाश यावयास सांगून आपण लवकर पोंचण्याच्या इच्छेनें पुढें निघाला.

१४ पुढें सर्वतीर्थ ग्रामामध्यें थोडें थांबून अनेक नद्या उतरून हस्तिपृष्ठक गांवाजवळ त्यानें कुटिका नदी ओलांडली.

१५ नंतर लोहित्य गांवाजवळ कपीवती, एकसाल गांवाजवळ स्थाणुमती आणि विनत गांवापाशीं **गोमती** नदी ओलांडून पुढें निघाला.

१६ नंतर कलिंग नगराजवळील साल वनापाशीं आल्यावर तें वन त्यानें रातोरात ओलांडलें व अरुणोदयाच्या सुमारास त्याला अयोध्या नगरी दिसली.

१७ थोड्या वेळांत त्यानें अयोध्येंत प्रवेश केला. (अयोध्या. स. ७१)

केकय देशांतून निघून अयोध्येस येण्यास त्यास (**सप्तमीं रात्रिः।** अयो. स. ७२।८) सात रात्री प्रवास करावा लागला. यावरून केकय देशाहून अयोध्येपर्यंतचें जाण्यायेण्याचें दोन–अडीचशें मैल अन्तर असावें असें वाटतें.

## सूतानें चार दिवस वाट पाहिली

गंगातीरापर्यंत रामाला रथांतून पोंचविल्यावर गंगापार होऊन राम वनस्थ झाला. सूताला वाटलें कीं, राम वनवासाला कंटाळेल व परत येईल. या इच्छेनें तो तेथें चार दिवस राहिला. तो म्हणाला—

**गुहेन सार्धं तत्रैव स्थितोऽस्मि दिवसान् बहून्।**
**आशया यदि मां रामः पुनः शब्दापयेदिति ३**

(अयोध्या. स. ५९)

' गुहासह वर्तमान तेथेंच गंगातीरीं मी राम परत येईल व मला परत येण्या-

विषयीं सांगेल, अशा आशेनें बरेच दिवस थांबलों.' बरेच दिवस म्हणजे तीनच दिवस होत.

१ पहिला दिवस सीतेसह राम गंगापार गेला तो.

२ दुसरा दिवस राम चित्रकूटाला पोंचला तो.

३ दूतांनीं राम चित्रकूटास पोंचल्याची खबर आणली तो तिसरा दिवस.

राम गंगापार होण्याच्या पूर्व दिवशीं गंगातीरीं पोंचला होता तो दिवस या तीन दिवसांत मिळवला म्हणजे रथ सुमारें चार दिवस गंगातीरीं होता असें ठरतें. रथाबरोबर सूतहि होताच. सूताला रामविरहाच्या दुःखानें हे चार दिवस पुष्कळच दिवस वाटले, हें अगदीं स्वाभाविकच आहे.

## राम वनवासाला जाऊन पांच दिवस झाले

**वनवासाय रामस्य पञ्चरात्रोऽत्र गण्यते ।**
**यः शोकहतहर्षायाः पञ्चवर्षोपमो मम १७**

'राम वनवासाला जाऊन पांच रात्री गेल्या. या पांच रात्री पांच वर्षांसारख्या या दुःखामुळें मला वाटल्या.' असें कौसल्या म्हणत आहे.

हा सहावा दिवसही गेला. सूर्य अस्ताला गेला व सहावी रात्र सुरू झाली, तेव्हां राजा शोकाकुल होऊन त्यास थोडीशी डुलकी लागली. (अयोध्या. ६२।१८-२०)

**स राजा रजनीं षष्ठीं रामे प्रव्राजिते वनम् ।**
**अर्धरात्रे दशरथः सोऽस्मरद् दुष्कृतं कृतम् ४**

( अयोध्या. स. ६३ )

या सहाव्या रात्रीला मध्य रात्रीच्या समयीं राजा दशरथाला श्रावणवधरूपी जें दुष्कृत्य आपण पूर्वीं केलें होतें, तें भयंकर कृत्य आठवलें व तो श्रावणवधाचा वृत्तांत त्यानें कौसल्येस सांगितला.

## दोन दिवसांचा प्रवास

रामाला पोंचवून परत येण्यास दोन दिवस सारथ्याला लागले.

**ततः सायाह्नसमये द्वितीयेऽहनि सारथिः ।**
**अयोध्यां समनुप्राप्य निरानन्दां ददर्श ह ५** (अयो. स. ५७)

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तो सुमंत्र रथासह आनन्दहीन अशा अयोध्येस येऊन पोंचला. छत्तीस तास त्यास यावयास लागले, असें यावरून दिसतें. हें अन्तर अयोध्येपासून फार तर पन्नास साठ मैल असावेंसें वाटतें.

## स्त्रीवधाबद्दल रामाचा तिटकारा

**अवध्याः सर्वभूतानां प्रमदाः क्षम्यतामिति ॥२१॥**
**हन्यामहं इमां पापां कैकेयीं दुष्टचारिणीम् ।**
**यदि मां धार्मिको रामो नासूयेन्मातृघातकम् ॥२२॥**
**इमामपि हतां कुब्जां यदि जानाति राघवः ।**
**त्वां च मां चैव धर्मात्मा नाभिभाषिष्यते ध्रुवम् ॥२३॥**

( अयोध्या. स. ७८ )

भरत शत्रुघ्नाला म्हणाला– 'स्त्रियांना ठार मारणें सर्वदा निषिद्ध आहे. धर्मनिष्ठ राम मातृघातक म्हणून जर मला दोष देणार नसेल, तर मीहि या दुष्ट आचरण करणाऱ्या कैकेयीचा वध करीन. जर या कुब्जा मंथरेला आम्ही ठार मारलें असें श्रीरामाला समजलें तर तो धर्मात्मा तुझ्या व माझ्याबरोबर बोलणारसुद्धां नाहीं. '

यासाठीं तूं तिला मारूं नकोस. रामाचें इतकें भय भरताला व शत्रुघ्नाला वाटत होतें. रामाची धार्मिक शिस्त अशी होती.

## सीता दागिने घालीत असते

**नूपुरोत्कृष्टलीलेव खेलं गच्छति भामिनी ।**
**इदानीमपि वैदेही तद्रागान्न्यस्तभूषणा १९.**

( अयोध्या स. ६० )

'नूपुरांच्या आवाजामुळें जिच्या चालण्यांत अधिक सौंदर्य भासत असतें, त्या सीतेला दागिने फार आवडत असल्यानें ती अजूनही आपल्या अंगावर सर्व दागिने घालीत असते. '

स्त्रियांना दागिने घालणें आवडतें ही गोष्ट कवीनें येथें मोठ्या मार्मिकपणानें सांगितली आहे व सीता दागिने घालीत असते, असें सांगण्यानें ती उदास झाली नाहीं, आनंदांत आहे, असेंही सुचविलें आहे.

## मला स्मरत नाहीं

**कैकेयीसंश्रितं जल्पं नेदानीं प्रतिभाति माम्       १४**

( अयोध्या. स. ६० )

' सीता कैकेयीसंबंधानें काय बोलली, तें मला या वेळीं आठवत नाहीं. ' यासंबंधानें कवि लिहितो–

**ध्वंसयित्वा तु तद्वाक्यं प्रमादात् पर्युपस्थितम् ।**
**ह्लादनं वचनं सूतो देव्या मधुरमब्रवीत्       १५**

( अयोध्या. स. ६० )

' कैकेयीसंबंधीं सीतेनें जें काय भाषण केलें, तें सूताला स्मरत होतें. तें त्याच्या जिभेवरही आलें होतें, पण तें अप्रिय असल्यानें सूतानें तें टाळलें व ज्याच्या योगानें आनंद वाटेल, तेंच तो सांगूं लागला. यांत सूताची समयज्ञता व्यक्त होत आहे.

## फिरावयास जाणें

बायकांना बरोबर घेऊन कोसभर ( दोन तीन मैल ) पुरुष फिरावयास जात असत, असें दिसतें .पहा–

**रामं वा लक्ष्मणं वापि दृष्ट्वा जानाति जानकी ।**
**अयोध्याक्रोशमात्रे तु विहारमिव संश्रिता       १३**

( अयोध्या. स. ६० )

सीता रामाला वनासंबंधीं माहिती विचारते व अयोध्येपासून एक कोस अन्तरावर फिरावयास जावें व तेथें जसा आनंदानें विहार करावा त्याप्रमाणें ती सीता मोठ्या आनंदांत तेथें रहात आहे.

यामध्यें आपल्या नगरापासून कोसभर फिरावयास जाण्याचा उल्लेख आहे व तो सीतेसंबंधानें असल्यानें रामायणकाळीं स्त्रियांना बरोबर घेऊन पुरुष फिरावयास जात असत असें दिसतें.

## यज्ञकर्मामध्यें रामाची प्रवीणता

**यजस्व, कुशलो ह्यसि ।** ( अयोध्या. स. ५६।२९)

राम यज्ञकर्मामध्यें कुशल होता. सर्व वास्तुशांति त्यानेंच एकट्यानें येथें केली आहे. सर्व कर्म कसें करावें व संक्षेपानें करावयाचें असतां कर्मांचा संक्षेप कसा करावा, हें सर्व त्यास माहीत होतें.

त्यावेळच्या क्षात्रियांच्या पाठविधीमध्यें हें कर्मविधि–प्रयोगांचें शिक्षण देत असत, असें दिसतें.

## पितृश्राद्ध

**आनयेङ्गुदिपिण्याकं चीरमाहर चोत्तरम् ।**
**जलक्रियार्थं तातस्य गमिष्यामि महात्मनः ॥ २०**
**सीता पुरस्ताद्व्रजतु त्वमेनामभितो व्रज ।**
**अहं पश्चाद्गमिष्यामि गतिर्ह्येषा सुदारुणा ॥ २१**

(अयोध्या. स. १०४)

'वाळलेल्या इंगुदी फळांचा गोळा आण, तें उत्तम वल्कल घेऊन ये. मी पित्याची उदकक्रिया करतों. सीतेनें प्रथम जावें, तिच्या मागून तूं जावें. तुझ्या-मागून मी येतों. या वेळीं अशाच क्रमानें गेलें पाहिजे !'

**'सर्वे कनिष्ठप्रथमा इतरे तु स्त्रियोऽग्रतः'**

स्त्रियांनीं अग्रभागीं, लहानांनीं प्रथम व इतरांनीं मागाहून जावें. या वचना-प्रमाणें रामानें केलें. येथें इंगुदी फळांच्या गोळ्यांचा पिंड दिला आहे. मांसाचा उल्लेख येथें नाहीं. रामाच्या झोपडींत जर मांस असतें तर तेंच यावेळीं घेतलें असतें. म्हणूनच मांस-वचनें प्राक्षिप्त दिसतात.

नंतर कौसल्येनें हा पिंड दिलेला पाहिला व तिला फार दुःख झालें व ती म्हणाली– 'अहो ! पहा हो ! एवढ्या सम्राटाला हा इंगुदीच्या पिठाचा पिंड दिला जात आहे. या सम्राटाला हें भोजन योग्य आहे काय ? वैभवसंपन्न रामाला आपल्या वैभवसंपन्न पित्याच्या उद्देशानें असला पिंड देण्याचा प्रसंग यावा, या-सारखें दुसरें काय बरें दुःखदायक असेल ? (अयोध्या. स. १०५।८-१७)

## १३ दिवसांचें और्ध्वदेहिक

और्ध्वदेहिक १३ दिवसांत संपत असे. चौदाव्या दिवशीं मनुष्य निवृत्त होऊन रोजच्या कामाला लागत असत.

**ततः प्रभातसमये दिवसेऽथ चतुर्दशे ।**
**समेत्य राजकर्तारो भरतं वाक्यं अब्रुवन् ॥१॥**

( अयोध्या. स. ७९ )

चौदाव्या दिवशीं सकाळीं राज्यांतील अधिकारी जमले व त्यांनीं भरताला असें सांगितलें कीं 'तूं आतां राज्याचें पालन कर.' त्यावर भरतानें सांगितलें कीं, 'वडील बंधूचाच राज्यावर बसण्याचा अधिकार आहे. म्हणून मी वनांत जातों व रामाला परत घरीं आणतों व त्यालाच आपण गादीवर बसवूं.' ( अयो. स. ७९।६-१३)

हें भाषण ऐकून सर्व लोकांना आनंद झाला व ते म्हणाले कीं, 'ज्या अर्थीं वडील भावाला राज्य देण्याची इच्छा तूं करीत आहेस, त्या अर्थीं तुलाच कमल-निवासिनी लक्ष्मी प्राप्त होवो.' याप्रमाणें सर्व लोकांनीं भरताला आशीर्वाद दिले व भरताचें हें भाषण ऐकून सर्वांस आनंद झाला. त्यानंतर रामाला आणण्यासाठीं वनांत जाण्याची तयारी करण्याची आज्ञा भरतानें दिली व त्या तयारीस सर्व लोक लागले.

## वन्य भोजन

नीवार म्हणजे वनांत आपोआप उगवणारें तृणधान्य होय. हें वनवासी लोकांचें भोजन होतें. पहा–

**भुक्त्वाशनं विशालाक्षी सूपदंशान्वितं शुभम् ।**
**वन्यं नैवारमाहारं कथं सीतोपभोक्ष्यते ५**

( अयोध्या. स. ६१ )

'चमचमीत चटण्या व कोशिंबिरी यांनीं युक्त भोजन खाण्याची संवय असलेली सीता वनांतील नीवार- सांवे - कसे बरें खाईल ?'

सांव्याचें पीठ, सांव्याचे तांदूळ, वऱ्या, शेंगाड्याचें पीठ, इंगुदी फळांचें पीठ इत्यादि शुष्क व नीरस अन्न वनांत मिळणार, तें सीतेला कसें बरें आवडेल ?

## मांस-भक्षण

राम मांस भक्षण करीत होते कीं काय, याचा विचार करावयाचा असतांना पुढील वचनें पाहण्यासारखीं आहेत-

ऐणेयं मांसं आहृत्य शालां यक्ष्यामहे वयम् २२
कर्तव्यं वास्तुशमनं सौमित्रे चिरजीविभिः ।
मृगं हत्वाऽऽनय क्षिप्रं लक्ष्मणेह शुभेक्षण २३
कर्तव्यः शास्त्रदृष्टो हि विधिर्धर्ममनुस्मरन् ।
ऐणेयं श्रपयस्वैतच्छालां यक्ष्यामहे वयम् २५
त्वर सौम्य मुहूर्तोऽयं ध्रुवश्च दिवसो ह्ययम् ।
स लक्ष्मणः कृष्णमृगं हत्वा मेध्यं प्रतापवान् ।
अथ चिक्षेप सौमित्रिः समिद्धे जातवेदसि २६
तत्तु पक्वं समाज्ञाय निष्टप्तं छिन्नशोणितम् २७
लक्ष्मणः पुरुषव्याघ्रं अथ राघवमब्रवीत् ।
अयं सर्वः समस्तांगः श्रितः कृष्णमृगो मया २८
देवता देवसंकाश यजस्व कुशलो ह्यसि ।
रामः स्नात्वा तु नियतो गुणवाञ्जपकोविदः २९
संग्रहेणाऽकरोत्सर्वान्मन्त्रान् सत्रावसानिकान् ।
इष्ट्वा देवगणान् सर्वान् विवेशावसथं शुचिः ३०
वैश्वदेवबलिं कृत्वा रौद्रं वैष्णवमेव च ।
वास्तुसंशमनीयानि मंगलानि प्रवर्तयन् ।
जपं च न्यायतः कृत्वा स्नात्वा नद्यां यथाविधि ३२
पापसंशमनं रामश्चकार बलिमुत्तमम् ।
वेदिस्थलविधानानि चैत्यान्यायतनानि च ॥
आश्रमस्यानुरूपाणि स्थापयामास राघवः ३३

(अयोध्या. स. ५६)

याचा आशय असा आहे- रामानें लक्ष्मणाला सांगितलें कीं- 'हे लक्ष्मणा ! हरिणाचें मांस आण, आपण वास्तुशान्ति करूं. दीर्घकालपर्यंत घरांत राहूं इच्छि-

णारांनीं वास्तुशान्ति केली पाहिजे. मृग मारून लवकर आण. शास्त्राप्रमाणें व धर्मविधीप्रमाणें वास्तुशान्ति करणें योग्य आहे. हरिणाचें मांस शिजवून तयार कर, आपण या शालेची शान्ति करूं. लक्ष्मणा! त्वरा कर, हा दिवस ध्रुव आहे.' लक्ष्मणानें पवित्र कृष्णमृग जळत्या अग्नींत टाकला. तो शिजून तयार झाला, रक्तस्राव बंद झाला, असें पाहून तसें त्यानें ' रामाला निवेदन केलें व देवतांचें यजन कर, तूं या कर्मांत कुशल आहेस ' असेंहि तो म्हणाला.

रामानें स्नान केलें, जप करून संक्षेपानें वास्तुशांतीचें कर्म केलें, सर्व देवांना यज्ञभाग दिला व पवित्रतेनें त्या घरांत त्यानें प्रवेश केला.

वैश्वदेवबली, रुद्रबली व वैष्णवबली करून वास्तुशांति केली, जप केला, नदीमध्यें स्नान केलें, पापनाशासाठीं बली दिला. वेदिस्थानें, चैत्यस्थानें, देवालयें यांना उद्देशून आश्रमाला अनुरूप बलि दिले.

यांत मांसबलीचा उल्लेख आहे. पण हें अवतरण वाचकांनीं काळजीपूर्वक पाहिलें असतां त्यांत निष्कारण कांहीं विधानांची पुनरुक्ति झालेली आहे, असें तेव्हांच त्यांच्या लक्षांत येईल. पहा—

श्लोक २२, २३ व २५ यामध्यें तीन ठिकाणीं मृगमांसाचा उल्लेख आहे, तो पुनरुक्त दोष असल्यासारखा दिसत आहे. पहा—

**ऐणेयं मांसं आहृत्य शालां यक्ष्यामहे वयम्** २२
**ऐणेयं श्रपयस्वैतत् शालां यक्ष्यामहे वयम्** २५
**मृगं हत्वाऽऽनय क्षिप्रं ... ...** ३२

ही पुनरुक्ति वाल्मिकीची असावी, असें वाटत नाहीं. ही निरर्थक पुनरुक्ति आहे. स्नानाचा उल्लेखही श्लोक २९ व ३२ मध्यें पुनरुक्त व अप्रासंगिक आहे. शिवाय लक्ष्मणानें जी पर्णकुटिका बांधली, ती नवीनच बांधली होती. ती वनांत बांधली होती. तेथें चैत्य, देवालयें वगैरे कांहींएक नव्हतें. तेव्हां यांच्या उद्देशानें बलि दिले, असें जें वर्णन आहे, तें अप्रस्तुत आहे असें दिसतें.

श्लोक २० श्लोकाच्या पुढें एकदम ३४ वा श्लोक असावा असें दिसतें. मधला हा मांस-वर्णनाचा भाग प्रक्षिप्त असावा असा संशय त्यांतील व्यर्थ पुनरुक्तीवरून येतो.

## मांस

शुद्धबाणहतांस्तत्र मेध्यान् कृष्णमृगान्दश ।
राशीकृतान् शुष्यमाणानन्यान्कांश्चन कांश्चन ३४
क्रियतां बलयश्चेति रामः सीतामथावशात् ।
तयोरुपदद्द्भ्रात्रोर्मधु मांसं च तद् भृशम् ३६
(अयोध्या. स. ९६)

' शुद्ध म्हणजे विष न लावलेल्या बाणानें मारलेले दहा काळवीट आणि रास घालून ठेवलेले आणखी कांहीं मृग रामानें तेथें पाहिले. ते पाहून रामाला आनंद झाला. 'आतां बलि द्या' असें त्यानें सीतेला सांगितलें. प्रथम भूतबलि देऊन मग मधु व मांस त्या सीतेनें भरपूर त्यास वाढलें.'

हा अध्याय प्रक्षिप्त आहे असें सर्व टीकाकारांनीं मानलें आहे व याचा मागें-पुढें संबंधही दिसत नाहीं. मधु नामक मद्य तयार होण्यास जितके दिवस लागतात, तितके दिवस येथें रामाला येऊन झालेलेही नाहींत. असें असतां मधु व मांस यथेष्ट वाढलें असें जें वर्णन आहे तें निःसंशय प्रक्षिप्त आहे. कोणत्याही टीकाकारानें हा अध्याय येथें मानलेला नाहीं. पण तो कांहीं पोथ्यांत आढळतो.

## भरद्वाजांनीं भरताच्या सैन्याला जेवण घातलें.

सेनायास्तु तवैवास्याः कर्तुमिच्छामि भोजनम् ।
(अयोध्या. स. ९१।४)

' हे भरता ! तुझ्या सर्व सैन्याला मी भोजन देऊं इच्छितों. त्याचा स्वीकार कर.' भरतानें प्रथम नम्रपणानें आश्रमास कष्ट होतील असें म्हटलें, पण ऋषींचा आग्रह पडल्यामुळें भरतानें मान्य केलें. येथील वर्णन मात्र संशय घेण्याजोगें आहे.

' दारू पिणारांसाठीं दारू तयार ठेवली होती, पायस पिणाऱ्यांसाठीं पायस तयार झाला होता. मांस खाणाऱ्यांसाठीं अनेक प्रकारचीं मांसें तयार केलीं होतीं. एकएकासाठीं सात आठ स्त्रिया अंगास तेल लावण्यासाठीं तयार होत्या.' (अयो. स. ९१।५१-५४) हें वर्णन आश्रमांतील दिसत नाहीं व आश्रमाला शोभतही नाहीं. 'बकरे व डुकरें यांचीं मांसें वाढलेलीं होतीं (६७). खापरावर

*

भाजून तयार केलेल्या हरिण, मोर व कोंबडी यांच्या मांसांचे ढीग तेथें ठेवले होते.' ( ७० )

## लक्ष्मण झोंपडी बांधतो.

तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिर्विविधान्द्रुमान् ।
आजहार ततश्चक्रे पर्णशालामरिंदमः २०
तां निष्ठितां बद्धकटां दृष्ट्वा रामः सुदर्शनाम् ।
(अयोध्या. स. ५६)

' रामाचें भाषण श्रवण करून लक्ष्मणानें अनेक वृक्ष तोडून आणले व त्यांची एक पर्णशाला बनवली. ती चांगल्या रीतीनें उभारली असून आंत पाऊस येऊं नये यासाठीं तिच्यावर गवताचें उत्तम आच्छादनही घातलेलें होतें. ही झोंपडी दिसण्यासही अत्यंत सुंदर होती.' दिसण्यांत सुंदर, राहण्यास सुखदायी व थंडी, वारा व पाऊस यांपासून उत्तम प्रकारें संरक्षण करणारी अशी झोंपडी तेथें लक्ष्मणानें बांधून तयार केली.

येथें त्यानें दुसऱ्यांचें सहाय्य घेतल्याचा उल्लेख नाहीं. एकट्या लक्ष्मणानेंच ही झोंपडी तयार केली असली पाहिजे. निदान तीन खोल्या होण्याइतकी तरी ही मोठी असावी, असें वाटतें. कारण राम व सीता यांसाठीं स्वतंत्र खोली व स्वतः लक्ष्मणासाठीं निराळी खोली असावयास पाहिजे. राजपुत्रांना झोंपडी बांधण्याचें व ती बांधण्यासाठीं लागणारें काबाडकष्ट करण्याचें शिक्षण मिळत होतें. इतर अध्ययनाबरोबर हेंही काम करवून घेत असत, असें यावरून वाटतें. नाहींतर एखाद्या राजपुत्रास एकदम झोंपडी बांधतां येईलसें वाटत नाहीं.

## चित्रकूट पर्वत

चित्रकूटं इमं पश्य प्रवृद्धशिखरं गिरिम् १०
समभूमितले रम्ये द्रुमैर्बहुभिरावृते।
पुण्ये रंस्यामहे तात चित्रकूटस्य कानने ११
बहुमूलफलं रम्यं संपन्नसरसोदकम् १२
मनोज्ञोऽयं गिरिः सौम्य नानाद्रुमलतायुतः ।

**बहुमूलफलो रम्यः स्वाजीवः प्रतिभाति मे १४**
**मुनयश्च महात्मानो वसन्त्यस्मिन् शिलोच्चये ।**

(अयोध्या. स. ५६)

'या चित्रकूट पर्वताला हीं रमणीय उंच उंच शिखरें आहेत. येथें नानाप्रकारचे वृक्ष आहेत. या रम्य, पवित्र व सपाट अशा भूविभागावर आपण येथें आनंदानें राहूं. येथें अनेक पक्ष्यांचे समूह रहात आहेत. येथें कंद, मुळें व फळें विपुल आहेत. नाना प्रकारचे वृक्ष, लता व वेली यांनीं हा पर्वत युक्त आहे. या संपन्न पर्वतावर आपण उत्तम रीतीनें उपजीविका करूं शकूं. येथें पाणीहि उत्तम आहे व येथें अनेक ऋषि-मुनीहि रहात आहेत.'

अर्थात् येथें कन्द, मुळें व फळें पुष्कळ आहेत, पाणी उत्तम आहे, अशी खाद्य पेयांची येथें सोय आहे व धर्मविषयांची चर्चा करण्यासाठीं तपस्वीहि येथें रहात आहेत. यांची सोबतही आहे. अशा रीतीनें या चित्रकूटावर आपण राहिलों तर आपला वनवास सुखाचा होऊं शकेल.

## पिशाच-बाधा

पिशाच-बाधा झाल्याप्रमाणें जानकी सीता तेथें उभी होती, असें सूत म्हणत आहे. पहा—

**जानकी तु महाराज निःश्वसन्ती तपस्विनी ।**
**भूतोपहतचित्तेव विष्ठिता विस्मृता स्थिता ॥**

(अयोध्या. स. ५८।३४)

'सीता तर पिशाचबाधा झाल्याप्रमाणें नुसते जोरानें श्वासोच्छ्वास करीत, सर्व कांहीं स्मरतच नाहीं अशा बावरल्यासारख्या स्थितींत उभी होती.'

येथें '**भूत-उप-हत-चित्ता**' या पदांवरून त्या वेळीं भूतबाधा माणसांना होते, असा समज होता, असें दिसतें. जेव्हां भूतबाधा होते तेव्हां मोठ्यानें श्वास चालतो, कांहीं स्मरत नाहीं व मनुष्य स्तब्ध पडून राहतो, हीं लक्षणें होतात, असाही समज वरील श्लोकावरून स्पष्ट दिसून येतो.

**ततो भूतोपसृष्टेव वेपमाना पुनः पुनः ।**
**धरण्यां गतसत्त्वेव कौसल्या सूतमब्रवीत्     १**

(अयोध्या. स. ६०)

'पिशाच्चानें पछाडल्याप्रमाणें कौसल्या कांपूं लागली.' येथेंही पिशाचबाधेचा उल्लेख आहे. येथें पिशाचबाधा झाली म्हणजे शरीर कांपूं लागतें असें म्हटलें आहे.

## मुहूर्त

**त्वर सौम्य मुहूर्तोऽयं ध्रुवश्च दिवसो ह्ययम् ॥**

(अयोध्या. स. ५६।२६)

'ध्रुव मुहूर्त व ध्रुव दिवस' यांचा उल्लेख या ठिकाणीं आहे. चल मुहूर्त व चल दिवस गृहप्रवेशाला योग्य नव्हे. तशा वेळीं गृहप्रवेश केला तर फार दिवस त्या घरांत राहतां येत नाहीं. ध्रुव मुहूर्तावर व ध्रुव दिवसाला जर गृह-प्रवेश केला, तर त्या घरांत दीर्घ काळ राहणें शक्य होतें, असा भाव येथें दिसत आहे.

ध्रुव दिवशीं ध्रुव मुहूर्तावर गृहप्रवेश करावा, असा याचा आशय दिसतो.

## कुंकू

स्त्रियांच्या कपाळावर कुंकवाचा तिलक लावीत असत, असें पुढील वचनावरून दिसतें—

'त्या वनामध्यें एक मोठा वानर सीतेनें पाहिला. तेव्हां ती भ्याली व तिनें रामाला कवटाळून धरलें.' रामानेंहि त्या वानरास भय दाखवून हांकून लावलें. या धांदलीमध्यें—

**मनःशिलायास्तिलकः सीतायाः सोऽथ वक्षसि ।**
**समदृश्यत संक्रान्तो रामस्य विपुलौजसः     २४**

(अयोध्या. सर्ग ९६)

'सीतेच्या मस्तकावर लावलेला मनःशिलेचा लाल तिलक तिनें जेव्हां आपलें मस्तक रामाच्या छातीवर ठेवलें, तेव्हां तो तिलक रामाच्या छातीवर बरोबर मध्यावर उमटला.' तें पाहून सीतेला हंसूं आलें.

यावरून स्त्रियांना नेहमीं नसलें, तरी केव्हां केव्हां कुंकूं लावलें जात असे असें वाटतें. कदाचित् प्रति दिवशींहि लावीत असतील, पण प्रत्येक दिवशीं लावित

असल्याचा उल्लेख सांपडत नाहीं. पुरुष अंगावर चंदन लावीत असत. पण स्त्रिया कुंकू प्रति दिवशीं सौभाग्यचिन्ह म्हणून लावीत असत कीं काय, याचा शोध व्हावयास पाहिजे.

## क्षत्रियांना प्रायोपवेशनाचा अधिकार नाहीं

किं मां भरत कुर्वाणं तात प्रत्युपवेक्ष्यसे १६
ब्राह्मणो ह्येकपार्श्वेन नरान् रोद्धुमिहार्हति ।
न तु मूर्धाभिषिक्तानां विधिः प्रत्युपवेशने १७

( अयोध्या. सर्ग ११२ )

राम म्हणतो-'बा भरता! मी कोणता अपराध केला म्हणून तूं हें येथें प्रायोपवेशन करणार आहेस ? हा प्रायोपवेशन करण्याचा अधिकार ब्राह्मणांना आहे. हा अधिकार क्षत्रियांना नाहीं. क्षत्रियांनीं प्रायोपवेशन करूं नये.'

## भरताबरोबर कुत्रे

केकय देशांतून आजोबांचा निरोप घेऊन भरत निघाला. त्याबरोबर दिलेले नजराणे हे होते-

तस्मै हस्त्युत्तमांश्चित्रान् कम्बलानजिनानि च ।
सत्कृत्य केकयो राजा भरताय ददौ धनम् १९
अन्तःपुरेऽतिसंवृद्धान् व्याघ्रवीर्यबलोपमान् ।
दंष्ट्रायुक्तान् महाकायाञ्शुनश्चोपायनं ददौ २०
रुक्मनिष्कसहस्त्रे द्वे षोडशाश्वशतानि च ।

( अयोध्या. सर्ग ७० )

'केकय राजानें भरताबरोबर उत्तम हत्ती, उत्तम लोंकरीचीं वस्त्रें, सिंहव्याघ्रांचीं चर्में, अन्तःपुरांत वाढवलेले मोठे वाघासारखे बलिष्ठ कुत्रे, सोन्याच्या दोन हजार मोहोरा, सोळाशें घोडे, इतकें सर्व भरताबरोबर दिलें.'

यांत भयंकर कुत्रे व लोंकरीचीं वस्त्रें हीं सीमा-प्रांतांतील बहुमूल्य वस्तूंपैकीं आहेत. मण्डलचक्र असलेले रथही दिले होते. (२९) चारचाकी रथाला फिरविण्यासाठीं

मध्यें जें चक्र असतें, यावर रथाचीं पुढील चाकें हवीं तिकडे फिरूं शकतात, याला 'मण्डलचक्र' असें म्हणतात. खेचरें व उंट हेही या प्रांतांतील विशेष होत.

## सैन्याची शिस्त

**तूर्णं त्वमुत्थाय सुमन्त्र गच्छ बलस्य योगाय बलप्रधानान् ।**

( अयोध्याकाण्ड, सर्ग ९२।३० )

'हे सुमंत्रा! तूं लवकर जा व सैन्याच्या अधिकाऱ्यांना सांग कीं सैन्य शिस्ती-मध्यें उभें करा.'

**'बलस्य योगः'** याचा अर्थ 'सैन्य जुळवून शिस्तींत उभें करणें' असा आहे.

## जाबालीचें मत व त्याचें खंडन

(अयोध्या. स. ११०-१११)

जाबाली ऋषीनें नास्तिकासारखें मत प्रतिपादन केलें, त्याचें खंडनही रामानें केलें. हा विषय अयोध्याकांडांत अ. ११०-१११ मध्यें प्रत्यक्ष पाहण्यारखा आहे. यावरून श्रीरामचन्द्र हा वैदिक धर्मरक्षणासाठीं किती यत्न करीत होता, तें कळून येईल. श्रीरामाचें सर्व आयुष्यच या कामासाठीं होतें, म्हणूनच त्यास अवतार म्हटलें गेलें. **'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि'** (गीता) हें येथें सार्थ दिसतें.

याप्रमाणें अयोध्याकाण्ड उत्तरार्धाचें निरीक्षण येथें समाप्त झालें.




ध.